मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीची पुस्तकमाला.

पुस्तक ६२ वें.

# आजपासून पन्नास वर्षांनीं !

आंग्ल कादंबरीकर्त्री ' जेन ऑस्टिन ' यांच्या

' प्राइड ॲन्ड प्रेजुडिस ' या कादंबरीचें रूपांतर.

श्रीयुत कृष्णाजी केशव गोखले,

सबजज्ज—जत,

यांनीं लिहिलें.

प्रकाशक

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी,

गिरगांव—मुंबई.

किंमत १—४—०.] सर्व हक्क स्वाधीन. [१९१३.



माझे परमपूज्य वडील

## तीर्थरूप रा. रा. केशवराव जनार्दन

ऊर्फ

# आबासाहेब गोखले

पूर्वी असिस्टंट इंजिनीयर, व हल्लीं पेनशनर

यांच्या चरणीं

**ही लहानशी कृति प्रेमपूर्वक**

**अर्पण केली असे.**

कृ. के. गोखले.



# अनुक्रमणिका.

# प्रकाशकांचे दोन शब्द.

मनोरंजक ग्रंथ प्रसारक मंडळीच्या पुस्तकमालेंतील ६१ वें पुस्तक '**प्राइड ॲन्ड प्रेज्युडेस**' वरून लिहिलेलें श्रीयुत गोपाळ चिमणाजी भाटे यांचें '**विचारविलसित**' नाटक असून, प्रस्तुतचें ६२ वें पुस्तकहि त्याच इंग्रजी कादंबरीचें रूपांतर असल्यामुळें खुलाशाकरितां येथें दोन शब्द लिहिणें जरूर आहे.

इंग्रजी वाङ्मयांतील कादंबरी या सदरामध्यें 'प्राइड ॲंड प्रेजुडिस' हें एक अत्यंत देदीप्यमान व फार मोलाचें रत्न आहे. त्याचें रूपांतर मराठींत कोणत्या तरी रूपानें यावें, अशी प्रबळ इच्छा आम्हाला अनेक वेळां होऊन त्या हेतूनें निरनिराळ्या वेळीं तीनचार प्रयत्न करण्यांत आले; पण ते समाधानकारक न वठल्यामुळें नाइलाजानें तो नाद सोडून द्यावा लागला. पुढें गेल्यावर्षी या कादंबरीला नाटकाचा पेहराव चढविलेलें 'विचार-विलसित' प्रसिद्ध करून मूळ कादंबरीची महाराष्ट्रवाचकांनां गोडी लावून देण्याचा व तद्वारा इंग्लिश समाजाची व रीतिरिवाजांची त्यांनां माहिती करून देण्याचा जो आमचा पुष्कळ वर्षांचा हेतु, तो बऱ्याच अंशीं पूर्ण करण्यास आम्ही समर्थ झालों.

परंतु नाटकापेक्षां कादंबरीचें क्षेत्र साहाजिकपणेंच अधिक व्यापक असतें. जरी नाटक व कादंबरी दोन्ही आपापल्यापरी वाचकांचें मनो-रंजन करण्यास समर्थ आहेत, तरी कादंबरीची मर्यादा अधिक विस्तीर्ण असल्यामुळें तिच्यांत विविध प्रसंगांचें संकलन अधिक होतें, व कथा-सूत्राचा संबंध लावण्यास वाचकाला आपल्या कल्पनाशक्तीवर फारसें अवलंबून रहावें लागत नाहीं. नाटकांत सूचक प्रकार अधिक येतात, परंतु त्यांचें कादंबरीमध्यें विस्तारपूर्वक यथातथ विवेचन येतें.

जरी आम्हीं 'प्राइड ॲंड प्रेजुडिस' या कादंबरीचें नाटकरूपानें रूपांतर प्रसिद्ध केलें आहे. तरी वरील कारणाकरितां मूळ कादंबरीची योग्यता जिच्यामुळें वाचकांच्या निदर्शनाला अधिक चांगल्या रीतीनें येईल, अशी प्रस्तुतची

‘ **आजपासून पन्नास वर्षांनीं !**’ ही कादंबरी प्रसिद्ध करीत आहों. या कादंबरीमुळें मराठी भाषेंत एका चांगल्या कादंबरीची भर पडली, असें आमच्या प्रिय वाचकांनां वाटेल, अशी आम्हाला उमेद आहे.

मूळ कादंबरींत रूपांतरकारांनीं अनेक ठिकाणीं प्रसंगानुसार आपल्या पदरची भर टाकली आहे, आणि कांहीं स्थळीं संविधानकांतहि थोडा फरक केला आहे; पण त्यामुळें मुळांतील स्वारस्याला मुळींच धक्का बसला नसून उलट थोडी जास्तच गोडी आलेली आहे, असें मूळ कादंबरीच्याहि भक्तांनां वाटेल असें आम्हाला वाटतें.

प्रथमतः हें रूपांतर तयार करतांना त्यापासून कॉलेजच्या विद्यार्थ्यांनां कांहीं मदत व्हावी, असा जरी हेतु मनांत धरलेला नव्हता, तरी ‘ प्राइड अँड प्रेजुडिस ’ मधील अनेक खुबीदार प्रसंग समजण्यास प्रस्तुतचें रूपांतर फार उपयोगी पडण्यासारखें झालें आहे. प्रकरणशः रूपांतर असल्यामुळें आधीं मराठींत प्रकरण वाचून नंतर जर इंग्रजी प्रकरण विद्यार्थी वाचतील, तर त्यांनां अतिशय मदत होणार आहे. अशा विद्यार्थ्यांच्या उपयोगाकरितां पुस्तकाबरोबर इंग्लिश नांवांच्या समान मराठी नांवांची यादी मुद्दाम दिली आहे.

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीचें कार्यालय, गिरगांव—मुंबई, ता. १।५।१३.

**का. र. मित्र,**
व्यवस्थापक.

# प्रस्तावना.

सन १८८६ सालीं पी. ई. च्या परीक्षेकरितां ' प्राइड अँड प्रेजुडिस ' हें पुस्तक नेमलें असतां, प्रथम त्याची व माझी ओळख झाली, व वुइल्सन कॉलेजांतील प्रो. ग्रीव्ह व नंतर फर्ग्युसन कॉलेजांतील प्रो. वासुदेवराव केळकर यांच्या मार्फत त्या पुस्तकाची खरी योग्यता मला समजूं लागली. पुढें कर्मधर्मसंयोगानें परीक्षेचा अभ्यास चालू ठेवणें मला अशक्य झालें, तरी 'प्राइड अँड प्रेजुडिस'ची मला जी गोडी एकदां लागून राहिली, ती दिवसेंदिवस वाढतच गेली, व गेल्या २५ वर्षांत ती कादंबरी सदोदित माझ्यापुढें राहून नाना प्रकारें माझी तिजवरची भक्ति दृढ होऊन राहिली. या काळांत सदर कादंबरीचीं मजकडून शेंदोनशें वेळां तरी पारायणें खास झालीं असलीं पाहिजेत. मजप्रमाणेंच सदर कादंबरीचे आणखी कांहीं भक्त मला आपल्या समाजांत दृष्टीला पडले. सर वॉल्टर स्कॉटसारख्या प्रख्यात कादंबरीकारालाहि जिनें चटका लावून "निदान तीन वेळां तरी" पारायण करावयाला लाविलें, व त्याच्या उतारवयांत नेहमीं त्याच्या उशापायथ्याशीं रहाण्याचा मान जिनें मिळविला, ती कादंबरी मजसारख्या वाचकांनां वेडें करून सोडण्यापर्यंत समर्थ झाली असल्यास नवल काय?

अशा अनुपम रसानें भरलेल्या कादंबरीचा आस्वाद आकंठ सेवून झाल्यानंतर, तिची ओळख जेवढ्या पुष्कळ माणसांनां होईल तितकी जास्त श्रेयस्कर आहे, असा विचार मनांत येणें साहजिकच होतें, व कित्येक वर्षेंपर्यंत 'प्राइड अँड प्रेजुडिस'चें रूपांतर आपल्या भाषेंत झालेलें दिसेल तर फार बहार होईल, असें मला वाटत असे; परंतु ती आशा सफळ होण्याचें चिन्ह दिसेना. प्रिन्सिपाल सेल्बीसाहेब यांच्या शिफारशीवरून डेक्कन व्हर्नॅक्युलर ट्रॅन्स्लेशन सोसायटीकरितां प्रो. आबासाहेब काथवटे हे रूपांतर करणार आहेत, असें मध्यंतरीं ऐकण्यांत आलें होतें, व आबासाहेबांसारख्या कुशल व सहृदय विद्वानाकडून तें काम उत्कृष्टपणें पार पडेल अशी खात्रीहि वाटत होती. पण आबासाहेबांच्या हातून सुरुवातहि न होतां ते परलोकवासी झाल्यामुळें पुनः निराशा झाली, व अखेरीला मनांत अशी प्रेरणा उत्पन्न होऊं लागली, कीं, मुळींच रूपांतर न होण्यापेक्षां आपल्यासारख्याच्याकडून

जरी एकवार मराठीमध्यें सदरहु कादंबरी निवळ मराठी जाणणाऱ्या बंधु-भगिनींनां उपलब्ध होईल, तरी फार बरें होईल. ही प्रेरणा दिवसेंदिवस बळावत गेली, व अखेर सन १९११ च्या प्रारंभीं मीं भीतभीत सुरुवात करून कांहीं महिन्यांनीं तें काम संपूर्ण केलें. ही बातमी माझे मित्र श्रीयुत वासुदेव गोविंद आपटे यांनां समजतांच त्यांनीं मला श्रयुित चिपळुण-करांच्या ' दर्पदर्पणा ' चीं प्रुफें पाहिल्याचें कळविलें, आणि नंतर कांहीं महिन्यांनीं माझें रूपांतर श्रीयुत काशीनाथपंत मित्र यांजकडे मी घेऊन गेलों असतां, त्यांनीं श्रीयुत भाटे यांच्या 'विचारविलसिता'ची हकीगत मला कळविली. अशा तऱ्हेनें जेथें मुळींच आशा दिसत नव्हती, तेथें एकसमयावच्छेदेंकरून तीन निरनिराळ्या गृहस्थांकडून तीन प्रयत्न व्हावेत, व तीन्हीहि प्रकाशित व्हावेत, ही गोष्ट 'प्राइड ॲंड प्रेजुडिस'च्या कोणच्याहि भक्ताला आनंदकारक होईल, हें कोणीहि सांगेल.

प्रस्तुतचें रूपांतर करतांना कोणच्या गोष्टी गृहीत ह्मणून धरल्या आहेत, व एकंदर रूपांतर कोणत्या धोरणावर केलें आहे, त्याचें विस्तृत दिग्दर्शन तिसऱ्या प्रकरणांत स्पष्टपणें येईल, ह्मणून येथें त्याबद्दल जास्त लिहिण्याचें कारण नाहीं. मुळांतील चॅप्टर्स २–३–४–५ यांतील मजकूर रूपांतरांतील २–४–५ या प्रकरणांत संगृहीत करून तिसरें प्रकरण हें पुष्कळ अंशीं प्रस्तावनेदाखल स्वतंत्र असेंच लिहिलें आहे. प्रस्तावना वाचण्याचा कंटाळा करणाऱ्या वाचकांनां विशेष विनंति आहे, कीं, तें प्रकरण त्यांनीं न सोडतां मुद्दाम काळजीनें वाचावें, ह्मणजे पुढचीं प्रकरणें त्यांनां नीटपणें सहज समजतील. बाकीचीं सर्व प्रकरणें जशींच्या तशीं रूपांतरांत ठेविलेलीं आहेत. मूळ पुस्तकांतलि मजकुरावर माझें इतकें प्रेम आहे, कीं, त्यामध्यें विनाकारण ढवळाढवळ करणें महापातक आहे असें मला वाटतें. केवळ मराठी वाचकांनां जें अगदींच चमत्कारिक लागलें असतें, तेवढेंच बदलून त्याऐवजीं त्यांनां पटेल असा मजकूर होतांहोईतो मुळांतलें स्वारस्य न जाऊं देतां घालण्याचा मीं प्रयत्न केला आहे. त्याचप्रमाणें मुळांतलि पांचव्या नंबरची मुलगी लिडिआ हिला रूपांतरांत चौथ्या नंबरची ( सुंदरी ) करण्या-पलीकडे जास्त बदल कोणत्याहि महत्त्वाच्या पात्रांत केला नाहीं, व हा नंबर बदलण्याचा हेतु सहृदय वाचकांनां कळून येण्यास अडचण पडणार नाहीं.

प्रस्तुत रूपांतरांत प्रौढविवाह व मिश्रसमाजपद्धति यांची ठिक-ठिकाणीं जोराची तरफदारी केलेली दिसून येईल, किंबहुना असें ह्मटलें असतां चालेल, कीं, सदरहु गोष्टी या रूपांतराचा आत्माच आहेत.

सदरील दोन्ही गोष्टी आमच्या समाजामध्यें जितक्या लवकर येतील, तो महाभाग्याचा दिवस समजावा, व तो दिवस फारतर आजपासून पन्नास वर्षांच्या अगोदरच उगवलेला दिसेल, अशी प्रस्तुत लेखकाची श्रद्धा आहे. अठराव्या शतकाच्या अखेरीला जी समाजपद्धति इंग्लंडमध्यें सररहा चालू होती, ती विसाव्या शतकाच्या अव्वलीलासुद्धां हिंदुस्थानाला शंभर वर्षांच्या पाश्चात्य शिक्षणानंतरहि लाभू नये, ही दुर्दैवाची गोष्ट समजली पाहिजे ! व '**आजपासून पन्नास वर्षांनीं**' तरी तो लाभ हिंदी समाजाला झालेला दिसो, एवढ्याच इच्छेनें कांहीं सन्मान्य मित्रांच्या सूचनेवरून प्रस्तुतचें नांव मीं आपल्या रूपांतराला दिलें आहे. प्रौढाविवाह व मिश्रसमाजपद्धति प्रचलित झाली असतां, स्त्रियांवर हरएक बाबतींत हल्लींपेक्षां जास्त जबाबदारी येऊन पडणार आहे, हें उघड आहे. ती जबाबदारी संभाळण्याकरितां प्रौढ कुमारिकांनीं कोणची खबरदारी घेणें अवश्य आहे, ती पृष्ठें ३२२–२३ व ३६६–६७ यांत स्पष्ट करून दाखविलेली आहे. आणखीहि कोठेंकोठें कमीअधिक महत्त्वाचे फेर-फार केले आहेत, व कित्येक ठिकाणीं पदरचा मजकूर कमीअधिक प्रमाणानें घातलेला वाचकांच्या नजरेला येईल; परंतु त्यामुळें रसपरिपोष जरी माझ्या हेतूप्रमाणें झाला नसला, तरी निदान रसहानि तरी झाली नसल्याचें वाचकांनां आढळून येईल अशी उमेद आहे. हीं सर्व स्थळें येथें नमूद करण्या-पेक्षां वाचकांनींच तीं शोधून काढावीं, हें बरें वाटल्यामुळें तसें करीत नाहीं.

आणखी एका गोष्टीचा विचार येथें थोडक्यांत करणें जरूर आहे. सर **वाल्टर स्कॉट** सारख्या प्रख्यात कादंबरीकाराला 'प्राइड अँड प्रेजुडिस' अनेकदां वाचण्याची लालसा व्हावी, असें त्या कादंबरींत आहे तरी काय? असा प्रश्न सामान्य वाचकांनां पडणें साहजिक आहे. जेन ऑस्टिनसारखी मुलगी आपल्या वयाच्या केवळ एकविसाव्या वर्षीं 'प्राइड अँड प्रेजुडिस' नांवाची कादंबरी लिहिते, व ती कादंबरी पंधरा वर्षें जशीच्या तशीच तिच्या कपाटांत पडून राहिल्यानंतर ती छापली जाऊन हजारों लोकांनां इतका चटका लावून सोडते, कीं, तेव्हांपासून आज शंभर वर्षें होऊन गेलीं असूनहि सदर कादंबरीच्या दरसाल हजारों प्रति खपल्या जात आहेत, हा काय चमत्कार आहे ! या कादंबरीनंतर जेन ऑस्टिननें आपल्या बेचाळिसाव्या वर्षीं मृत्यु येईपर्यंत दुसऱ्या पांच कादंबऱ्या प्रसिद्ध केल्या.

पण 'प्राइड अँड प्रेजुडिस'ची सर एकीलाहि येऊं शकली नाहीं. एकट्या 'प्राइड अँड प्रेजुडिस'वरून जेन ऑस्टिनला कित्येक थोर विद्वानांनीं खुद्द शेक्सपीअरच्या पंक्तीला नेऊन बसविली आहे. याचें इंगित तरी काय ? या प्रश्नाचें उत्तर थोडक्यांत देणें कठिण आहे. सर वॉल्टर स्कॉटच्याच शब्दांनीं असें सांगतां येईल, कीं, "जेन ऑस्टिनला संसारांत नेहमीं दृष्टीला पडणाऱ्या साधारण मनुष्यांच्या स्वभावांचें, त्यांच्या मनोवृत्तींचें व त्या संसारांतील गुंतागुंतींचें हुबेहूब चित्र रेखाटण्याची हातोटी इतकी विलक्षण साधली आहे, कीं, तशा प्रकारची कला मीं आजन्मांत पाहिली नाहीं !" पण एवढ्यानेंच मनाचें समाधान होऊं शकते नाहीं. जेन ऑस्टिनच्या वेळीं जीं माणसें कादंबरीकार म्हणून प्रसिद्ध असत, त्यांच्यापेक्षां जेन ऑस्टिन-मध्यें वर सांगितलेला गुण विशेष दिसून आला, हें जरी खरें असलें, तरी अलीकडे शंभर वर्षांत बहुतेक कादंबरीकार तिच्या साध्या वळणावर कादंबऱ्या लिहीत असूनहि अजून जेन ऑस्टिनची छाप कायम असलेली दिसते, याचें इंगित कांहींतरी निराळेंच आहे. 'प्राइड अँड प्रेजुडिस' या कादंबरीचें सूक्ष्म तऱ्हेनें पृथक्करण करून पाहिलें, तर सर वॉल्टर स्कॉट म्हणतो, त्याप्रमाणें त्यांत अद्भुत अथवा असाधारण असें कांहीं नाहीं. इतकेंच नसून, त्यांत नेहमीं कादंबरींतून आढळण्यांत येणारे प्रसंगहि फारसे नाहींत. संविधानकांत लढाया, कारस्थानें, प्रवास अथवा स्थलवर्णनें, अपघात, खून वगैरे प्रकारहि मुळींच नाहींत. किंबहुना मोठ्या शहरांतील घडामोडी बिलकूल नसून खेडेगांवांत रहाणाऱ्या दोनचार साध्या कुटुंबांची रोजची हकीगत मुख्यत्वेंकरून संविधानकांत आहे. विशेष प्रकार जो आहे, तो इतकाच, कीं, बहुतेक सर्व पात्रें जरी इतर तऱ्हांनीं शहाणींसुरतीं व हुशार आहेत, तरी प्रत्येकांत एक विवक्षित प्रकारचा अचरटपणा अत्यंत शिताफीनें दाखविलेला आहे. ज्यालात्याला आपण अत्यंत धूर्त व हुशार आहों अशी जरी घमेंड आहे, तरी प्रत्येकाच्या अंगचा अचरटपणा वाच-कांनां फारच मार्मिक तऱ्हेनें दाखवून दिलेला आहे. आनंदराव व सीताबाई, रावबहादुर आठवले व त्यांची पत्नी, कमलिनी व आनंदरावांच्या बहुतेक मुली, भाऊसाहेब, भय्यासाहेब व बंडोपंत, माईसाहेब व नीलकंठराव आणि नागेशराव गोडबोले ही सर्व मंडळी अत्यंत सूक्ष्म प्रमाणापासून तों अत्यंत दीर्घ प्रमाणापर्यंत अचरट आहेत. विशेषेंकरून सीताबाई व नीलकंठराव यांची जेथेंजेथें भेट होते, तेथेंतेथें तर अचरटपणाचा कळसच होत असतो. हा सर्व अचरटपणा पाहून वाचकांनां अत्यंत

हृदयंगम अशी मौज वाटूं लागते. इंग्रजींत ज्याला Subtle humour ह्मणजे अत्यंत सूक्ष्म तऱ्हेचा हास्यविनोद ह्मणतात, त्याचीं उदाहरणें या पुस्तकांत पदोपदीं दृष्टीला पडतात, व जों जों वाचक वाचीत जातो, तों तों ते प्रसंग नव्या नव्या ठिकाणीं अनुभवाला येऊं लागतात. बाष्कळ कोटी अथवा शब्दश्लेष बहुतेक कोठेंहि नसून वर सांगितलेल्या सटल्‌ह्यूमर-पासून पराकाष्ठेचें हंसूं लोटतें. मात्र तो विनोद स्पष्टपणें लक्ष्यांत आला पाहिजे, अथवा कोणींतरी एकदां समजावून दिला पाहिजे. प्रत्येकाचा विशिष्ट अचरटपणा समजूं लागला म्हणजे जास्तजास्त आनंद वाटत जातो, व असा अचरटपणा ओळखण्याची हतोटी एकदां साधली, म्हणजे वाचक आपल्याभोंवतीं लक्ष्य टाकून तेथेंहि तसा अचरटपणा सांपडतो कीं काय, तें सहजच शोधूं लागतो; आणि आपल्याभोंवतीं—किंबहुना प्रसंगविशेषीं आपणां स्वतःच्याहि अंगीं—नानाप्रकारचा अचरटपणा भरलेला ओळखूं आला, ह्मणजे जेन ऑस्टिनची खरी किंमत वाचकाला पटत जाते, आणि तो तिचा भक्त बनून जातो. असो.

ही प्रस्तावना संपविण्यापूर्वीं श्रीयुत काशीनाथपंत मित्र यांनीं हा तिसरा प्रयत्न प्रकाशित केल्याबद्दल त्यांचे मनापासून आभार मानणें जरूर आहे. त्याचप्रमाणें माझे मित्र जत येथील मराठे रहिवासी श्रीयुत आनंदराव देशमुख अजरेकर, इनामदार सिंदूर, यांनीं मला वेळोवेळीं मार्मिक सूचना केल्या त्यांचे, आणि ज्यांच्या महनीय छत्राखालीं ग्रंथलेखनाला प्रोत्साहन मिळण्याइतकें मनःस्वास्थ्य मला मिळणें शक्य झालें, त्या श्रीमंत जत संस्थानाधिपतींचे व स्टेटकारभारी रा. ब. तिरोडकर यांचेहि मी अत्यंत आभार मानितों. सरतेशेवटीं सच्चिदानंद प्रभूच्या कृपाप्रसादानें आज पंचवीस वर्षें मनांत घोळत असलेला हेतु तडीला गेला, त्याच्या चरणीं लीन होऊन वाचकांची रजा घेतों.

जत, ११ एप्रिल १९१३ — कृ. के. गोखले.

वसंत केशव चिटणीस.

## या कादंबरीतील पात्रांची यादी.

हें रूपांतर मूळ कादंबरीशीं ताडून पाहूं इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांकरितां पुढील यादी मुद्दाम दिली आहेः—

**मिस्तर बेनेट**—आनंदराव नगरकर.
**मिसेस बेनेट**—सीताबाई नगरकर.
**जेन**—शांता. (वय २१.)
**एलिजाबेथ**—तारा. ( ,, १९.)
**मेरि**—मथुरी. ( ,, १८.)
**लिडिआ**—सुंदर. ( ,, १६.)
**कॅथरीन (किटि)**—हिरी. ( ,, १४.)
**मिस्तर डार्सी**—भय्यासाहेब (कृष्णराव) बिनिवाले.
**मिस्तर बिंगले**—भाऊसाहेब (चिंतामणराव) भावे.
**मिस्तर हर्स्ट**—चंडोपंत आपटे.
**मिसेस हर्स्ट**—इंदिराबाई आपटे.
**मिस् बिंगले**—कमलिनी भावे.
**सर वुइल्यम् लुकस**—रा. ब. आठवले.
**लेडि लुकस**—रावबहादुरीणबाई.
**मिस् शार्लट**—मालती.
**मिस् मराया**—शेवंती.
**मिस्तर कॉलिन्स**—नीलकंठराव राजगुरु.
**मिस्तर विखम्**—नागेशराव गोडबोले.
**मिस्तर फिलिप्स**—भागवत वकील.
**मिसेस फिलिप्स**—रमामावशी भागवत.
**मिस्तर गार्डनर**—वसंतराव केळकर.
**मिसेस गार्डनर**—शारदाबाई केळकर.
**कर्नल फिडज विल्यम्**—कॅप्टन बाळासाहेब.
**मिस् जॉर्जाना डार्सी**—सरलादेवी.
**लेडि कॅथरीन डी बरो**—श्री. मा. राणी माईसाहेब.

**मिस् डीबरो**—श्री. आक्कासाहेब.
**मिसेस लॅांग**—सारजाबाई.
**मिस् किंग**—द्वारका.
**कॅप्टन कार्टर**—कॅ. गोविंदराव.
**कर्नल फॉर्स्टर**—कर्नल फडके.
**मिसेस फॉर्स्टर**—नलिनीबाई फडके.
**मिस्तर डेनि**—दाणी.

---

## स्थळांची यादी.

**मेरिटन**—शिवदुर्ग.
**नेदर्फील्ड**—आनंदभुवन.
**लॅांगबोर्न**—शांतिसदन.
**लुकस् लॉज**—लूकाश्रम.
**हन्स्फर्ड**—सुवर्णपुर.
**पेंबर्ले**—दिलबहार.
**रोझिंग्ज**—नजरबाग.
**ब्रायटन्**—नगर.
**किंप्टन**—चणकापुर.
**लंडन**—मुंबई.
**लॅंबटन**—चटणी.
**ग्रेटनाग्रीन्**—गिरी.

---

# आजपासून पन्नास वर्षांनीं !

## प्रकरण पहिलें.

### काय पण पोरींचा लाट आहे !

लग्न या शब्दापासून मनांत उत्पन्न होणारी कल्पना इतकी मोहक आहे, कीं, लहानापासून थोरापर्यंत सर्वांनां ती अंतःकरणापासून अत्यंत प्रिय असते. मग ती तरुण व श्रीमंत अशा माणसांनां फारच मोहून टाकीत असली पाहिजे असा जो सर्व जगाचा दृढ समज असतो, त्यांत आश्चर्य काय ? एकादा श्रीमंत तरुण माणुस जर अविवाहित आढळला, तर तो केवळ त्याच्या मनासारखी मुलगी अजून त्याच्या नजरेस पडली नाहीं म्हणूनच लग्नाचा राहिला आहे, व तशी योग्य मुलगी मिळाल्याबरोबर तो ताबडतोब लग्न करून घेईल, अशी सर्वांची खात्री असते. असला मनुष्य एकाद्या गांवांत जाऊन राहिला आणि त्याचें अजून लग्न व्हायचें आहे असें जर समजलें, तर घरोघरीं मोठी चलबिचल सुरू होते, आणि ही शिकार कोणच्या मुलीच्या हातीं लागते, याविषयीं तर्क सुरू होतात. इतकेंच नाहीं, तर ती आपल्या हातीं लागावी म्हणून जारीनें खटपट करण्यासहि प्रारंभ होतो.

आनंदराव नगरकर यांच्या पत्नी सीताबाई एके दिवशीं त्यांनां म्हणाल्या "ऐकलं का, एकदांचं आनंदभुवन कुणींसं भाड्यानं ठरवून घेतलं !"

"मीं नाहीं तें ऐकलें," आनंदराव म्हणाले.

"हो, पण तें खरंच घेतलं !" सीताबाई म्हणाल्या. "कारण, आत्तां इतक्यांत सारजाबाई येऊन गेली, तिनं मला सारं सांगितलं."

आनंदराव कांहींच बोलले नाहींत. म्हणून सीताबाई पुनः मोठ्या उत्सुकतेनें म्हणाल्या "तें कुणीं घेतलं तें समजण्याची नाहीं का आपल्याला इच्छा?"

आनंदराव म्हणाले "आपल्या मनांतून सांगायचेंच आहे, तर ऐकायला आमची कांहीं हरकत नाहीं !"

एवढें उत्तेजन सीताबाईंनां रगड झालें. त्या लागलीच सांगूं लागल्या "वा, आपणाला नाहीं का माहीत ? सारजाबाई सांगत होती, कीं, ग्वाल्हेरी-कडच्या एका तरुण गर्भश्रीमंत गृहस्थानं आनंदभुवन घेतलं आहेन्. तो काल सोमवारीं एका मोठ्या मोटारमध्यें बसून आला, अन् त्याला तो बंगला इतका पसंत पडला, कीं, तो त्यानं ताबडतोब भाड्यानं घेऊनसुद्धां टाकला. तो लवकरच राहायला सुद्धां येणार आहे, अन् त्याचे चार नोकर तर उद्यां शनवारच्या आंत तिथें येणार आहेत."

"त्याचें नांव काय ?" आनंदरावांनीं विचारलें.

"चिंतामणराव ऊर्फ भाऊसाहेब भावे."

"त्याचें लग्न झालें कीं व्हायचें आहे ?"

"अहो, व्हायचं आहे, अलबत व्हायचं आहे ! अगदीं गर्भश्रीमंत, पंच-विशीच्या आंत, उत्पन्न चांगलं पंधरावीस हजारांचं आहे ! काय पण आपल्या पोरींचा लाट आहे !"

आनंदराव आश्चर्यानें म्हणाले "तो कसा बोवा ? त्यांचा काय संबंध ?"

"हें काय बरं विचारायचं ?" सीताबाई उत्तरल्या. "किती स्पष्ट करून सांगूं आणखी? आपल्या एकाद्या मुलीला त्यानं पत्करायची मी गोष्ट बोलतें आहें हो !"

आनंदराव म्हणाले "तसा का कांहीं हेतु आहे त्याचा, इकडे येऊन रहाण्यामध्यें ?"

सीताबाई म्हणाल्या "हेतु ? भलतंच कांहीं तरी ! हें काय बाई बोलावं? माझं आपलं म्हणणं असं, कीं, तसा पुष्कळ संभव आहे. अन् म्हणून तर मी म्हणतें, कीं, तो आल्याबरोबर आपण त्याला भेटायला अवश्य गेलं पाहिजे."

आनंदराव म्हणाले "मला नाहीं जरूर दिसत मींच जाण्याची. आपणच मुलींनां घेऊन जा म्हणजे झालें. अथवा हें पहा, नुसत्या त्यांनांच पाठवून द्या. तें तर फारच उत्तम. कारण, न जाणो, तुमचं तर स्वरूप इतकं अप्रतिम आहे, कीं, तुमच्या पुढें त्या त्याला अगदीं कुचकामाच्या वाटूं लागतील!"

सीताबाई ह्मणाल्या "ही आपली माझी उगीच स्तुति चालविली आहे ! आतां बरोबरीच्या माझ्या पांच मुली झाल्या, तर आतांतरी माझ्या सुंदरपणाचा गर्व नको का मला सोडायला ?"

# काय पण पोरींचा लाट आहे !

आनंदराव ह्मणाले " पण अशा वेळीं आधीं गर्व वाटायला फारसें रूप शिल्लक राहतें तरी कुठें ? "

" तें जाऊं द्या आतां, " सीताबाई म्हणाल्या. " आधीं मला सांगा, तो गृहस्थ येतांक्षणींच आपण जाणार ना त्याच्या भेटीला ? "

" आपण कांहीं वचन नाहीं देत बुवा! पाहूं, करूं विचार ! "

सीताबाई म्हणाल्या " पण आपल्या लेंकींकडे नको का पहायला ? पहा बरं एकीची कशी छान सोय लागून जाईल ती! आपले शेजारचे रावबहादुर कधीं फारसे कुणाकडे भेटायला न जाणारे, पण तेसुद्धां एवढ्याचकरतां अगदीं खास जाणार आहेत. छे छे, आपण अलबत् गेलंच पाहिजे, कारण,नाहींतर आह्मी कशा जाणार ? "

आनंदराव ह्मणाले " एवढी अडचण कशाला ? आपल्या भेटण्यापासून तो गृहस्थ फार खुष होईल. मी पाहिजे तर त्याला एक चिठी पाठवितों, कीं, माझ्या पोरींपैकीं जी त्याला आवडेल तिच्याशीं लग्नाचें ठरवायला माझी त्याला अगदीं सदर परवानगी आहे! बाकी, मी त्या चिठींत माझ्या तारीची विशेष स्तुति करीन."

सीताबाई ह्मणाल्या " छे छे, तसं कांहीं नका हो लिहूं ! बाकींच्यापेक्षां तारी मुळींच चांगली नाहीं. शांतीच्या निम्यानंसुद्धां सुरेख नाहीं, अथवा माझ्या सुंदरपेक्षां निम्यानंसुद्धां सुस्वभावाची नाहीं. पण इकडे आपली जिथें तिथें तारी तारी ! "

आनंदराव म्हणाले "तसेंच पाहिलें तर एकीमधेंहि कांहीं विशेष राम नाहीं. एकंदर पोरींप्रमाणें याहि अगदीं मूर्ख न् अज्ञानी आहेत. इतकेंच कीं, तारी जराशी त्यांतल्या त्यांत पाणीदार आहे. "

सीताबाई म्हणाल्या " ही काय बरं निंदा आपणच आपल्या लेंकरांची करावी ! पण मला असं चिडविण्यांत मोठं सुख वाटतं नाहीं आपल्याला ? अशानं माझं बाई डोकं कसं फिरायला लागतं. पण आपणाला कुठे त्याची परवा आहे ? "

आनंदराव ह्मणाले " छे छे, ही अगदीं चूक आहे आपली ! त्या आपल्या डोकें फिरण्याला मी फार मान देतों. त्याचा न् माझा फार जुना स्नेह आहे. आज निदान वीस वर्षें तरी त्याचे गुण मी आपल्या तोंडून ऐकतों आहें !"

सीताबाई म्हणाल्या " मला किती अशानं त्रास होतो त्याची कोणाला आहे का जाणीव ? "

आनंदराव म्हणाले " छे छे, आपण असा त्रास वाढून घेऊं नका. अजून कैक गर्भश्रीमंत या प्रांतांत राह्यला येणार आहेत, त्यांनां अजून तुह्मालाः भेटायचं आहे. तें करायला डोकं नको का शाबूत ठेवायला ? "

सीताबाई ह्मणाल्या " दहा नाहीं वीस तसे आले तरी आह्मांला काय उपयोग, आपण जर त्यांनां जाऊन भेटलां नाहीं तर ? "

आनंदराव म्हणाले "त्याची नको आपणाला काळजी. वीस जमले, कीं, मी मुळीं साऱ्यांनांच एकदम भेटून येईन ! "

आनंदराव ह्मणजे एक मोठी विचित्र व्यक्ति होती. त्यांच्या अंगीं उत्तम प्रकारची चलाख बुद्धि, एकाद्याच्या मनाला लागेल असा विनोद करण्याची शैली, वाटेल तेव्हां एकाएकीं धरसोड करण्याची हातोटी, वगैरे गुण ओत-प्रोत भरले होते. त्यांच्या मनांत नसलें म्हणजे कोणीं कितीहि प्रश्न विचारले तरी ते ते शिताफीनें चुकवून टाकीत असत. बायकोची चेष्टा करण्यांत तर अगदीं पहिला पाय. असा कांहीं विलक्षण स्वभाव त्यांचा होता, कीं, लग्नाला आतां पंचवीस वर्षें होऊन गेलीं होतीं, तरी सीताबाईनां अजून त्यांची पुरी पारख झाली नव्हती. सीताबाईचा मात्र स्वभाव सहज ओळखण्यासारखा होता. त्यांची बुद्धि अगदींच साधारण, माहिती अगदीं पूज्य, व तब्बेतीला तर ताळ ना तंत्र, अशी त्यांची स्थिति होती. पतिराजांनीं केलेला विनोद तर कैक वेळां त्यांनां कळतहि नसे. कशावरून नाखुष झाल्या, कीं, त्यांनां वाटे, कीं, आपलें डोकें फिरतें आहे. हल्लीं आपल्या मुलींचीं लग्नें होण्याची खटपट करणें, व त्याकरितां इकडे तिकडे भेटायला जाऊन नवीन नवीन बातम्या काढणें, एवढाच त्यांनां उद्योग होता. त्यांत त्या अगदीं चूर असत.

---

## प्रकरण दुसरें.

### भाऊसाहेबांचा परिचय.

आनंदभुवनांत चिंतामणराव राह्यला आल्याबरोबर त्यांनां भेटायला जे कांहीं लोक प्रथमप्रथम गेले, त्यांतच मुळीं आनंदराव हे एक होते. त्यांचा पहिल्या-पासूनच तेथें जाण्याचा हेतु होता; पण अगदीं अखेरपर्यंत आपण जाणार

नाहीं, असें ते बायकोला ह्मणत होते. आणि ते सकाळीं भेटून आले होते, तरी सुद्धां संध्याकाळपर्यंत त्यांनीं घरांत कोणालाच ती वार्ता कळविली नव्हती. आणि अखेर त्यांनीं ती बातमी घरांत दिली, तीहि मोठ्या चमत्कारिक व मजेदार तऱ्हेनें. त्यांची दुसरी मुलगी ताराबाई आपल्या गुलाबी पोलक्यावर कांहीं फीत लावीत दिवाणखान्यांत बसली होती, तिला उद्देशन. आनंदराव ह्मणाले " काय ग तारे, ही असली फीत आवडते का पण चिंतामणरावांनां ? "

सीताबाई व दुसऱ्या मुली तेथेंच होत्या. सीताबाई जरा चिडून एकदम म्हणतात " त्यांनां काय आवडतं तें आम्हांला कसं कळणार, आमचीन् त्यांची जर भेटच होत नाहीं तर ? "

ताराबाई म्हणाली " तें कां बरं आई, आपली न् त्यांची गांठ आत्तां आपल्या वार्षिक संमेलनाच्या वेळीं झालीच पाहिजे, हें नाहीं का तुझ्या लक्षांत आलं ? तेथें आपली ओळख करून देण्याचं सारजाबाईनीं कबूलसुद्धां केलं आहे . "

सीताबाई म्हणाल्या "मला नाहीं वाटत सारजाबाई तसं करतील असं ! त्यांच्या त्यांनां दोघी पुतण्या उजवायच्या आहेतच. सारजाबाई मोठ्या आपस्वार्थी अन् ढोंगी आहेत. माझं तर त्यांच्याविषयीं मुळींच चांगलं मत नाहीं!!"

आनंदराव म्हणाले " माझें सुद्धां नाहीं! म्हणूनच तुम्ही त्यांच्या भरंवशावर रहात नाहीं, हें तर फार चांगलें ! "

यावर सीताबाई कांहींच बोलल्या नाहींत. पण अगदीं स्वस्थ रहावेना म्हणून त्या एका मुलीवर ताशेरा झाडूं लागल्या " अशी खोक्खो खोकूं नको, हिरे ! जरा कृपा कर माझ्यावर अन् माझ्या या डोक्यावर ! तूं अगदीं त्याच्या चिंधड्याच उडवते आहेस ! "

आनंदराव म्हणाले " हिरीला बेटीला केव्हां खोकावें तें देखील समजत नाहीं ! भलत्याच वेळीं खोकत रहाते आपली ! "

हिरी तिरसटपणानें उद्गारली " मी काय आपल्या करमणुकीकरतां मुद्दाम खोकतें वाटतं ? "

आनंदरावांनीं तिकडे दुर्लक्ष करून मध्येंच विचारलें " कधीं आहे ग तारे, तें आपलें वार्षिक संमेलन ? "

ताराबाई म्हणाली " उद्यां पंधरादिशीं. "

यावर सीताबाई म्हणाल्या " हो खरंच ! अन् सारजाबाई गांवाला गेल्या आहेत त्या मुळीं अजून दहा बारा दिवस परत येणार आहेत कुठें ? मग त्या कशी आपली अन् चिंतामणरावांची ओळख करून देणार ? "

आनंदराव म्हणाले, " असें का ? तर मग तुम्हीच तिची अन् त्यांची ओळख करून द्या, म्हणजे झालें ! "

सीताबाई म्हणाल्या "अशक्य, अगदीं अशक्य! आमचीच आधीं ओळख होईना, तर म्हणे तुम्हीच तिची ओळख करा. असं कसं एकाद्याला अगदींच छळावं बाई ? "

आनंदराव म्हणाले " बरें, राहिलें आमचं बोलणें ! पण हें पहा, तुम्ही तिची ओळख चिंतामणरावांशीं नाहीं करून दिलीत, म्हणून ती काय झाल्याशिवाय राहते ? दुसरें कोणीतरी करून देईलच. तर मग मी म्हणतों, मी स्वतःच त्यांची न् तिची ओळख करून देईन, ह्मणजे ती माझे उपकार तरी मानील ! "

सर्व मुली वडिलांकडे आश्चर्यानें पाहूं लागल्या. सीताबाई फक्त " भलतंच कांहीं तरी ! " इतकेंच बोलल्या.

आनंदराव ह्मणाले " भलतेंच ? त्यांत काय भलतेंच आहे बुवा ? कसें काय ग मथुरे ! तूं मोठमोठे ग्रंथ वाचीत असतेस अन् उतारे उतरून घेत असतेस. तुझ्या वाचण्यांत आलें आहे का कांहीं यांतलें ? "

मथुरीची इच्छा यावर कांहींतरी फार सुंदरसें बोलावें, अशी होती; पण काय बोलावें तें तिला एकदम सुचेना. ती जुळवाजुळव करीत होती. इतक्यांत आनंदराव म्हणाले " मथुरी जरा डोक्यांत जुळवते आहे तोंवर आपण चिंतामणरावांविषयीं बोलूं या ! "

त्यामुळें चिडून जाऊन सीताबाई म्हणाल्या " मला बाई आतां अगदीं वीट आला त्या चिंतामणरावाचा ! "

आनंदराव म्हणाले " अरेरे, मला आतां फार वाईट वाटूं लागलें आहे ! पण मला आपण आधींच कां नाहीं बरें सांगून ठेवलेंत ? आज सकाळींच जर मला आपणाला वीट आल्याचें कळलें असतें, तर मी सकाळीं खासच नसतों गेलों त्यांनां भेटायला! छे छे, हें अगदीं गैर झालें! पण आतां कसें बरें करावें? मी तर सकाळींच त्यांनां भेटूनसुद्धां आलों. मग आतां तुमचा व त्यांचा परिचय कसा चुकणार ? "

हें ऐकून सगळ्याजणी आश्चर्यचकित झाल्या. आणि तोच तर मुळीं आनंदरावांचा हेतु होता. सीताबाईला तर सगळ्यांपेक्षां जास्त आश्चर्य वाटलें. तरी पण त्या आश्चर्याचा पहिला भर ओसरल्यावर त्या म्हणूं लागल्या " मीं पहिल्यापासून हें असं होणार असं ताडलंच होतं ! "

नंतर थोड्या वेळानें त्या आनंदरावांला म्हणाल्या " वाहवा, वाहवा ! आपण किती बरं ही उत्तम गोष्ट केलीत! मी आपल्याला तसं करायला मन वळवीन असं मला वाटतच होतं. माझी खात्रीच होती, कीं, आपलं प्रेम जर मुलींच्यावर इतकं रगड आहे, तर अशी उत्तम संधि आपण कशी बरं वायां दवडाल ? वा, किती तरी मला आतां बरं वाटतं आहे! अन् काय बाई मौज तरी, सकाळपासून आम्हांला एक शब्दसुद्धां नाहीं कळूं दिला अं ! "

आनंदराव ह्मणाले " हें पहा हिरे, तूं आतां हवी तेवढी खुशाल खोंक !"

इतकें ह्मणून बायकोची व पोरींची रगड मौज केली असें वाटून आनंदराव तेथून निघून गेले. ते जाऊन दार लागल्याबरोबर सीताबाई ह्मणाल्या " पहा बरं मुलींनों, किती उत्तम तुमचे वडील आहेत! या त्यांच्या श्रमाचा तुह्मी त्यांनां कधीं कसा मोबदला द्याल कोण जाणे. अन् तसंच ह्मटलं, तर माझ्याहि श्रमांचा. या आतां आमच्या वयामध्यें रोज नव्या नव्या ओळखी करीत बसणं आह्मांला कांहीं मोठंसं सुखावह नसतं. पण तुमच्याकरितां आह्मी काय वाटेल ते श्रम करायला सदा तयार असतों बरं ! माझ्या लाडके सुंद्रे, तूं जरी या तिघींच्याहून लहान आहेस, तरी तुझ्याकडेसुद्धां भाऊसाहेबांचं लक्ष जाईल बरं ! "

सुंद्री म्हणाली "अलबत्, मी ज़री त्यांच्याहून लहान आहें, तरी दिसायला मीच मोठी दिसतें !"

त्या दिवशीं बाकीचा वेळ त्या बायांनीं कल्पना करण्यांत घालविला. भाऊसाहेब आपल्या घरीं परत भेटीला केव्हां येतील, व त्यानंतर त्यांनां आपल्या घरीं मेजवानीला कधीं बोलवावें ? आनंदरावांपासून आणखी कांहीं विचारून घ्यावें असें अर्थात्च त्यांच्या मनांत फार होतें; पण ते मुळीं तेथून निघून गेले होते !

दुसऱ्या दिवशीं सीताबाईनीं आपल्या पांच मुलींच्याबरोबर आनंदरावांनां भाऊसाहेबांविषयीं माहिती काढण्याच्या हेतूनें अनेक प्रश्न विचारिले. पण समाधान होण्यासारखें असें कांहींच उत्तर त्यांच्याकडून त्यांनां मिळालें नाहीं.

त्यांनीं नाना तऱ्हेचे प्रयत्न केले, स्पष्ट प्रश्न विचारले, प्रत्यक्ष माहिती विचारली धूर्ततेनें अनेक कल्पना लढवून पाहिल्या, अथवा दुरून दुरून तर्क बांधून पाहिले, पण आनंदराव कसले खमंग? त्यांनीं दाद म्हणून लागूं दिली नाहीं ! म्हणून केवळ नाइलाजास्तव त्यांची शेजारीण रावबहादुरीणबाईनीं जी शिळी माहिती सांगितली, तीवरच त्यांनां कसेंबसें तात्पुरतें समाधान मानून घ्यावें लागलें. रावबहादुरीणबाईनीं सांगितलेली बातमी मात्र फारच पसंत होती. रावबहादुर तर भाऊसाहेबांवर अगदीं खुष होऊन आले होते. भाऊसाहेब अगदीं तरुण, गोरेमुर्के, विलक्षण सुस्वरूप व अत्यंत मनमिळाऊ असे होते. त्यांनां माणसांची भारी हौस, इतकी कीं, या गांवांत एकादा क्लब् आहे कीं नाहीं, असें त्यांनीं होऊन विचारलें, व आहे असें कळतांच त्यांनां फार समाधान वाटलें. इतकेंच नाहीं, तर लवकरच वार्षिक संमेलन होणार आहे असें समजतांच त्या संमेलनाच्या पूर्वींच क्लब्च्या मंडळींत सामील होण्याची त्यांनीं आपली इच्छा दर्शविली ! याहून आणखी गोड बातमी सध्यां काय असूं शकणार ? माणसांत मिळून मिसळून रहाण्याची इच्छा असली म्हणजे बरेंच काम झाल्यासारखें होय. केव्हां एकदां संमेलनाचा दिवस उगवतो, असें सीताबाईला झालें. सीताबाई आपल्या मनांत गोडशा कल्पना करूं लागल्या. " माझी जर एक मुलगी आनंदभुवनांत पडली, व बाकीच्या तसल्याच ठिकाणीं पडल्या, तर मग माझ्या बहुतेक इच्छा पुऱ्या झाल्यासारख्या होतील, " असे त्यांनीं स्पष्ट उद्गारसुद्धां काढून दाखविले.

थोड्याच दिवसांनीं भाऊसाहेब आनंदरावांच्या घरीं परत भेटीला आले, व सुमारें दहा मिनिटें ते लायब्ररीच्या खोलींत आनंदरावांशीं बोलत राहिले होते. त्यांनां फार आशा होती, कीं, आनंदरावांच्या तरुण मुली आपल्या नजरेस पडतील. कारण, इतके दिवसांत त्यांच्या स्वरूपाची वगैरे बातमी त्यांच्या कानीं गेलीच होती; पण त्यांनां फक्त आनंदरावच दृष्टीस पडले. बायांचें मात्र थोडेंसें पुढें पाऊल पडलें. कारण, त्यांनां एका वरच्या खिडकींतून एवढें तरी दिसलें, कीं, भाऊसाहेबांच्या अंगांत पारव्या रंगाचा कोट होता, व ते तेल्या रंगाच्या आरबी घोड्यावर बसून आले होते !

आतां आपल्या घरीं भाऊसाहेबांनां मेजवानीला कधीं बोलवावें, काय निमित्तानें बोलवावें, जेवणाचा बेत काय करावा, अशा विचारांत सीताबाई व मुली अगदीं दंग होऊन गेल्या होत्या; व आतां नक्की बेत करणार, तों सारजा-

बाईंनीं बातमी आणली, कीं, 'ते कालच मुंबईला गेलेसुद्धां. आणि सातआठ दिवस तिकडेच रहायचे आहेत !' सीताबाई फारच खट्टू झाल्या. " हें काय बाई, नुकते कुठें आले नाहींत तों इतक्यांत कसलं काम निघालं बाई मुंबईला ? अन् इथें चांगलं स्थिर रहावं तें असे उठल्या सुटल्या मुंबई पुण्याला हे पळूं लागले तर कसं व्हावं बाई ? "

अशा विवंचनेंत कांहीं दिवस गेल्यावर थोडीशी समाधानकारक बातमी उठली, कीं, ते मुंबईहून आपल्या माणसांनां आणायला गेले असतील. आणि पुढें लवकरच ती बातमी पक्की झाली, कीं, संमेलनाच्या आदले दिवशीं ते खास परत येताहेत. तेव्हां कुठें सीताबाईंचा जीव खालीं पडला !

---

# प्रकरण तिसरें.

## त्या काळची परिस्थिति.

शिवदुर्ग हा एक तालुक्याचा गांव होता. कृष्णेला जाऊन मिळणाऱ्या एका लहानशा नदीच्या कांठीं तो वसलेला होता. तेथून पुढें तीनचार मैलांवर त्या नदीचा कृष्णेशीं संगम होत असे. या नदीला शिवदुर्गाला नळ आणण्याकरितां धरण बांधलें होतें; त्यामुळें दोनतीन मैल नदीचें पात्र फार प्रेक्षणीय दिसत असे. नदीकांठीं एक टुमदार बगीचा होता, त्यांत शिवदुर्गाचा क्लब असे. एका सुंदर इमारतींत एक भव्य दिवाणखाना व वर्तमानपत्रें वगैरे वाचण्याकरितां खोली असे. दिवाणखान्यांत रोज मंडळी सवडीप्रमाणें सायंकाळीं जमून घटका दोन घटका हास्यविनोदांत घालवीत, अथवा सोंगट्या, बुदबळें, लाडिस, बिझिक, ब्रिज् वगैरे बैठे खेळ खेळत. एका कोंपऱ्यांत पिंगपाँगची तजवीज असे. इमारतीच्या सभोंवतीं मोकळा व्हरांडा असे, त्यांत आरामखुर्च्या टाकलेल्या असत. समोरच दोन उत्तम टेनिसकोर्टें होतीं. पलीकडे एक पत्र्याची उंच इमारत बांधून त्यांत बॅड्मिंग्टनचेंहि कोर्ट केलें होतें. अलीकडे नदींत नौकाविहारहि करण्याची सोय उत्तम झाली होती. दोन सिंगल बोटी व दोन मोठाल्या बोटी ( बार्जेस ) रावबहादुर आठवल्यांनीं आपल्याला पदवी मिळाल्याच्या स्मरणार्थ क्लबाला दिल्या होत्या. अशा तऱ्हेनें तें विश्रामस्थान फारच रम्य झालें होतें.

# आजपासून पन्नास वर्षांनीं !

आमच्या या कादंबरीचा काळ इसवी सन १९६० चा, म्हणजे आजपासून सुमारें पन्नास वर्षांनंतरचा आहे. या पन्नास वर्षांत आपल्या हिंदु समाजांत कांहीं अत्यंत महत्त्वाचे फेरफार होऊन गेले होते. इंग्रजी अंमल सुरू झाल्यापासून समाजसुधारकांनीं आपल्या समाजाची उन्नति होण्याकरितां जे दीर्घ प्रयत्न केले होते, त्यांनां हळुहळू फळें येऊं लागून अगदीं लहानपणीं लग्नें करून टाकण्याचें लोकांनां आवडेनासें झालें होतें. त्यांत प्लेगच्या भयंकर स्वरूपामुळें तरुण माणसांचें जीवित अत्यंत अशाश्वत होऊन गेलें; व १५ वर्षें होऊन गेलीं तरी प्लेगमहाराजांनीं आपलें प्रयाण करण्याचें चिन्ह न दाखविल्यामुळें होतांहोईलतोंवर मुलांमुलींचीं लग्नें पुढें पुढें ढकलण्यांत येऊं लागलीं होती. मुलांचें लग्नवय तर हां हां म्हणतां वीसबावीसपर्यंत सहज पुढें सरकलें. मुलींचें मात्र त्या मानानें पुढें सरकलें नव्हतें. कारण, ऋतुप्राप्तीची मर्यादा उघड उघड उल्लंघणें सामान्यजनांस फार कठीण वाटत होतें; परंतु परमेश्वराची कृपा असल्यावर काय होणार नाहीं ? ज्या त्याच्या अवकृपे (?) च्या योगानें प्लेगच्या द्वारें लोकमत येथवर तयार झालें होतें, त्यानेंच श्रीमंत सांगलीकरांसारख्यांच्या मनांत जबर प्रेरणा उत्पन्न केली, व त्यांनीं अत्यंत मनावर घेऊन ऋतुप्राप्तीच्या बागुलबोवाला आपल्या महाराष्ट्रांतील शास्त्रीपंडित वगैरे धर्मशास्त्रविशारद लोकांकडून अत्यंत सौम्य स्वरूप देऊन टाकलें. इतकेंच नव्हे, तर आपण स्वतः या नव्या शास्त्राधाराबरहुकूम आचरण करून लोकसमाजाला कित्ता घालून देण्याकरितां एका १८ वर्षांच्या सकलगुणसंपन्न युवतीचें स्वतः पाणिग्रहण करून जनतेकडून धन्य मानून घेतलें. अर्थात्च '**राजा कालस्य कारणं**' या न्यायानें यानंतर ऋतुप्राप्तीची फारशी आडकाठी न वाटणें साहजिक होतें. या एका सुधारणेमुळें दुसरेहि कांहीं अत्यंत इष्ट प्रकार समाजांत जारीनें चालू झाले. मुलींच्या लग्नाचें वय पुढें सरकल्याबरोबर त्यांनीं पितृगृहीं राहून वेळ कसा घालवावा, हा प्रश्न सहजच उपस्थित झाला; आणि अर्थात्च त्याचा योग्य असाच निकाल लागला, कीं, लग्न होईपर्यंत मुलांप्रमाणें मुलींनांहि शिक्षण देण्याची जबाबदारी आईबापांवरच आहे. मुली जसजशा मोठ्या होऊं लागल्या, तसतसें त्यांनां घरच्या घरीं शिक्षण देण्याचें अशक्य होऊं लागलें, व त्यामुळें त्यांनां मुलींच्या शाळेंत पाठविल्यावांचून इलाजच नाहींसा झाला. यामुळें कन्याशाळांची स्थिति फारच सुधारली. तेथें आतां पुरुष शिक्षक ठेवणें

हरएक कारणामुळें अनिष्ट वाटूं लागल्यामुळें स्त्रीशिक्षकिणींची फार गरज भासूं लागली. पुरुषशिक्षकांच्या दुप्पट पगार देऊनहि योग्य व लायक स्त्रीशिक्षक मिळेनात, ह्मणून गरीबगुरीब पुरुषशिक्षकांनीं स्वतः आपल्या स्त्रियांना शिक्षण देऊन स्त्रीशिक्षक बनवून सोडलें. गरीब विधवा स्त्रियांनांहि अब्रूनें पोट भरण्याचें एक नवीनच साधन झालें. सेवासदनासारख्या संस्था हरएक शहरांत अस्तित्वांत आल्या. अनाथबालिकाश्रमांतून तयार झालेल्या विधवा स्त्रियांनांहि निर्वाह करण्याचें फार सोपें पडूं लागलें. याप्रमाणें स्त्रीशिक्षणाचें पाऊल बरेंच झपाट्यानें पुढें पडूं लागलें. उपवर मुलींच्या इतर गुणांबरोबर त्यांच्या शिक्षणाचीहि चौकशी होऊं लागली. हें शिक्षण निवळ पुस्तकी नसून सर्वांगसुंदर असें बनविण्याचा समाजाच्या अग्रणींनीं मनापासून प्रयत्न केला, व त्यांना पुष्कळसें यशहि आलें. स्त्रीशिक्षणांत निवळ वाचनलेखनाचा समावेश होत नसून इतर बऱ्याच गोष्टींचा अंतर्भाव त्यांत होऊं लागला, व कुटुंबाकुटुंबांच्या सांपत्तिक स्थितीप्रमाणें त्यांत नवे नवे विषय शिरूं लागले. मध्यम स्थितींतल्या कुटुंबांतून कपडे बेतणें, शिवणें, कशीदा, चांगलीशी रांगोळी काढणें, दोनचार पानांचा स्वयंपाक सुग्रणपणानें करणें, वगैरे गोष्टींचा स्त्रीशिक्षणांत अवश्य समावेश होऊं लागला. त्याहून वरच्या दर्जाच्या कुटुंबांमधून तर त्याचें क्षेत्र जास्तच व्यापक झालें. कामापुरतें चालचलाऊ इंग्रजी व संस्कृत, संगीत, सतार, वीणा, पिआनो, हार्मोनियम वगैरे कांहीं तरी वाजवून घटकाभर गायन करणें, जीगचें वगैरे काम करणें, चित्रकलेची साधारण तरी माहिती, सायकल अथवा घोड्यावर बसणें, टेनिस, पिंगपॉंग वगैरे खेळ खेळतां येणें, वगैरे गोष्टींचा कमी अधिक मानानें स्त्रीशिक्षणांत अंतर्भाव झाला होता. त्याच दर्जाच्या पुरुषांनांहि त्यामुळें वरील गोष्टींचें ज्ञान असणें जरूर झालें. असा एकमेकांवर आघात प्रत्याघात होऊन स्त्रीशिक्षणाला फारच मनोहर स्वरूप आलें होतें.

याहिपेक्षां आणखी एक अत्यंत महत्त्वाचा असा परिणाम मुलांमुलींचें लग्नवय वाढल्यापासून आपोआप प्रचारांत येऊं लागला. जोंपर्यंत लग्नवय कमी असतें तोंपर्यंत लग्न जुळविण्याचें काम फक्त आईबापांकडेसच असतें, व त्यांत प्रत्यक्ष नवरानवरी हीं केवळ बाहुलाबाहुलीप्रमाणेंच त्यांच्या तंत्रानें हालचाल करीत असतात. पण जों जों मुलांचें लग्नवय वाढत जाऊन लग्नविधीची खरी जबाबदारी त्यांना समजूं लागते, तों तों तटस्थवृत्ति सोडून

देण्याची इच्छा होऊन नवरानवरी आपलें अस्तित्व आग्रहपूर्वक दर्शवूं लागतात; आणि मग आईबापांची इच्छा असो वा नसो, त्यांचें वजन लग्नाच्या बाबतींत कमी कमी होत जातें. हा सामान्य नियम आमच्याहि समाजांत दृष्टोत्पत्तीस आला. मुलगे आपली भावी पत्नी एकवार तरी लग्नाच्या पूर्वी आपल्या नजरेस पडावी म्हणून हल्लीं जो आग्रह धरीत असतात, तसाच आग्रह उपवर झालेल्या प्रौढ मुलीहि त्या कालीं धरूं लागल्या. मुलींनां चांगलें समजूं लागल्यामुळें दिवसेंदिवस ही पद्धति जास्त प्रचारांत येऊं लागली. निवळ विद्येवर अगर सुस्वरूपावर आवडनिवड अवलंबून राहीनाशी झाली. वधुवरांनीं एकमेकांनां पसंत केल्यावांचून लग्नाची गोष्ट काढणें आईबापांनां अशक्य होऊन बसलें. हें पसंत करणें निवळ औपचारिक नसून अत्यंत आवश्यक असें तें लग्नाचें एक प्रधान अंग झालें. अर्थात्च, हल्लींप्रमाणें मोजक्या व ठराविक प्रश्नांचीं ठराविक उत्तरें देण्यास शिकविलेल्या मुलींच्या हल्लींच्या परीक्षणापेक्षां फार निराळ्या तऱ्हेची परीक्षा एकमेकांची करण्याची वहिवाट पडूं लागली. आपल्या पसंतीस कोण येतें याचा निर्णय लावण्याकरितां योग्य संधि आणून देणें जरुर पडूं लागलें.

पण अशी संधि हल्लीं चालू असलेल्या एकेरी समाजव्यवस्थेंत मुबलक कशी मिळणार ? पांचदहा प्रौढ मुलगे व पांचदहा प्रौढ मुली यांनीं एकमेकांतून परीक्षण करून आपणास योग्य असें माणूस पसंत करायचें, तें एकदोन वेळां एकमेकांनां नुसतें पाहून कसें करतां येणार ? अर्थातच अशी मुबलक संधि आपल्या मुलांमुलींनां मिळावी ह्मणून आईबापांनां नवीन नवीन मार्ग स्वीकारावे लागले. कांहींतरी निमित्त उत्पन्न करून विवाहेच्छु तरुण स्त्रीपुरुष एकमेकांच्या सहवासांत राहूं शकतील, असे प्रसंग मुद्दाम घडवून आणण्याचा प्रघात सुरू झाला. व अशा प्रसंगीं हल्लींप्रमाणें स्त्रियांचे व पुरुषांचे असे दोन भिन्न समाज न करितां एके जागीं स्त्रीपुरुष जमा होऊन एकमेकांशीं दळणवळण सुरू झालें. यामुळें हल्लींची एकेरी समाजव्यवस्था हळुहळू नाहींशी होऊन स्त्रीपुरुष एके जागीं असण्याची मिश्र समाजव्यवस्था जारीनें अंमलांत येऊं लागली. प्रथम प्रथम पुष्कळ लोकांनां हा बदल आवडला नाहीं. पण एक तर बंगाली लोकांप्रमाणें अथवा अस्सल मराठे लोकांप्रमाणें आमच्या समाजांत गोषा नव्हता. इतकेंच नाहीं, तर प्रसंगविशेषीं अंशतः तरी मिश्रसमाजाची संवय आमच्या लोकांनां पूर्वी-

पासूनच होती. दुसरें बलवत्तर कारण असें झालें, कीं, प्रौढविवाह सुरू झाल्यापासून पूर्वींच्या पद्धतीनें विवाह जुळवून आणणें केवळ अशक्य होऊन गेलें. ज्याप्रमाणें घरीं कितीहि उत्तम अभ्यास केला असला तरी युनिव्हर्सिटीकडून त्यावर छाप मारून घेतल्यावांचून कोणी तो कबूल करीत नाहीं, अथवा विक्रीकरितां तयार केलेला माल बाजारांत नेऊन मांडल्याशिवाय त्याची खरी परीक्षा होऊन योग्य गिऱ्हाईक मिळूं शकत नाहीं, त्याचप्रमाणें आपल्या मुलांमुलींनां समाजांत यथेच्छ मिळूंमिसळूं दिल्यावांचून त्यांची खरी परीक्षा होऊन योग्य वधु अथवा वर मिळवून देणें आईबापांनां अशक्य झालें. अशा प्रकारें युनिव्हर्सिटीच्या परीक्षांच्या मंडपाप्रमाणें मिश्रसमाजाचें अस्तित्व अत्यंत जरूर होऊन बसलें, व त्यामुळें पूर्वीं प्रचलित असलेली एकेरी समाजपद्धति अगदीं नष्टप्राय झाली. परमेश्वरकृपेनें या नवीन पद्धतीपासून कोठेंहि अनिष्ट प्रकार बरींच वर्षें घडून आल्याचा बोभाटा झाला नाहीं, व एकदां मंडळी रुळून गेल्यावर मिश्रसमाजपद्धति इतकी अंगवळणी पडून गेली, कीं, नुकते पन्नास वर्षांमागचे लोक एकेरी समाजांत सुख कसें मानीत असत याचेंच सर्वांनां आश्चर्य वाटूं लागलें होतें !

आणखी एक याहूनहि कदाचित् जास्त महत्त्वाचा असा बदल केवळ परमेश्वरी इच्छेनें हिंदुस्थानांत अकल्पित तऱ्हेनें घडून गेला होता, तो सांगून ठेवणें अत्यंत जरूर आहे. आपल्या या हिंदुस्थान देशाचे परम दयाळु **सम्राट् पंचम जॉर्ज** यांच्या राज्याभिषेकानंतर ते स्वतः हिंदुस्थानांत येऊन दिल्लीस त्यांनीं एक फार मोठा दरबार इसवी सन १९११ सालीं भरविला होता. त्या समयीं त्यांच्या नजरेस ज्या गोष्टी आल्या त्यांवरून, व त्याच्याहि पूर्वीं ते प्रिन्स ऑफ वेल्स या नात्यानें हिंदुस्थानांत प्रवास करून गेले होतें त्या प्रवासामध्यें त्यांनीं हिंदुस्थानच्या लोकांच्या स्वभावाविषयीं स्वतः जें सूक्ष्म निरीक्षण केलें होतें त्यावरून, त्यांची पूर्ण खात्री होऊन चुकली होती, कीं, हिंदुस्थानांतल्या रहिवाशांमध्यें राजनिष्ठा ओतप्रोत वसत असून त्यांनां राजकर्त्यांनीं सहानुभूतीनें वागविलें तर त्यापासून इंग्लंडचें नुकसान नसून उलट अत्यंत फायदा होईल. ही त्यांची मनोमय खात्री पंचम जॉर्ज सम्राटांनीं अनेक वेळां स्पष्टपणें उच्चारून दाखविल्यामुळें '**राजा कालस्य कारणं**' हा न्याय राजकीय बाबतींतहि पूर्णपणें अनुभवास आला. राज्यकर्त्यांच्या मनांतले दुर्ग्रह नाहींसे होऊन त्यांच्या मनांत पुष्कळ वर्षें वस्ती करीत असलेले

संशय पार निघून गेले. खऱ्या व निर्भेळ सहानुभूतीचें साम्राज्य सुरू झाल्याबरोबर औद्योगिक बाबतींत सढळ हातानें हिंदुस्थानवासीयांनां उत्तेजन मिळूं लागून नाना प्रकारचे यांत्रिक कारखाने शहरोंशहरीं दिसूं लागले. पाटबंधाऱ्यांकरितां मुबलक द्रव्य खर्च होऊन शेंकडों कालवे तयार झाले व अवर्षणाचें रौद्र स्वरूप हिरावून गेलें. बोरघाटांतल्या विद्युद्योजनेमुळें मुंबईपासून सोलापुर आणि मिरजेपर्यंत हरएक कामांत विजेचा उपयोग होऊं लागला. सर्वांत विशेष गोष्ट ही झाली, कीं, राज्यकर्ते व प्रजाजन यांचा जेते व जित असा भाव नाहींसा होऊन एका पातशाहीचे दोघेहि समान महत्त्वाचे घटक आहेत ही भावना दृढ झाली. त्यामुळें हिंदुस्थानांतील तरुण मनुष्यांनां त्यांच्या अंगच्या योग्यतेप्रमाणें पलटणींतून आणि आरमारांवर नोकऱ्या देण्याचा प्रघात जारीनें सुरू झाला. त्यामुळें मिश्रसमाजांत नानाप्रकारच्या दर्जाचे पलटणींतले ऑफिसर—विवाहित व विवाहेच्छु, तरुण, मध्यम वयाचे व वृद्ध असे—पुष्कळ मिसळतांना दृष्टीस पडत असत, व त्यांच्या निरनिराळ्या पोषाखांमुळें—पलटणींतल्या व आरमारांतल्या—समाज विशेष खुलून दिसत असे. या सर्व महत्त्वाच्या फेरफारांचें श्रेय आंग्ल-सम्राट् पंचम जॉर्ज यांनांच लोक देत असत, व रात्रंदिवस त्यांचें मनापासून अभीष्ट चिंतीत असत.

पण ही सर्व हकीकत सांगण्याला बराच वेळ लागला, नाहीं बरें? त्या पहा सीताबाई स्वतः आपण तयार होऊन व आपल्या पांची मुलींनां यथायोग्य तयार करून नदीकांठच्या क्लबाकडे जाण्यासाठीं गाडीची वाटच पहात उभ्या आहेत. त्यांच्या मुलींच्या चेहऱ्यांवर आज वार्षिक संमेलनाला जाण्याची विशेष उत्सुकता दिसत आहे. बहुतकरून भाऊसाहेब पुण्याहून काल रात्रींच येऊन आज संमेलनाला खास हजर रहाणार आहेत, अशी या मंडळीला बित्तं बातमी लागलीशी दिसते आहे !

---

## प्रकरण चवथें.

### क्लबाचें संमेलन.

आज वार्षिक संमेलनाकरितां विश्रामस्थान उत्तम प्रकारानें शृंगारलें होतें. नेहमींच्या सर्व सभासदांनीं आपल्या मित्रमंडळीसह अवश्य यावें, अशीं विनंतिपत्रें पाठविण्यांत आलीं होतीं, व सेक्रेटरींनीं कांहीं कांहीं सभासदांनां स्वतः भेटूनहि प्रत्यक्ष आमंत्रण केलें होतें. शिवदुर्गांतली बहुतेक मध्यम

स्थितींतली मंडळी आपापल्या कुटुंबासुद्धां विश्रामस्थानाचा उपयोग करून घेत असत. मुनसफ, मामलेदार, फौजदार व डाक्तर, चार वकील, चार सावकार, कांहीं सुखवस्तु गृहस्थ, कांहीं शाळामास्तर, इतकी मध्यम स्थितीं तली मंडळी विश्रामस्थानाचे वर्गणीदारांत असत. शिवाय, आनंदरावां-सारखीं उच्च प्रतीचीं कांहीं कुटुंबेंहि होतीं. रावबहादुर आठवले हे तर अध्यक्षच होते. ही सर्वच मंडळी रोज नेमानें जमे, असें नाहीं. अध्यक्ष मात्र बहुतकरून एकदां संध्याकाळीं येऊन निदान पांचदहा मिनिटें तरी राहिल्या-वांचून दिवस जाऊं देत नसत. दर रविवारीं सायंकाळीं मात्र बहुतेक मंडळी येई. कारण, सेक्रेटरी कांहीं तरी विशेष योजना त्या दिवसाकरितां ठरवून आगाऊ सर्वांनां सूचना पाठवीत असत. सेक्रेटरींची नेमणूक करतांना एक पुरुष व एक स्त्री अशी नेमण्याचा नियम असे. कारण, विश्रामस्थान हें हल्लींप्रमाणें निवळ पुरुषवर्गाकरितां एकांगी नसून त्या काळीं जिकडे तिकडे प्रचलित असलेल्या मिश्रसमाजाला जरूर असें दुहेरी अंगाचें असे. मागील प्रकरणांत समाजामध्यें जें स्थित्यंतर झाल्याचें वर्णन केलें आहे, त्या स्थित्यंतराला अनुसरून शहरोशहरीं मिश्रसमाजाच्या सोयीकरितां अशीं विश्रामस्थानें अस्तित्वांत आलीं होतीं. अर्थात्च आजच्या संमेलनामध्यें आपणांस त्या वेळच्या मिश्रसमाजाचें स्वरूप प्रत्यक्ष पहाण्यास मिळेल.

सीताबाई व त्यांच्या पांची मुली संमेलनाला जाण्याकरितां निघतांना आपण पाहिल्याच आहेत. आनंदराव त्यांच्याबरोबर निघाले नाहींत. "मी आलों तर मागून येईन, अथवा येणारहि नाहीं," असें सांगून ते लायब्ररींत बसूनच राहिले होते. आनंदरावांचा नेहमींचा स्वभाव जाणून कोणींच त्यांनां विशेष आग्रह केला नव्हता. सीताबाईनां तर एकदां भाऊसाहेबांनां पहाण्याची इतकी उत्कंठा झाली होती, कीं, मुलींना घेऊन त्या विश्रामस्थानाकडे ठरलेल्या वेळेच्या पूर्वींच जाऊन दाखल झाल्या. सेक्रेटरी व अध्यक्ष त्याहिपेक्षां अर्थात्च आगाऊ तेथें हजर होते. मागाहून हळुहळू मंडळी दाखल होऊं लागली. ठरलेल्या वेळीं बहुतेक सर्व मंडळी हजर झाल्यामुळें आज विश्रामस्थान अगदीं गजबजून गेलेलें दिसत होतें. आनंदभुवनांत आलेले नवीन गृहस्थ मात्र अजून आले नव्हते. त्यांची सर्व मंडळी उत्कंठेनें मार्ग-प्रतीक्षा करीत होती.

# आजपासून पन्नास वर्षांनीं !

आनंदभुवन हा बंगला मुंबईच्या एका लक्षाधीशानें आपल्या स्वतःला घाटावरची हवा पालट करण्यासाठीं येऊन राहाण्याकरितां ह्मणून पैशाकडे लक्ष न देतां मुद्दाम हौसेप्रमाणें बांधला होता. बंगला फार मोठा असून त्याच्याभोंवतीं एक विस्तीर्ण मळा होता. पण बांधून झाल्यापासून मालक स्वतः एकदोनच वेळां येऊन चारआठ दिवस राहिला असेल. अलीकडे एकदोन वर्षें मालक व्यापारानिमित्त चीन देशांत जाऊन राहिला होता, व त्याचा लवकर परत येण्याचा संभव नसल्यामुळें, आतां तो त्यानें पांच वर्षांच्या करारानें भाड्यानें देण्याला काढला होता. त्यांत त्यापासून भाडें वसूल करण्यापेक्षां दरसालची डागडुजी व बगीचा चांगल्या स्थितींत ठेवण्याचा खर्च परस्पर निघावा, एवढीच मालकाची इच्छा होती; पण एवढ्यालाच सालीना दोन हजार रुपये लागत! तितकें भाडें देणारा गृहस्थ इकडे कसा मिळतो? अर्थात् , एक दोन वर्षें आनंदभुवन बंगला रिकामाच होता. अखेर, इतकें भाडें कबूल करून तो एका ब्राह्मण गृहस्थानें घेतला, हें ऐकल्यापासून हे गृहस्थ कोण आहेत ही जिज्ञासा उत्पन्न होऊन त्यांची ओळख करून घेण्याला सर्व मंडळी उत्कंठित झाली, यांत आश्चर्य कसलें ?

परंतु या मंडळीला फार वेळ वाट पहावी लागली नाहीं. भाऊसाहेब व त्यांजबरोबरची मंडळी कबूल केलेल्या वेळीं येऊन दाखल झाली. बरोबर दोन स्त्रिया व दोन पुरुष मिळून एकंदर पांच मनुष्यें आलीं होतीं. भाऊसाहेबांचा पोषाख अगदीं साधा, पांढरा स्वच्छ, असा होता. बरोबरच्या दोघी स्त्रिया त्यांच्या बहिणी असून त्या दोघीहि त्यांच्याहून लहान होत्या. त्यांतली वडील बहिण श्रीमती सौ. इंदिराबाई आपटे, व धाकटी श्रीमती कुमारी कमलिनी. या दोघीहि आपल्या भावाच्या श्रीमंतीला शोभतील अशा थाटानें शृंगार करून आल्या होत्या. दोघीहि भावासारख्याच गोऱ्या होत्या, पण त्यांतल्या त्यांत कुमारी कमलिनी जराशी जास्तच गौरवर्ण होती, व नाकींडोळींहि जास्त निटस होती. इंदिराबाई जास्त चलाख दिसत असे. तिचे यजमानहि बरोबर आले होते. त्यांचें नांव बंडोपंत आपटे. हे साधारणपणें खाऊन पिऊन सुखी गृहस्थ होते व हे बहुतकरून वर्षांतून आठ महिने आपल्या मेव्हण्यांच्या जवळच घालवीत असत. अर्थात्च, इंदिराबाईलाहि माहेरीं राहण्याचा लाभ रगड होत असे.

भाऊसाहेबांविषयीं शिवदुर्गांत आतां बरीच माहिती झालेली होती. व विश्रामस्थानांत आल्यापासून मोकळेपणानें ते इतर मंडळीशीं मिळूं मिसळूं

लागलें हें पाहून तर रावबहादुरांनीं त्यांच्याविषयीं प्रथम भेट होतांच जें मत ठरविलें होतें, तेंच इतर सर्व लोकांच्या दृष्टीनेंहि कायम ठरलें. साधा, निगर्वी स्वभाव, मोकळी दिलदार मुद्रा, व हंसत खेळत मंडळींत बसण्या-उठण्याची ढब, वगैरे प्रकारांनीं तेथल्या सर्वांवर भाऊसाहेबांनीं आपली केव्हांच छाप बसविली. त्यांच्या दोघी बहिणींच्या अंगीं मात्र जरासा अभिमान, श्रीमंतीची ऐट, इतर सामान्य जनांविषयीं तुटकपणा धरण्याची इच्छा, वगैरे दुर्गुण असावेत असें उघड दिसूं लागलें. बंडोपंत हे खरोखरीच एक निवळ खाऊन पिऊन सुखी असे गृहस्थ दिसले. त्यांच्यांत धड डौलदार वृत्तिहि नव्हती, अथवा मोकळेपणाहि नव्हता. सुंदर पोषाख करावा, उंची उंची पदार्थ खावें प्यावें, सुवासिक सिगारेट्स् ओढाव्यात व गायनवादन ऐकावें, इतकें असलें ह्मणजे बंडोपंत अगदीं खूष असणारे गृहस्थ होते.

भाऊसाहेबांबरोबर आलेले दुसरे गृहस्थ त्यांचे एक फारा दिवसांचे स्नेही होते. त्यांचें नांव कृष्णराव ऊर्फ भय्यासाहेब बिनीवाले. त्यांची शरीरयष्टि उंच व बांधेसूद असून त्यांच्या चेहऱ्यावर एक प्रकारची खानदानीची इभ्रत दिसून येत असे. त्यांनीं डोकीला एक पंजाबी थाटाचा पटका ऐटीनें बांधलेला होता, व उत्तरहिंदुस्थानांतल्या पद्धतीप्रमाणें पायांत झोंकदार विजारहि घातलेली होती. अर्थात्च, हे गृहस्थ कोण असावेत याविषयीं जिकडेतिकडे तर्क चालू झाले, व लवकरच सर्वांना समजून आलें, कीं, हे एक माळव्याकडचे बडे जमीनदार आहेत, आणि त्यांचें उत्पन्न सालीना जवळ जवळ पाऊण लाख रुपये आहे. वयानें ते भाऊसाहेबांच्या बरोबरीचे दिसत. असल्या गृहस्थांचा परिचय होण्याची संधि आल्याबद्दल सर्वांना आनंद वाटला व भाऊसाहेबांप्रमाणेंच आपली त्यांच्याशींहि जास्त ओळख व्हावी, म्हणून जो तो प्रयत्न करूं लागला. पण भाऊसाहेबांपेक्षां भय्यासाहेब फार निराळ्या तऱ्हेचा माणूस आहे, हें लवकरच सर्वांच्या अनुभवाला येऊं लागलें. भय्यासाहेबांशीं कोणी चार शब्द बोलायला आपण होऊन गेलें, तरच ते त्याच्याशीं बोलत; व तेंहि बोलतांना आपण फार मोठे माणूस आहों, ही छाप लोकांच्या मनावर बसावी, अशा ऐटीनें वागत. स्वतः आपण होऊन तर ते कोणाशींच बोलत नसत. आपल्या आपल्या मंडळींशीं मात्र ते कधीं कधीं बोलत. बाकी ते उगाच एकटेच इकडेतिकडे बघत रहात. या त्यांच्या वर्तनामुळें त्यांच्याविषयीं अमोदर उत्पन्न झालेला चांगला ग्रह लवकरच नाहींसा झाला,

व त्यांच्या फाजील डौलीपणानें त्यांच्यावरचें लोकांचें मन सहज उडून गेलें. तें इतकें, कीं, त्यांचें उत्पन्न पाऊण लाखाचें असूनहि त्यांच्याविषयीं कोणी बरा अभिप्राय देईना. जो तो ह्मणूं लागला, कीं, त्यांची मुद्रा अगदींच बेडौल व द्वाड अशी आहे, व भाऊसाहेबांपुढें भय्यासाहेब अगदीं केवळ टाकाऊ माणूस आहे. भाऊसाहेब बहुतेक सर्वांशीं कांहींना कांहीं तरी बोलले, संमेलनांत चालू असलेल्या कार्यक्रमाबद्दल त्यांनीं आपली पसंती उद्गारून दाखविली. इतका थोडा कार्यक्रम कां ठरविला, असें ह्मणाले. आपण लवकरच सर्व मंडळीला आनंदभुवनांत आमंत्रण करणार आहों, असें त्यांनीं ध्वनित केलें. अशा प्रकारें त्यांनीं भय्यासाहेबांपेक्षां अगदीं उलट वागणूक केल्यामुळें भय्यासाहेबांविषयींचा लोकांचा अनादर जास्तच वाढून गेला.

सीताबाई तर इतरांपेक्षां भय्यासाहेबांवर जास्तच रागावल्या. त्याचें कारण असें झालें, कीं, भय्यासाहेब अविवाहित आहेत ही बातमी त्यांनीं सर्वांच्या आधीं काढून ठेवली होती, त्यामुळें त्या इतरांपेक्षां त्यांच्यावर प्रथमदर्शनीं फारच खुष झाल्या होत्या; पण पुढें त्यांच्या एका मुलीचा भय्यासाहेबांनीं अपमान केला असें त्यांनीं पाहिलें, त्यामुळें त्या मागाहून इतरांपेक्षां त्यांच्यावर जास्तच संतापून गेल्या. त्या अपमानाची हकीगत अशीः—

त्या दिवशीं तरुण पुरुष थोडेसे कमी आले असल्यामुळें, व होते ते इतर स्त्रियांशीं बोलण्याचालण्यांत गुंतून गेल्यामुळें, मधें कांहीं वेळ ताराबाई एकटीच एका खुर्चीवर बसून मौज बघत राहिली होती. त्या वेळेला तिच्या मागच्याच व्हरांड्यांत भाऊसाहेबांचें भय्यासाहेबांशीं कांहीं बोलणें झालें, तें मधली खिडकी उघडी असल्यामुळें सहजीं तिच्या कानावर आलें. भाऊसाहेब ह्मणाले "हें काय बरें भय्यासाहेब! असे एकटे एकटे कां उभे राहतां बरें ? कोणी तरी माणूस पाहून दोन घटका मौज मानून घ्यायची, तें असें खुंमासारखें उभें राहणें मला नाहीं बुवा आवडत तुमचें !"

यावर भय्यासाहेब ह्मणाले " छे छे भाऊसाहेब ! माझी विशेष ओळख असल्याशिवाय मला कोणाशीं बोलणें नाहीं आवडत, तें तुह्माला माहीत आहेच. अन् या गांवढळ मंडळींत तर काय बोलावें न् काय करावें ! तुमच्या बहिणी दुसऱ्यांशीं गुंतून गेल्या आहेत, अन् दुसरी अशी कोणी स्त्री मला तर इथें दिसत नाहीं, कीं, जिच्याशीं हंसण्यासंवरण्यांत मला केवळ शिक्षा वाटायची नाहीं !"

भाऊसाहेब ह्मणाले "एः, ही उगीच तुमची फाजील छानी आहे ! मला तर इथें आज रगड सुरेख स्त्रिया दिसताहेत, अन् कांहीं कांहीं तर विशेषच खुपसुरत आहेत."

भय्यासाहेब ह्मणाले "हो हो, तें बरोबर. इथें काय ती एकच सुरेख स्त्री आहे, ती तर आपण घेऊन बसलां आहां !" असें शांताबाईकडे बघत भय्यासाहेब हंसत हंसत ह्मणाले.

यावर भाऊसाहेब म्हणाले "अलबत, अशी खुपसुरत स्त्री आपण तर आजपर्यंत पाहिली नव्हती! पण हें पहा, तिचीच बहीण ती पहा या भिंतीशीं आंत बसली आहे. तीहि पुष्कळ चांगली आहे अन् तशीच हुशारहि असेल. मी देऊं का तुझान् तिचा परिचय करून तिच्या बहिणीकडून ?"

"कोणची बरें, पाहूं या !" असें ह्मणत भय्यासाहेबांनीं ताराबाईकडे दृष्टि फेंकली आणि लगेंच ह्मटलें "आहे, साधारण बरी आहे, पण मला आकर्षण करण्याइतकी नाहीं. आणि दुसऱ्यांच्या दृष्टीनें टाकाऊ झालेल्या स्त्रीला, माझ्या सहवासानें नसतें महत्त्व देण्याची माझी या वेळीं नाहीं तब्बेत लागत! आपण आपल्या माणसाकडे जा, आपल्या सुखांत उगाच आमचा व्यत्यय कशाला ? त्यांत कांहीं फायदा होणार नाहीं आपणाला."

भाऊसाहेबांचा नाइलाज झाला व ते शांताबाईकडे निघून गेले. भय्यासाहेबहि दुसरीकडे फिरूं लागले. हें बोलणें कानीं पडलें असल्यामुळें ताराबाईला त्यांच्याविषयीं राग उत्पन्न होणें साहजिकच होतें, पण तिचा स्वभाव असा मजेदार होता, कीं, तिनें ती सर्व हकीगत आपल्या बहिणी व मैत्रिणी यांच्यामध्यें आपणच होऊन सांगितली. तिचा स्वभाव फार आनंदी व चेष्टेखोर असा होता. कांहीं थट्टा करण्यासारखी गोष्ट असली, कीं, ती केव्हां चारचौघांत सांगून पोटभर हंसेन, असें तिला वाटत असे.

अशा तऱ्हेनें नानाप्रकारच्या मौजेमध्यें त्या दिवशींचें संमेलन पार पडलें. सीताबाईंनां व त्यांच्या मुलींनां तर तें फारच आवडून गेलें. कारण, भाऊसाहेबांनां शांताबाई विशेष पसंत पडली, असें रगड चिन्ह त्या दिवशीं दिसून आलें होतें. शांता अर्थातच तशीच खूष झाली होती. थोरल्या बहिणीचें सुख पाहून ताराहि आनंदली. या प्रांतांत मथुराबाईइतकी कोणी विदुषी मुलगी नांहीं, अशी कोणींशी तिची शिफारस कुमारी कमलिनीजवळ तिच्यादेखत केली होती, याहून तिला खुष व्हायला आणखी काय पाहिजे? सुंदर व हिरा

यांनां कोणीना कोणी तरी हंसायखेळायला शेवटपर्यंत मिळतच गेलें, व त्यांनां यापेक्षां जास्त अपेक्षा नव्हती. यामुळें एकंदरींत सर्वजणी बऱ्याच उत्साहानें संमेलन संपल्यावर घरीं आल्या.

आनंदराव अजून लायब्ररींतच बसलेले होते. वर्तमानपत्रें अथवा मासिक पुस्तकें यांचा एका बाजूला भारा, दुसऱ्या बाजूला सिगारेटची पेटी व तोंडांत मधून मधून टाकण्याकरितां चिकणी सुपारी, अशी सामुग्री लायब्ररींत असली, कीं, तेथें त्यांनां बहुतेक इंद्रभुवनच वाटूं लागे ! त्यांतून अलीकडे त्यांनीं एक नवीन ग्रंथ लिहिण्याची तयारी चालविली होती, त्यामुळें तर त्यांचा लायब्ररींत किती वेळ जाई, त्याचा सुमारच नव्हता. मंडळी घरीं आलेली समजल्याबरोबर ते नाइलाजानें उठून दिवाणखान्यांत आले. इतके दिवस उत्सुकतेनें वाट पहात राहिलेल्या मंडळीची कशी काय खबरबात आहे, हें समजण्याची त्यांनां साहजिकच इच्छा उत्पन्न झाली होती. निराशा होऊन त्या परत याव्यात, व आपल्याला त्यांची चेष्टा करून टर उडविण्यास संधि सांपडावी, असेंहि स्वारींच्या मनांतून होतें; पण आपल्या पत्नीचा पहिलाच शब्द ऐकून त्यांची अगदीं निराशा झाली!

आनंदराव दिवाणखान्यांत येतांक्षणींच सीताबाई आनंदानें उद्गारल्या "वाहवा, कायपण आज मौज झाली ! आपण आलां असतां तर आपणाला सुद्धां किती तरी मौज वाटली असती पण सांगू ! शांतीची इतकी कांहीं वाखाणणी झाली, कीं, कांहीं पुसूंच नका ! सारीं म्हणालीं, कीं, ती किती तरी सुंदर दिसते ! भाऊसाहेब तर केवळ तिच्या भोंवतीं भोंवतीं नाचत होते जसे कांहीं ! पहिल्यानं त्यांनीं रावबहादुरांच्या मालतीबरोबर बोलायला सुरुवात केली. मला असं वाईट वाटलं म्हणतां—पण पुढं ती कांहीं त्यांच्या मनास आली नाहीं—नाहींच येणार म्हणा—यावी कशी ?—पण मग त्यांची नजर शांती-कडे गेली—त्याबरोबर सारजाबाई—आपल्या सेक्रेटरी नाहींत का, त्यांच्याकडून त्यांनीं तिची ओळख करून घेतली, अन् चांगलीं पंधरा मिनिटं तिच्याशीं हिंडत फिरत होते. मग त्या वकिलाची मुलगी द्वारका नाहीं का, तिच्याशीं थोडं बोलले—मग शेवंती आठवलीच्याशीं थोडंसं-पुनः आपली शांती! तिच्याशीं तर मुद्दाम बसून दहापंधरा मिनिटं चहा पिणंच चाललं होतं—मग आपली तारी—मग—कोण बरं ? हो !—नाहीं !—"

आनंदराव मधेंच म्हणाले "अरे बाप रे! ही यादी मारुतीच्या शेंपटासारखी का आतां लांबत जाणार? त्यापेक्षां पहिल्या तासांतच तो कंटाळून चालता झाला असता, तर यादींतून आम्ही सुटलों असतों तरी!"

पण तिकडे दुर्लक्ष करून सीताबाई पुढें बोलूं लागल्या "तें कांहीं पुसूंच नका! काय पण पसंत माणूस आहे म्हणतां भाऊसाहेब! अन् त्यांच्या दोघी बहिणीहि तशाच गोड स्वभावाच्या स्त्रिया आहेत. त्यांच्याइतके डौलदार व नवीन तऱ्हेचे पोल्के तर मीं कधींच पाहिले नव्हते! मला तर खास वाटतं, कीं, इंदिराबाईच्या पिलावाची किनार—"

येथें पुन्हां पतिराजांनीं सीताबाईनां अडविलें व किनारीबिनारीचीं वर्णनें बिलकुल नकोत, म्हणून बजाविलें. म्हणून सीताबाईनां दुसरा विषय काढावा लागला. त्यांनीं पुष्कळसें तिखटमीठ लावून मोठ्या झणकाऱ्यानें भय्या-साहेबांची व त्यांच्या उद्धटपणाची हकीगत सांगितली. तारीविषयीं झालेला संवादहि सांगितला, आणि त्या पुढें म्हणाल्या "पण त्याच्या मनाला तारी नाहीं आली, तर कोण परवा करतं आहे? तो आहे एक आडमुठ्या शिलेदार झालं! त्याला खुष करायला जायला आडलं आहे कोणाचं इथें? इतका गर्विष्ठ, कीं, कांहीं पुसूंच नका! सर्व मंडळी जशी कांहीं केरासारखीं दिसतातशी वाटत होती! वा, वा, काय पण म्हणें 'तारी आहे साधारण सुरेख, पण मला आकर्षण करण्याइतकी नाहीं!' तुम्ही नव्हतां हो तिथें, नाहीं तर अशी तुम्ही त्याची फाजिती केली असतीत! मला तर अगदीं भिरभिरी आली त्याची!!"

---

## प्रकरण पांचवें.

### संमेलनानंतरच्या गप्पा.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं घरोघर अर्थात्च आदल्या दिवसाच्या संमेलना-विषयीं गोष्टी चालू होत्या. सकाळीं सीताबाईनां रिकामा वेळ कुठला सांपड-णार? त्या आपल्या गृहकृत्यांमध्यें गुंतून गेल्या होत्या. त्यांच्या घरीं नोकर चाकर जरी बरेच होते, तरी त्यांच्याकडून योग्य तऱ्हेनें कामें करवून घेण्यांत त्यांचा बराच वेळ जाई. हिरा व सुंद्री यांचा अभ्यास पुरा झाला नसल्या-मुळें त्यांनाहि सकाळीं गप्पा मारीत बसण्यास फुरसत नसे. मथुरा जराशी काळीसांवळी, व रूपानेंहि सुमारच असल्यामुळें, इतर गुण अंगीं आणून

आपल्या स्वरूपाची उणीव भरून काढण्याची तिला फार इच्छा असे. म्हणून तीहि सकाळच्या वेळीं आपल्या खोलींत बसून हार्मोनियम वाजविणें, नानातऱ्हेची माहिती मिळविण्याकरितां पुस्तकें वाचणें, व त्यांतील निवडक वेंचे उतरून घेऊन ते तोंडपाठ करून ठेवण्यांत वगैरे गुंतून जात असे. आनंदराव तर दहा वाजेपर्यंत लायब्ररीच्या बाहेर कधींच पडत नसत. त्यामुळें सकाळच्या वेळीं फुरसत काय ती थोरल्या दोघी बहिणींनांच असे. त्या वयानेंहि जवळ जवळ सारख्याच असत म्हणून त्यांचें एकमेकींशीं बरेंच हितगुज चालत असे, व इतरांच्या देखत बोलून न दाखविण्यासारख्या गोष्टी देखील त्या एकमेकींशीं मोकळ्या मनानें बोलत.

आज सकाळीं त्या दोघी एकट्याच दिवाणखान्यांत बसल्या होता. शांताक्काचा स्वभाव जरासा खोल होता; पण तारा याच्या अगदीं उलट. तिच्या मनांत कांहीं येऊन तोंडाबाहेर पडायचें राहिलें, असें सहसा होणें अशक्य. तिनें आपणाला भाऊसाहेब फार छान माणूस आहे असें वाटल्याचें सांगितलें. त्यावरून शांताबाईची बोलायची सुरुवात झाली. ती म्हणाली " खरंच गडे तरुण गृहस्थ असावा तर अगदीं असा असावा ! समजूतदार, सुस्वभावाचा अन् हुशार. अन् बोलायचालायला किती साधा म्हणतेस, अगदीं पूर्ण सभ्य. मी तर कधीं इतकी उत्तम रीतभात कोणांत पाहिली नव्हती ! "

" अन् देखणाहि पण असावा नाहीं बरं ? " तारा म्हणाली. "म्हणजे, अगदीं सर्वगुणसंपन्न झाला म्हणायचा ! "

"मला नव्हती कल्पना, कीं, भाऊसाहेब दुसऱ्यांदां अन् तिसऱ्यांदां माझ्याशीं येऊन चहाबिहा घेत बसतील असं ! "

" नव्हतं तुम्हाला वाटलं ? मला तर खास वाटलं होतं ! पण आपणां दोघींमध्यें फरक आहे तो हाच. तुमची स्तुति कोणीं केलेली तुम्हीं ऐकलीत तर तुम्हाला आश्चर्य वाटतं, पण मला माझी ऐकून नाहीं कधीं तसं वाटत ! ते तुमच्याकडे पुन्हां वळले त्यांत नवल तें काय ? दुसऱ्या कोणत्याहि स्त्रीपेक्षां निदान पांच पटीनें तरी जर तुम्ही सुंदर दिसत होतां, तर तुमच्याकडे येण्यांत अशी काय त्यांनीं मोठी चतुराई दाखविली ? बाकी, ते अगदीं योग्य गृहस्थ आहेत हो ! माझी तुम्हाला अगदीं सदर परवानगी आहे त्यांच्यावर प्रेम करूं लागायला ! त्यांच्यापेक्षां दुसरे कितीतरी मूर्ख लोक आजपर्यंत तुम्हाला बरे वाटले आहेत ! "

" हें काय बरं, तारा!" शांता उद्गारली.

तारा म्हणाली "हें पहा, तुमचा आपला एकंदर लोकं आवडून घेण्याचा स्वभाव भारी आहे. दोष असा तुम्हाला कधीं कोणामध्यें दिसतच नाहीं. तुमच्या दृष्टीनं सगळं जग अगदीं गोड व भलं असं आहे. मी तर आजन्मांत कधीं तुम्हाला कोणाच्याहिविषयीं वाईट बोलतांना ऐकलं नाहीं!"

शांताबाई म्हणाली "एकाद्याची घाईनं निंदा करणं मला नाहीं आवडत बाई. मी आपली केवळ मला जें वाटतं तेंच बोलत असतें."

तारा म्हणाली "मी कुठें नाहीं म्हणतें आहे? अन् त्यांतच तर सारं आश्चर्य आहे! तुमच्याइतकी बुद्धि असूनहि तुम्हाला खरोखरीच लोकांमध्यें मूर्खपणा अन् दोष दिसत नाहींत, हेंच तर आश्चर्य! स्पष्टवक्तेपणाचा आव घालणारीं रगड आहेत, पाहिजे तिथें भेटतील. मनांत एक असून दुसरंच बोलून दाखविणारे ढोंगी शेंकडों पडले आहेत. पण ढोंग अथवा लबाडी न करितां, दुसऱ्याचं चांगलं तेवढं निवडून काढून तें जास्त चांगलं करून दाखवायचं, अन् त्याच्यांतल्या वाईटाविषयीं कांहींएक न बोलायचं—हें तुम्हाला एकटीलाच साधतं! आणि मग, त्या गृहस्थाच्या त्या बहिणीहि आवडतात ना आपल्याला? त्यांची तर रीतभात कांहीं तशी नाहीं!"

यावर शांताबाई म्हणाली "नाहीं, पहिल्याप्रथम नाहीं. पण जों जों त्यांच्याशीं बोलूं लागावं, तों तों त्याहि कांहीं चांगल्या नाहींत असं ह्मणतां येणार नाहीं. कमलिनी इथेंच भावाबरोबर राह्यची आहे. अन् मला तर वाटतं, कीं, आपल्या गांवांत एक योग्य स्त्री आली, असंच आपणां सर्वांनां वाटल्याशिवाय राहणार नाहीं."

यावर ताराबाई कांहींच बोलली नाहीं. भाऊसाहेबांच्या दोघी बहिणींची संमेलनांतील वागणूक कोणालाहि विशेष पसंत पडण्यासारखी नव्हती. ताराबाईच्या अंगीं शांताक्कापेक्षां जास्त धूर्तता व कमी लवचिकपणा असल्यामुळें, व शांतेप्रमाणें तिची त्या स्त्रियांनीं वाखाणणी केली नव्हती म्हणून तिचें मन जास्त सरळ राहिलेलें असल्यामुळें, त्यांच्याविषयीं चांगला ग्रह करून ठेवण्याची तारेची तयारी नव्हती. वास्तविक म्हटलें तर त्या दोघी फार डामडौली स्त्रिया होत्या. खुषींत असल्या म्हणजे त्यांचा सुस्वभाव कांहीं कमी नव्हता. अथवा त्यांच्या मनांत आलेंच तर दुसऱ्याला खूष करण्याचीहि त्यांची शक्ति कांहीं कमी नव्हती. पण त्या अत्यंत गर्विष्ठ व ताठ्याच्या असत. त्यांचें स्वरूपहि

साधारणपणें चांगल्यांतलें होतें. ग्वाल्हेरीकडच्या एका चांगल्या कन्याशाळेंत त्यांचें बरेंच शिक्षण झालें होतें. एकेकीच्या नांवानें पैसाहि वडिलांनीं बराच ठेवला होता. अलबत त्यामुळें आपल्या योग्यतेपेक्षां जास्त दर्जाचीं आपण माणसें आहोंत, असें दाखविण्याच्या हेतूनें बाजवीपेक्षां फाजील खर्च करण्याची त्यांनां संवय लागलेली होती. बड्या लोकांत नेहमीं वावरत म्हणून आपण फार श्रेष्ठ,व सामान्य जन आपणापेक्षां फार हलके, असें मानण्याची त्यांची भारी प्रवृत्ति असे. आपल्या वडिलांनीं एवढी संपत्ति व्यापारधंदा करूनच मिळविली होती, ही गोष्ट शिताफीनें साफ विसरून जाऊन, आपण पिढीजाद कोणी बडे सरदारदरखदार आहों, अशा ऐटींत त्या नेहमीं असत.

या वर्णनावरून असें दिसून येईल, कीं, ताराबाईनें जी त्या दोघी बहिणींची परीक्षा केली होती, ती योग्यच होती. तरी पण ताराबाई त्या वेळीं जास्त बोलली नाहीं. तिसरे प्रहरीं त्यांनां भेटण्याकरितां रावबहादुरांच्या मुली आल्या. थोरली मुलगी कुमारी मालती ही फार समजूतदार व हुषार स्त्री होती. तिची ताराबाईशीं विशेष मैत्री असे. दुसरी मुलगी कुमारी शेवंती ही अजून हिराबाई एवढी अल्लड अशी होती. रावबहादुरीणबाईहि लेकींबरोबर सीताबाईनां भेटण्याला आल्या होत्या. त्या दोघींचे स्वभाव व समजुती साधारणपणें सारख्याच असल्यामुळें सीताबाईनां त्या आपल्या घरीं याव्याशा वाटत असत. त्यांचा एकुलता एक मुलगा दहा वर्षांचा होता, तोहि त्यांच्याबरोबर आला होता.

दामोदरपंत आठवले हे पूर्वीं आगगाड्या झाल्या त्या वेळीं कंत्राटें घेत असत. त्यांत त्यांनीं रगड पैसा मिळविला होता. ते पहिल्यापासूनच मोठे धोरणी व उद्योगी होते. त्यांनीं बांधिलेल्या एका मोठ्या पुलाच्या सुरुवातीच्या समारंभाच्या वेळीं त्यांनीं रेलवेच्या युरोपियन अधिकाऱ्यांनां फार खूष करून सोडलें होतें. त्यामुळें, व त्यांच्या नेहमींच्या एकंदर नम्र वर्तनामुळें त्यांनां साहेबलोकांत बरीच मानमान्यता असे. त्यांनीं पुलाचें काम फार उत्तम व फार थोड्या वेळांत उठविलें होतें, म्हणून त्यांची मुद्दाम शिफारस होऊन, त्या वेळचे रेलवेचे एजंट मि. लुक यांनीं त्यांनां पदवी देण्याची गव्हर्नरसाहेबांकडे शिफारस केली होती; व त्यानंतरच्या पदवीदानप्रसंगीं त्यांनां रावबहादुरीचा किताब मिळाला होता. पण कित्येक रावबहादुरांप्रमाणें त्यांच्या अंगीं त्या किताबामुळें उद्दामपणा न येतां ते जास्तच नम्र व लीन बनले होते. रगड पैसा झाला होता, व एकच मुलगा असल्यामुळें त्यांनीं जास्त हव्यास सोडून उद्योगधंदा बंद केला,

आणि ते आपल्या मूळच्या गांवीं म्हणजे शिवदुर्गांत बंगला बांधून सुखवस्तु राहूं लागले. मि. लुक साहेबांच्या स्मरणार्थ त्यांनीं आपल्या बंगल्याला 'लुक लॉज' असें कृतज्ञतापूर्ण नांव दिलें होतें. तेथें ते सर्वजणांशीं मित्रत्वानें राहून होतां होईल तोंवर सभोंवतालच्या लोकांनां सदुपदेश करण्यांत, व पुण्यास गणेशखिंडींत व मुंबईस काउन्सिल हॉलमधें ते लेव्हीला, व त्यानंतरच्या गव्हर्नरसाहेबांनीं दिलेल्या रिसेप्शनला जात असत त्याविषयीं वारंवार बोलण्यांत, आपला बहुतेक वेळ घालवीत असत.

रावबहादुरांच्या घरची मंडळी सीताबाईकडे आल्यावर सहजच कालच्या गोष्टी निघाल्या. सीताबाई मुद्दामच मालतीला म्हणाल्या "मालू, तुं सुरुवात तर चांगली केलीस! भाऊसाहेब पहिल्यांदां तुझ्याशीं बोलले—"

मालती म्हणाली "तें खरं, पण दुसऱ्यानं ते जिच्याशीं बोलले ती त्यांनां जास्त आवडली!"

सीताबाई म्हणाल्या "कोण, शांता होय? हो, असं दिसलं खरं. पुनः आणखी एकदोनदां ते तिच्याकडे वळले, तेव्हां मलाहि तसं वाटलं. तसं कायसं मीं ऐकलंसुद्धां—कायसं ते धोंडोपंतांनां म्हणाले म्हणे!"

मालती म्हणाली "धोंडोपंतांशीं ते बोलतांना मीं ऐकलं तें म्हणतां होय? मीं नाहींका तें तुम्हाला सांगितलं? धोंडोपंतांनीं त्यांनां विचारलं, कीं, 'शिवदुर्गांतली मंडळी कशी काय आवडते? अन् इथल्या मुलींपैकीं कोणची उत्तम दिसते?' त्याबरोबर त्यांनीं उत्तर दिलं, कीं, 'त्यांत काय आहे? शांताबाई सर्वांत उत्तम निःसंशय आहे, त्यांत मतभेद होणं शक्यच नाहीं."

सीताबाई म्हणाल्या "असं का? अगबाई, अगदीं स्पष्टच बोलले तर मग! हें मोठं शुभ चिन्हच दिसतं आहे म्हणायचं. बाकी, त्याचा काय नेम म्हणा, अखेर फुस् व्हायचं कदाचित्!"

मालती म्हणाली "मीं जें काय ऐकलं तें, ताराबाई, आपण ऐकलंत त्यापेक्षां कितीतरी योग्य आहे म्हणतां! भय्यासाहेब कांहीं भाऊसाहेबांसारखे ऐकायला गोड नाहींत, नव्हे बरं? अरेरे, एक माणूस फक्त कायतें 'साधारण बरं!' ना?"

सीताबाई म्हणाल्या "छे, मालू, त्यानं नको तारीला उगच चिडवूं! भय्या-साहेब आहे एक आपला आडमुठ्या माणूस झालं. असल्या माणसानं चांगलं

म्हणणं म्हणजे एक संकटच! सारजाबाई सांगत होत्या, कीं, तो अर्धा तास तिच्याजवळ बसला होता, पण एकदां तोंड उघडलं असेल तर शपथ!"

शांताबाई म्हणाली "खरं का आई हें? मला वाटतं, कांहीं तरी चूक आहे. मीं तर ते तिच्याशीं बोललेले एकदां पाहिले."

सीताबाई म्हणाल्या "अग हो, तें असं झालं. तिनंच अखेर त्याला विचारलं, कीं, 'आपणाला आनंदभुवन कसं वाटतं?' तेव्हां त्यानं नाइलाजानं नुसतं 'ठीक आहे,' असं म्हटलं. पण त्याला घुस्सा आल्यासारखा दिसला, असं ती म्हणत होती."

शांताबाई म्हणाली "मला कमलिनीनं काल सांगितलं, कीं, चांगला परिचय असल्यावांचून एकाद्याशीं बोलणं त्यांनां नाहीं आवडत. पण तसा एकदां दृढ परिचय झाला, कीं, मग ते फारच दिलदारपणानं वागतात."

सीताबाई म्हणाल्या "मला नाहीं त्यांतलं एक अक्षर खरं वाटत! तसं असतं, तर सारजाबाईशीं कां नसते बोलले? पण मीं समजलें, ते कां नाहीं बोलले तें. सारीं म्हणतात, कीं, तो अगदीं गर्वानं फुगून गेला आहे. कसं तरी त्याच्या कानीं गेलं असेल, कीं, सारजाबाईच्या घरीं गाडीघोडा नाहीं. मग असल्या दरिद्री माणसाशीं तो कसा बरं बोलणार?"

यावर मालती म्हणाली "सारजाबाईशीं न का बोलेना परता! पण निदान ताराबाईशीं तरी त्यांनीं बोलायचं होतं, इतके भाऊसाहेब आग्रह करीत होते तर!"

सीताबाई म्हणाल्या "छे ग, गर्वानं त्याला अगदीं अस्मान ठेंगणं झालं आहे."

मालती म्हणाली "मला नाहीं इतकं चमत्कारिक वाटत, तसं त्यांनां झालं असलं तर. त्यांनां गर्व वाटायला योग्य कारण तरी आहे. तरुण वय, ऐश्वर्य, संपत्ति, कुळशील, इतकं सगळं यथास्थित असून त्यांनां गर्व नाहीं वाटला तरच आश्चर्य म्हणायचं! खरं म्हटलं, तर गर्वानं वागण्याचा त्यांनां हक्कच आहे!"

ताराबाई म्हणाली "असेना बापडा! दुसऱ्यांनां न दुखवतां हवा तेवढा गर्व यांनीं केला तर आम्ही कशाला विचारायला जातों आहोंत!"

मथुराबाईनें गर्वाविषयीं एक वेंचा पाठ करून ठेवला होता, त्यानें लोकांनां चकित करण्याची ही चांगली संधि आहे असें वाटून ती म्हणाली

"मला वाटतें, कामक्रोध, मदमत्सर यामध्यें जी गर्वाची गणना केली आहे, ती अगदीं यथायोग्य आहे. मनुष्यमात्राला कोणच्याना कोणच्या, खऱ्या वा खोट्या, गुणाचा गर्व सदैव वाटतच असतो. त्यापासून एकहि प्राणी अलिप्त असा दृष्टोत्पत्तीस येणार नाहीं. परंतु गर्व करण्यास अगदीं योग्य असा जरी गुण आपल्या अंगीं असला, तरी अहंकार त्या गुणाची मातीच करून टाकीत असतो. अतएव, कामक्रोध, मत्सराप्रमाणें मदाचाहि त्याग करून, जितेंद्रियता मिळविण्याचा प्रयत्न करणें, हें मनुष्यमात्राचें आद्य कर्तव्य आहे!"

रावबहादुरांचा नानु बरोबर आला होता तोमध्येंच म्हणाला "मीं जर भय्यासाहेबांसारखा असतों, तर हवा तितका डौलानं वागलों असतों. अन् रोज जेवायला जिलब्याच केल्या असत्या! अन् दहावीस तरी शिकारी कुत्रे बाळगले असते!"

सीताबाई म्हणाल्या "रोज जिलब्या खाल्लया असत्या? वा, मीं तुझी आई असतें तर मीं नसत्या रोज जिलब्या खाऊं दिल्या तुला!"

नानु म्हणाला "अलबत मी खाणारच!"

आणि सीताबाई पुनः म्हणाल्या "अलबत् मीं नसत्याच खाऊं दिल्या!"

असें त्या दोघांचें बोलणें कितीदां तरी झालें! अखेर संध्याकाळ झाली म्हणून रावबहादुरांची मंडळी निघून गेली.

इकडे आनंदभुवनांतहि त्या दिवशीं तोच विषय चालला होता. चिंतामणराव आपल्या स्वभावाप्रमाणें संमेलनाहून खूष होऊन आले होते. "इतकी नानातऱ्हेची मंडळी आपणाला भेटली, आपणाशीं सर्व लोक चांगले वागले, मन मोकळें करून साध्या वृत्तीनें एकमेकांशीं सरळपणानें वागणें त्यांचें मला भारी आवडलें बुवा. माझी तर एक अर्ध्या तासांत सगळ्यांची छान ओळख झाली. कांहीं कांहीं स्त्रिया सुंदर देखण्या होत्या, अन् त्या नगरकरांची थोरली मुलगी तर मला अगदीं अप्सरेसारखी खुपसुरत वाटली." अशा अर्थाचे उद्गार त्यांनीं कितीकदां तरी काढले होते.

त्यांच्या उलट कृष्णराव भय्यासाहेब अगदीं नाखुष होऊन आले होते. "काय गांवढळ माणसें गोळा झालीं होतीं झालें! एकांत तरी कांहीं तसा विशेष गुण असायचा होता! माझें तर बिलकुल कुठें लक्ष लागलें नाहीं, अथवा एकहि माणूस पसंत पडलें नाहीं. ती नगरकरांची मुलगी ठीक आहे,

खुपसुरत आहे खरी, पण फाजील हंसत असते, त्यामुळें फारच कमीपणा येतो तिच्या रूपामधें." वगैरे प्रकारची कृष्णरावांची टीका चालली होती.

इंदिराबाई व कमलिनी कांहीं भावासारखें, तर कांहीं कृष्णरावांसारखें, मधून मधून बोलत होत्या. एकंदरींत शांता आपणाला दृढ परिचय करण्यासारखी काय ती एकटीच आहे, असें साधारणपणें ठरलें. त्यामुळें भाऊसाहेबांच्या मनांत तिच्याविषयीं जो अनुकूल ग्रह झाला होता त्याला इतरांची एक प्रकारची पसंति पडल्यासारखी त्यांनां वाटली.

भाऊसाहेबांचा स्वभावच असा मनमिळाऊ होता, कीं, पदोपदीं दुसऱ्या माणसांची संमति घेणें त्यांनां बरें वाटत असे. दुसऱ्यांनां पसंत असल्याशिवाय कोणचेंहि काम करणें त्यांनां आवडत नसे. ते स्वतः चांगले बुद्धिमान् होते, व त्यांनीं कॉलेजांत असतांना मन लावून अभ्यास केला असल्यामुळें त्यांचें मन चांगलें सुसंस्कृत झालें होतें. कॉलेजांत असतांनाच त्यांची आणि कृष्ण-रावांची प्रथम गट्टी जमली, ती पुढें जास्तच वाढत गेली. त्यांच्यापेक्षां कृष्णराव जास्त हुशार व धूर्त होते, म्हणून ज्या त्या कामांत कृष्णरावांची सल्ला घ्यावीशी चिंतामणरावांनां वाटत असे. स्वभाव पाहिले तर दोघांचे भिन्न भिन्न असत. चिंतामणराव भारी मनमिळाऊ, दिलदार व थोर वृत्तीचे असत; पण कृष्णराव नेहमीं आपल्याच ऐटींत, तुटकदार, व तब्बेतखोर असे होते. असा स्वभाव होता, तरी एकदां मनें जुळल्यामुळें चिंतामणराव नेहमीं पड घेऊन त्यांच्याशीं जुळवून घेत, व कृष्णरावहि त्यांनां मनापासून मान देत. चिंतामणराव कुठेंहि जावोत, लोकप्रिय व्हायचेच. कृष्णराव आपले जेथें तेथें सलत रहायचे, असा हमेश अनुभव येई.

चिंतामणरावांचे वडील उत्तरहिंदुस्थानांत नुकतेच वारले होते. त्यांची इस्टेट सगळी रोकड होती. त्यांनीं जमीनजुमला कोठेंच केलेला नव्हता. चिंतामणरावांच्या मनांत कोठें तरी एकादा इनामी गांव खरेदी करण्याचा होता, व उत्तरहिंदुस्थानांतल्यापेक्षां पुण्यासाताऱ्याकडे उत्तम हवेवर इस्टेट करावी, असा त्यांचा व त्यांच्या बहिणींचा फार हेतु होता. आनंदभुवन पहातांच त्यांनां तो बंगला व हवापाणी फार पसंत पडलें व तो त्यांनीं एकदम पांच वर्षांकरितां घेऊनहि टाकला. आतां त्यांच्या विशेष आग्रहावरून त्यांचे स्नेही भय्यासाहेबहि तेथें कांहीं दिवस रहायला आले होते. भय्यासाहेब हे भाऊसाहेबांपेक्षां किती तरी जास्त श्रीमंत होते, व त्यांचें घराणेंहि फार जुनें

व खानदानीचें असें होतें. चिंतामणरावांचा आणखीहि एक हेतु असा होता, कीं, जर आपल्या कमलिनीवर भय्यासाहेबांचें प्रेम जुळून आलें, तर सोन्याहून पिवळें होऊन सर्वच यथास्थित होईल.

---

## प्रकरण सहावें.

### रावबहादुरांच्या घरीं पार्टी.

शांतिसदनांतील, म्हणजे आनंदरावांच्या घरच्या स्त्रिया आनंदभुवनांतील स्त्रियांना भेटायला लवकरच गेल्या, व इंदिराबाई व कमलिनी याहि शांतिसदनांत परत भेटीला जाऊन आल्या. अशा प्रकारें त्यांचें दळणवळण जास्त वाढत चाललें. हळुहळू शांताबाईविषयींचा त्यांचा अनुकूल ग्रह बळावत गेल्याचें दिसूं लागलें. सीताबाई व खालच्या तिघी मुली जरी त्यांच्या दृष्टीनें यःकश्चित् ठरल्या होत्या, तरी पण थोरल्या दोघी बहिणी जास्त सलगी करण्यालायक आहेत, असें ठरलें होतें, व त्याप्रमाणें त्यांचें वर्तनहि दिसूं लागलें होतें. शांताक्का स्वभावानें अल्पसंतोषी, ती लागलीच विरघळली; पण ताराबाई अजून पहिल्याप्रमाणेंच होती. तरी पण, शांताक्काशीं त्या चांगल्या वागतात तें बहुतकरून आपल्या भावाचा कल पाहून वागत असतील, असा तिनें तर्क केला होता, व तो तर्क खरा असला तर उत्तमच आहे असें तिला वाटत होतें. आणि खरोखरच जेव्हां जेव्हां भाऊसाहेबांशीं त्यांची गांठ पडे, तेव्हां त्यांच्या मनांत शांताबाई जास्त भरत चालली असल्यासारखें दिसून येऊं लागलें होतें. शांताक्काचाहि ओढा भाऊसाहेबांकडे वाढत असल्याचें, इतर लोकांनां जरी नाहीं, तरी ताराबाईच्या दृष्टीला स्पष्ट दिसूं लागलें होतें. कारण, शांताक्का स्वभावानें विशेष भिडस्त अथवा लाजाळू होती, त्यामुळें आपल्या मनांत आलेले विचार अथवा अंकुर कोणालाहि सहज न दिसण्याइतकी ती स्वभावतःच वर्तन ठेवीत असे. कांहीं विशेष प्रगति नसतां लोकांनीं तर्क बांधीत बसावें, व त्यामध्यें पदरची भर घालून बडबडत सुटावें, हें शांताक्काच्या स्वभावाला पसंत नसे. म्हणून ती मुद्दामच मंडळीमध्यें फार जपून वागत असे. पण ताराबाईपासून ती गोष्ट लपून कशी राहणार ? आणि तिच्यापासून लपविण्याची जरूरहि पण नव्हती.

एके दिवशीं ताराबाई आपली मैत्रीण मालती हिच्याबरोबर फिरायाला गेली असतां सहज गोष्टीच्या ओघानें शांताक्काच्या मनाची स्थिति तिनें मालतीला

सांगितली. त्यावर मालती म्हणाली "लोकांनां बडबडण्याला मिळूं नये म्हणून बेतानं वागणं एकप्रकारें बरोबर आहे. पण अशा बेतानं वागण्यापासून दुसरीकडे नुकसान होण्याचा संभव आहे; मनांतला प्रेमोद्भव इतर लोकांप्रमाणं त्या प्रेम उत्पन्न करणाऱ्या माणसापासूनहि जर आपल्या सावधगिरीनं लपवून ठेविला, तर त्याला चालन न मिळाल्यामुळं कदाचित् तो जेथल्या तेथें खुरटून जाण्याचा संभव आहे. कारण 'प्रीतिपासुनी प्रीति वाढती' हें उघड आहे. आम्हांलाहि दिसतं आहे, कीं, भाऊसाहेबांनां शांता आवडते आहे. पण त्यांच्या मनांतल्या आवडीला जर तिच्यापासून त्यांनां जबाब मिळाला नाहीं, तर काय उपयोग? पहिल्यानं आवड साहजिकपणें उत्पन्न होते हें जरी खरं आहे, तरी आपणाला आवडणारं माणूस आपणाविषयीं तटस्थ व बेफिकीर आहे असं वाटलं, तर आपल्या मनांत उत्पन्न झालेली आवड वाढीस लागण्याच्या ऐवजीं उलट नाहींशी होत जाईल. तूं मला आवडतेस खरी, पण, मी आलें काय न आलें काय, तुला सारखंच आहे असं जर मला वाटलं, तर माझंहि तुजवरचं प्रेम थंड होत जाईल कीं नाहीं? आणि मनांत खरोखर प्रेम उद्भवलेलं असून, तें लोकं बडबडतील या भीतीनं गुप्त ठेवणं, ही तर फारच चूक! तसं करून त्यांचा प्रेमांकुर करपून गेला म्हणजे मग आपण लोकांची बडबड चुकविली एवढ्यानं कितीसं समाधान होणार आहे? माझा तर अगदीं याच्या उलट अभिप्राय आहे, कीं, आपल्या मनांत असेल त्यापेक्षां थोडंसं जास्तच प्रेम दिसूं द्यावं, तें पत्करलं. तूंच पहा, शांताक्कानं जर उत्तेजन दिलं नाहीं तर तेहि हळुहळू आपली आवड विसरून जातात कीं नाहीं."

"पण तिच्या स्वभावाला शक्य तेवढं उत्तेजन तिच्याकडून मिळतंच आहे. मला जर तें स्पष्ट दिसतं आहे, तर त्यांनां तरी तें कां दिसूं नये?"

"जसा कांहीं तुझ्याइतका त्यांनां तिचा हा भिडस्तपणा ठाऊकच आहे!"

"पण त्यांचं हें काम नाहीं का, कीं, आपल्या आवडीच्या माणसाचं आपणावर प्रेम आहे कीं नाहीं तें शोधून काढण्याचं?"

"घटकाभर आपण म्हणूं, कीं, तें त्यांचं काम आहे. पण इतका शोध करायला त्यांनां संधि तरी कशी मिळणार? वारंवार त्यांच्या गांठी पडतात खऱ्या, पण तेव्हां इतरहि पुष्कळ स्त्रिया असतात व पुष्कळ पुरुष असतात. दोन तास गांठ पडणार, त्यांतला कितीसा वेळ निव्वळ शांतेकडे देतां येईल

बरं त्यांनां ? तर, शांताक्कानं आलेल्या प्रत्येक संधीचा पूर्ण उपयोग करून घेतला पाहिजे, व त्यांनां उत्तेजन देऊन त्यांचं प्रेम वाढविलं पाहिजे. एकदां तें प्रेम पक्कं झालं म्हणजे मग हवा तेवढा भिडस्तपणा करावा!"

यावर ताराबाई हंसत म्हणते "जिथें कसंहि करून एकाद्याला आपल्या प्रेमजालांत पकडून घ्यायचा हेतु असेल, तिथें तूं म्हणतेस हा मार्ग बरोबर आहे. अन् माझ्या मनांत जर श्रीमंत असा एकादा नवरा काबीज करायचा असला, अथवा निदान कसा एकदां एकादा नवरा काबीज होतो असं मला झालं असलं, म्हणजे मी अगदीं अश्शीच वागेन! पण शांताला अजून इतकी हांव सुटली नाहीं! तिच्या तरी मनाचा अजून पुरता निश्चय झाला आहे कीं नाहीं, हाच मला संशय आहे. फार तर या महिन्यांत पांचसहा वेळां त्यांची गांठ पडली असेल, अन् चारपांचदां जेवणं बरोबर झालीं असतील. पण तेवढ्यानं तिचं तरी मन तिला पुरतं कसं कळावं? अन् त्यांची तरी तिनं मनासारखी परीक्षा कशी इतक्यांत करावी?"

"तसं नव्हे ग. नुसतीं जेवणींखाणींच जर एकत्र झालीं असतीं तर त्याला भूक कशी काय असते व कोणती भाजी जास्त आवडते एवढंच कळलं असतं. पण इतर तऱ्हेनं दळणवळण आणि सहवासहि चारपांचदां नाहीं का झाला?"

"हो, अन् त्या सहवासानं भाऊसाहेबांनां बिझिकपेक्षां लाडिस आवडतं, इतकं आणखी कळलं असेल. यापेक्षां महत्त्वाच्या गोष्टी समजल्या असतीलसं मला नाहीं वाटत!"

"बरं बाई, आमचं आपलं राहलं! माझं आपलं शांताक्काचं बरं व्हावं, इतकंच म्हणणं! माझा आणखी एवढाच अभिप्राय आहे, कीं, साधारण पतकरण्यासारखं माणूस असलं, म्हणजे त्याला चारपांच वेळां पाहिलं काय, अन् वर्षभर त्याची छानी करीत बसलं काय; एकच. जास्त वेळ परीक्षा करण्यानं, लग्न झाल्यानंतर जास्त का सुख व्हायचं आहे? लग्नापासून सुख होणं वा न होणं हें केवळ नशिबावर अवलंबून असतं. आधीं किती स्वभाव पारखून घेतले, तरी ते म्हणजे नेहमीं तसेच राहतात; किंवा त्यांच्यांत बदल होत नाहीं, असं थोडंच आहे? पुढंमागं फेरबदल हा व्हायचाच. अन् कमी-जास्ती मानानं मतभेद, रुचिवैचित्र्य उत्पन्न होऊन थोडीबहुत चकमक कधीं कधीं उडायचीच! म्हणून मी तर म्हणतें, कीं, ज्याच्याबरोबर आपणाला

आयुष्य घालवायचं त्याचे दोष आपणाला जितके कमी समजतील अन् तेहि जितके उशीरां, तितकं जास्तच चांगलं ! !"
तारा मोठ्यानें हंसत म्हणाली "वा वा ! हें तर फारच छान ! तुझं तत्त्वज्ञान विचित्र आहेच; पण प्रसंग आला म्हणजे तूंच प्रथम तें फेंकून देशील कीं नाहीं तें पाहीन !"

तो विषय इतकाच चालून संपला. कारण, दोघीहि आपापल्या घराकडे नंतर निघून गेल्या. आणखी कांहीं दिवस गेले. विश्रामस्थानांत कधीं कधीं सर्वांच्या गांठी पडत. नंतर एके दिवशीं रावबहादुरांनीं आपल्या घरीं आनंद-भुवनांतल्या माणसांच्या सन्मानार्थ एक मोठी थाटाची ईव्हिनिंग् पार्टी देण्याचीं आमंत्रणें केलीं. त्याप्रमाणें क्लबाची बहुतेक मंडळी त्यांच्या घरीं जमली होती. ईव्हिनिंग पार्टी हा एक नवीनच मेजवानीचा प्रकार प्रचारांत आला होता. संध्याकाळीं पांच वाजतां मंडळी जमून रात्रीं आठ वाजेपर्यंत राहून गप्पागोष्टी कराव्या, नानाप्रकारचे खेळ खेळावे, गाणीं म्हणावीं, वाद्यें वाजवावीं, चहा काफी, आईसक्रीम व नानाप्रकारचे फराळाचे पदार्थ सेवन करावे, व अशा तऱ्हेनें दोनतीन तास मिश्रसमाजांत आनंदानें घालवून नऊ वाजण्याच्या सुमारास घरोघर जावें, अशी व्यवस्था ईव्हिनिंग पार्टीमधें केलेली असे. अशा समयीं समवयस्क तरुण विवाहेच्छु जनांनां एकमेकांशीं सहवास करून आवडनिवड ठरविण्यास संधि मिळे.

भाऊसाहेब व शांता यांचें एकमेकांशीं कसें वर्तन चालतें, हें ताराबाई आपल्या इतर व्यवसायांत बारकाईनें निरखून पहात असे; परंतु त्यांच्या स्नेह्याचें आपणा स्वतःकडे दिवसेंदिवस जास्त लक्ष लागत चाललें आहे, याची तिला कल्पनाहि नव्हती ! संमेलनाच्या दिवशीं कृष्णरावांनीं तिला नुसती साधारण बरी म्हटली होती खरी, व दुसऱ्या खेपेला केवळ दोष काढण्याच्याच हेतूनें त्यांनीं तिच्याकडे पाहिलें होतें; पण तिच्या चेहऱ्यांत अनेक खोडी आहेत, अशी त्यांनीं आपली समजूत करून ठेवली नाहीं तोंच, त्यांनां असेंहि वाटूं लागलें, कीं, तिच्या त्या काळ्याभोर डोळ्यांच्या योगानें तिची एकंदर चर्या विशेष मोहक व पाणीदार दिसते, व त्यामुळें तिच्या अंगची चलाखी स्पष्ट होऊन जाते. तिची एकंदर शरीराची ठेवण उत्तमपैकीं बांधेसूद जरी नसली, तरी नैसर्गिक चपलतेमुळें व वारंवार सहजपणें होणाऱ्या अंगविक्षेपांनीं ताराबाई बरीच चित्ताकर्षक स्त्री होत असे. भय्यासाहेबांच्या मनांत झालेला हा फरक

तारेला बिलकुल कळून आला नव्हता. इतकेंच नव्हे, तर आपण त्यांच्या दृष्टीनें केवळ टाकाऊ आहोंत, असाच तिचा अजून समज होता. कृष्णरावांना मात्र दिवसेंदिवस तिच्याशीं जास्त सलगी करावीशी वाटूं लागली होती, व म्हणून स्वतः तिच्याशीं भाषण करण्यास सुरुवात करण्याच्या हेतूनें, ते प्रथम लोकांशीं चाललेल्या तिच्या संभाषणाकडे जास्त लक्ष देऊं लागले. ही गोष्ट आज रावबहादुरांच्या घरीं तिच्या लक्षांत प्रथम आली.

त्या वेळीं मालती तिच्याजवळ होती तिला तारा म्हणाली "मी कॅप्टन् फडक्यांशीं बोलत असतांना ते भय्यासाहेब लक्ष लावून ऐकत असतात, यांत त्यांचा काय हेतु असावा बरं?"

मालती म्हणाली "या प्रश्नाचं उत्तर त्यांच्यावांचून कोण कसं देणार बाई? त्यांनांच विचार पाहिजे तर!"

"पण पुन्हां जर तसं ते करूं लागले, तर मी खास त्यांनां सांगेन, कीं, तुमचं कृत्य आमच्या लक्षांत येऊन चुकलं म्हणून! त्यांनां भारी लोकांवर टीका करायची संवय आहे. म्हणून त्यांच्या टीकेची जर मला परवा करायची नसेल, तर आपणच होऊन आधीं थोडासा वात्रटपणा त्यांच्याशीं मला केला पाहिजे."

नंतर जरा वेळानें कृष्णराव त्या दोघींच्याकडे सहजगत्या आले. पण त्यांच्याशीं कांहीं बोलायचा त्यांचा हेतु दिसला नाहीं. म्हणून मालती चेष्टेनें आपल्या मैत्रिणीला हळूच म्हणाली "पाहूं बरं आहे का तुझी छाती, मघाशीं म्हणालीस तसं कांहीं त्यांनां बोलायची?"

त्यावरून ताराबाईला जास्तच चेव येऊन ती कृष्णरावांकडे वळली व म्हणाली "का हो, भय्यासाहेब! आपणाला नाहीं का वाटलं, कीं, मीं मघाशीं कॅप्टन् फडक्यांनां त्यांनीं एक पार्टी देण्याचा आग्रह भारी सडकून केला असं?"

भय्यासाहेब म्हणाले "वा, वा, फारच सडकून केलात आपण खरा. पण तो विषयच मुळीं सदा स्त्रियांनां आवेश आणणारा असतो!"

ताराबाई म्हणाली "आपली एवढी वक्रदृष्टिशी आम्हांवर?"

तितक्यांत मालती म्हणाली "पण ताराबाईची पाळी आतां आग्रह करून घ्यायची आली आहे, बरं का! मी आतां बाजा उघडते आहे ताराबाई, अन् मग काय होतं तें ठाऊकच आहे."

# आजपासून पन्नास वर्षांनीं !

ताराबाई म्हणाली "तूं तरी माल्तु एक चमत्कारिकच मैत्रीण आहेस, वाटेल तिथें अन् वाटेल त्याच्यासमोर मला गायला न् वाजवायला सांगतेस ती ! मला जर संगीताचा गर्व असता किनई, तर तुला अगदीं अमूल्य अशी मीं मानिली असती. पण खरं म्हणशील, तर ज्यांनीं नेहमीं उत्तम उत्तम व नामांकित अशा गवयांचं गाणं बजावणं ऐकलं आहे, अशांच्यापुढें मला नाहीं गावंसं वाटत !"

तरी पण मालती आपला आग्रह सोडीना. त्यावर तारा म्हणाली "बरं बाई, नाहींच सुटत, तर म्हणतें एकादं गाणं."

नंतर भय्यासाहेबांकडे पाहून ती हंसत म्हणाली "आमच्या मराठींतली एक छानदारशी जुनी म्हण आहे, ती आमच्या या खेडेगांवांतल्या सर्वांनां चांगली माहीत आहे. त्याप्रमाणें मी आतां न बोलतां आपला दम गाण्याकरितां राखून ठेवतें !"

ताराबाईनें एकदोन साधीं गाणीं म्हणून बाजावर वाजवून दाखविलीं. तीं जरी उत्तम नव्हतीं, तरी तीं कानाला मधुर लागलीं. आणखी म्हणा असा कित्येकजण तिला आग्रह करीत होते, पण त्यांनां कांहीं उत्तर मिळण्याच्या आधींच मथुरी बाजाशीं जाऊन उभी राहिली. कारण, रोज इतकी ती मेहनत घेत असे, ती लोकांपुढें आपली प्रवीणता दाखवावीशी तिला नेहमीं हौस असे. मथुरीच्या गळ्यांत तितकी गोडीहि नव्हती, अथवा खरी गाण्याची माहितीहि तिला नव्हती. कांहीं तरी गुण असावा म्हणून ती झटत असे, पण त्याच्या योगानें तिच्या गाण्यांत एकप्रकारचा शास्त्रीय थाट शिरून राहिलेला दिसत असे, तो कांहीं तिला शोभत नसे. तारा तिच्या निम्म्यानेंसुद्धां वाजवीत नसून तिच्या साधेपणामुळें लोकांनां तिचें गाणें जितकें गोड लागलें, तितकें मथुरीचें लागलें नाहीं. तिनें एकामागून एक पदें, ठुंबऱ्या, गझल, यांचा सपाटा चालविला; पण त्याला ना ताल ना सूर ! तरी मंडळी केवळ उपचारार्थ वा वा म्हणतच होती !

कृष्णरावांनां हा बाष्कळपणाचा प्रकार पाहून भारी संताप आला, व अशा तऱ्हेनें वेळ घालविणारांनां काय म्हणावें, तें त्यांनां समजेना. असे ते मनांतल्या मनांतच चरफडत होते, तों रावबहादुर त्यांच्याजवळ जाऊन त्यांनां म्हणाले "तरुण जनांनां संगीतासारखें दुसरें काय प्रिय असणार ? मला तर वाटतें,

भय्यासाहेब ! कीं, एकंदरींत संगीतासारखी दुसरी चीज नाहीं ! मी तर समजतों, कीं, प्रत्येक सुसंस्कृत जनाला ती एक अत्यंत आवश्यक अशी कला आहे."

यावर भय्यासाहेब म्हणाले "अलबत्, रावबहादुर! आणि दुसरें असें आहे, कीं, मुळींच संस्कार नसलेल्या जनांनांहि ती अवगत असते—धनगरसुद्धां आपली बांसरी नाहीं तर पावा वाजवीत असतोच !"

रावबहादुर नुसते हंसले. नंतर एकदोन क्षणानें ते म्हणाले "भाऊसाहेबांनां चांगलें ज्ञान आहे संगीताचें, तें आम्हाला दिसतेंच आहे. अन् आपणालाहि भय्यासाहेब, उत्तम प्राविण्य असेलच त्यामध्यें ?"

भय्यासाहेब म्हणाले "आपण परवां मीं म्हटलेलें ऐकलें असेल, नव्हे ?"

रावबहादुर म्हणाले "हो, हो, वा. फारच बहार केलीत आपण ! गणेश-खिंडींतल्या बँडची आपण नेहमीं अशीच मजा अनुभवीत असाल बहुतकरून!"

भय्यासाहेब म्हणाले "कधींच नाहीं. मी कधीं गेलों नाहीं तिथें."

रावबहादुर म्हणाले "असें काय ? तर मग, आपला बंगला पुण्यास आहे, नव्हे ?"

कृष्णरावांनीं नुसतें स्मित केलें. त्यावर रावबहादुर पुढें बोलले "माझाहि पूर्वी विचार होता पुण्यांत बंगला घ्यायचा. कारण, मला सुशिक्षित लोकांचा भारी शोक आहे. पण आमच्या कुटुंबाला तेथली हवा मानण्याची खात्री वाटेना."

भय्यासाहेब उत्तर देतील म्हणून रावबहादुर थोडेसे थांबले; पण ते मुळींच कांहीं बोलेनात. इतक्यांत ताराबाई जवळूनच कुठेंशी जात होती, त्यावरून थोडीशी तिची मौज करावी असें त्यांच्या मनांत आलें, म्हणून त्यांनीं तिला मोठ्यानें हांक मारून बोलाविली व म्हटलें "अग ताराबाई, संपलें का गाणें ? इकडे ये पाहूं जरा. ही मुलगी, भय्यासाहेब, किती उत्तम ब्रिज् खेळते म्हणून सांगूं ! एकदां आपण पहा तर खरें ! अशा सुंदर मुलीशीं खेळण्यानें आपणाला फार आनंद होईल." असें म्हणून त्यांनीं तेथें जवळच असलेले ब्रिजचे पत्ते काढण्यास सुरुवातहि केली.

भय्यासाहेबांनां फार आश्चर्य तर वाटलेंच, पण तिच्याशीं खेळत बसण्याची त्यांनीं नाखुषी दाखवली नाहीं. इतकेंच नव्हे, तर ते पत्ते हातांत घेणार इतक्यांत तारा झटकन् मागें होऊन म्हणाली "छे छे रावबहादुर ! मी कांहीं

आतां नाहीं खेळत. खरंच सांगतें, मी कांहीं मला कुणी खेळायला मिळवून द्या, असं म्हणायला इकडे नव्हतें आलें!"

कृष्णरावांनींसुद्धां अत्यंत योग्य अशा औपचारिक तऱ्हेनें "आम्हाला एकदां आपलें खेळणें पाहूं द्या तरी," असें आग्रहपूर्वक पुन्हां पुन्हां म्हटलें, पण व्यर्थ. रावबहादुरांनींहि जास्त आग्रह केला; "हें काय बरें तारा! तूं इतकी उत्तम खेळतेस, कीं, आम्ही अगदीं तुझी हुशारी बघून खूषच होतों. मग आम्हाला खूष करण्याकरितां आमचें नाहीं का येवढें ऐकत? या गृहस्थांनां पत्ते खेळणें फारसें आवडत नसेल, पण तेसुद्धां माझ्याकरितां तयार झाले!"

"भय्यासाहेब आहेतच तसे मनमिळाऊ," ताराबाई हंसत हंसत म्हणाली.

रावबहादुर म्हणाले "हो हो, तें तर खरेंच; पण तुझ्यासारखें माणूस खेळायला मिळतें आहे, तर ते मागें घेत नाहींत यांत काय आश्चर्य!"

ताराबाई म्हणाली "पण आत्तां नको, पुन्हां केव्हांतरी पाहूं!"

असें बोलून ती पटकन् निघूनच गेली. तिच्या या आढेवेढ्यांनीं तिच्याविषयीं कृष्णरावांचा ग्रह बिघडला नाहीं; इतकेंच नव्हे, तर या एकंदर भाषणांत तिची मुद्रा वेळोवेळीं इतकी बदलत होती, कीं, त्यांनां उलट तिचें कौतुकच वाटलें. तिच्या काळ्याभोर डोळ्यांतल्या तेजाचें कौतुक करीत ते उभे असतां त्यांच्याजवळ कमलिनी येऊन म्हणाली "आपल्या डोक्यांत काय चाललें आहे तें मीं ओळखलं, पण!"

कृष्णराव म्हणाले "मला नाहीं वाटत ओळखलें असेलसें!"

कमलिनी म्हणते "हात्तेच्या! त्यांत काय कठिण? आपला असा विचार चालला होता, कीं, या असल्या घोळक्यामधें जर कांहीं दिवस घालवावे लागले तर कोण पिडा होईल! अन् खरोखर, मला दिखील अगदीं आपल्यासारखं वाटतं आहे. इतकी मी कधीं कंटाळलें नव्हतें बाई! कोण बेचव माणसं हीं! नुसता गोंधळ माजून राहिला आहे जसा! सारीं फुसकीं, पण अभिमान किती म्हणतां? आपल्या तोंडांतून यांच्यावर जराशी चुरचुरीत टीका ऐकावीशी वाटते आहे मला!"

कृष्णराव म्हणाले "आपली कल्पना अगदीं सपशेल चुकली बरें! मी तर उलट मोठ्या मजेदार कल्पना करीत होतों! मी मनांत म्हणत होतों, कीं, एकाद्या सुंदर स्त्रीच्या पाणीदार नेत्रांनीं मन कसें गार होऊन जातें अगदीं!"

कमलिनी म्हणाली " हं हं, इतकं गार करून टाकणारं माणूस तरी कोण बाई ? तें तरी कळूं द्या!"

आणि कृष्णरावांनीं नांव सांगितल्यावर आश्चर्यानें ती म्हणाली "कोण! ताराबाई ? मोठंच अजब आहे म्हणायचं! कधींपासून इतकी छाप बसविलीन् तिनं? अन् मुहूर्त कोणचा धरायचा ठरला आहे ?"

कृष्णराव म्हणाले " माझी खात्रीच होती, आपण हा प्रश्न करणार म्हणून ! स्त्रियांची सुतानं स्वर्गाला जाण्याची तयारी असते म्हणतात, तें का खोटें ? जरा डोळे चांगले म्हटले, कीं, त्यावरून एकदम प्रेम, अन् तेथून लगेच लग्न, अशा उड्या त्या मारणारच ! मला ठाऊक, कीं, आपण एकदम मुहूर्तच विचाराल!"

कमलिनी म्हणाली " हें पहा, इतकं जर माझं म्हणणं आपणाला लागतं आहे, तर मी तें खास ठरलंच असं समजतें! छान, छान, सासुबाई तर अगदीं पसंत काढल्यात निवडून! अन् नेहमीं त्यांनां आपल्या जवळच तुमच्या दिलबहारांत ठेवून घ्या, बरं का!"

अशा प्रमाणें ती चेष्टा करीत होती, तरी भय्यासाहेब स्वस्थ ऐकून घेत होते व मध्येंमध्यें हंसतहि होते. त्यावरून कमलिनीची खात्री होऊन धास्ती नाहींशी झाली!

---

## प्रकरण सातवें.

### शांताबाईचा आजारीपणा.

शिवदुर्ग गांवापासून अर्ध्या मैलावर आनंदरावांचा बंगला असे. त्यांनां सालीना चारपांच हजार रुपयांचें उत्पन्न असून तें त्यांच्या मामाकडून त्यांनां मिळालें होतें. पण मामानें तें देतांना अशी एक अट घालून ठेवली होती, कीं, आनंदरावांनीं लग्न करून जर त्यांनां मुलगा असला तरच तें उत्पन्न आनंदरावांच्या पश्चात् त्या मुलाला वंशपरंपरा रहावें; पण जर आनंदरावांनीं लग्नच केलें नाहीं, किंवा त्यांनां पुत्रसंतति नसली, तर त्या मामांचा एक बायकोच्या बहिणीचा नातू होता, त्याला तें आनंदरावांच्या पश्चात् मिळावें. आनंदरावांनीं लग्न केलें, पण त्यांनां सगळ्या मुलीच झाल्या. त्यामुळें मुलींनां त्या इस्टेटीचा विशेष फायदा नव्हता. आनंदराव होते तोंपर्यंत त्यांची काळजी नव्हती खरी; तितक्यांत त्या सुस्थळीं पडून जातील तर ठीकच होतें; पण

नाहीं तर त्यांची दैनाच होती. कारण, आनंदराव असा खर्चिक माणूस होता, कीं, त्याच्याजवळ फारशी शिल्लक नव्हती. सीताबाईचा बाप शिवदुर्गांत पूर्वीं मुखत्यार वकील होता. तिची एक थोरली बहीण शिवदुर्गांतच दुसऱ्या एका मुखत्यार वकिलाला दिली होती, तिचें नांव रमाबाई भागवत; आणि एक भाऊ होता, तो मुंबईंत भाजीपाल्याच्या दलालीचा व्यापार करीत असे.

गांव बेताचें दूर असल्यामुळें एकदोन दिवशीं तरी आनंदरावांच्या मुली तिकडे फिरत फिरत मावशीला भेटायला म्हणून जात असत. शिवाय, बाजारांतून लोंकर, सुया, फिती, किनारी, मजलिन् वगैरे कांहींना कांहीं तरी आणायचें असेच, तें मावशीच्या घरीं जवळच्या जवळ बघायला आणण्याची बरी सोय होई. शेवटच्या दोघी मुली आईच्या लाडानें साधारणच शिकल्या होत्या. त्यांनां वेळ घालवायला कांहीं तरी विषय लागे. तो एकदां गांवांत मावशींकडे जाऊन आलें म्हणजे दोनतीन दिवस पुरे. हल्लीं तर शिवदुर्गास एक पलटणीचा सबंध रिसाला येऊन चार महिने राहिला होता. मग बातमीला काय तोटा ? त्या रिसाल्यांतल्या तरुण विवाहित अथवा अविवाहित ऑफिसरांची माहिती काढण्याचा एक मोठाच उद्योग झाला होता. प्रत्येक ऑफिसर कुठें राहातो, त्याच्या घरीं कोण कोण आहे, वगैरे बातमी मावशीकडे लागायची. भागवत वकील सर्वांनां जाऊन भेटून आलेच होते. त्यामुळें ऑफिसरहि त्यांच्या घरीं कधीं कधीं येत. त्यामुळें धाकट्या दोघीतिघी मुलींनां ऑफिसरांवांचून बोलायला दुसरा विषयच नव्हता. त्यांचे ते लालभडक पोषाख, व त्यावरचीं चकचकीत बटनें आणि तलवारी, यांनीं त्यांनां अगदीं दिपवून टाकलें होतें. चिंतामणरावांची इतकी श्रीमंती देखील त्या लाल पोषाखापुढें त्यांच्या नजरेनें रद्द ठरली होती !

एके दिवशीं बराच वेळ त्यांच्या ऑफिसरांविषयीं गप्पा ऐकून आनंदराव म्हणाले "मी स्वस्थ तुमचें बोलणें ऐकतों आहें. मला तर आतां खात्री वाटूं लागली आहे, कीं, तुमच्या दोघींसारख्या मूर्ख पोरी कुठेंहि नसतील ! मला आधीं तसें वाटतच असे, पण आतां तर अगदीं शंका राहिली नाहीं त्याविषयीं !"

हिरी गप झाली; पण सुंदर आईची जास्त लाडावलेली, तिला बापाच्या बोलण्याचें कांहींच न वाटून ती "एका ऑफिसराला उद्यां मी जाऊन भेटणार आहें," असें आईला म्हणाली.

# शांताबाईचा आजारीपणा.

सीताबाई आनंदरावांनां म्हणतात "ही काय बाई आपल्याच लेंकरांनां नांवं ठेवण्याची हौस पण? कोणाच्या पोरांनां मला नांवं ठेवायचींच झालीं, तर मी नाहीं बाई कधीं आपल्याच लेंकरांनां वाईट म्हणणार!"

आनंदराव म्हणाले "आपलीं पोरें जर बेवकुब असलीं, तर तें आपणालाच प्रथम कळून यावें, असें मला तर वाटतें."

सीताबाई म्हणाली "पण असतील तर ना? आपलीं तरी भारी हुशार आहेत हो!"

आनंदराव म्हणाले "तुमचें अन् आमचें इतर सर्व बाबतींत जसें मत अगदीं तंतोतंत जुळतें, तसें याहि गोष्टींत जुळत असतें तर काय मौज होती! पण इथें फार मतभेद आहे. या धाकट्या दोघी तर मला वाटतें अगदीं अत्यंत गाढव आहेत!"

सीताबाई म्हणाल्या "असूं द्या आपल्या! मोठाल्या माणसांसारखी त्यांनां कुठून अक्कल येईल इतक्यांत? जरा मोठ्या झाल्या, म्हणजे नाहीं ऑफिसरां-करितां इतक्या धांवपळ करायच्या. मला आठवतें आहे, कीं, मलासुद्धां लहानपणीं पलटणींतले ऑफिसर बरे वाटत. अझूनसुद्धां मला ते आवडतात. अन् एकादा कर्नल जर माझी एकादी मुलगी येऊन मागेल, तर मी कांहीं असा जांवई नापसंत नाहीं करायची. परवां रावबहादुरांच्या पार्टीमधें तो कॅप्टन् फडके कसा डौलदार दिसत नव्हता बरं?"

यावर सुंदर म्हणते "कॅप्टन् फडके कनई, मावशी म्हणते, आतां पहिल्या-सारखे त्या मास्तरीणबाईच्या घरीं जात नाहींत, बरं का, आई!"

सीताबाई आपल्या लाडक्या लेंकीला कांहीं उत्तर देणार, तों इतक्यांत एका गड्यानें एक पत्र आणून शांताक्काच्या हातीं दिलें, व आनंदभुवनांतला पट्टेवाला उत्तरासाठीं उभा आहे म्हणून तो म्हणाला. सीताबाईची मुद्रा आनंदानें प्रफुल्लित झाली, व शांता वाचीत आहे तोंच त्या उतावळीनें म्हणाल्या "कुणाचं ग तें पत्र—कशाविषयीं आहे—काय म्हणतात ते—अग लवकर बोल—सांग झटकन् बाळ!"

"तें कनई कमलिनीचं आहे," असें म्हणून शांतानें तें वाचून दाखविलें:—

**"अत्यंत प्रिय मैत्रीण शांताबाई यांस,**

**प्रेमपूर्वक सा. न. विनंति विशेषः—**

**आजचा दिवस जर आपण मेहरबानीनें आमच्या घरीं येऊन घालविला**

**नाहीं, तर ताईचें न् माझें नेहमींचें वांकडें येऊन बसण्याची आम्हांला फार भीति वाटते. कारण सबंध दिवस आम्ही एकट्याच दोघीजणी असलों तर अखेर भांडण झाल्याखेरीज कसें राहील ? म्हणून, हें पत्र हातीं पडतांक्षणींच इकडे निघून यावें. आज पुरुष सारे ऑफिसरांकडे मेजवानीला गेले आहेत.**

**आपली सदैव मैत्रीण,**

**कमलिनी भावे."**

"ऑफिसरांकडे मेजवानी !" सुंदर उद्गारली. "अन् मावशीनं कशी नाहीं आम्हांला अगोदर बातमी दिलीन् ?"

"पुरुष बाहेरच का गेले आहेत ?" सीताबाई उद्गारल्या. "मग कांहीं मोठासा अर्थ नाहीं आजच्या जाण्यांत !"

"बाबा, गाडी मिळण्यासारखी आहे का ?" शांतेनें विचारलें.

सीताबाई म्हणाल्या "अं हं, घोड्यावर बसून जा, बाळ. कारण, पावसाचा रंग दिसतो आहे. अन् तो पडायला लागला तर रात्रीं आयतंच तुला रहावं लागेल."

ताराबाई म्हणाली "पण आई, त्या आपली गाडी तिला परत यायला देणार नाहींत कशावरून ?"

सीताबाई म्हणाल्या "अलबत् नाहींच देणार ! कारण, भाऊसाहेबांच्या गाडींत पुरुष गेले असतील, अन् बंडोपंतांचा एक घोडा आजारी आहे !"

शांताबाई म्हणाली "मला बाई गाडीच बरी वाटते जायला."

सीताबाई म्हणाल्या "पण हें पहा बाळ, त्या घोड्यांनां फुरसत आहे कोठें ? त्यांतून आज त्यांनां मळ्याकडे जायचें आहे. आहे ना हो ?"

आनंदराव म्हणाले "किती दिवस माझ्या मनातून एकदां तिकडे फेरी मारून यायचें आहे. पण तुमच्या या नेहमींच्या जाण्यान् येण्याखालीं आम्हाला गाडी मिळते आहे कुठें ?"

ताराबाई म्हणाली "पण तुम्हाला आजच मळ्याकडे जायचं असलं तर आईचं आयतं काम झालं !"

अखेर आनंदरावांनीं कबूल केलें, कीं, घोडे तांगा घेऊन सकाळींच साताऱ्याला गेले आहेत. अर्थात्, शांताला स्वारीच्या घोड्यावर जाणें भागच पडलें. आणि खास आज पाऊस येईल असे हौसेनें उद्गार काढीत सीताबाईंनीं तिची रवानगी करून दिली.

## शांताबाईचा आजारीपणा.

सीताबाईचें भाकित अक्षरशः खरें ठरलें. शांता घरांतून जाऊन दहापंधरा मिनिटें झालीं नाहींत, तोंच सडकून पाऊस पडूं लागला. ताराबाईला शांता भिजली कीं काय, म्हणून काळजी लागून राहिली; पण सीताबाईला उलट आनंद झाला. रात्र पडेपर्यंत पावसानें अगदीं झोड लावली होती, तेव्हां अर्थातच शांता परत येणें अशक्य झालें.

"काय पण माझी नामी युक्ति निघाली ती," सीताबाई दोनचारदां म्हणाल्यासुद्धां. जणूं काय त्यांनींच पाऊस पडायला लावला होता! रात्रभर त्या आपल्या युक्तीवर खूष होऊन राहिल्या होत्या. कारण त्यांच्या त्या युक्तीचा खरा परिणाम त्यांनां सकाळपर्यंत कळला नव्हता. सकाळीं चहा घेऊन झाला नाहीं, तोंच आनंदभुवनांतून एक चिठी ताराच्या नांवानें आली, तेव्हां सीताबाईनां आपल्या युक्तीचें खरें स्वरूप कळून आलें. ती चिठ्ठी येणेंप्रमाणेंः—

**" प्रिय ताराबाईस आशीर्वाद विशेषः—**

**आज सकाळीं मला अंमळ बरें वाटत नाहीं आहे, तें बहुशः काल इकडे येतांना थोडीशी भिजून हुडहुडी वाटली होती म्हणूनच असेल. मला पक्कें बरें वाटल्याशिवाय माझ्या मैत्रिणी मला एथून घरीं येऊं देत नाहींत, अन् त्यांनीं डाक्टरलाहि बोलावणें धाडलें आहे. डाक्टर इकडे आल्याचें तुम्हांला समजलें, तर तुम्ही उगीच घाबराल, म्हणून ही चिट्ठी आगाऊ लिहिली आहे. वास्तविक थोड्याशा सर्दीखेरीज मला कांहीं झालेलें नाहीं आहे. कळावें.**

**आपली,**

**शांता "**

ताराबाईनें चिठ्ठी वाचून दाखवितांच आनंदराव म्हणाले "ही पहा आपली उत्तम युक्ति! आपल्या लेंकीला जर विषमबिषम झाला—किंवा आणखी कांहीं बरेंवाईट झालें—तर आम्हां सर्वांनां एवढें तरी समाधान राहील, कीं, तें सगळें उत्तम जांवई मिळविण्याच्या आपल्या युक्तीचें फळ आहे!"

सीताबाई म्हणाल्या "एः, मला नाहीं भीति वाटत तसली! अशीं सर्दीनं माणसं थोडींच कधीं दगावत असतात! तिथें तिची चांगली बरदास्त घेतली जाईल. तिथें ती राहिली तें कांहीं वाईट नाहीं झालं. मी दिखील एकदां जाऊन तिला बघून येईन, गाडी असली तर."

ताराला बहिणीची काळजी वाटूं लागली. इतकी, कीं, गाडी नसली तरीहि तिनें जाण्याचा निश्चय केला, आणि तिला घोड्यावर बसतां येत नव्हतें म्हणून पायीं गेल्याशिवाय दुसरी तोडच नव्हती. तिचा निश्चय ऐकून सीताबाई म्हणाल्या "तारा, चिखल कोण झाला आहे, पायीं कसची जातेस ? वेडीच आहेस कुठली ! तिथें पोंचेपर्यंत अगदीं अवतार बनून जाईल तुझा. कुणाच्या नजरेससुद्धां पडणं शक्य राह्यचं नाहीं तुला !"

ताराबाई म्हणाली "मी शांताला पाह्यला शक्य राहीन ना ? मला तेवढंच हवं आहे !"

आनंदराव म्हणाले "ही का तारे आम्हाला टांग्याची सूचना वाटतं ?"

ताराबाई म्हणाली "नाहीं हो बाबा, मी खरंच पायीं जातें. तीन मैलतर सारं आनंदभुवन आहे. कारण असल्यावर न जायला काय झालं ? मी जेवणाच्या आधीं परत दिखील येईन !"

मथुरा मध्येंच म्हणाली "ताई, तुझा हेतु मोठा श्लाघ्य आहे. 'परदुःखेन दुःखिता विरला' पण आपल्या प्रत्येक कृत्याला सारासार विचाराची माणसानें जोड दिली पाहिजे, आणि जेवढी वास्तविक जरूरी असेल त्या मानानंच श्रमाचं प्रमाण ठेवलं पाहिजे."

सुंद्री व हिरी म्हणाल्या "चला, आम्हीहि गांवापर्यंत ताईबरोबर जाऊं."

तारानें तें कबूल केलें व तिघीजणी पायींच निघाल्या. घराबाहेर पडतात तों सुंदर म्हणाली "चला, जरा पाय जलदी उचलले तर कदाचित् कॅप्टन् गोविंदराव आज जायचे आहेत त्यांचीहि गांठ पडेल."

शिवदुर्गाशीं पोंचतांच धाकट्या दोघी आंत गेल्या व ताराबाई एकटी पुढें चालूं लागली. गाडीरस्त्यापेक्षां पाऊलवाट एक मैल जवळ होती म्हणून तिनें जास्त विचार न करितां तीच धरली. तेथें तर कांहीं ठिकाणीं अगदीं आमटी चिखल झाला होता. मध्यें मध्यें शेतांचीं कुंपणें, बांध होते ते ओलांडून तिला जावें लागलें. अशा तऱ्हेनें ऊन्ह व वारा खात खात ती आनंदभुवनाच्या बागेशीं गेली. जोडे चिखलानें सडकून भरलेले, अंगावर चिखलाचा शिडकाव झालेला, ओचे भिजून चिंब झालेले, केस विस्कळलेले, व दोन मैल अशा रस्त्यानें वाऱ्यांतून चालल्यामुळें चेहरा गुलाबी रंगावर चढलेला आहे, अशा स्थितींत ती पायऱ्या चढून आंत गेली. आंत एका बाजूच्या दालनांत मंडळी चहा घेऊन नुकतीच जमली होती. तारेला पाहून सर्वांनांच आश्चर्य वाटलें.

एवढ्या सकाळीं, अशा पावसाळी हवेंत, ती तीन मैल चालत आली असेल, हेंच तेथल्या स्त्रियांनां खरें वाटेना; आणि एकटी आल्याचें तर विचित्रच वाटलें! तारा मनांत उमजली, कीं, त्या आपल्याला त्याबद्दल अगदीं तुच्छ मानितील. बाह्यात्कारीं सर्वांनींच तिचें स्वागत केलें. भाऊसाहेबांनीं खरोखरच मनापासून तिचा सत्कार केला. कृष्णराव थोडेंसें औपचारिक बोलले व बंडोपंतांनीं अवाक्षरहि काढलें नाहीं. कारण, जराशानें फराळाला आज काय मिळणार, याचाच ते विचार करीत होते. कृष्णराव एकपक्षीं श्रमामुळें आलेल्या चेहऱ्या-वरील गुलाबी रंगाकडे कौतुकांत, तर दुसऱ्यापक्षीं इतक्या लांब एकटीनें येण्याचें वास्तविक प्रयोजन होतें कीं नाहीं, अशा संशयांत गढून गेले होते.

शांताची बातमी फारशी समाधानकारक नव्हती. रात्रभर डोकें दुखत होतें, व झोंपहि फारशी लागली नव्हती. सकाळीं अजून तापहि होताच म्हणून अजून हंतरुणावरच ती होती. तिनें आपल्या शांत स्वभावाला अनुसरून आपल्या आजाराला होतें त्यापेक्षां कमी स्वरूप घरीं पाठविलेल्या चिठ्ठींत दिलें होतें. ताराला पहातांच तिला समाधान वाटलें; पण घसा दुखत असल्यामुळें तिच्यानें फारसें बोलवत नव्हतें. इंदिराताई व कमलिनी बाहेर गेल्यावर आपली इतकी चांगली काळजी त्यांनीं घेतल्याबद्दल तिनें कृतज्ञतेचे मात्र उद्गार काढले.

नंतर आठ वाजण्याच्या सुमारास थोडासा उपहार झाल्यावर, डाक्तर आले. त्यांनीं शांताला तपासून, त्यांच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें "जबर सर्दी झाली आहे; नीट काळजी घेतली तर भिण्यासारखें कांहीं नाहीं; मात्र कॉंप्लिकेशन्स नाहीं झालीं पाहिजेत; थंडीवाऱ्यांत बिलकुल जाऊं नये; अंथरुणावर पडून रहावें; अन् पुड्या, गोळ्या, पिण्याचें औषध पाठवतों, तें सर्व सांगितल्याप्रमाणें द्यावें" वगैरे सांगितलें.

दहा वाजल्याबरोबर आतां परत जायला निघालेंच पाहिजे, असें वाटून ताराबाई नाइलाजानें तसें शांताबाईला म्हणाली. कमलिनी जवळ होतीच; तिनें गाडींतून जा म्हणून थोडासा आग्रह केल्यावर तारानें तें कबूल केलें; परंतु तारा जाऊन आपण येथें एकटी राहणार, हें शांताला कसेंसेंच वाटूं लागलें, असें तिच्या चेहऱ्यावरून कमलिनीला स्पष्ट दिसूं लागलें. म्हणून तिनें गाडी देण्याचा विचार सोडून देऊन "तुम्हीसुद्धां इथेंच यांच्याबरोबर रहा, जाऊं नका," असा केवळ नाइलाजानें आग्रह सुरू केला, व मनांत मुळींच नसतां शांताकरितां म्हणून ताराला कमलिनीच्या आग्रहाला मान द्यावा लागला.

एक पट्टेवाला मात्र घराकडे पाठवून घरीं हकीगत कळविली. व परत येतांना आपल्याकरितां व शांताकरितां कपडे वगैरे आणण्यास सांगितलें.

---

## प्रकरण आठवें.

### सर्वगुणसंपन्न स्त्री कोणती ?

दुपारचें जेवण म्हणजे आनंदभुवनांत एक मोठाच समारंभ असे. मिश्रसमाजाची चाल पडल्यापासून अर्थात् जेवणालाहि स्त्रीपुरुषें एकदमच बसण्याची वहिवाट जिकडे तिकडे श्रीमंत लोकांत जारीनें सुरु झाली होती. त्याचप्रमाणें आचरटपणाच्या सोंवळ्याओंवळ्याचा नायनाट होऊन निवळ स्वच्छतेवर सर्व मदार येऊन राहिली होती. स्वच्छतेकरितां पुरुषांनीं कंबरेपासून वर उघडें बोडकें ( अर्धनग्न ) राहण्याची हल्लीं जरूर वाटेनाशी झाली होती. स्वच्छ धूतवस्त्रें अंगभर नेसून स्त्रीपुरुषें भोजनास बसत असत. त्यांतल्या त्यांत स्त्रियांनां दागदागिने, वेणीफणी नीटनेटकी करणें, हीं जास्त कामें असल्यामुळें पुरुषां-पेक्षां तयारी करण्यास त्यांनां जास्त वेळ लागे, हें उघड आहे. जों जों श्रीमंती जास्ती, तों तों या तयारीचें प्रमाण वाढत असे. कमलिनी व इंदिराताई दहा वाजल्याबरोबर पोषाखाच्या तयारीला गेल्या, त्या साडे अकरा वाजतां आपापल्या खोल्यांतून बाहेर पडल्या. तारेची काय, दहापंधरा मिनिटांत तयारी होऊन गेली. ती भोजनाला येऊन बसल्याबरोबर सर्वांनीं, व विशेषतः भाऊसाहेबांनीं शांताची उत्कंठेनें चौकशी केली.

" इतक्यांत फरक तो काय पडणार ? होती तशीच अजून आहे, " असा जबाब तारानें दिला.

कमलिनीनें व इंदिराताईनें तीनचार वेळां " काय बाई सर्दीपासून डोकं दुखतं म्हणतां ? आम्हांला एकदां अनुभव आला तेव्हांपासून आम्ही थंडी वाऱ्यांत पाऊलसुद्धां घालीत नाहीं " असें कांहीं तरी म्हटलें, आणि मग त्या जेवणांत दंग होऊन गेल्या.

भाऊसाहेबांच्या चेहऱ्यावर मात्र स्पष्टपणें काळजीचीं चिन्हें जेवणभर दिसत होतीं, व ते ताराबाईचा फार आग्रहपूर्वक समाचार घेत असल्यामुळें, तिला आपण आज निवळ आगंतुक आहों, असें वाटेनासें झालें. दुसऱ्या कोणीं फारसें तिच्याकडे लक्ष दिलें नाहीं; भय्यासाहेबांकडे त्या दोघी पार गुंतून गेल्या होत्या. बंडोपंतांचें पान तारेच्या शेजारीं होतें, ते तर

काय जेवण करण्यांत अत्यंत गुंग झाले असल्यामुळें त्यांनां बोलायला फुरसत कोठें होती ? लाडवापेक्षां मला पुरीच पाहिजे, असें ताराबाई म्हणतांना त्यांनीं ऐकल्यावर तर ते आश्चर्यचकितच होऊन गेले होते !

जेवण झाल्याबरोबर तारा बहिणीकडे एकदम गेली, व इतर मंडळी मुखशुद्धीकरितां दुसऱ्या दालनांत जाऊन बसली. जेवतांना अनेक कारणांनीं कमलिनीचें बोलणें बरेंच बंद होतें, तें आतां ताराबाई तेथें नसल्यामुळें तिनें तिच्यावरच सुरू केलें. "काय पण, रीतभात तर मुळींच तिला ठाऊक नाहीं! गर्वन् उद्धटपणा मात्र रगड भरला आहे ! चांगल्या लोकांत कसं बोलावं, कसं वागावं, तें तर मुळींच माहीत नाहीं, अन् चेहराहि पहावा तो असाच !"

इंदिराताईनें तें सर्व कबूल करून आणखी म्हटलें "एकंदरींत काय, चालणारी जबरी आहे, याशिवाय तर बाई मला कांहीं तिच्यांत दिसत नाहीं! आज सकाळीं आली तेव्हांचा तिचा अवतार तर मी कधीं नाहीं विसरायची ! जशी कांहीं भिल्लीण एकादी !"

कमलिनी म्हणाली "तें तर बोलायची सोयच नाहीं ! मीं तर कोण कष्टानं हंसू आंवरलं म्हणतेस ताई ! आधीं इकडे येण्याचंच कारण नव्हतं. बहिणीला जरा कुठें सर्दी झाली, तर स्वतः येवढं नदीनाल्यांतून धडपडत यायला कशाला हवं होतं ? केंस काय विखरले होते पण !"

इंदिराताई म्हणाली "अन् ओचे पदर ? तूं नाहीं का पाहिलेस ? निदान वीतवीत तरी ओचे चिखलानं बरबटले होते. अन् पदर भरलेला दिसूं नये म्हणून वरती शाल घेतली होती, तरी तें काय झांकतं ?"

भाऊसाहेब म्हणाले "तुमचें हें वर्णन, कमळे! खरें असेल; पण मीं यांतलें कांहींसुद्धां पाहिलें नाहीं. मला तर ती सकाळीं इथें आली, तेव्हां फारच सुरेख दिसली. ते तुमचे ओचे पदर मी नाहीं इतके पहात बसलों !"

कमलिनी म्हणाली "भय्यासाहेबांनीं अलबत् तें सारं लक्षांत धरलंच असेल. का हो भय्यासाहेब, आपली बहीण अशी दिसलेली आवडेल का आपल्याला ?"

कृष्णराव म्हणाले "अलबत् नाहीं."

कमलिनी म्हणाली "काय बाई तरी ! चार मैलन् पांच मैल, का किती कोण जाणे, एकटीनं धांवत सुटणं, चिखल कोण मी म्हणतो, वाऱ्यांत तर वाऱ्यांत, रानांतून, पळूं लागावं, म्हणजे आहे तरी काय ? निवळ आडदांडपणा

झालं! चालरीत सोडून द्यायची, अन् आलं मनांत कीं आपलं पळत सुटायचं! रानवटच माणसं म्हणायचीं हीं!"

भाऊसाहेब म्हणाले "पण मला तर यांत बहिणीवरचें प्रेमच जास्त दिसून येतें बुवा!"

कमलिनी हळूच भय्यासाहेबांकडे पहात हंसून म्हणते "आजच्या यामुळं आपलं त्या काळ्याभोर डोळ्यांचं कौतुक जरासं कमी झालं असेल ना? अरेरे!"

कृष्णराव म्हणाले "बिलकुल नाहीं! चालत आल्यानें ते उलट जास्तच पाणीदार दिसत होते."

थोडा वेळ गेल्यावर इंदिराताई म्हणाली "मला शांताबाई फार पसंत वाटते, अन् तिचं बिचारीचं चांगलं होवो, असं मी मनापासून म्हणत असतें; पण असलीं आईबापं, अन् अशी दुसरी नातेवाईकमंडळी असल्यावर मला नाहीं वाटत तिला कुठं उत्तमसं स्थळ मिळेलसं!"

कमलिनी म्हणाली "तिच्या मावशीचा नवरा कायसा बगल्या वकील आहे, असं ऐकलं नाहीं परवां आपण?"

इंदिराताई म्हणाली "हो, हो, अन् मामा कायसा कांदेवाडींत कांद्या-बटाट्यांची दलाली करतो!"

कमलिनी म्हणाली "वा, वा, तें तर फारच पसंत!" असें म्हणून दोघी सडकून हंसल्या.

भाऊसाहेब म्हणाले "सगळ्या कांदेवाडी भरून जरी त्यांचे मामे चुलते असले, तरी त्यांचा मोहकपणा केंसभरसुद्धां कमी होणार नाहीं!"

कृष्णराव एकदम म्हणाले "पण त्यामुळें उच्च दर्जाचें स्थळ मिळण्याला तर भारी पंचाईत पडेल कीं नाहीं? मी तर म्हणतों, बहुतेक अशक्यच होईल!"

यावर भाऊसाहेब कांहींच बोलले नाहींत. पण बहिणींनां तें म्हणणें बरोबर पटलें, व नंतर बराच वेळ त्यांनीं आपल्या 'प्रिय मैत्रिणी' च्या हलकट नातेवाईकांची चेष्टा चालविली होती. अखेर भाऊसाहेब वामकुक्षी करण्यासाठीं निघून गेले, तशी इतर मंडळीहि त्याच उद्योगाला लागली.

तिसऱ्या प्रहरीं चार वाजतां पुन्हां चहाची वेळ झाली, तेव्हां ताराबाई बहिणीच्या खोलींतून भाऊसाहेबांनीं निरोप पाठविल्यावरून खालीं दिवाण-खान्यांत आली. दररोज मंडळी तेथेंच चहानंतर पांचसहा वाजेपर्यंत बसत

असे. शांताबाईला दुपारीं चांगली झोंप लागली होती त्यामुळें डोकेंहि आतां साधारण कमी झालें होतें. हें ऐकून सर्वांनां बरें वाटलें. चहा घेऊन झाल्यावर पत्ते निघाले, व नेहमींप्रमाणें मंडळी चौघांचें ब्रिझिक सुरु करण्याच्या विचारांत होती, तों चिंतामणराव भाऊसाहेब म्हणाले "आज आपण सहाजणें आहों, तर लाडीसच खेळूं या, म्हणजे सगळ्यांनांच करमणूक होईल."

यावर ताराबाई म्हणाली "छे छे, तसं कांहीं नको. शांताक्का अंमळशानं जागी झाल्यावर मला जावंच लागेल. तोंवर मी एकादं पुस्तक वाचीत बसतें."

बंडोपंतांनां आश्चर्य वाटून ते म्हणाले "काय? पत्त्यापेक्षां आपणाला पुस्तक आवडतें? अजब आहे बुवा हें!"

कमलिनी म्हणाली "ताराबाईनां पत्ते खेळायचा अगदीं तिटकारा आहे हो! त्या मोठ्या जबऱ्या वाचणाऱ्या आहेत, त्यांनां दुसऱ्या कश्शांत मौज नाहीं वाटत!"

ताराबाई म्हणाली "दोन्हीहि गोष्टी मला लागू नाहींत! मी जबरी वाचणारीहि नाहीं, अन् दुसऱ्या पुष्कळ गोष्टींत मला मौजहि वाटत असते."

भाऊसाहेब म्हणाले "अलबत्! बहिणीची शुश्रूषा करण्यांत तुम्हाला मौज वाटते, हें तर आम्हांला स्पष्टच दिसतें आहे. आणि ती पुनः बरी झाली म्हणजे तुम्हाला फारच मौज वाटेल, हें अगदीं निःसंशय."

ताराबाई फक्त हंसली व एका टेबलावर पुस्तकें ठेवलीं होतीं तिकडे वळून तीं चाळूं लागली, तों चिंतामणराव म्हणाले "आणखी आहेत वरतीं चांगलीशीं, तीं आणवतों. माझी लायब्ररी असावी तशी नाहीं, हें मी कबूल करितों; पण माझ्या आळशीपणामुळें आहेत तीं सुद्धां मीं अजून सारीं वाचलीं नाहींत."

ताराबाई म्हणाली "नको नको, आणखी कशाला आणायला पाहिजेत? हीं रगड आहेत!"

कमलिनी म्हणाली "आमच्या बाबांनां इतकीं थोडीं पुस्तकं कशीं पुरेशीं वाटलीं कुणास ठाऊक? आपली लायब्ररी भय्यासाहेब, केवढी तरी सुंदर आहे अन् जंगी आहे तुमच्या दिलबहारांत!"

कृष्णराव म्हणाले "अहो, ती पिढ्यान् पिढ्या वाढत चालली आहे म्हणून तशी आहे."

कमलिनी म्हणाली "अन् आपणहि स्वतः तींत किती तरी भर घातली आहेत. नेहमीं तर खरेदी चाललेली असते पुस्तकांची आपली!"

भय्यासाहेबांनीं पुरवणी जोडली "हें तर सगळें अवश्य पाहिजेच; आणखी शिवाय तिनें अत्यंत विस्तृत वाचनानें आपलें मन विशेष सुसंस्कृत केलेलें असलें पाहिजे !"

ताराबाई म्हणाली "तर मग, तुम्हाला फक्त सहाच स्त्रिया सर्वगुणसंपन्न अशा माहीत आहेत याचं मला मुळींच आश्चर्य वाटत नाहीं. एकादी तरी तशी माहीत आहे, हेंच मी आश्चर्य समजतें !"

कृष्णराव म्हणाले "कां बरें ? हें सगळें स्त्रियांनां येणें अशक्य आहे, इतकें का आपलें स्त्रीजातीविषयीं हलकें मत आहे ?"

ताराबाई म्हणाली "मीं तर बाई कध्धीं अशी स्त्री पाहिली नाहीं ! तुम्ही सांगतां इतके सर्व गुण एकीच्या ठिकाणीं एकवटलेले मीं तर नाहीं पाहिले !"

त्या दोघी बहिणी आवेशानें म्हणूं लागल्या "इतका अविश्वास धरणं वाईट आहे ! आम्ही तर अशा सर्वगुणसंपन्न स्त्रिया कितीक तरी पाहिल्या आहेत !"

तितक्यांत बंडोपंत ओरडून म्हणाले "डावाकडे लक्ष नाहीं ! काय पान पडलें आहे तें नीट पाह्यचें नसलें तर डाव बंद कराना !"

अर्थात्च सगळा वाद एकदम बंद झाला, आणि अंमळशानें ताराबाई बहिणीकडे निघून गेली.

तिची पाठ फिरल्याबरोबर कमलिनी म्हणाली "स्त्रीजातीची कुचेष्टा करून आपली स्वतःची शिफारस पुरुषांजवळ करणाऱ्या स्त्रियांपैकीं ताराबाई ही एक आहे. अन् मला वाटतं, असं केल्यानं बहुतेक पुरुष खुषहि होतात; पण तसं करणं माझ्या मतानं अगदीं गैरशिस्त, अगदीं नीचपणाचं आहे !"

कमलिनी हें कृष्णरावांनां उद्देशून बोलली होती, तें ऐकून ते म्हणाले "खरोखरच, पुरुषांनां आपल्या मोहजालांत पकडून घेण्याकरितां कित्येक स्त्रिया ज्या युक्त्या लढवीत असतात, त्या सर्वच गैरशिस्त व नीचपणाच्या असतात. जेवढें म्हणून खरें नव्हे, केवळ लबाडीचें, तितकें सर्व नीचपणाचेंच !"

या उत्तरानें कमलिनीचें मनासारखें समाधान न झाल्यामुळें तिनें तो विषय सोडूनच दिला. इतक्यांत ताराबाई सांगत आली, कीं, शांताला जास्त ताप भरला आहे. भाऊसाहेब गडबडीनें म्हणाले "एकदम डाक्टरला आणवा !"

त्यांच्या बहिणी म्हणूं लागल्या "खेड्यांतला डाक्टर काय उपयोगाचा ? साताऱ्याहून मुद्दाम सिव्हीलसर्जन आणला पाहिजे."

ताराबाई म्हणाली "छे, इतकी कांहीं जरूर नाहीं."

अखेर असें ठरलें, कीं, आतां डाक्टर आणावा, सकाळीं पुढचा विचार करूं.

भाऊसाहेबांची सारखी येरझार चालली होती. याला हें सांग, त्याच्याकडून तें आणव, अशी त्यांच्या मनाची चलबिचल चालली होती. पण बहिणी बंडोपंतांशीं जेवणानंतर ३०४ खेळत स्वस्थ बसल्या होत्या.

---

## प्रकरण नववें.

### सीताबाई समाचाराला आल्या.

त्या रात्रीं ताराबाई अर्थात्‌च बहिणीजवळ निजली, व शांताबाईचा ताप कमी होत चालल्यामुळें दोघींनां बरीच झोंपहि मिळाली. सकाळीं प्रथम भाऊसाहेबांकडून माणूस चौकशीला आला, व नंतर त्यांच्या बहिणी स्वतः आल्या. ताप निघाल्यामुळें सर्वांनांच बरें वाटलें. तरी पण आपल्या आईनें एकदां येऊन शांताला पाहून जावें हें चांगलें, असें ताराला वाटल्यावरून तिला बोलावून आणण्याकरितां भाऊसाहेबांनीं चिठी पाठविली. ती हातीं पडतांच दोघी धाकट्या मुलींनां बरोबर घेऊन सीताबाई तावडतोब तेथें येऊन दाखल झाल्या. आल्याबरोबर शांताला पाहून त्यांची खात्री झाली, कीं, भिण्यासारखें कांहीं नसून निवळ थंडीवाऱ्याचा ताप आहे. तेव्हां त्यांची भीति नाहींशी झाली; इतकेंच नाहीं, तर शांता एकदम बरी न झाली तर तेवढें चांगलेंच, असाहि त्यांच्या मनांत विचार येऊन चुकला. कारण, ती अगदीं बरी झाली, कीं, आनंदभुवनांतून घरीं जावें लागेल! शांतानें आपणाला घरीं घेऊन जाण्याविषयीं आईला कितीक म्हटलें, तरी सीताबाई तें कबूल करीनात. नंतर तितक्यांत डाक्टर आले, तेहि घरीं नेण्याच्या विरुद्धच दिसले. जरा वेळ शांताजवळ बसल्यावर कमलिनीनें त्यांनां खालीं दिवाणखान्यांत बोलावल्यावरून सीताबाई तिघी लेकींनां घेऊन तिकडे गेल्या. तेथें भाऊसाहेब व इतर मंडळी होती. भाऊसाहेब सीताबाईनां म्हणाले "आपणाला वाटलें होतें त्यापेक्षां शांताबाईची प्रकृती जास्त बिघडलेली नाहींना आपणाला दिसली?"

सीताबाई म्हणतात "हो हो, किती तरी जास्त! अगदीं इथून तिला हालवायची सोय नाहीं इतकी ती आजारी आहे. डाक्टरांनंसुद्धां घरीं नेऊं नका म्हणून सांगितलं आतां!"

भाऊसाहेब म्हणाले "घरीं न्यायची? भलतेंच कांहीं तरी! बोलूंसुद्धां नका! आमची इंदिरा तर नांवसुद्धां तसलें काढूं द्यायची नाहीं."

कमलिनी केवळ उपचारार्थ म्हणाली "त्या इथें आहेत तोंवर त्यांची नीट काळजी इथें घेतली जाईल बरं."

सीताबाईंनीं औपचारीक तऱ्हेनें त्यांचे आभार मानिले व म्हटलें "तुमच्यासारखीं उत्तम माणसं नसतीं तर शांतेचं काय झालं असतं कोण जाणे! ती कनई भारी आजारी आहे. अन् तिला अतिशय त्रास होतो आहे. तीच म्हणून आपली सगळा सोसते आहे. तिचा स्वभावच नेहमींचा तसा. अगदीं निमुटपणं दुखणं काढायची. भारीच शांत अन् सोशिक. मी या बाकीच्यांनां नेहमीं म्हणत असतें, ना, कीं शांतेच्या नखाचीसुद्धां तुम्हांला सर येणार नाहीं म्हणून!—वा, किती पण सुंदर हा दिवाणखाना आहे हो तुमचा भाऊसाहेब! अन् ह्या खिडकींतून देखावा तरी कसा छान दिसतो पण? आनंदभुवनासारखा दुसरा चांगला बंगला पाहूं गेलं असतां पुनः पुनः मिळत नसतो. सध्यां जरी आपण तो कांहीं मुदतीनं घेतला आहे तरी निदान ती संपेपर्यंत तरी इथें रहा. इकडेतिकडे उगाच जाण्याची गर्दी करूं नका."

चिंतामणराव म्हणाले "माझ्या स्वभावाची सदा गर्दीच असते बुवा. एकदां जर हा बंगला सोडायचें माझ्या मनांत आलें, तर एक पांच मिनिटांत मी निघून जाईन! बाकी, या घटकेला तरी निदान माझा विचार इथें कायम रहायचा आहे."

यावर ताराबाई म्हणाली "माझी आपल्याविषयीं अगदीं अश्शीच कल्पना होती!"

भाऊसाहेब तिच्याकडे वळून म्हणतात "तर मग आपल्याला माझ्या स्वभावाची उमज पडूं लागली म्हणायची?"

ताराबाई म्हणाली "हो हो, अगदीं पक्की उमज पडली आहे मला!"

भाऊसाहेब म्हणतात "इतक्या लवकर आपला स्वभाव समजला जाणें चांगलें कीं वाईट, हेंच मला कळत नाहीं चांगलेंसें. पण एकंदरींत तें कांहीं श्रेयस्कर नाहीं."

यावर ताराबाई म्हणाली "आहे हें असं आहे खरं. पण यावरून असं मात्र निघत नाहीं, कीं, तुमच्यासारखा खुला स्वभाव, खोल अथवा अट्टल स्वभावापेक्षां बरा किंवा वाईट?"

सीताबाई मध्येंच म्हणाल्या "तारे, तूं कुठं आहेस तें लक्षांत आहे ना? घरीं जसं तुला वाटेल तसं बडबडायला मिळतं तसं इथें नको करूं!"

लगेच चिंतामणराव ताराबाईला म्हणाले "मला नव्हतें ठाऊक, कीं, आपण मनुष्यस्वभावाची पारख करण्याचा अभ्यास करीत असतां. मोठा मनोरंजक असेल नाहीं तो अभ्यास?"

ताराबाई म्हणाली "फारच! त्यांतून खोल अथवा लपंडावी स्वभाव तर अत्यंत मनोरंजक असतात! तेवढा तरी त्यांच्यांत गुण आहे."

कृष्णराव म्हणाले "पण या अभ्यासाला खेडेगांवांत कांहीं तितका वाव मिळत नसेल! कारण, येथील समाज संकुचित असतो व वारंवार त्यांत बदल होत नसतो."

यावर ताराबाई म्हणाली "पण लोकांचे स्वभावच इतके वारंवार बदलत जातात, कीं, सदा त्यांच्यामधें कांहींना कांहीं तरी बघण्यासारखं असतं."

कृष्णरावांनीं खेडेगांवचें नांव काढल्यामुळें सीताबाई रागावून म्हणाल्या "अगदीं अलबत! शहराप्रमाणंच खेडेगांवांतून सुद्धां तितकं बघायला मिळतं हो!"

सर्वांनां या बोलण्याचें आश्चर्य वाटलें. कृष्णराव तर सीताबाईंकडे जरा वेळ चमत्कारिक रीतीनें पाहून दुसरीकडेच वळले. त्यावरून सीताबाईंनां वाटलें, कीं आपण त्यांनां चीतच केलें. म्हणून त्या जय मिळाल्यासारख्या मुद्रेनें पुढें म्हणाल्या "मला तर बाई खेडेगांवापेक्षां पुण्यामुंबईत कांहीं जास्त असेलसं वाटत नाहीं! दुकानं किंवा सार्वजनिक इमारतीच काय असतील त्या तुम्ही सोडून द्या. पण एकंदरींत खेडेगांवच रहायला किती तरी उत्तम! नाहीं बरं, भाऊसाहेब?"

भाऊसाहेब म्हणाले "हें पहा, मी खेड्यांत असतों तेव्हां तिथून हालूं नयेसें मला वाटतें; अन् शहरांत असतों तेव्हांहि साधारण तसेंच मला वाटतें. ज्याचे त्याचे निरनिराळे फायदे आहेत. अन् मला तर दोन्ही ठिकाणीं बरें वाटतें."

सीताबाई म्हणाल्या "हो, पण त्याचं कारण आपला स्वभावच असावा तसा आहे. पण (कृष्णरावांकडे बघून) त्या राजश्रींनां वाटतंसं दिसतं, कीं, खेडेगांव म्हणजे आपलं कांहींच नाहीं!"

आईच्या या बोलण्याची लाज वाटून ताराबाई म्हणाली "तसं नव्हे आई, भय्यासाहेब काय म्हणाले तें तुझ्या लक्षांत चांगलंसं आलं नाहीं. त्यांचं म्हणणं इतकंच, कीं, शहरांत जसे नानाप्रकारचे लोक दिसून येतात तसे खेडेगांवांत दिसणं शक्य नाहीं. अन् हें म्हणणं खरं आहे, हें कुणीहि कबूल करील."

सीताबाई म्हणाल्या "अलबत्, कोण नाहीं म्हणत आहे? पण आपल्या गांवांत फार लोकं नाहींत म्हटलं, तर इतकीं तरी मोठालीं गांवं फार कुठं आहेत? गांवजेवण घातलं तर ब्राह्मणांचंच चांगलं दोनअडीचशें पान होतं, पोरंबाळं आणखी शिवाय हो!"

केवळ ताराबाईला वाईट वाटेल म्हणून भाऊसाहेबांनीं मोठ्या कष्टानें हंसूं दाबलें. पण बहिणीला तितका विवेक कुठला? तिनें हळूच हंसत भय्यासाहेबांकडे पाहिलें. आतां हें बोलणें फिरवावें म्हणून दुसरा कांहीं विषय काढण्याच्या हेतूनें ताराबाईनें आईला विचारिलें "मी इकडे आल्यापासून मालती आली होती का आपल्या घरीं?"

सीताबाई म्हणाल्या "हो, काल ती आपल्या वडलांबरोबर आली होती—रावबहादुर किती तरी छान माणूस आहे म्हणतां, भाऊसाहेब! इतका हुशार, इतका सौम्य अन् किती तरी साधा पण! कधीं म्हणजे कुणाशीं बोलल्याशिवाय राहिला आहे असं नाहींच! खऱ्या गृहस्थाचं मी म्हणतें तेंच लक्षण! अन् जे लोक सदा आपल्याच ऐटींत असतात, अन् कुणाशीं अक्षरसुद्धां बोलत नाहींत, त्यांचं अगदीं सपशेल चुकतं!"

ताराबाई म्हणाली "मालती जेवायला राहिली होती का?"

सीताबाई म्हणाल्या "छे, ती घरीं जातेंच म्हणाली. बहुतकरून चुलीशीं कांहीं तरी काम होतं तिला! माझ्या इथें, भाऊसाहेब, तसलं कध्धीं नाहीं! मी आपली रगड नोकर ठेवतें. माझ्या घरीं मुलींनां चूल काय ती माहीत सुद्धां नाहीं. पण तो ज्याचा त्याचा विचार आहे. एरवीं त्या रावबहादुरांच्या मुली बऱ्या आहेत हो. आतां, सुरेख नाहींत त्याला कोण काय करणार? मालती कांहीं केवळ कुरूप नाहीं, पण ती आमची विशेष सलगीची आहे."

भाऊसाहेब म्हणाले "हो, मलासुद्धां ती चांगली आवडते."

सीताबाई म्हणाल्या "चांगली तर आहेच—पण आपणच कबूल कराल, कीं, रूपानं ती अगदींच साधारण आहे. रावबहादुरीणबाई नेहमीं तसं स्पष्टच म्हणतात, अन् शांतेच्या रूपाची वाखाणणी करीत असतात ना! आपल्याच लेंकराची आपण काय स्तुति करावी? पण तसंच पाह्यलं, तर शांतापेक्षां जास्त सुरूप मुलगी क्वचित्‌च आढळेल. सारींच मुळीं तसं जर म्हणतात, मग मी आई म्हणून मला तसं वाटतंसं कसं बरं म्हणावं? मुंबईत ती आपल्या मामाकडे गेली होती, तेव्हां अवघी १४-१५ वर्षांची होती, तेव्हांसुद्धां एक

गृहस्थ तिच्यावर प्रेम करायला लागला होता. मामीला तर वाटायला लागलं होतं, कीं, हा आतां तिला मागणी घालतो; पण तसं कांहीं नाहीं झालं. ती त्याला कदाचित् जरा फार लहान वाटली असेल;पण त्यानं तिच्यावर एकदोन गाणीं रचिलीं होतीं, तीं काय छान होतीं पण!"

ताराबाई झटकन् म्हणाली "अन् गाणीं रचिल्यानं त्याचं प्रेम ओसरलं! मला वाटतं, असं कितीकतरीजणांचं होतं! प्रेम हांकून लावायला गाणीं रचण्याची रामबाण युक्ति प्रथम कुणीं काढली कोण जाणे!"

भय्यासाहेब म्हणाले "माझी आजपर्यंत समजूत अशी, कीं, काव्य हें प्रेमाचें एक पोषण आहे!"

ताराबाई म्हणाली "खऱ्या, सोज्वळ, जिवट प्रेमाचं असेल; कारण जें आधींच जिवट असतं त्याचं वाटेल त्यानं पोषणच होतं; पण तें प्रेम जर नुसतं क्षणिक अन् वरवरचं असलं, तर एकदोन पदं लिहिलीं, कीं, पार ओसरून गेलंच समजावं!"

हें ऐकून भय्यासाहेब खूप हंसले. नंतर जरा बोलण्यांत खळ पडला, तों ताराबाई भिऊं लागली,कीं, आई पुन्हां कांहीं तरी भलतेंच बोलते कीं काय. सीताबाईंच्या मनांतून कांहीं तरी बोलायचें होतें; पण काय तें सुचेना. म्हणून त्या अंमळ थांबून भाऊसाहेबांचे, शांताची काळजी घेतल्याबद्दल व तारीलाहि ठेवून घेण्याची तसदी दिल्याबद्दल, आभार मानूं लागल्या. भाऊसाहेबांनीं मनापासून योग्य तो जबाब दिला व आपल्या बहिणींकडूनहि तशाच प्रकारचे उद्गार काढविले. एकंदरींत, सीताबाईंचें समाधान झाल्यावर त्यांनीं घरीं जाण्याकरितां आपली गाडी बोलावली. तें ऐकतांच सुंदर मुद्दाम पुढें झाली. तिचा व हिरीचा येवढा वेळ कांहीं तरी बेत चालला होता, व सुंदरनें पुढाकार घ्यावा असें आपसांत ठरलें होतें. त्याप्रमाणें आतां सुंदर पुढें सरसावली होती. ती मोठी धटकुली मुलगी असून आईच्या फाजील लाडांमुळें फारच शेफारलेली झाली होती. उंच व अंगानें धष्टपुष्ट असल्यामुळें, व नाकींडोळीं अंमळ निटस व उत्तम गोरी असल्यामुळें, जिथें तिथें तिची वाखाणणी होत असे. शिवदुर्गास रिसाला आल्यापासून ऑफिसर लोकांच्या स्तुतीनें ती अगदीं चढून गेली होती; व कांहीं बोलली तरी तिऱ्हाईत वाखाणणी करीत, म्हणून कोठें काय बोलावें याचा अलीकडे तिला सुमारच राहिला नव्हता. या वेळीं तिनें एकदम पुढें सरसावून भाऊसाहेबांना बजावलें, कीं "भाऊसाहेब, आपण

मागं आनंदभुवनांत मंडळींनां पार्टी द्यायचं वचन दिलंत तें विसरलां वाटतं ? एकदां दिलेलं वचन मोडलंत तर त्यासारखी शरमेची गोष्ट दुसरी कांहीं नाहीं."

हा तडाखा ऐकून भाऊसाहेब चपापले; पण तितक्यांत सावरून त्यांनीं जें तिला उत्तर दिलें, तें सीताबाईच्या कानाला फारच मधुर लागलें.

"मी कधीं नाहीं म्हणतों आहें ? मी आपलें वचन राखण्याला अगदीं तयार आहें. तुमची बहीण बरी झाली म्हणजे पाहिजे तर तुम्हींच दिवस ठरवून मला कळवा. पण, अलबत्, ती आजारी आहे तोंपर्यंत तर तुम्हांला पार्टी नको असेल ना ?"

सुंदरचें समाधान झालें. "हो हो, तेंहि खरंच. शांताक्का बरी होईपर्यंत थांबावं तें कांहीं वावगं नाहीं. अन् तोंपर्यंत बहुशः कॅप्टन् गोविंदरावहि परत येतील. अन् तुमची पार्टी झाली, कीं, कॅप्टन् गोविंदरावांकडूनहि एक मी काढीन. मी त्याला साफ म्हणेन, कीं पार्टी नाहीं दिली तर तें अगदीं बेश्रमपणाचं होईल !"

नंतर सीताबाई आपल्या परिवारासह निघून गेल्या. आपल्या आईवर व बहिणींवर सडकून टीका होईल हें उमजून ताराबाई लगेच शांताकडे निघून गेली. मागें इंदिराताई आणि कमलिनी सगळ्यांवर यथेच्छ भडिमार करीत होत्या, व भय्यासाहेबहि मधून मधून हातभार लावीत होते; पण काळ्याभोर डोळ्यांवर त्या दोघींनीं कितीक चेष्टा केली तरी, तारावरच्या चेष्टा मात्र त्यांनां मान्य झाल्या नाहींत !

---

## प्रकरण दहावें.

### मजेदार संवाद.

आदल्या दिवसाप्रमाणेंच बहुतेक हाहि दिवस गेला. इंदिरा व कमलिनी कांहीं वेळ शांताजवळ बसून तिची करमणूक करीत होत्या, आणि शांताहि हळुहळू बरी होत चालली होती. तिसऱ्या प्रहरीं ताराबाई चहाला खालीं गेली व नंतर तेथें जरा वेळ राहिली. आज पत्ते मात्र निघाले नाहींत. कृष्णराव एका टेबलावर आपल्या बहिणीला पत्र लिहीत बसले, व कमलिनी त्यांच्या जवळच राहून तें पत्र लिहितांना त्यांच्याकडे बघत होती व मधून मधून त्यांच्याशीं कांहीं बोलत होती. बंडोपंत व भाऊसाहेब बुद्धिबळें खेळत होते तो डाव इंदिराताई पहात होती.

ताराबाईच्या हातीं कांहीं शिवणकाम होतें. ती मधून कृष्णराव व कमलिनी यांचें काय बोलणें चाले तें सहज ऐकण्यांत मौज मानीत होती. कमलिनी कोणच्या ना कोणच्या गोष्टीवरून कृष्णरावांची स्तुति करीत होती, पण त्या स्तुतीकडे ते फारसें लक्ष देत नव्हते. तो मोठा मौजेचा एक संवाद होत होता, व त्या दोघांविषयीं ताराबाईचा जो अभिप्राय बनला होता त्याला पूर्णपणें सुसंगत असाच तो संवाद होता. तो येणेंप्रमाणें:—

कमलिनी म्हणाली "असलं सुंदर पत्र वाचून आपल्या बहिणीला किती तरी आनंद होईल !"

कृष्णरावांनीं कांहींच उत्तर दिलें नाहीं.

कमलिनी पुढें म्हणाली " आपण विशेषच जलद जलद लिहितां ! "

भय्यासाहेब म्हणाले " ही आपली चूक आहे. मी साधारण बराच सावकाश लिहितों. "

" किती तरी पत्रं आपल्याला नेहमीं ल्याहावीं लागतात बाई ! अन् तीं आणखी कामाकाजाचीं पत्रं ! कोण पीडा पण तसलीं पत्रं लिहिण्याची ! "

" तर मग तीं आपल्या वांट्यास न येतां माझ्याच वांट्यांला येतात हें बरेंच आहे. "

" आपल्या बहिणीला ल्याहा, कीं, कधीं एकदां तिला भेटेनसं मला झालं आहे. "

" वरतीं एकदां तें लिहिलें आहे की ! "

" मला वाटतं आपला टांक नीट चालत नाहीं. मी तो पुसून देऊं का ? मीं छान करून देतें आपल्याला तो. "

" माफ करा, माझा मला पुसून घेतां येतो. "

" इतकं एकसारखं अक्षर कसं आपणाला काढतां येतं बाई ! "

कांहींच उत्तर नाहीं !

पुन्हा कमलिनी म्हणाली " सरलादेवीला ल्याहा, कीं, सतार अलीकडे ती उत्तम वाजवूं लागली आहे हें ऐकून मला फार आनंद झाला; अन् दुसरं असं ल्याहा, कीं, टेबलक्लॉथवरचा तिनं तयार केलेला रेशमांतला सीन पाहून मला अत्यानंद वाटला, अन् मला तो अनसूयेच्या नमुन्यापेक्षां किती तरी जास्त उत्तम वाटला. "

आजपासून पन्नास वर्षांनीं !

"हा आपला अत्यानंद पुढच्या पत्राकरितां राखून ठेवण्याची परवानगी द्याल का? या पत्रांत आतां जागा नाहीं राहिली!"

"अं त्यांत काय मोठंसं; लौकरच मी तिला भेटेनच. पण इतकीं सुंदर मोठालीं पत्रं नेहमीं तिला तुम्ही लिहितां अं भय्यासाहेब?"

"मोठालीं असतात खरीं, सुंदर असतात कीं नाहीं हें मला काय ठाऊक?"

"मला तर वाटतं, कीं, असा नियमच आहे, कीं, ज्याला मोठालं पत्र सहज लिहितां येतं तो वाईट कसं लिहील?"

भाऊसाहेब तितक्यांत म्हणाले "ही कांहीं स्तुति, कमळे, भय्यासाहेबांनां लागू पडायची नाहीं! कारण, त्यांनां कधीं सहज पत्र लिहितां येत नाहीं. मोठमोठे शब्द घालण्याकरितां ते भारी विचार करीत बसत असतात. नाहीं का हो, भय्यासाहेब?"

भय्यासाहेब म्हणाले "माझी भाषासरणी तुमच्याहून निराळी आहे बुवा!"

कमलिनी म्हणाली "अंः, आमच्या भाऊसाहेबांचीं पत्रं म्हणजे असतात झालं कशीं तरी निष्काळजीपणानं लिहिलेलीं! आधीं निम्मे शब्द खाल्लेले असतात, अन् बाकीच्यांवर शाईचे डाग असतात!"

भाऊसाहेब म्हणाले "माझ्या डोक्यांत इतक्या भराभर कल्पना येत असतात, कीं, त्या सर्व कागदावर टांचण्याला मला वेळच मिळत नाहीं, त्यामुळें कित्येकदां असें होतें कीं, माझें पत्र वाचणाराला त्यापासून कांहींच समजत नाहीं!"

ताराबाई म्हणाली "आपला विनय इतका आहे, कीं, कोणाच्यानं त्यावर टीकाच करवायची नाहीं!"

कृष्णराव म्हणाले "विनयाचा आव घालण्यासारखें दुसरें उत्तम ढोंगच कुठें नाहीं! असल्या ढोंगी विनयाचा दोहोंतून एक तरी हेतु असतो. दुसऱ्याच्या अभिप्रायाविषयीं बेपर्वा, किंवा अप्रत्यक्षपणानें डौल मिरवणें!"

भाऊसाहेब म्हणाले "आणि या दोहोंपैकीं माझ्या विनयांत कोणचा हेतु होता, असें आपलें म्हणणें आहे?"

भय्यासाहेब म्हणाले "अलबत दुसरा, म्हणजे अप्रत्यक्षपणानें डौल मिरवायचा तुमचा हेतु उघड होता. तुम्हाला आपल्या वेड्यावांकड्या अर्धवट लिहिण्याचा डौल मिरवावासा वाटतो. कारण, अर्धवट मजकूर लिहिण्याचें कारण तुम्ही असें सांगतां, कीं, डोक्यांत कल्पनांची इतकी गर्दी होते, कीं, त्यांनां कागदावर पडायला फुरसतच रहात नाहीं, व हें असें होणें विशेष

श्लाघ्य जरी नसलें, तरी निदान तें मोठें मजेदार आहे, असें तुम्हाला वाटतें. पुष्कळ लोकांनां एकादी गोष्ट भारी झटपट आपणाला करतां येते असा अभिमान असतो, व ती झटपटीनें करतांना नीट होते का बिघडते, याविषयीं ते पर्वा करीत नाहींत. त्यांनां वाटतें कीं, चुटकीसरसा बार उडवण्यांतच कायती सारी मौज आहे. इतकें लांब कशाला; आजच सकाळीं तुम्ही सीताबाईनां म्हणालांत, कीं, माझ्या मनांत इथून जायचें आलें, कीं, मी एका पांच मिनिटांत चालता होईन! अन् तसें म्हणतांना, आपण मोठी कौतुक करण्यासारखी गोष्ट बोलत आहों, असा तुमचा स्पष्ट आविर्भाव दिसत होता. पण तसेंच पाहूं गेलें, तर इतकी झटपट करून निघून जाण्यांत—कीं, ज्या जाण्यानें अत्यंत जरूरीचींसुद्धां कामें सोडून द्यावीं लागतील, अन् ज्यापासून तादृश लाभ कोणालाच कांहीं व्हायचा नाहीं—असल्या तांतडी करण्यांत, येवढी प्रशंसा करण्याजोगें तरी काय आहे?"

भाऊसाहेब म्हणाले "एः, हें पहा, सकाळीं सहज बोललेलें एवढें ध्यानांत धरून संध्याकाळीं तें काढण्यांत कांहींच अर्थ नाहीं! पण खरेंच म्हणाल तर तें बोलतांना अगदीं खरें म्हणून मी तेव्हां बोलत होतों. इतकेंच तर काय, मला तें आत्तांसुद्धां अगदीं खरें वाटतें आहे. तेव्हां निदान, बायकांच्यापुढें शेखी मिरवण्याकरितां तरी मी झटपट जाण्याची खोटी थाप मारीत नव्हतों, येवढें तरी तुम्हाला कबूल करावें लागेल! "

भय्यासाहेब म्हणाले " असेल, तेव्हां तुम्हाला तें खरें वाटलें असेल, मी नाहीं म्हणत नाहीं; पण इतक्या तांतडीनें तुम्ही कधीं निघून जाल हें मात्र मला नाहीं खरें वाटत! दुसऱ्या कोणच्याहि एकाद्या माणसाचें जें वर्तन होईल, तसेंच अगदीं तुमचेंहि होईल. मला तर वाटतें, कीं अगदीं रिकिबींत पाय टाकतांना जर एकादा मित्र तुम्हाला म्हणाला, कीं, 'भाऊसाहेब चार दिवस आणखी रहाना!' तर तुम्ही बहुतकरून त्याचें ऐकाल. इतकेंच नाहीं, पुन्हां जर त्यानें आग्रह केला, तर महिनाभरसुद्धां रहाल!"

ताराबाई म्हणाली "हो, पण यावरून तुम्ही एवढंच सिद्ध केलंत, कीं, भाऊसाहेबांनीं आपल्या स्वभावाचं यथार्थ वर्णन केलं नाहीं. त्यांनीं दाखवला त्यापेक्षां जास्त चांगला स्वभाव, तुम्ही त्यांचा दाखवतां आहां!"

भाऊसाहेब म्हणाले "वा, ताराबाई, छान! आमचे हे स्नेही जो माझा दोष म्हणून दाखवीत होते, तो एक माझ्या गोड स्वभावाचा दाखलाच आहे,

असें तुम्हीं त्याचें रूपांतर केलेंत, त्याबद्दल मी तुमचे आभार मानितों; पण हें तुम्हीं बदललेलें स्वरूप भय्यासाहेबांनां नाहीं पसंत पडायचें. त्यांच्या समजुतीप्रमाणें म्हटलें, तर तशा वेळीं मीं त्या मित्राला साफ नाहीं म्हणून, घोडा भरधांव काढला पाहिजे, तरच ते मला बरें म्हणतील ! ''

ताराबाई म्हणाली '' म्हणजे ? आधीं घाईघाईनं केलेल्या उतावेळपणाचा दोष, मागून तो बेत हट्टानं कायम केल्यानं धुवून जातो, असं का भय्यासाहेबांचं मत आहे ? ''

भाऊसाहेब म्हणाले '' तें काय तें मला खरोखरच सांगतां येत नाहीं. भय्यासाहेबांनींच आपलें काय मत आहे तें स्पष्ट करावें. ''

भय्यासाहेब म्हणाले '' तुम्ही प्रथम मीं कधींहि न प्रतिपादन केलेलीं मतें मला चिकटवून देतां, अन् मग मला त्यांचा खुलासा करा म्हणतां. तें असो म्हणा. पण घटकाभर, तुम्ही म्हणतां तशीं माझीं मतें आहेत, असें आपण धरून चालूं. तर मग ताराबाई, एवढें आधीं लक्षांत धरलें पाहिजे, कीं, ज्या मित्रानें तो बेत रहित करून चार दिवस राहण्याची इच्छा प्रदर्शित केली असें आपण कल्पिलें आहे, त्यानें केवळ नुसती इच्छा प्रदर्शित केली आहे, पण त्या इच्छेच्या समर्थनाकरितां कांहींएक कारणें सांगितलेलीं नाहींत. ''

ताराबाई म्हणाली '' तर मग, एकाद्या मित्राच्या विनंतीला ताबडतोब सहजगत्या मान देणं, यांत आपणाला कांहींच गुण दिसत नाहींना ? ''

भय्यासाहेब म्हणाले '' मनाची खात्री झाल्याविना तसें करणें, दोघांनांहि श्रेयस्कर आहेसें मला नाहीं वाटत ! ''

ताराबाई म्हणाली '' आपण भय्यासाहेब, मित्रत्वाला अथवा प्रेमाला मुळींच कांहीं महत्त्व देत नाहींसं दिसतं ! कित्येक प्रसंगीं तर, विनंति करणारं माणूस कोण आहे, येवढंच पाहून आपण ताबडतोब त्याची ती विनंति मान्य करीत असतों. त्यानं आपल्याला कारणं सांगण्याची आपणाला जरूरच लागत नाहीं. मी आतां भाऊसाहेबांच्याबिषयीं बोलत नाहीं. तें आपण सोडून देऊं. तशी कुणीं त्यांनां विनंति केली असतां, ते प्रत्यक्ष कसे वागतात तें आपल्या नजरेस पडलं, म्हणजे मगच आपण त्याविषयीं चर्चा करूं; पण सामान्य व्यवहारांत, आपण साधारणपणें अशी कल्पना करूं, कीं, दोघे स्नेही आहेत, अन् त्यांतल्या एकानं विशेष महत्त्वाचा नाहीं असा कांहीं बेत केला आहे, अन् तो दुसरा स्नेही तो त्याचा बेत बदलण्याची इच्छा प्रदर्शित करतो

आहे. तर, त्या स्नेह्याकडून कारणं ऐकण्याची वाट न पहातां, जर पहिल्या स्नेह्यानं आपला बेत फिरवला, तर तुम्ही त्याला दोष द्याल का?"

भय्यासाहेब म्हणाले "याचं उत्तर देण्याच्या आधीं थोडासा जास्त खुलासा करून ठेवणें बरें नाहीं का? त्या दोघां स्नेह्यांमध्यें स्नेह तरी किती होता? आणि केलेल्या विनंतींचें महत्त्व किती समजायचें? ह्या दोन बाबी ठरवल्या पाहिजेत प्रथम."

भाऊसाहेब म्हणाले "अलबत, तें आधीं ठरवलेंच पाहिजे! सर्व गोष्टी प्रथम नक्की करून ठेवल्या पाहिजेत. इतकेंच काय, तर त्या दोघां स्नेह्यांची उंची, लांबी, रुंदीसुद्धां ठरवायचें विसरून नाहीं चालणार! कारण, तेंहि कांहीं कमी महत्त्वाचें नाहीं. किती महत्त्वाचें हें आहे त्याची, ताराबाई, आपणाला कल्पना नसेल. मी खरेंच सांगतों, हे भय्यासाहेब जर माझ्यापेक्षां इतके जाडेजुडे उंच प्राणी नसते, तर मी हल्लीं त्यांनां मानतों त्याच्या निम्यानंसुद्धां मीं त्यांनां मानलें नसतें! कांहीं कांहीं प्रसंगीं आणि कांहीं कांहीं स्थलीं तर मी त्यांनां फार वचकून असतों बुवा—विशेषें करून त्यांच्या दिलबहारांत गुरुवारीं संध्याकाळीं जेव्हां त्यांनां उपास सोडायचा असतो तेव्हां तर फारच!"

भय्यासाहेब हंसूं लागले; पण त्यांनां ज़रा राग आल्यासारखें ताराबाईला दिसलें, म्हणून तिनें आपलें हंसूं आवरून धरलें. कमलिनी भावावर रागावून म्हणाली "हें काय तुमचं भलतंच बोलणं आपलं, भाऊसाहेब?"

भय्यासाहेब म्हणाले "मी आपला हेतु समजलों भाऊसाहेब. आपल्याला वादविवाद आवडत नाहीं, म्हणून कसातरी बंद पाडतां आहां!"

भाऊसाहेब म्हणाले "तसेंहि असेल! वादविवाद म्हणजे एकप्रकारचें भांडणच. म्हणून मी बाहेर जाईपर्यंत जर तुमच्यान् ताराबाईचा वाद तहकूब ठेवाल, तर उत्तम होईल. मी बाहेर गेल्यावर तुम्ही मला काय वाटेल तें म्हणा पाहिजे तर."

ताराबाई म्हणाली "माझी मुळींच हरकत नाहीं बाई! भय्यासाहेबांनीं आपलं पत्र खुशाल पुरं करावं."

तिच्या म्हणण्याप्रमाणें भय्यासाहेबांनीं पत्र पुरें केलें. त्यानंतर त्यांनीं कमलिनी व ताराबाई यांनां विनंति केली, कीं, "थोडेंसें गायनवादन मिळालें तर पाहिजे आहे."

कमलिनी ताबडतोब पिआनोकडे गेली, व "आधीं आपण सुरू करा." असें तिनें ताराबाईला उपचारार्थ म्हटलें; पण तिनें तितक्याच उपचारानें "छे छे, आपणच आधीं," असें म्हटल्याबरोबर, कमलिनी बाजाच्या पेटीवर बसली. तिच्याबरोबर इंदिराताईहि गाणें म्हणूं लागली. ताराबाई एका मासिकाचा ताजा आलेला अंक टेबलावर पडला होता, तो चाळूं लागली असतां, आपणाकडे भय्यासाहेबांचे डोळे वारंवार लागत आहेत, असें तिच्या लक्षांत आलें. या पहाण्याचा तिला नीटसा अर्थ लागेना. एवढा मोठा गृहस्थ आपणाकडे कौतुकानें पहात असेल, ही कल्पना संभवेना; आणि आपण त्याला आवडत नाहीं म्हणून पहात असेल असें म्हणणें केवळ अशक्य ! अखेर तिनें ठरविलें, कीं, इतर स्त्रियांच्यापेक्षां आपल्यामध्यें कांहीं तरी विशेष हास्यास्पद अगर तिरस्करणीय असें कांहीं तरी यांच्या दृष्टीनें असेल, म्हणूनच हे इतके पुनःपुन्हां निरखून पहात असावे. ही कल्पना तिला पटली. पण त्यापासून तिला वाईट मुळींच वाटलें नाहीं. कारण, भय्यासाहेबांनां आपण पसंत पडावें अशी तिची इच्छा कोठें होती ?

दोनचार पदें वाजविल्यानंतर, कमलिनीनें भय्यासाहेबांची नेहमींची आवडती अशी, इंग्लिश बँडच्या पद्धतीची, नाचाची चाल वाजविण्यास सुरुवात केली, व ती वाजवितांनां तिनें अगदीं बहार चालविली होती. भय्यासाहेब अगदीं तल्लीन होऊन गेले होते. त्या भरांत ते ताराबाईकडे येऊन म्हणाले "ही अशी बहारीची चाल वाजत असतांना माणसाला अगदीं नाचत सुटावेंसें वाटतें, नाहीं बरें ताराबाई ?"

तारा नुसती हंसली; कांहीं बोलली नाहीं. तें पाहून आश्चर्यानें भय्यासाहेबांनीं तोच प्रश्न पुनः विचारला. त्यावर ती म्हणाली "मीं आपला प्रश्न मघाशींच ऐकला; पण काय उत्तर द्यावं तें लवकर ठरेना म्हणून बोललें नाहीं. मला ठाऊक आहे, कीं, आपल्या मनांत असं आहे, कीं, मी हो म्हणून म्हणेन, अन् मग मला वेडगळ म्हणून आपण हंसाल ! परंतु असले वस्तादगिरीचे बेत फसवून टाकून, लोकांची निराशा करण्याची मला बाई भारी हौस आहे ! म्हणून आपणाला असं उत्तर द्यायचं मीं ठरविलं आहे, कीं, मला कधीं नाचत सुटावंसं नाहीं वाटत ! आतां खुशाल हंसा मला, हवं असलं तर !"

भय्यासाहेब म्हणाले "छे बोवा, आपली नाहीं छाती आपणाला हंसायची !"

तारबाईला वाटलें होतें, कीं, आपल्या बोलण्याचा त्यांनां राग येईल; पण ते फक्त हंसले, व खुष झालेसे पाहून तिला आश्चर्यच वाटूं लागलें. पण तिच्या अंगीं मोहकपणा व ठसकेबाजपणा अशा उत्तम प्रकारानें मिश्रित झाला होता, कीं, कोणालाहि तिचा राग येणें कठिण असे. भय्यासाहेब तर आजपर्यंत कोणावर कधीं इतके मोहित झाले नव्हते. त्यांनां खरोखरीच असें वाटूं लागलें होतें, कीं, ताराबाईच्या व आपल्या घराण्यामध्यें इतकें मोठें अंतर आहे म्हणूनच ठीक आहे, नाहीं तर आपली कांहीं धडगत नव्हती!

त्या एकंदर प्रकारावरून कमलिनीच्या मनांत हळुहळू मत्सर उत्पन्न होऊं लागला; आणि तिची प्रिय मैत्रीण शांता लवकर बरी व्हावी अशी जी तिची इच्छा होती त्या इच्छेला, तारा आपल्या मार्गांतून दूर व्हावी या इच्छेचा, बराच दुजोरा मिळाला!

नंतर ताराबाई आपल्या बहिणीकडे निघून गेली. तेव्हांपासून कमलिनी वारंवार संधि पाहून त्यांची तिच्यावरून कुचेष्टा करूं लागली. हेतु असा, कीं, त्यामुळें तिच्याविषयीं त्यांच्या मनांत नावड उत्पन्न होऊन रहावी. दुसऱ्या दिवशीं सकाळीं ती भय्यासाहेबांबरोबर आनंदभुवनाभोंवतालच्या बागेंत हिंडत असतांना हंसत म्हणाली "हें पहा, ती अत्यंत इष्ट गोष्ट घडून येऊन लग्न झालं, म्हणजे सासुबाईंनां कनई, जरा आपली जिभली आवरण्याची सूचना करा बरं का? अन् जमलंच तर धाकट्या मेव्हण्यांनां ऑफिसरांच्या मागं धांवूं नये असंहि शिकवा! आणखी एक नाजुकशी सूचना करूं का? आपल्या प्रिय पत्नीच्या स्वभावांत उद्दामपणासारखं अन् फाजील डौलासारखं, जें कायसंसं आहे, तें जरासं कमी होण्याचा प्रयत्न करा!"

भय्यासाहेब म्हणाले "आम्हांला गृहसौख्य उत्तम लाभावं, म्हणून आणखी कांहीं सूचना आहेत का आपल्याजवळ?"

कमलिनी म्हणते "हो हो, रगड आहेत! आपल्या मामेसासऱ्याची अन् मावससासऱ्याची अशा दोन्ही तज़्बिरा मोठाल्या मुद्दाम काढवून, दिलबहारांतल्या थोरल्या दिवाणखान्यांत लावा. तुमचे चुलते इंदुरच्या हायकोर्टांत जज्ज् होते त्यांच्या तसबिरीशेजारींच अगदीं त्या टांगून ठेवा—कारण दोघांचाहि धंदा कायद्याचा, मात्र दिशा निराळी इतकंच काय तें अंतर! आतां तुमच्या ताराबाईच्या खुद्द तसबिरीचं राह्यलं! पण छे, तुम्ही मुळीं ती तजबीर काढ-

ण्याच्या भानगडींतच नका पडूं! कारण, ते काळेभोर सुंदर डोळे, कोणच्या बेस्या चित्रकाराला काढतां यायचे आहेत !"

भय्यासाहेब हंसत म्हणाले "नाहींच मुळीं त्या डोळ्यांतलें तेज कोणाला नीट काढतां येणार! पण नुसती त्यांची आकृति, विशाळपणा, व काळेभोरपणा, अन् त्या धनुष्याकृति भिंवया तर खास काढतां येतील!"

तितक्यांत समोरून एकाएकीं ताराबाई व इंदिराताई येतांना त्यांच्या नजरेस पडल्या. "आपली कुचेष्टा ताराबाईनें ऐकली तर नाहीं?" अशी कमलिनीला भीति वाटून, ती एकदम मोठ्यानें म्हणाली "तुम्ही बागेंत होतां हें मला नाहीं माहीत."

इंदिराबाई म्हणाली "काय पण आम्हांला ठकवलंत? बागेंत जायचं आम्हांला कुणाला न सांगतां एकटीं एकटीं आलांत का?"

इतकें म्हणून ताराबाईचा हात सोडून त्या दोघांत जाऊन ती मिसळली. त्यामुळें ताराबाई एकटीच राहिली. बागेंतल्या रस्त्यांत फक्त तीनच माणसांना चालतां येण्यासारखें होतें. भय्यासाहेबांनां इंदिराबाईचें हें करणें पसंत झालें नाहीं, म्हणून ते लागलीच म्हणाले "या रस्त्यांत चार माणसें रहात नाहींत. चला आपण कारंजापाशीं जाऊं सगळींच!"

पण ताराबाईला त्या तिघांमध्यें राहण्याची कोठें इच्छा होती? ती लगेच म्हणाली "छे छे, आहां तिथें चांगलीं आहांत. तिघांचा जमाव छानदार दिसतो आहे, त्यांत चौथं माणूस आल्यानं सारा बिघाड होऊन जाईल. मी शांताकडे जातें!"

असें म्हणून गडबडीनें ती निघून गेली. लवकरच आपण आपल्या घरीं जाऊं, अशी आज तिची खात्री झाली होती. कारण, शांताबाईला आज इतकें बरें वाटलें होतें, कीं, तिसऱ्या प्रहरीं उन्हाच्या वेळीं चहाला ती खालीं येऊन दोन घटका मंडळींत बसण्याची डॉक्टरनें सकाळीं परवानगी दिली होती.

---

## प्रकरण अकरावें.

### शांताबाई बरी झाली

तिसऱ्या प्रहरीं चहाकरितां ठरल्याप्रमाणें ताराबाईनें शांताला खालीं आणण्याची तयारी चालविली. अंगांत गरम कापडाचा एक पोल्का व पायांत

गरम पायमोजे असे घालून, शिवाय एक शाल अंगावर घालून शांता खालीं आली. दिवाणखान्यांत अजून पुरुष आले नव्हते. इंदिराबाई व कमलिनी या दोघींनीं शांताबाईला पाहून हंसतमुख करून आनंद प्रदर्शित केला. आज पुरुषांनां यायला घटकाभर उशीर लागला, तोंवर त्या दोघी बहिणी शांताबाईशीं सलगीपूर्वक बोलत होत्या. त्यांच्या मनांत असलें म्हणजे त्यांचें वर्तन समाधानकारक असे. एकादें पाहिलेलें स्थल त्यांनां बरेंच चांगल्या रीतीनें वर्णन करतां येत असे. अथवा एकादी हंसण्याजोगी गोष्ट असली तर तीहि रसभरितपणानें सांगतां येई. अथवा एकाद्या माणसाची नक्कलहि हुबेहुब करतां येई. आज कमलिनी विशेषच खुषींत होती. कारण, शांताबाई बरी झाल्यामुळें ताराबाईचा कांटा आपोआप लवकरच नाहींसा होण्याचा समय जवळ आला होता !

पण पुरुष दिवाणखान्यांत शिरतांच तिचें लक्ष त्या दोघींवरून उडालें, व भय्यासाहेब चार पावलें आंत आले नाहींत, तोंच ती त्यांनां कायसेंसें म्हणाली. पण तिला उत्तर न देतां ते शांताबाईकडे जाऊन चार औपचारिक शब्द बोलले. बंडोपंत फक्त " ठीक झालें बुवा, " येवढेंच म्हणाले. पण अंतःकरणापासून हर्षाचे उद्गार कायते भाउसाहेबांच्या तोंडूनच निघाले. शांताला वारा लागूं नये म्हणून पहिला अर्धा तास खटपट करण्यापलीकडे त्यांनां कांहीं दुसरें सुचलेंच नाहीं. तिची खुर्ची मुद्दाम कोंपऱ्यांत नेऊन जवळची खिडकी बंद करून मग स्वारी जवळच स्वतःची खुर्ची ओढून तिच्याशीं बोलत बसली. चहा पिणें झाल्यावर " बसवत असलें तरच बसा, " असें त्यांनीं म्हटलें, व शांताहि दुखणेंकऱ्याच्या खोलीला कंटाळली असल्यामुळें तेथेंच बसून राहिली. भाऊसाहेबांनां जास्तच आनंद होऊन ते बहुतेक दुसऱ्या कोणाशीं कांहीं फारसें बोललेच नाहींत. ही सर्व मौज मोठ्या कौतुकानें ताराबाई दुसऱ्या कोंपऱ्यांत बसून पहात होती.

जरा वेळानें बंडोपंतांनीं कमलिनीला पत्त्यांची आठवण केली; पण तिनें ऐकिलें न ऐकलेंसें केलें. कारण, भय्यासाहेबांनां आज पत्ते नको होते, असें तिला आधींच वाटलें होतें. पुनः बंडोपंतानीं "काढा, बिझिक काढा, तुमच्यावर डबल गेम देतों आज, " म्हणून पुरता प्रयत्न करून पाहिला, पण व्यर्थ! कमलिनी म्हणाली "आज कुणाचीच बिझिकवर मर्जी दिसत नाहीं " व कोणीं तिला मोडून काढिली नाहीं, त्यावरून तें अगदीं उघडच झालें.

तेव्हां नाइलाजानें बंडोपंत तेथेंच एका कोचावर आडवे झाले व पांचदहा मिनिटांत सडकून घोरूंहि लागले. भय्यासाहेबांनीं एक पुस्तक हातीं घेतलें, त्याबरोबर कमलिनीनेंहि तसेंच केलें. आजच सकाळीं मुंबईहून आलेल्या मोत्यांच्या बांगड्या इंदिराताईनें आपल्या हातांत घातल्या होत्या, त्यांच्याशीं खेळत व भावाचें शांताबाईशीं बोलणें चाललें होतें त्यांत मधून मधून एकादा शब्द ती बोलत होती.

कमलिनीचें लक्ष आपल्या हातांतल्या पुस्तकाइतकेंच भय्यासाहेबांच्या हातांतल्या पुस्तकाकडे होतें. ती मध्येंच त्यांनां कांहीं तरी विचारी, किंवा त्यांच्या पानाकडे पाही. ते फक्त तिच्या प्रश्नाचें उत्तर देत आणि पुढें वाचीत. यापेक्षां आपण होऊन ते तिच्याशीं कांहीं बोलेनात. तिचें लक्ष तिच्या पुस्तकाकडे नव्हतेंच; कारण, त्यांनीं हातीं घेतलेल्या पुस्तकाचा दुसरा भाग म्हणूनच तिनें तें उचललें होतें. पहिला भाग वाचला नव्हता तर दुसऱ्यामध्यें तिला गोडी कशी लागावी ? एक अर्धी घटका जेमतेम काढून तिनें जांभई देऊन म्हटलें “ अहाहा, असें सुंदर पुस्तक वाचण्यांत वेळ तरी बाई कसा मौजेनं जातो ! खरोखर; वाचनासारखी दुसरी करमणूक नाहीं. त्याचा किती वेळ तरी कधीं कंटाळा येतच नाहीं! मला माझं घर झालं म्हणजे आधीं तिथें सुंदरशी लायब्ररी नसली तर मी ताबडतोब ती करवीन. ”

तिला कोणीं जबाब दिला नाहीं. मग तिनें पुस्तक मिटून पुन्हां एक मोठी जांभई दिली, व आतां काय करमणूक काढावी अशा हेतूनें दिवाण-खान्यांत इकडे तिकडे पाहिलें. तितक्यांत भाऊसाहेब शांताबाईला ईव्हिनिंग पार्टीविषयीं कायसें बोलतांना ऐकून ती त्यांनां म्हणाली “ खरंच का भाऊसाहेब, तुम्ही पार्टी देण्याचा विचार करतांहा ? पक्का निश्चय करण्याच्या पूर्वीं एकदां आपल्या मंडळीचा अभिप्राय घ्या. कारण, मला तर वाटतं, कीं, इथल्या कांहींनां तसल्या पार्टीपासून मौज न वाटतां केवळ ती शिक्षाच वाटेल!”

भाऊसाहेब म्हणाले “ कोणाला, भय्यासाहेबांनां होय ? त्यांनां नको असली पार्टी, तर त्यांनीं आपलें तेव्हां बाहेर फिरायला जावें. कारण, पार्टी द्यायची हें तर पक्केंच ठरलें आहे. दिवसच तेवढा कायम व्हायचा आहे. तेवढें तें विस्तवावर आईसक्रीम करायचें यंत्र हातीं आलें, कीं, आमंत्रणचिठ्ठ्या पाठवायच्या. ”

# शांताबाई बरी झाली.

कमलिनी म्हणाली " ईव्हिनिंग पार्टी मला आवडत नाहीं असं नाहीं; पण त्यांचं स्वरूप बरंच बदललं पाहिजे. हल्लींची आपली छापील झालेली पद्धत भारी कंटाळवाणी होते. खाण्यापिण्या व गाण्याबजावण्यापेक्षां दोन तास संभाषण चालू राहिलं, तर पार्टी किती तरी खरी मनोरंजक होईल ! "

यावर भाऊसाहेब म्हणतात " हो, कदाचित् होईल; पण मग तिला ईव्हिनिंगपार्टी म्हणणें अशक्य होऊन भाषणसमारंभ किंवा तसेंच कांहीं तरी म्हणावें लागेल. "

कमलिनी गप्प राहिली. नंतर लवकरच उठून ती दिवाणखान्यांत इकडे तिकडे फेऱ्या घालूं लागली. तिचा बांधा नीटनेटका होता व चालण्याची ढबहि चांगली असे. कांहीं वेळ चालत राहिली तरी मनांतल्या हेतूप्रमाणें भय्यासाहेबांचें लक्ष पुस्तकांतून निघेना. ते वाचनांत अगदीं गढले होते. अखेर आणखी एक युक्ति करून पहाण्याचें ठरवून ती ताराबाई जवळ जाऊन म्हणाली " या, ताराबाई, आपण मजबरोबर फिरायला. फार वेळ एका जागीं बसून कंटाळल्यावर थोडंसं फिरलं, कीं, भारी मौज वाटते. "

ताराबाईला हें बोलणें चमत्कारिक वाटलें; पण तें तिनें सहजीं कबूल करून तिच्याबरोबर चालण्यास सुरुवात केली. आतां मात्र कमलिनीचा खरा हेतु तडीला गेला. भय्यासाहेबांनीं पुस्तकावरून डोळे वर उचलले. कमलिनीनें ताराबाईशीं इतकी सलगी केलेली पाहून तिच्यासारखें त्यांनांहि आश्चर्य वाटलें, व त्यांनीं हातांतलें पुस्तक मिटून ठेवलें. त्याबरोबर कमलिनीनें त्यांनांहि आपणाबरोबर फिरायला बोलावलें.

भय्यासाहेब ह्मणाले "नको नको! कारण, आपण दोघीजणी अशा कां हिंडत आहां, याविषयीं दोनच हेतु मला दिसतात. त्यांतला कोणताहि खरा धरला तरी मी हिंडायला आलों तर तो बिघडून जाईल ! "

कमलिनी ह्मणाली " याचा काय अर्थ बाई ? यांतला अर्थ कळायला मी काय वाटेल तें देईन ! ताराबाई, तुमच्या तरी कांहीं ध्यानांत येतो का तो !"

ताराबाई ह्मणाली " बिलकुल नाहीं! पण एवढं मात्र खास समजा तुह्मी, कीं, आपल्यावर कांहीं तरी टीका आहे ! अन् माझं ऐकाल, तर तुह्मी मुळींच कांहीं त्यांनां विचारूं नका, ह्मणजे छान फसेल स्वारी ! "

पण भय्यासाहेबांनां फसवणें कमलिनीला कसें पसंत पडणार ? म्हणून तिनें पुन्हां एकदां त्यांनां आग्रहपूर्वक विचारलें.त्यावर भय्यासाहेब म्हणाले "आमचा

अर्थ स्पष्ट करून सांगायला माझी मुळींच हरकत नाहीं! असें दिवाणखान्यांत हिंडण्यामध्यें दोनच हेतु मला शक्य दिसतात. तुमचें दोघींचें कांहीं तरी हितगुज तरी चाललें असावें एक,अथवा अशा फिरण्यानें आपला बांधेसूदपणा जास्त नजरेस येतो असें तुम्हांला वाटत असावें हा दुसरा. पहिला हेतु असेल तर मी येण्यानें तुमचें हितगुज मोडेल; दुसरा असेल तर इथें बसूनच आपण मला जास्त नजरेस पडतां आहां !"

कमलिनी ह्मणाली "इश्श मेलं! काय बाई पण भलतंच बोलणं तरी! इतकी कधीं मीं कुचेष्टा नव्हती ऐकली बाई ! काय बरं, ताराबाई, आतां आपण याचं उसनं फेडायला योजावं ?"

ताराबाई ह्मणाली " हात्तिच्या! तुमच्या खरंच मनांत असलं, तर मुळींच कठिण नाहीं. तुह्मी त्यांनां कांहीं तरी चिडण्यासारखं बोला. त्यांची कांहीं तरी कुचेष्टा करून त्यांनां राग आणावा, ह्मणजे झालं. तुमचा इतका परिचय आहे तर काय बोलाव तें तुह्माला सहज सुचेल !"

कमलिनी म्हणाली "छे हो, मला मुळींच सुचत नाहीं. इतके दिवस परिचय आहे तरी दिखील मला कांहीं सुचत नाहीं. जिथें अगदीं मूर्तिमंत शांतता व प्रसंगावधान वास करतं आहे, तिथें राग कसा कोण आणूं शकेल बाई? छे,छे, तो प्रयत्न अगदीं व्यर्थ आहे. अन् चेष्टा करून हंसायचं म्हणाल, तर चेष्टा करण्यासारखं त्यांच्यांत जर कांहीं नाहींच, तर आपली चेष्टा उलट आपल्याच गळ्यांत येईल !"

ताराबाई म्हणाली " भय्यासाहेबांची चेष्टा करण्यासारखं मुळींच कांहीं नाहीं अं ? मोठं विशेषच आहे म्हणायचं हें ! अन् मी म्हणतें, असलीं माणसं क्वचित्च कधीं काळीं दृष्टीस पडोत ! माझ्या ओळखीच्यांमधें अशीं फार सांपडायला लागलीं, तर माझी मोठीच गैरसोय होऊन जाईल. कारण, मला तर चेष्टा करून हंसणं अतोनात आवडतं !"

भय्यासाहेब म्हणाले " कमलिनीबाईनीं आहे त्यापेक्षां जास्त तुम्हाला सांगितलें आहे; पण त्यांत काय आहे ? ज्याला कांहीं तरी काढून चेष्टाच करायची आहे, त्याला कुठें नडच नाही. अगदीं अत्यंत शहाण्या व सज्जन अशा माणसाचें अत्यंत शहाणपणाचें जरी एकादें कृत्य असलें, तरी त्याबद्दल सुद्धां त्याची तो चेष्टा करूं शकेल !"

यावर ताराबाई म्हणाली "असतील, अशीं नुसतीं चेष्टेखोर माणसं कोणी असतील; पण मी तरी खास तशी नाहीं! जें कांहीं सत्य अथवा चांगलं असं असेल, त्याची मी कधींहि चेष्टा करीत नसतें. अचरटपणा, मूर्खपणा, हेकेखोरपणा, बोलण्यांत एक तर करण्यांत दुसरंच असणं, असले जे दोष आहेत, त्यांची बरीक मला भारी मौज वाटते, अन् तशांची रगड चेष्टा करून मीं हंसत असतें, हें खरं आहें. पण मला वाटतं, कीं, असले दोष आपल्या अंगीं मुळींच नाहींत! असंच खरं ना?"

भय्यासाहेब म्हणाले "असल्या दोषांपासून अगदीं निखालस अलिप्त असणें कोणालाच शक्य नाहीं! परंतु उत्तम बुद्धिमत्ता असूनहि जे कांहीं अंगीं असलेले दोष माणसाची फजिती होण्याला कारणीभूत होतात, त्या प्रकारचे दोष आपल्या अंगीं येऊं न देण्याविषयीं मी आजन्म खटपट करीत आलों आहें."

ताराबाई म्हणाली "म्हणजे उदाहरणार्थ, पोकळ डौल व अभिमान?"

भय्यासाहेब म्हणाले "होय. पोकळ डौल हा दोषच खरा; पण अभिमान—उत्तम बुद्धीच्या माणसाला तरी निदान—अभिमान योग्य प्रमाणांत राखून ठेवतां येईल."

ताराबाईला हंसू येऊं लागलें, तें दाबण्याकरितां तिनें तोंड दुसरीकडे वळविलें. थोड्याशा वेळानें कमलिनी तिला म्हणाली "कां हो ताराबाई, संपली का आपली भय्यासाहेबांच्या स्वभावाची परीक्षा? काय निकाल लावलात तुम्हीं?"

ताराबाई म्हणाली "माझी अगदीं बालंबाल खात्री होऊन गेली आहे, कीं, त्यांच्यांत दोष म्हणून बिलकुल नाहीं! तेच मुळीं तसं स्पष्ट कबूल करताहेत!"

भय्यासाहेब म्हणाले, "नाहीं, मीं तसली ऐट कधीं मारली नाहीं. माझ्या अंगीं दोष रगड आहेत; परंतु मला वाटतें, ते डोक्यांतल्या बुद्धीचे नाहींत. माझ्या स्वभावाविषयीं मात्र मला तसें म्हणतां येणार नाहीं. मला वाटतें, कीं, तो जरा कमी लवचिक आहे—निदान इतर लोकांच्या दृष्टीनें तरी तो तसा दिसतो. मला इतर लोकांचें दुर्गुण अथवा मूर्खपणा लवकर विसरतां येत नाहीं, किंवा कोणी माझ्या वाटेला गेला, तर मी कधीं तें विसरून जात नाहीं. माझ्या अंतःकरणावर इतर लोकांची छाप हवी तशी पडूं शकत नाहीं. माझी

तब्बेतहि जराशी तिरसट म्हटली तरी चालेल. माझ्या मनांत एकदां का कोणाविषयीं वाईट ग्रह झाला, कीं, तो वज्रलेप झाला ! ”

ताराबाई म्हणाली “ वा, हा तर मोठाच दोष आहे. निरंतरचं वैर धरणं हा मोठाच स्वभावांत दुर्गुण म्हटला पाहिजे. पण तुम्हीं माझ्या दृष्टीनं छानदार दुर्गुण पतकरला आहे. असल्या दुर्गुणाची चेष्टा करून मी तरी निदान हंसूं इच्छीत नाहीं ! ”

भय्यासाहेब म्हणाले. “ मला वाटतें, कीं, प्रत्येक मनुष्याच्या अंगीं जन्मतःच असा एकादा तरी दोष असतो, कीं, कितीहि प्रयत्न केल्यानें, किंवा कितीहि शिक्षण प्राप्त झाल्यानें, तो घालवून टाकतां येत नाहीं ! ”

ताराबाई म्हणाली “ होय, अन् अशा प्रकारचा तुमचा दोष कोणचा म्हणाल, तर ज्याला त्याला तुच्छ समजत असणं ! ”

भय्यासाहेब हंसत ह्मणाले “ अन् तसलाच तुमचा दोष हा दिसतो आहे, कीं, मुद्दाम लोकांच्या बोलण्याचा गैरसमज करून घेणें !”

कमलिनीला या संवादांत कांहीं बोलतां येईना. तेव्हां ती म्हणाली “चला, आतां थोडंसं संगीत चालवूंया. ताई, बंडोपंत जागे झाले तर चालेल का?”

इंदिराताई ह्मणाल्या “ हो, आतां रगड झाली झोंप ! झोंप मोडलेलीच बरी आतां. नाहीं तर मग रात्रीं झोंप येईनाशी होते ! ”

कमलिनीनें बाजा उघडला व गायनवादन सुरू केलें. कृष्णरावांनां एकंदरींत गायन सुरू झालेलें ठीक वाटलें. ताराबाईकडे जास्त लक्ष देणें धोक्याचें आहे, असें त्यांनां आतां वाटूं लागलें होतें !

---

## प्रकरण बारावें.

### नाइलाजानें निरोप दिला !

त्या दिवशीं रात्रीं दोघींच्या मतानें ठरलें, कीं, उद्यां आपण आपल्या घरीं जावें, व त्या प्रमाणें सकाळीं ताराबाईनें आईला चिठी पाठविली, कीं, आजच्या दिवसांत सवडीप्रमाणें आमच्याकारितां गाडी पाठवावी; पण सीताबाईचा हेतु त्यांनीं अजून दोनदिवस तरी तेथें रहावें असा असल्यामुळें, ती चिठी त्यांनां रुचली नाहीं. त्यामुळें त्यांनीं जो जबाब पाठविला, तो ताराबाईला आवडला नाहीं. कारण, केव्हां एकदां आपल्या घरीं जाईन, असें तिला झालें होतें. “ मंगळवारापर्यंत गाडीला फुरसत नसल्यामुळें ती

मिळणें शक्य नाहीं," असें प्रथम लिहून ताज्या कलमांत तर लिहिलें होतें, कीं, " भाऊसाहेबांनीं किंवा त्यांच्या बहिणींनीं त्यापेक्षांहि जास्त रहाण्याचा आग्रह केला तर खुशाल रहा, आमची कांहीं हरकत नाहीं. " परंतु आतां जास्ती न रहाण्याचा ताराबाईचा पक्का निश्चय झाला होता, आणि तसा कोणी आग्रहहि करणार नाहीं हेंहि ती जाणून होती. उलट तिला अशी भीति पडूं लागली होती, कीं, वाजवीपेक्षां जास्त रहाणारीं हीं अगांतुक पाहुणीं आहेत, असेंहि कदाचित त्यांनां वाटेल, म्हणून भाऊसाहेबांची गाडी आज मागून घे, असें तिनें शांतालां सुचविलें. तिलाहि ती सूचना पटली, व अखेर त्यांनीं ठरविलें, कीं, आपल्या पहिल्या बेताप्रमाणें आजच घरीं जावें व त्याकरितां भाऊसाहेबांची गाडी मागावी.

ती विनंति शांताबाईनें करितांच सरलस्वभावी भाऊसाहेबांबरोबर त्यांच्या मंडळींनींहि आश्चर्य प्रदर्शित करण्याचा रगड आव घातला. कमलिनी तर वरपांगीं सर्वांपेक्षां जास्तच आग्रह करूं लागली. एकंदरींत इतका आग्रह झाला, कीं, आजच्या दिवस तरी जाण्याचा विचार शांताबाईनें रहित केला, व उद्यां जाण्याचें नक्की ठरलें. "एक दिवस कशाला आणखी लांबला" असें कमलिनी मनांत म्हणूं लागली. कारण, एका बहिणीवरच्या तिच्या प्रेमापेक्षां दुसऱ्या बहिणीचा तिचा मत्सर व नावड किती तरी जास्त होती!

ही मंडळी उद्यां खास जाणार, हें पाहून भाऊसाहेबांनां किती तरी वाईट वाटलें, व त्यांनीं त्या दिवशीं दोनचार वेळां त्यांचें मन वळविण्याचा प्रयत्न केला. " अजून शांताबाई साफ बरी नाहीं झाली. गाडींत वारा लागून कदाचित् दुखणें उलटण्याचा संभव आहे, " वगैरे त्यांनीं पुष्कळ सांगितलें. पण एकदां आपलें करणें रास्त आहे अशी शांताबाईची खात्री झाली, कीं, मग तिचा निश्चय फिरत नसे.

कृष्णरावांनां तो बेत मनापासून इष्ट वाटला. ताराबाई आनंदभुवनांत आतां रगड राहिली, आपणाला इष्ट वाटतें त्यापेक्षां ती आपलें मन जास्त आकर्षण करिते, असें त्यांनां वाटूं लागलें होतें. कमलिनीहि तिच्याशीं ज्यास्त तुटक वागूं लागली होती, व तिच्यावरून भय्यासाहेबांची ती जास्तीच चेष्टा करूं लागली होती. त्यांनीं आतां असा पोक्त विचार ठरविला होता, कीं, आपणाला तिचें कौतुक वाटतें, असें एकहि चिन्ह चुकूनसुद्धां कोणाच्या नजरेस पडूं नये. अथवा, तिच्याहि स्वतःच्या मनांत आपणाविषयीं भलतीच

आशा उत्पन्न होऊं देण्याला आपण कारण घडूं देऊं नये. जरी यदाकदाचित् आजपर्यंतच्या आपल्या वर्तनामुळें तसल्या प्रकारच्या कल्पनेचा अंकुर तिच्या मनांत उत्पन्न झालेला असला, तरी आज शेवटच्या दिवशीं आपण जसें वर्तन करूं त्यानें तो एक खात्रीनें बळावत तरी जाईल, किंवा नाहींसा तरी होऊन जाईल. तो निश्चय पूर्णपणें मनांत बाळगून, सबंध दिवसांत त्यांनीं तिच्याशीं दहा शब्द देखील उच्चारले नाहींत. एकदां तर सबंध अर्धा तास ते व ती एकटींच दिवाणखान्यांत होतीं; पण ते मुद्दामच पुस्तकांत गढून गेल्यासारखें दाखवून तिच्याकडे पाहीनातसुद्धां !

दुसऱ्या दिवशीं सकाळीं बहुतेक सर्वांनां इष्ट असल्याप्रमाणें त्यांच्या जाण्याची गडबड सुरू झाली. जाण्याची वेळ जों जों जवळ येत चालली, तों तों कमलिनी ताराबाईशीं जास्त आदर व शांताबाईवर जास्त प्रेम दाखवूं लागली. इंदिराताईनींहि यथायोग्य वर्तन ठेवलें होतें. "नेहमीं येत जा, आपल्या भेटीपासून अतिशय आनंद झाला," वगैरे औपचारिक भाषा रगड झाली. भाऊसाहेबांनां मात्र मनापासून वाईट वाटलें, व त्यांनीं नाइलाजानें त्यांनां निरोप दिला.

घरीं पोंचतात तों सीताबाई साधारण नाखूषच झाल्या. "इतका अघोचरपणा करून त्यांची गाडी मागून यायची काय घाई होती बाई ! इथें कांहीं अडलं का होतं ? अन् आतां वारा लागल्यानं दुखणं उलटलं तर ! छे छे, या पोरींनां किनई भारी कारभार करायला हवेत !" असे त्यांचे उद्गार पुन्हां पुन्हां निघाले. आनंदरावांनां मात्र त्या आल्या हें मनापासून आवडलें. त्या गेल्यापासून त्यांनां चुकल्या चुकल्यासारखें वाटत असे. दुपारीं जेवणावेळच्या बोलण्यांतला बहुतेक रस नाहींसा झाला होता, व त्यांत कांहीं खुबीहि राहिली नव्हती असें त्यांनां होऊन गेलेलें होतें.

मथुरी नेहमींप्रमाणें पुस्तकें वाचून उतारे करण्यांत, पेटीवर संवय करण्यांत गढलेलीच होती. तिनें कांहीं नव्या चाली वाजवून दाखविल्या, व कांहीं नवे नवे नीतिशिक्षणावरचे उतारे केलेले दाखविले. सुंद्री, हिरी यांच्या निराळ्याच तऱ्हेच्या गोष्टी चाललेल्या होत्या. चार दिवसांत रिसाल्यांत किती गोष्टी झाल्या होत्या, किंवा होऊं घातल्या होत्या; कित्येक ऑफिसरांनां मावशीच्या इथें चहा झाला होता, एका शिपायाला एक दिवशीं फटके मारण्यांत आले होते, व कर्नल फडके यांचें लवकरच लग्न होण्याचा रंग आहे, असें लोक हळुहळू बोलूंसुद्धां लागले होते !

# प्रकरण तेरावें.

## नवीन परिचय.

शांता व तारा घरीं येऊन तीन दिवस झाले होते. चवथ्या दिवशीं सकाळीं चहा झाल्यावर आनंदराव आपल्या पत्नीकडे पाहून म्हणाले "हें पद्दा, आज जेवणाचा कांहीं विशेष बेत केला आहे ना? कारण, आज कोणी नवीन माणूस जेवायला येईल असें वाटतें आहे मला."

सीताबाई म्हणाली "कोण येणार बाई नवीन? मला तर नाहीं कोणी लक्षांत येत. न जाणों आली तर कदाचित् मालती येईल. पण तिच्याकरितां आमचा रोजचा बेत काय बदलायला हवा आहे? तिच्या घरीं इथल्या आमच्या-सारखा बेत तरी कधीं रोज असतो म्हणा!"

आनंदराव म्हणाले "नवीन येणारा माणूस एक नवखा गृहस्थ आहे, बरं का?"

सीताबाईंचे डोळे प्रफुल्लित झाले. "नवखा! अन् गृहस्थ! तर मग भाऊ-साहेबच! मला बिलकुल बातमी लागूं नाहीं दिलीस अं, शांते! अग लबाडे! बरं पण, त्यांत काय मोठंसं? केव्हांहि आले तरी हवेच आहेत! पण अगबाई, आज भाज्या दोनच आहेत. सुंद्रे, बाळ, जा बरं, त्या नर्मदेला बोलाव बरं. मी आधीं तिला सांगतें!"

आनंदराव म्हणाले "तो गृहस्थ भाऊसाहेब नव्हे! अगदीं इतका नवखा तो गृहस्थ आहे, कीं, मीं सुद्धां कधीं अजून त्याला पाहिला नाहीं!"

आतां मात्र सर्वांनांच आश्चर्य वाटलें, व आपली पत्नी व पांची मुली आपल्याला एकदम प्रश्न करताहेत, असें पाहून आनंदरावांनां समाधान झालें. कांहीं वेळ त्यांची चेष्टा केल्यावर ते बोलूं लागले "एक महिना झाला मला हें पत्र आलें. अन् त्याचें उत्तर मीं पंधरा दिवसांपूर्वीं पाठविलें. कारण, मला वाटलें, कीं, जरा तें नाजुक विषयाविषयीं होतें, व जबाबहि लवकर मागितला होता त्या गृहस्थानें! तें आलें आहे—आमचा भाचा नीलकंठराव याजकडून! तुम्हांला ठाऊकच आहे, कीं, आमची गठडी वळली, कीं, तो हवा तेव्हां येऊन तुम्हां सगळ्यांनां या बंगल्यांतून हांकून लावील!"

सीताबाई म्हणाल्या "नको ग बाई, त्या मेल्याचं नांवसुद्धां काढूं नका माझ्या-समोर! कोण तरी अन्याय हा बाई, कीं, ही सगळी इष्टेट आपल्या लेंकरांच्या म्हणे हातांतून हिसकावून घ्यायची! त्यासारखं दुसरं खडतर नष्टचर्यच नसेल.

मी जर तुमच्या जागीं असतें, तर कधींच कांहींना कांहीं तरी युक्ति करून तें सगळं फिरवून घेतलं असतं ! ”

दोघी वडील लेकींनीं आईला खरी स्थिति समजावून सांगण्याचा प्रयत्न केला. आजपर्यंत तिची समजूत पाडण्याचा पुष्कळदां प्रयत्न झाला नव्हता असें नाहीं. पण या बाबतींत तिची समजूत घालणें केवळ अशक्यच होतें. सीताबाई या वेळींहि नेहमींप्रमाणें सडकून रागावून बडबडूं लागल्या. “काय पण नीचपणा ! पांच सोन्यासारखीं लेंकरं त्यांना भीक मागायला लावून, जो मेला कधीं काळा का गोरा देखला नाहीं, असल्या पाजी माणसाला म्हणे सगळी इष्टेट देणार ! म्हटलं, दत्तक तरी घ्या एकादा मुलगा, म्हणजे तो तरी आपल्या बहिणींची कींव करून संभाळ करील. तेंहि चालत नाहीं म्हणे कायद्यानं ! त्या काळतोंड्यालाच सगळं द्यायचं बरं आवडतं बाई !”

आनंदराव म्हणाले “एकंदर सर्व प्रकार अत्यंत जुलमाचा आहे खरा. अन् ही इष्टेट घेण्याच्या पातकाचें नीलकंठराव कसें क्षालन करील कोण जाणे. पण, हें पहा, तो या पत्रांत काय म्हणतो आहे तें ऐकून, कदाचित् आपला त्याच्यावरचा संताप कमी होतो का पहा बरें ?”

सीताबाई म्हणाली “नाहीं, कद्धीं कमी नाहीं होणार ! आधीं त्यानं तुम्हाला पत्रच लिहिण्याची छाती कशी केलीन् ? भारी मानभावी हो ! असले ढोंगी लोक मला बिलकुल आवडत नाहींत कद्धीं. त्यानं आपल्या बापासारखं आमच्याशीं नेहमीं भांडतच रहावं, तेंच पतकरलं !”

आनंदराव म्हणाले “हो, वडिलांच्या संबंधानें त्या बाबतींत त्यालाहि अजून किंतु वाटतो आहेच; पण आधीं पत्र तर वाचतों तें ऐका !” असें म्हणून आनंदरावांनीं पुढील पत्र वाचून दाखविलें:—

**“ श्रीरंगनाथस्वामी प्रसन्न.**

**मुक्काम सुवर्णपूर,**

**मित्ति वैशाख शुद्ध ७. शके १९—**

**तीर्थस्वरूप राजश्रिया विराजित रा. रा आनंदरावजी दादासाहेब नगरकर**

**मु० शिवदुर्ग, वडिलांचे शेवेसी.**

**अपत्यें बालकें नीलकंठ राजगुरु कृतानेक शिरसाष्टांग नमस्कार. विज्ञापना विशेष.**

**आमच्या कैलासवासी तीर्थरूपांमध्यें व आपणांमध्यें जो कलह माजून**

राहिला होता, त्याचे कारणें आमचे चित्तास नेहमीं असमाधान उत्पन्न होत असे; व दुर्दैवानें वडिलांस देवाज्ञा झाल्यापासून अशी वारंवार इच्छा उत्पन्न होत असते, कीं, आमच्याविषयीं आपले मनांत असलेला लढा सोडवून घ्यावा; परंतु ज्यांच्याशीं बेदिलीनें रहाण्याचें आमच्या वडलांनां योग्य वाटलें, त्यांच्याशीं आम्ही दिलसफाई करून घेणें, त्यांच्या परलोकवासी आत्म्यास प्रिय वाटेल कीं नाहीं, अशा कुशंकेनें आजपर्यंत दिवसगत करण्यांत आली. ”

सीताबाई मध्येंच म्हणाल्या “ पाहिलंत ? मीं म्हटलं तसं आहे कीं नाहीं तारे ? ”

आनंदराव पुढें वाचूं लागले.

“ तरी पण आतां पूर्ण विचारा अंतीं, त्या बाबतींत आम्ही आपले मनाशीं निश्चय ठरविला आहे. कारण, आमचा विद्याभ्यास नुकताच पूर्ण झाल्याबरोबर, श्रीमंत मातुश्री राणी माईसाहेब सुवर्णपुरकर ( म्हणजे कै. श्रीमंत महाराज सरकार बाळासाहेब सुवर्णपुरकर यांच्या पत्नी ) यांनीं अत्यंत कृपालोभपूर्वक आम्हांला आमच्या पूज्य वडिलांच्या स्थानीं मानून, पूर्ववत आपले पदरीं कायम करण्याची मेहरबानी केली आहे. म्हणून श्रीमत् रंगनाथ स्वामी महाराज यांच्या शिष्यसांप्रदायाच्या महत्त्वाप्रमाणें, व श्रीमंतांनीं आम्हाला गुरुस्थानीं मानून जो आमचा सन्मान केला आहे त्याच्या इभ्रतीस अनुरूप अशा रीतीनें, आपलें आचरण ठेवून त्यांचे सन्निध नम्रपणानें रहाणें, हें आमचें आद्यकर्तव्य आम्ही समजतों. समर्थांच्या अनुज्ञेप्रमाणें आमच्या दृष्टिपथांत जे जे जन येतील, त्यां सर्वांमध्यें शांतिसुखाची महती वाढविण्याचेहि आम्हीं मनापासून प्रयत्न केले पाहिजेत. या दृष्टीनें पहातां, आपणां उभयतांमधील कलहाग्नि शांत करण्याचा हा आमचा प्रयत्न आपल्या पसंतीस येईल, अशी फार उमेद आहे. इष्टेटीसंबंधानें जे निर्बंध झालेले आहेत त्यांमुळें आपल्या सुस्वभावी कन्यांचें मनस्वी अहित झालें आहे, ही गोष्ट आम्हाला केवळ शल्यप्राय लागून राहिली आहे. व त्याविषयीं आपण आम्हाला क्षमा करावी, अशी सविनय प्रार्थना आहे;

इतकेंच नाहीं, तर तें अहित शक्य त्या मानानें भरून काढण्याचा आम्ही यथाशक्ति उद्योग करूं. — पण त्याविषयीं आपण भेटीअंतीं जास्त बोलूं. आपली हरकत नसेल, तर आपले भेटीस येऊन सातआठ दिवस समागमसुखाचा प्रत्यक्ष लाभ घेण्याचा आमचा मानस आहे. म्हणून सोमवार ता. ५ जून रोजीं सकाळीं नवांचे सुमारास शिवदुर्गास आपले घरीं यावें, असें आम्हीं योजिलें आहे सात दिवसपर्यंत आमचें वास्तव्य सुवर्णपुरांत न झालें तरी हरकत नाहीं, अशी श्रीमंत राणी मातुश्री माईसाहेब यांनीं अत्यंत कृपाळु होऊन परवानगी दिली आहे, त्यामुळें इकडील काळजी नाहीं.

पत्रोत्तर सत्वर यावें. कृपा लोभ पूर्ण असावा. शेवेसी श्रुत होय, हे विज्ञापना.

आपला नम्र बालक,

**नीलकंठ राजगुरु.** ”

पत्र संपल्यावर आनंदराव म्हणाले “ तर मग, हे सलोखा करूं इच्छिणारे गृहस्थ, आतां एका तासानें यावेत. स्वारी दिसते आहे मोठी विनयशील व स्वकर्तव्यपरायण ! अन् मला वाटतें, कीं, आपणां सर्वांनां हा नवीन परिचय मोठा अमूल्य होईल—म्हणजे जर यांच्या श्रीमंत मातुश्री राणी माईसाहेबांनीं इकडे वारंवार येण्याची मेहरबानीनें परवानगी दिली तर ! ”

सीताबाई म्हणाल्या “ मुलींच्याविषयीं जें लिहिलं आहेन् त्यांत दिसतो आहे कांहीं अर्थ. अन् त्यांचं नुकसान भरून देण्याचा जर खरोखर त्याचा हेतु असला, तर मी कांहीं त्याच्या उलट जायची नाहीं. ”

शांताबाई म्हणाली “ पण कोणच्या रीतीनं तें नुकसान भरून काढतां येईल, हें समजणं फार कठिण आहे. तरीपण ती त्यांनां इच्छा आहे हें भूषणास्पद आहे. ”

ताराबाईला त्या पत्रांतला राणीसाहेबांविषयीं पुन्हां पुन्हां प्रदर्शन केलेला आदर जरासा फाजील वाटला, व आपणाकडे इष्टेट येणार त्याविषयीं क्षमा मागितलेली ऐकून हंसावेंसेंहि वाटलें. ती म्हणाली “ जरा चमत्कारिकच स्वारी दिसते आहे. भाषाहि फार बोजड व बडेजावीची दिसते आहे. इष्टेटीबद्दल

क्षमा मागतात ह्मणजे काय बाई ? मला नाहीं वाटत, कीं, ते इष्टेट सोडून द्यायला कधीं तयार होतील ! आपणाला वाटतं का, बाबा, कीं हा समजूतदार माणूस असेल असं ? "

आनंदराव म्हणाले " छे, मला नाहीं वाटत. माझी तर कल्पना आहे, कीं, तो अगदीं उलट निघेल ! त्याच्या पत्रांत खुशामत व आढ्यता इतकी मजेदार तऱ्हेनें मिसळलेली दिसते, कीं, मला हा प्राणी कधीं नजरेस पडेल, अशी उतावीळ झाली आहे ! "

एवढा वेळ मथुरी त्या पत्रावर विचार करीत होती, ती आतां ह्मणाली "मला वाटतं, पत्राची भाषासरणी कांहीं वावगी नाहीं. बेदिली व दिलसफाई, ही कल्पना जरी नवी नाहीं, तरी चांगल्या प्रकारानें ती व्यक्त झाली आहे."

सुंद्री, हिरी यांनां त्या पत्रांत किंवा तें लिहिणारांत मन घालण्यासारखें कांहींच नव्हतें. नीलकंठराव पलटणींतला तांबडा पोषाख घालून येणें केवळ अशक्य होतें, व त्या दोघींनां अलीकडे तांबड्या पोषाखाविना कोणाहि माणसांत अर्थ दिसत नसे. त्यांच्या आईचा मात्र बराचसा राग त्या पत्रानें उडवून टाकला होता, व ती नीलकंठराव येण्याची वाट इतक्या स्वस्थपणें पाहूं लागली, कीं, हा एकाएकीं झालेला तिच्यांतला फरक पाहून, आनंदराव व थोरल्या मुलींनां फार आश्चर्य वाटलें.

ठरलेल्या वेळीं नीलकंठराव येऊन दाखल झाले, व त्यांचें सर्वांनीं यथायोग्य स्वागत केलें. आनंदराव स्वतः फारसे बोलले नाहींत; परंतु इतर मंडळी बोलत होती, व नीलकंठरावांनांहि गप्प राहण्यापेक्षां बोलण्याचीच जास्त हौस दिसली. त्यांचें वय पंचविशीच्या आंतबाहेर असावें. बांधा साधारण ठेंगूच असून जाडसा दिसला. मुद्रा नेहमीं गंभीर व दरबारी थाटाची, व वागणूकहि त्याला शोभेशीच दिसली. पोषाख बहुतेक नवीन तऱ्हेचाच दिसला. वर्ण निमगोरा. त्यांनां पाहून ताराबाईला '**वेदाभ्यासजडः**' या कालीदासाच्या विशेषणाची आठवण झाली; पण त्याच्या विसंगत त्यांचा अलीकडचा पोषाख पाहून थोडेंसें हंसूं येऊं लागलें. थोड्याच वेळानें नीलकंठराव म्हणाले " आपल्या या उत्तम कन्या पाहून आमच्या चित्तास परम समाधान होत आहे. आह्मी त्यांच्या सुस्वरूपाची कीर्ति ऐकत होतों; पण या बाबतींत कीर्ति वस्तुस्थितीपेक्षां फार कमी पसरली आहे ! योग्यकालीं त्यांनां अनुरूप स्थळें मिळालेलीं आपणांस खास दिसून येतील. "

हें भाषण कांहींजणांना पसंत नव्हतें; पण तें सीताबाईंनां उद्देशून होतें, त्यांना तें योग्य वाटलें. त्या लगेच म्हणाल्या " आपलं बोलणं योग्यच आहे. अन् आपली वाणी खरी ठरो येवढीच माझी देवाजवळ प्रार्थना आहे. नाहींतर बिचाऱ्यांची दैनाच आहे, हें तर आपणाला ठाऊक आहेच. "

नीलकंठराव म्हणाले " आपण बहुतकरून इष्टेटीच्या व्यवस्थेला उद्देशून बोलत असाल ? "

सीताबाई म्हणाल्या " हो, उघड आहे. आमच्या या गरीब लेंकरांनां तो एक विशेष अन्यायच आहे म्हणायचा. बाकी, मी आपणाला त्याबद्दल दोष देतें असं नव्हे. कारण, असल्या गोष्टी जगांत कशातरी घडून येतात झालें."

नीलकंठराव म्हणाले " या सुंदर मुलींनां मोठा अन्याय झालेला आहे, ही गोष्ट आमच्या नेहमीं लक्षांत आहे, व त्याविषयीं आमच्या मनांत बरेंच बोलण्याचा हेतु आहे; परंतु आजच एकदम बोलणें जरा चमत्कारिक दिसेल, म्हणून आम्ही माघार घेत आहोंत. पण एवढें त्यांनां सांगायला मुळींच हरकत दिसत नाहीं, कीं, त्यांची वाखाणणी करण्याच्या तयारीनेंच आम्ही आलों आहोंत. आजच्या प्रसंगीं आम्ही जास्त बोलूं इच्छीत नाहीं; पण कदाचित्, जास्त परिचय झाल्यावर—"

इतक्यांत जेवणाची तयारी आहे म्हणून वर्दी आली, म्हणून नीलकंठराव स्नानाला उठले. थोरल्या मुली हळूच एकमेकींकडे पाहून हंसूं लागल्या. नुसत्या मुलींचीच वाखाणणी करून नीलकंठराव थांबले नाहींत; दिवाणखाना, स्नानाची जागा, देवघर, वगैरे स्थलें व त्यांतल्या सामानसुमानाची त्यांनीं यथेच्छ स्तुति केली. या सर्व वाखाणणीनें सीताबाई विशेष खूष झाल्या असत्या; परंतु हीं सर्व स्थलें एकेकाळीं आपल्या मालकीचीं होणार या दृष्टीनें ते बघत असतील, ही कल्पना सीताबाईंनां तितक्यांत आल्यामुळें, बरेंच विरजण पडलें. स्नानानंतर दहापांच मिनिटें जपजाप्य करून व सर्वांनां श्रीस्वामिमहाराजांचें तीर्थ अर्पण करून, भोजनास सुरुवात झाली. भोजनांतील. निरनिराळ्या पदार्थांचीहि रगड वाखाणणी झाली, व इतके रुचकर पदार्थ करण्याचें श्रेय कोणच्या सुग्रण कन्येला दिलें पाहिजे असा त्यांनीं सीताबाईंनां सहज प्रश्न केला. पण सीताबाईंनीं तोंऱ्यानेंच सांगितलें, कीं, " आमच्या घरीं स्वैपाक नेहमीं ब्राह्मणच करतो बरं. माझ्या मुलींनां मी कधीं चुलीला लावीत नसतें ! "

नीलकंठराव चुकल्याबद्दल क्षमा मागूं लागले. सीताबाईनीं "त्यांत क्षमा कसली मागायची," असें ह्मणून हंसण्यावारी नेलें; तरी पण जेवण संपेपर्यंत ते दोनचारदां तरी क्षमेविषयीं पुनः बोललेच !

---

## प्रकरण चवदावें.

### आम्ही कादंबरीसेवन करीत नसतों !

आदंराव जेवतांना फारसें बोलले नाहींत, पण जेवण झाल्यावर मंडळी पानसुपारी व मुखशुद्धी घेण्यासाठीं पुन्हां दिवाणखान्यांत जमल्यावर व नोकर चाकर घरांत गेल्यानंतर, या नव्या पाहुण्यांची थोडीशी परीक्षा करून पहाण्याचा त्यांनीं विचार करून, श्रीमंत राणी माईसाहेबांविषयीं गोष्ट काढली. या विषयानें त्यांच्या भाषणांत विशेष खुमारी दिसूं लागेल, असा त्यांचा अंदाज होता, व तो अक्षरशः खरा ठरला. आनंदरावांचा हेतु दुसऱ्या कोणत्याहि विषयानें इतका साध्य झाला नसता. श्रीमंत राणी माईसाहेबांची वहावा करण्यांत नीलकंठराव अगदीं तल्लीन होऊन गेले, व त्यांची मुद्राहि विशेष गंभीर होऊन गेली. विशेष उत्साहाच्या स्वरानें त्यांचें भाषण चालू झालें. ते म्हणाले "मी आपणाला खात्रीपूर्वक सांगतों, कीं, एवढ्या उच्चपदवींतल्या माणसाच्या अंगीं इतका सौम्य स्वभाव, व इतरांविषयीं सप्रेम वर्तणूक, आपण तर जन्मांत कधीं कुठें पाहिली नव्हती ! आम्हीं त्यांच्या विशेष इच्छेवरून श्रीमंत राणी माईसाहेबांच्या सन्निध दोन प्रवचनें दासबोधावर केलीं, तीं दोन्हीहि त्यांनां अत्यंत पसंत पडल्याचें त्यांनीं मेहरबानीनें उद्गार काढून दाखविले. येवढ्या थोड्या अवधींत आम्हाला श्रीमंतांनीं चार वेळां भोजनासहि आमंत्रण केलें, व आम्हाला आपल्या पंक्तीचा अमूल्य लाभ दिला. दोन वेळां तर सोंगट्या खेळण्यास कुणी नव्हतें म्हणून मुद्दाम निमंत्रण पाठवून श्रीमंतांनीं आम्हाला नेलें ! पुष्कळ लोक श्रीमंतांनां गर्विष्ठ समजतात, असें आमच्या श्रवणांत आहे; परंतु आम्हां स्वतःला सदैव त्यांच्या कृपालोभाचीच साक्ष पटत चालली आहे. इतर कोणाहि गृहस्थाप्रमाणें आमच्याशींहि श्रीमंत संभाषण करितात, व इतर सामान्यजनाशीं आम्ही मिळूनमिसळून वागलों तरी श्रीमंतांचा कांहीं प्रतिबंध नाहीं. कधीं सातआठ दिवस परगांवीं जाणें झालें तरीहि कृपादृष्टि आहे. इतकेंच काय, आम्हीं आतां विवाह करावा,

अशीहि श्रीमंतांनीं अनुज्ञा दिली आहे. मात्र कुलशीलवान् मुलगी पहावी, एवढीच त्यांची अट आहे ! आमच्या गरिबाच्या घरींसुद्धां एके प्रसंगीं श्रीमंतांचें आगमन झालें, त्या वेळीं आम्ही आमच्या घरांत नवीन केलेल्या सोयी त्यांनां अतिशय पसंत पडल्याचें त्यांनीं स्पष्ट बोलून दाखविलें, व आणखी कांहीं फळ्या सामानसुमानाकरितां स्वयंपाकगृहांत बसवून घेण्याची अत्यंत आग्रहानें शिफारसहि श्रीमंतांनीं स्वतः आम्हाला केली. ”

सीताबाई म्हणाल्या “ अहो, तें अगदीं रास्तच आहे. एकदां तुम्हाला गुरुघराण्यांतले म्हणून पूज्य मानले, म्हणजे हें सगळं आपोआप यायचंच मागाहून ! ”

नीलकंठराव म्हणाले “गुरु म्हणून एकदांच का हो? केव्हांहि आमची भेट झाली, कीं, उत्थापनपूर्वक आमचें स्वागत करून, आम्हाला श्रीमंत स्वतः वंदन करीत असतात; अशी त्यांनीं अत्यंत उत्तम वहिवाट ठेविली आहे. ”

सीताबाई म्हणाल्या “ अहो, तें थोरांनां योग्यच आहे. खऱ्या थोरांचं असंच असतं. त्यांचा वाडा आपल्या घराजवळच असेल नव्हे ? ”

नीलकंठराव म्हणाले “ त्यांचा जुना वाडा सुवर्णपुर गांवांत आहे; पण श्रीमंतांनां अलीकडच्या पद्धतीप्रमाणें तेथें राहणें पसंत नसून, बाहेर अर्ध मैलावर उत्तम बगीचा आहे, त्यांत भव्य बंगला बांधलेला आहे तेथें नेहमीं खाशा स्वाऱ्या रहातात. त्याला नजरबाग असें नामाभिधान आह, व आमचीहि पर्णकुटिका तेथून जवळच आहे. ”

सीताबाई म्हणाल्या “ श्रीमंतांनां संतति काय आहे बरं ? ”

नीलकंठराव म्हणाले “पुत्र एक आहेत त्यांचें केवळ बालवय अजून आहे. कन्या मात्र हल्लीं जवळ जवळ उपवर झालेल्या आहेत, त्यांनांहि कैलासवासी श्रीमंतांनीं रगड इष्टेट करून दिली आहे. ”

सीताबाई मान हलवीत म्हणाल्या “ वा, मग मोठी नशीबवान आहे म्हणायची ! कितीक मुलींची बिचाऱ्यांची खायचीप्यायचीसुद्धां अडचणच असते. अन् ती कन्या कशी काय आहे ? आहे का, सुस्वरूप ? ”

नीलकंठराव म्हणाले “ अहो, अत्यंत खुपसुरत आहेत त्या ! स्वतः मुळीं श्रीमंत माईसाहेबच कितीकदां म्हणत असतात, कीं, खरें स्वरूपच पाहिलें तर कोणच्याहि सुंदर मुलीपेक्षां इंदुमती देवी कितीतरी श्रेष्ठ आहेत. कारण, त्यांच्या मुद्रेवरूनच सहज त्यांचें श्रीमंत घराणें ओळखण्यासारखें आहे; परंतु दुर्दैवानें

त्यांची तब्दुरुस्ती नेहमीं बरोबर नसते, म्हणून त्यांनां स्त्रीजातीला योग्य असे इतर गुण अंगीं आणणें होत नाहीं. बाकी, त्यांतहि त्या कांहीं कमी व्हायच्या नाहींत, असें आह्माला त्यांच्या विद्याभ्यासावर देखरेख करण्याकरितां नेमण्यांत आलेल्या मास्तरीणबाई सांगत होत्या. आणखी स्वभाव मात्र अगदीं सज्जन! आमच्या पर्णकुटिकेशींसुद्धा कधीं कधीं गाडींतून येऊन, रस्त्यावर बोलत राहतात आमच्याशीं."

सीताबाई म्हणाल्या "त्या अजून क्लबांत संमेलनांत येऊं नाहीं लागल्या वाटतं? त्यांचं नांव कुठें ऐकिवांत येत नाहीं मोठमोठाल्या सरदार वगैरे लोकांमधें?"

नीलकंठराव म्हणाले "त्यांच्या प्रकृतीच्या नादुरुस्तीमुळें त्यांनां पुण्या-मुंबईकडे जायला फावत नाहीं, व त्यामुळें तेथल्या समाजाला एका अत्यंत देदीप्यमान रत्नाला मुकावें लागलें आहे! आम्हीं एके दिवशीं हें असें खुद्द श्रीमंतांनां सांगितलेंच मुळीं. अन् त्यांनांहि आमची कल्पना फार पटली! अन् आम्ही नेहमीं त्यांच्यासारख्यांनां प्रिय वाटेल अशीं भाषणें त्यांच्यापुढें करीतच असतों, हें सहज आहे. आम्हीं कितीकदां तरी त्यांच्या तोंडावर म्हणून दाखवतों, कीं, अक्कासाहेब अगदीं खुद्द संस्थानिकांची पट्टराणी होण्याइतक्या सर्वगुणसंपन्न आहेत. इतकेंच नव्हे, तर तसल्या उच्च स्थानामुळें त्यांनां शोभा येण्याच्या ऐवजीं त्या उच्च स्थानालाच त्यांच्यामुळें जास्त शोभा येईल! असलीं भाषणें मधून मधून ऐकिलीं, कीं, श्रीमंत राणीसाहेब सरकार अत्यंत खूष होतात, व आम्हीहि मधून मधून तसली वाखाणणी करणें, हें आमचें कर्तव्यच आहे असें मानतों."

आनंदराव ताराकडे हळूच पहात म्हणाले "आपली समजूत अगदीं रास्त आहे! आणि अशी बेताबेतानें खुशामत करण्याची हातोटी आपणाला साधली आहे, हेंहि फार नामी आहे. पण असलीं प्रिय भाषणें करतांना, तीं आपल्याला आयत्या वेळीं सुचतात, कीं, आपण आगाऊ तसलीं कांहीं जुळवून ठेवतां?"

नीलकंठराव म्हणाले "बहुशः तीं तात्कालिक स्फूर्तीनेंच आमच्या मुखांत येतात! शिवाय, कधीं कधीं प्रसंगाप्रसंगाला योग्य दिसतील अशीं फावल्या वेळीं आम्ही रचूनहि ठेवीत असतों; परंतु त्यांचा उपयोग करतेवेळीं, होतांहोईल तितकीं तीं स्वयंस्फूर्तीनेंच आयत्या वेळीं सुचल्याचें, आम्ही दर्शवून देत असतों!"

येणेंप्रमाणें आनंदरावांचा अंदाज अगदीं बरोबर ठरला. आपणाला आशा होती तितके अचरट आपले पाहुणे आहेत, अशी खात्री होऊन, त्यांनां समाधान वाटलें. हा वरील संवाद ऐकत असतां त्यांनां मनापासून गुदगुल्या होत होत्या, व ते मधूनमधून ताराकडे हंसत पाहून, हळूचें चेष्टा करीत होते. नंतर त्यांनां दोन तास वामकुक्षी करण्यास आनंदरावांनीं विनंति केली. कारण, घटकाभर मौज या वेळीं रगड झाली, असें त्यांनां वाटलें.

तिसरे प्रहरीं चार वाजतां पुन्हां मंडळी चहाकरितां जमली. चहा झाल्यावर आनंदरावांनीं "आह्मां सर्वांनां आपल्या ग्रंथवाचनाचा थोडासा लाभ मिळावा," अशी पाहुण्यास विनंति केली. ती नीलकंठरावांनीं मान्य केली. "काय वाचूं ?" ह्मणून विचारतांच, टेबलावर पांचसहा पुस्तकें होतीं, तीं त्यांच्याकडे मथुरीनें दिलीं; पण त्यांचीं नांवें वाचतांच नीलकंठराव एकदम दचकले व म्हणाले "माफ करा, पण या सर्व कादंबऱ्या आहेत ! आम्ही कधीं कादंबरी-सेवन करीत नसतों !"

सुंद्री, हिरीला अत्यंत आश्चर्य वाटलें. थोरल्या मुलींनां मात्र त्यांच्या बोलण्याचा श्लेष समजला; पण आनंदरावांप्रमाणें त्यांनांहि तो बाष्कळपणाचा वाटला. नंतर दुसरीं पुस्तकें आणलीं, त्यांतून त्यांनीं मोठ्या विचारपूर्वक "न्यायमूर्ति रानडे यांचीं धर्मविषयक व्याख्यानें" हें पुस्तक पसंत केलें. तें वाचण्याला त्यांनीं उघडतांच सुंद्री जांभई द्यायला लागली ! नीलकंठरावांनीं मोठ्या गंभीर स्वरानें व शांततेनें जेमतेम तीन पानें वाचलीं नाहींत तोंच सुंद्रीनें त्यांनां अडथळा केला. "आई, तूं ऐकलंस का, मावशी गणूला काढून टाकणार आहे तें ? अन् तसं जर झालं तर कर्नल फडके त्याला पलटणींत घेणार आहेत म्हणे ! मावशीच मुळीं परवां तसं म्हणाली. मी उद्यां सकाळीं गांवांत जाऊन जास्त बातमी काढीन म्हणा, अन् तसंच ते दाणी मुंबईहून कधीं येणार तोहि शोध करून येईन !"

सुंद्रीला गप बस ह्मणून थोरल्या दोघी बहिणींनीं सांगितलें; पण नीलकंठरावांची तब्येत गरम झाली. त्यांनीं पुस्तक मिटून बाजूला ठेवलें, व ते म्हणाले "आह्मांला ठाऊक आहे, कीं, असले धर्मपर ग्रंथ अज्ञान जनांच्या हिताकरितां जरी लिहिलेले असंतात, तरी त्यांत अज्ञान तरुण मुलींचें लक्ष लागत नाहीं, ही मोठी अजब गोष्ट आहे खरी; कारण, असल्या ग्रंथांतून त्यांनां

किती तरी लाभ होण्यासारखा असतो. पण आमच्या या मुलीला तसदी देण्याची आमची इच्छा नाहीं. चला रावसाहेब, आपण बुद्धिबळाचे दोन डाव मारूं या."

आनंदराव म्हणाले "कबूल. आपण हा रास्त विचार काढला. तरुण पोरींना त्यांच्या करमणुकीच्या गोष्टी करण्यास आपण सोडलेंत, तें फार शहाणपणाचें काम केलेंत!"

सीताबाई व थोरल्या मुली म्हणाल्या "नाहीं, आपण जरूर वाचावं. आह्मांला तें फार आवडतं आहे. पुनः कोणी आपणाला मधेंच अडविणार नाहीं."

नीलकंठराव म्हणाले "नाहीं, आतां नकोच! मला कांहीं सुंद्राबाईचा राग आला असें नव्हे कांहीं. त्यांत आमचा अपमान झाला, अशी आमची बिलकुल समजूत नाहीं. आम्ही आतां बुद्धिबलक्रीडा करतों, झालें!"

---

## प्रकरण पंधरावें.

### नागेशरावांची धूळभेट.

नीलकंठराव राजगुरु हा कांहीं शहाणासुर्ता गृहस्थ नव्हता, व निसर्गतः कमी असलेली बुद्धि त्यानें विद्याभ्यासानें, अगर चारचौघांत उठण्याबसण्यानें वाढविण्याचेहि श्रम घेतले नव्हते. वीस वर्षांपर्यंत अक्षरशत्रु व कद्रू अशा बापाजवळ त्याचा काळ गेला होता, व नंतर जरी तालुक्यांतून जिल्ह्याच्या शहरांत एका हायस्कुलांत त्यानें पांचसहा वर्षें घालविलीं होतीं, तरी तेथेंहि झटून अभ्यास न केल्यामुळें त्याला विशेष फायदा झाला नव्हता. वडिलांनीं चिरंजीवांवर बरीच करडी नजर ठेवली असल्यामुळें, त्यांच्या अंगीं बरीच नम्रता वसत असे; परंतु त्यांचा दाब नाहींसा झाल्यावर, बेअकली माणसाच्या अंगीं सहज येणारी आढ्यता मात्र ओतप्रोत शिरून राहिली. त्यांत आणखी आपण गुरुघराण्यांत जन्मलेले, मोठमोठे सरदारसुद्धां आपणास वंदन करतील असा आपला मान आहे, ही जाणीव त्यांच्या डोक्यांत होतीच, व त्याप्रमाणें श्रीमंत राणीसाहेबांनीं त्यांचें साधारण मोठें समजण्यासारखें उत्पन्न त्यांच्या नांवानें सोडल्यावर तर स्वारी पूर्णच बनून गेली! श्रीमंतांविषयीं नम्रता, इभ्रतीचा व स्वतःच्या बुद्धिमत्तेचा अतोनात अभिमान, आपल्या गुरुघराण्याची आढ्यता, वगैरे कारणांनीं नीलकंठराव राजगुरु ही एक विलक्षण व्यक्ति बनून राहिली होती.

# आजपासून पन्नास वर्षांनीं !

श्रीमंतांचा आश्रय व बेताचें उत्पन्न हातीं आल्यामुळें, आतां विवाह करावा, असें त्यांच्या फार मनांत आलें होतें. त्यांतून श्रीमंतांची खुद्द आज्ञा झाली ! आनंदरावांशीं सलोखा करण्याचें मनांत येण्याचें मुख्य कारण, त्यांच्या मुलींच्या सुस्वरूपाची वाखाणणी त्यांच्या कानीं गेल्यामुळें, त्यांतल्या एकीशीं, ती वाखाणणी खरी असली तर, आपण लग्न करावें, हें होतें. नुकसानी भरून देण्याचें जें त्यांच्या पत्रांत होते, तें हेंच. आणि त्यांनां खरोखरच असें साहजिकच वाटलें, कीं, आनंदरावांच्या मुलीशीं लग्न करण्याचा आपला हेतु बिलकुल आपस्वार्थीपणाचा नसून, केवळ त्यांच्यावर विलक्षण उपकार करण्याच्या इच्छेनें आपल्या मनांत आला आहे !

आनंदरावांच्या मुलींनां प्रत्यक्ष पाहूनहि त्यांचा हेतु ढळला नाहीं. शांताबाईचें सुस्वरूप पाहून त्यांचा हेतु कायम झाला, व ती वडील असल्यामुळें तिला आपण पसंत करणेंहि त्यांनां रास्त वाटलें. म्हणून पहिल्या दिवसभर त्यांच्या मनाचा निश्चय तिलाच पत्करण्याचा कायम राहिला. दुसऱ्या दिवशीं सकाळीं मात्र थोडा बदल करावा लागला. कारण, सकाळीं चहाच्या अगोदर ते व सीताबाई एकट्याच असतां त्यांच्या घरावरून गोष्ट सहज निघून त्या गृहाला योग्य अशी गृहिणी मिळवण्याकरितां आम्ही इकडे आलों आहों असें त्यांनीं सुचविल्यावरून सीताबाई अत्यंत खूष होऊन त्यांनीं ताबडतोब त्यांनां आपली पसंती प्रदर्शित केली. मात्र त्या इतकेंच म्हणाल्या, कीं, " धाकट्यांपैकीं कोणचीहि आपणांला द्यायला मला आनंद होईल. थोरली शांताबाईला मात्र, बहुतेक लवकरच एक गृहस्थ मागणी घालील असं आम्हांला दिसतें आहे. अन् तसं झालं तर तिलाहि तें स्थळ पसंत पडलेलें आहे. "

नीलकंठरावांनां काय, पहिली नाहीं तर दुसरी ! मंडळी तेथें चहाला येण्याच्या पूर्वींच एका क्षणांत, नीलकंठरावांनीं आपल्या हृदयांतून थोरलीला काढून टाकून, दुसरीला पक्कें बसवूनहि टाकिलें ! सीताबाईनां आपल्या दोन मुलींनां लवकरच स्थळें मिळण्याची खात्री वाटूं लागली, व काल सकाळीं ज्या मनुष्याचें नांव ऐकतांच त्या शिव्याशाप देऊं लागल्या होत्या, त्या मनुष्याला त्या आज आपली मुलगीहि देण्यास तयार झाल्या!

सुंद्रींचा गांवांत जाण्याचा बेत कायमच होता. मथुरीशिवाय चौघीहि बहिणी तिकडे जाण्यास चहानंतर निघाल्या. नेहमींप्रमाणें चहा झाल्याबरोब्बर आनंदराव आपल्या लायब्ररींत जाऊन बसले, त्यांच्यामागोमाग नीलकंठ-

रावहि तेथें आले. त्यांनीं बाह्यतः दासबोधावर नवीन प्रसिद्ध झालेली टीका हातीं घेतली होती; पण ती न वाचतां ते एकसारखे आनंदरावांशीं सुवर्णपुर व आपली पर्णकुटिका यांविषयीं हकीगत सांगून त्रास देत होते. " ही कोण पीडा आली ! " असें आनंदरावांनां होऊन गेलें. कारण, घरांत इतर ठिकाणीं जरी मूर्खपणा व अचरटपणा दृष्टीस पडत असे, तरी निदान आपल्या लायब्ररींत तरी त्यांचें वारें न लागावें, अशी त्यांची फार इच्छा असे. ही ब्याद कशी काढावी, अशा विचारांत ते होते, इतक्यांत मुली तयार होऊन घराच्या बाहेर पडत होत्या त्यांनां पाहून " त्यांजबरोबर जाऊन एकदां आमचें शिवदुर्ग तरी पाहून या, " असें त्यांनीं म्हटलें, व नीलकंठ-रावांनांहि वाचनापेक्षां हिंडणें जास्त पसंत असल्यामुळें त्यांनां तें म्हणणें आवडलें, व पुस्तक मिटून ते जामानिमा करून मुलींबरोबर निघाले.

शिवदुर्ग गांवाशीं जाईपर्यंत नीलकंठरावांचीं स्तुतिपर पोकळ भाषणें, व त्यांनां तसलींच मुलींचीं उत्तरें चाललीं होतीं; पण एकदां गांवांत शिरल्या-वर धाकट्या दोघी कुठें ऑफिसर दृष्टीस पडतो म्हणून इकडे तिकडे पाहूं लागल्या. कांहीं वेळानें पलीकडच्या बाजूला एक नवखा गृहस्थ त्यांच्या दृष्टीस पडला. तो दाणींशींच बोलत उभा होता. तो माणूस इतका गोरा-गोमटा व झोंकदार दिसला व तरुणहि होता, कीं, हा नवीन इसम कोण, हें जाणण्याची सर्वांनां साहजिकच उत्कंठा झाली. त्याचा पोषाख पलटणीं-तलाहि नव्हता, तरीसुद्धां तो सुंद्रीहिरींनां विशेष ऐटबाज वाटला. मग त्यांच्यानें बातमी काढल्याशिवाय कसें राहवणार ! दाणी पुण्याहून आलेले दिसत होते. त्यांच्याशींहि बोलायचें होतेंच. ही संधि साधावी अशा विचारांत सुंद्री, हिरी आहेत तोंच दाणीनें त्यांनां पाहिलें, व तो लगेच त्या नवख्या गृहस्थाला घेऊन या बाजूला आला, व त्यानें त्या सर्वांची ओळख करून दिली, कीं, " हे गृहस्थ नागेशराव गडबोले, काल मजबरोबर इथें आले, आमच्याच रिसाल्यांत ते आतां ऑफिसर झाले आहेत. "

पलटणीचा पोषाखच काय तो सुंद्रीच्या दृष्टीनें त्यांनां सर्वगुणसंपन्न ठरायला उणा होता. नागेशराव जवळ आले तरीसुद्धां त्यांच्यांत कांहीं खोड दिसून आली नाहीं; इतकेंच नाहीं, तर त्यांची रीतभातहि तशीच मोहक दिसूं लागली. ते मोकळ्या मनानें भाषण करूं लागले, अगदीं पसंत अशा पद्धतनिुरूप प्रश्न विचारूं लागले, व तशींच सुंदर उत्तरेंहि देऊं लागले.

असा प्रकार रस्त्यांत उभ्या उभ्या दोनचार मिनिटें चालला आहे, इतक्यांत घोड्यांच्या टापा ऐकूं येऊं लागल्या, म्हणून मंडळी रस्त्याकडे पहातात, तों भाऊसाहेब व भय्यासाहेब घोड्यांवरून भरधांव येत होते. ते जवळ आले, तों त्यांनींहि या मंडळीला पाहून घोडे थांबवून ते त्यांच्याजवळ आले. भाऊसाहेब शांताबाईला म्हणाले "आपल्याच प्रकृतीची चौकशी करायला आह्मी शांतिसदनाकडे निघालों होतों; पण आतां जरूर नाहीं तिकडे जायची, आपणच मंडळी येथें भेटलांत." भय्यासाहेबहि तोंडांतल्या तोंडांत तसलेंच औपचारिक कांहीं बोलले. तितक्यांत ताराबाईशीं कांहीं जास्त बोलावें न बोलावें अशा विचारानें त्यांनीं वळून तिच्याकडे पाहिलें, तों त्यांच्या नजरेस ते नवखे गृहस्थ स्पष्ट दिसले. एकाएकीं भय्यासाहेबांची मुद्रा लालबुंद झाली, व नागेशरावांचीहि मुद्रा बदलली. ताराबाईची नजर त्या वेळीं दोघांकडे अकस्मात् गेल्यामुळें, तिच्या लक्षांत हा झालेला प्रकार स्पष्टपणें आला. दोनचार क्षणांत नागेशरावांनीं भय्यासाहेबांस हात जरासे उचलून नमस्कार केला, व त्यांनींहि वरच्यावर तो घेतल्याचें दर्शविलें. इतक्यांत भाऊसाहेबांनीं परत जाण्याकरितां घोडा वळविला; त्याबरोबर भय्यासाहेबांनींहि वळवून, ते दोघेहि आल्या वाटेनें दौडत चालते झाले. हा सर्व प्रकार अर्थात्च इतरांच्या तितका लक्षांत आला नव्हता. ताराबाईला मात्र दोघांच्या चर्येंत फरक होण्याचें काय कारण असावें, याविषयीं फार जिज्ञासा लागून राहिली.

दाणी व गडबोले, या मंडळीबरोबर त्यांच्या मावशीच्या घरापर्यंत बोलत बोलत आले. तेथें सुंद्रीनें त्यांनां आंत चलण्याचा फार आग्रह केला, व मावशींनांहि ती बातमी कळून त्यांनींहि आंत या म्हणून निरोप पाठविला; पण त्या दोघांनां काम असल्यामुळें ते आले नाहींत.

मावशीला भाचांनां पाहून नेहमीं बरें वाटत असे. त्यांतून थोरल्या दोघी त्यांनां सातआठ दिवसांत भेटल्याच नव्हत्या. "का ग शांताबाई, तुह्मी दोघी आनंदभुवनांतून घरीं परत गेलेल्या मला नाहीं कळवलंत तें! मी तर समजत होतें परवापर्यंत, कीं, तुह्मी अजून तिथेंच आहांत. कारण, तुमच्याकरतां गाडी गेलेली कांहीं मला कुठें दिसली नव्हती. पण दवाखान्यांतला तो आबा शिपाई मला भेटला, तो सहज म्हणाला, कीं, आनंदभुवनांत आतां औषध पाठवावं लागत नाहीं. कारण, शांताबाई बऱ्या होऊन घरींसुद्धां गेल्या. तेव्हां मला बातमी लागली!"

## नागेशरावांची धूळभेट.

नंतर शांताबाईनें नीलकंठरावांची तिच्याशीं ओळख करून दिली, व त्यांनींहि हा नवीन परिचय झाल्याबद्दल अत्यंत संतोष व्यक्त केला, आणि म्हटलें "आपली आगाऊ परवानगी घेतल्यावांचून आम्हीं आपल्या घरीं आलों, त्याबद्दल आपण क्षमा करावी; परंतु आपलें व आमचें नातें असल्यामुळें, आम्हीं एवढें काम स्वतःच्या जबाबदारीवर केलें आहे, व त्यांत आमची विशेष चूक नाहीं असें आपणाला वाटेल अशी आम्हांला फार उमेद आहे."

येवढ्याशा गोष्टीविषयीं येवढें मोठें भाषण ऐकून रमामावशी दिपूनच गेल्या! तितक्यांत इतरांनीं त्यांनां गडबोल्यांविषयीं हकीगत विचारली; पण तिच्याहिजवळ फारशी जास्त माहिती नव्हती. यांनां आधीं कळलेली होती तीच हकीगत तिनें सांगितली. सुंद्री हिरी खिडकींतून रस्त्याकडे एकसारख्या बघत होत्या, पण नागेशराव न दिसतां दुसरेच एकदोन ऑफिसर त्यांनां दिसले, ते आतां त्यांनां नागेशरावांच्या मानानें 'अगदींच नेभळट प्राणी' वाटले! मावशीबाई म्हणाल्या "असं कशाला? उद्यां इथें कांहीं ऑफिसर चहाला यायचे आहेत, त्यांतच नागेशरावांनां बोलावणं करायला सांगेन– तुम्ही जर उद्यां इथें यायचं कबूल करीत असलां तर! म्हणजे अनायासं सगळ्यांचीच गांठ पडेल, दोन तास गप्पाटप्पा होतील, मग थोडंसं फराळाचं तयार ठेवीन, अन् मग तुम्हीं घरीं जा. याल का उद्यां?"

अर्थात्च हा विचार सर्वांनांच पसंत झाला. नीलकंठरावांनांहि मुद्दाम आमंत्रण केलें, व त्यांनींहि "आम्हांला निराळें आमंत्रण कशाला? आम्ही आतां आपल्या कुटुंबापैकींच झालों आहोंत. मात्र आमच्यामुळें आपणास बरीच तसदी पडणार आहे त्याबद्दल आपली आम्हींच क्षमा मागितली पाहिजे" असें म्हटलें. रमामावशींनीं योग्य तें उत्तर दिलें व सर्व मंडळी घरीं परत निघाली.

वाटेनें ताराबाईनें शांताक्काला आपण पाहिलेला प्रकार सांगितला, आणि यांत काय गूढ असावें, असा दोघींनांही प्रश्न पडला. शांतानें आपल्या स्वभावा-प्रमाणें "त्यांत कांहीं तरी गैरसमजुतीचा प्रकार असावा," असें म्हटलें; पण पुरेशी हकीगत ठाऊक नसल्यामुळें, आपण इतक्यांत त्याविषयीं जास्त कल्पनाच करीत बसूं नये, असा तिचा पोक्त अभिप्राय पडला. पण तो तारा-बाईला कसा पटावा?

नीलकंठरावांनीं घरीं पोंचतांच रमामावशींची खूप वाखाणणी सीताबाईच्याजवळ केली. ते म्हणाले " वा, वा, काय सज्जन स्त्री पण ! आम्हाला तर वाटतें, कीं, आमच्या श्रीमंत मातुश्रीराणी माईसाहेब व श्रीमंत आक्कासाहेब यांच्याखेरीज इतकी सुस्वभावी व हुशार स्त्री आम्हीं कधीं देखलीच नाहीं ! त्यांनीं आमचा यथायोग्य सत्कार केला; इतकेंच नव्हे, तर उद्यांच्या चहाला आम्हांला मुद्दाम आग्रहानें, आमची इतकी थोडी ओळख असतां अत्यंत आग्रहानें आमंत्रण केलें. फार पसंत मंडळी बरें ही ! आतां आपल्याशीं आमचा संबंध असल्यामुळें त्यांनीं हें आमंत्रण केलें असल्याचा संभव आहे, ही गोष्ट खरी आहे; पण एकंदरींत अशीं आदरातिथ्य करणारीं माणसें आम्हीं आजन्मांत कधीं पाहिलीं नव्हतीं. "

ही भाषा ऐकून सीताबाई नीलकंठरावांवर जास्तच खूष झाल्या, हें काय निराळें सांगितलें पाहिजे ?

---

## प्रकरण सोळावें.

### नागेशरावांची हकीगत.

दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं मावशीच्या घरीं ठरल्याप्रमाणें सर्वांनीं जाण्याला शांतिसदनांत कोणींच हरकत घेतली नाहीं. नीलकंठरावांनीं मात्र पुनः पुनः " आमचा मुक्काम आधींच थोडा, त्यांतून आपणाला सोडून एवढा वेळ दूर राहणें आम्हाला प्रशस्त वाटत नाहीं, " असें आनंदरावांनां व सीताबाईनां म्हटलें; पण त्यांनीं त्यांची समजूत घालून मुलींबरोबर त्यांनां गांवांत लावून दिलें. सीताबाईसुद्धां स्वतः गेल्या असत्या; पण एकतर बहिणीनें त्यांनां मुद्दाम निरोप पाठविला नव्हता, व दुसरें त्यांनां आज घरीं खरोखरच कांहीं काम होतें.

मंडळी मावशीच्या घरीं पोंचते तोंच मावशीनें आनंदानें सांगितलें, कीं, " नागेशरावांनीं आजचें आमंत्रण स्वीकारलें, इतकेंच नव्हे, तर ते या घटकेला वकिलांशीं कांहीं कामासंबंधानें हपिसांत बोलत बसले आहेत. "

नीलकंठराव इतरांबरोबर दिवाणखान्यांत जाऊन बसले व मावशीशीं बोलूं लागले. " हा आपला दिवाणखाना फारच टुमदार आहे बुवा, व हें आंतलें सामानसुमानहि फार खुबीनें मांडून ठेविलेलें दिसतें आहे. आम्हाला

तर असा मधूनमधून भास होतो आहे, कीं, आम्ही सुवर्णपुरांतल्या वाड्यांतल्या एका लहानशा दालनांतच आहोंत ! "

या वाखाणणीचा पुरा अर्थ मावशीबाईच्या प्रथम लक्षांत आला नाहीं; पण जेव्हां त्यांच्या एका भाचीशीं बोलतांना त्यांनां सुवर्णपुरचा वाडा म्हणजे खुद्द श्रीमंतांचा वाडा असें कळून आलें, तेव्हां मावशीबाई फारच खूष झाल्या. नंतर नीलकंठरावांनीं सुवर्णपुरच्या जुन्या वाड्याचें वर्णन करतां करतां, मुख्य दिवाणखान्यांतल्या सोनेरी छताला दहा हजार रुपये लागले आहेत म्हणून जेव्हां सांगितलें, तेव्हां त्या वाड्यांतल्या कोठीच्या दालनाशीं जरी नीलकंठरावांनीं या दिवाणखान्याची तुलना केली असती, तरीसुद्धां त्यांनां आनंदच झाला असता. नीलकंठराव सुवर्णपुरचें वर्णन व मधूनमधून आपल्या स्वतःच्या पर्णकुटिकेचें वर्णन करीत असतांना, भागवत वकील व नागेशराव, दाणी व दुसरी हपिसर मंडळी दिवाणखान्यांत येऊन दाखल केव्हां होतात असें इतरांनां झालें होतें. सुवर्णपुरच्या वाड्यांतल्या छताची हकीगत आपण आपल्या शेजारणीपाजारणींनां सांगून चकित करूं, असा बेत मावशीबाई एकीकडे मनांत करीत होत्या, तों एकदांची पुरुषमंडळी येऊन दाखल झाली.

हल्लीं शिवदुर्गांत असलेल्या रिसाल्याचे ऑफिसर बहुतेक तरुण व हुशार दिसणारे असे होते, व त्यांतूनहि जे विशेष हुशार व देखणे होते, तेवढेच आज कर्मधर्मसंयोगानें भागवत वकिलांच्या घरीं आलेले होते. हे ऑफिसर इतर सामान्यजनांपेक्षां जितके ऐटबाज व देखणे दिसत, तितकेच ज्यास्त ऐटबाज व उमदे इतर ऑफिसरांपेक्षां नागेशराव दिसले. तरी त्यांचा अजून पलटणीचा पोषाख शिवून आला नव्हता. त्यांनां पुनः पाहून आपला कालचा ग्रह बिलकुल चुकला नाहीं, असें सर्वांनां, व विशेषेंकरून ताराबाईला वाटलें. त्यांच्याबरोबरच भागवत वकील फोडेल्या तोंडाचे, पिकलेल्या केंसाचे व तंबाखूनें दांत लाल केलेले, असे हंसत चालले होते, त्यामुळें तर नागेशराव अत्यंतच मनांत भरून गेले. सर्वांचे डोळे अर्थातूच नागेशरावांकडे लागले, व इकडेतिकडे कांहीं मिनिटें पाहून ते अखेर ताराबाईशेजारीं येऊन बसले, व सहजपणें ते ताराबाईशीं गोष्टी बोलूं लागले. या प्रसंगीं बोलण्याचे विषय ते काय असणार ? आज ऊष्मा फार होतो आहे, बहुशः लवकरच वळिवाचा तरी पाऊस पडावा, असेच अगदीं फुसके

विषय चालले होते, हें उघडच आहे; पण अगदीं रोजचे साधे विषयहि हुशार व मधुर भाषण करणाराच्या तोंडून ऐकले असतां किती मोहक व चित्ताकर्षक होतात, याची ताराबाईला आजच्यासारखी कल्पना कधीं झाली नव्हती, अशी तिची खात्री झाली.

नागेशराव व इतर ऑफिसर दिवाणखान्यांत असतां, नीलकंठरावांकडे लक्ष द्यायला कोणच्या स्त्रीला फुरसत होणार ? धाकट्या मुलींनां तर नीलकंठ-राव नेहमींच कःपदार्थ वाटत असे; परंतु सुवर्णपुरच्या छताची गोष्ट मावशीबाईच्या लक्षांतून अजून गेली नसल्यामुळें, त्या मात्र मधूनमधून त्यांचीं लांब लांब भाषणें ऐकत, व निदान त्यांनां खाद्यपेयादि पदार्थ पुरवीत असत. मुख्य फराळ शेवटीं होणारच होता. सध्यां येण्याबरोबर चहा, काफी, बिस्किटें व वड्या इतकीच तयारी होती.

चहाकॉफीनंतर पत्ते निघाले, व नीलकंठराव, कांहीं स्त्रिया व ऑफिसर मिळून लाडिस खेळूं लागले. सुरुवातीला ते म्हणाले "आम्हाला अजून चांगलेंसें खेळतां येत नाहीं; पण शिकून तयार होण्याची फार इच्छा आहे; कारण, आमच्या सध्यांच्या स्थितींत—"

पण त्यांचीं कारणें ऐकायला कोणालाच वेळ नव्हता, म्हणून तीं तशींच शिल्लक राहिलीं. नागेशराव आज लाडिस खेळण्यांत नव्हते. ते ताराबाई व सुंद्री या दोघींच्या मध्यें बसून बोलूं लागले. पहिल्यानें सुंदर एकसारखी बोलत होती, त्यामुळें ताराबाईला नागेशरावांशीं बोलण्यास मिळेना. कारण, सुंद्री जबरी बोलणारी होती; पण पुढें नीलकंठराव खेळांत चुकूं लागले, आणि तिलाहि लाडिस अतिशय आवडे, म्हणून त्यांनां मदत करण्याकरितां म्हणून ती त्यांत प्रथम शिरली व हळुहळू अगदीं गढून गेली, त्यामुळें नागेश-रावांशीं ताराबाईला बोलायला रगड अवसर सांपडला. ते एकीकडे डावाकडे पहात होते, व दुसरीकडे ताराबाईकडे बोलत होते. प्रथम प्रथम अर्थात्च किरकोळ विषय निघाले. ताराबाईच्या मनांतून कालच्या तिनें पाहिलेल्या प्रकाराविषयीं गोष्ट काढून, भय्यासाहेबांची चर्या एकाएकी कां बदलली तें काढून घेण्याचें फार होतें; पण एकदम कशी गोष्ट काढतां येते ? पण अगदीं अनपेक्षित अशा रीतीनें तिची इच्छा पूर्ण झाली. कारण, नागेश-रावांनींच "आनंदभुवन इथून किती दूर आहे?" असें विचारलें, व तें कळल्या-

वर मागून लगेच त्यांनीं "भय्यासाहेबांनां तेथें आल्याला किती दिवस झाले?" म्हणून प्रश्न केला.

ताराबाई म्हणाली "झाला एक महिना."

नंतर तो विषय हातचा जाऊं नये या हेतूनें ती म्हणाली " त्यांची कायशीशी वरती माळव्यांत रगड इस्टेट आहे म्हणे ! "

नागेशराव ह्मणाले " हो, वा फारच नामी इस्टेट आहे त्यांची–निदान सालीना साठसत्तर हजारांचें तरी निवळ उत्पन्न आहे. त्यांच्याविषयीं नक्की माहिती असलेला दुसरा कोणी माझ्यासारखा माणूस आपणाला सांपडायचा नाहीं. कारण, माझ्या बाळपणापासून आमचा त्यांच्या घराण्याशीं एकप्रकारचा विशेष संबंध आहे. "

ताराबाईला आश्चर्य वाटत असल्याचें तिच्या मुद्रेवरून उघड दिसूं लागलें.

नागेशराव ह्मणाले " आपणाला आश्चर्य वाटणें बरोबर आहे. विशेषेंकरून काल आह्मां उभयतांची गांठ अगदीं तिऱ्हाइतांसारखी पडल्यासारखें जर आपल्या लक्षांत आलें असलें तर फारच. आपलीन् त्यांची किती ओळख आहे ? "

ताराबाई ह्मणाली " आहे बेताची, पण मला जास्तीची इच्छा नाहीं. मी चार दिवस आनंदभुवनांत राहिलें होतें, तेवढ्यांत मला ते मुळींच आवडतनासे झाले. "

नागेशराव ह्मणाले " मी कशाला माझें मत बोलून दाखवूं ? मला सारें आंतलें काळेंबेरें खडान्खडा ठाऊक आहे. माझा अभिप्राय काय उपयोगी ? पण आपलें मत हें असें विरुद्ध पाहून साऱ्यांनां आश्चर्य वाटेल ! इथें आपण आपल्या घरांतच तें बोलून दाखवितां तें ठीक आहे; पण लोकांच्या देखत कांहीं तुह्मी तसें स्पष्ट बोलणार नाहीं ?—"

ताराबाई म्हणाली "हात्तेच्या ! इथें मुळीं साऱ्यांचाच तसा वाईट अभिप्राय आहे. जे ते म्हणतात, कीं, गर्वाचा तो केवळ पुतळा आहे ! "

नागेशराव थोडा वेळ थांबून म्हणाले " मला हें बरें वाटत नाहीं, असें मी म्हणत नाहीं. जगांत ज्याची त्याची रास्त पारख झाली तर तें उत्तमच; पण हें जग असें आंधळें आहे, कीं, त्यांच्या पैशापुढें अथवा डामडौलापुढें कोणाला कांहीं खरें तें दिसतच नाहीं. ( पुनः जरा थांबून ) आणखी किती दिवस इथें मुक्काम होणार आहे त्यांचा ? "

ताराबाई म्हणाली " कोणास ठाऊक! पण जाण्याची कांही बोलवा ऐकूं आली नाहीं. पण त्यांच्यामुळें आपला इथें राहण्याचा बेत बदलणार नाहीं ना ? "

नागेशराव म्हणाले " भलतेंच एकादें ! मी काय त्याला डरतों होय ? छे, छे, तो पाहिजे तर जाईल ! आमचें आतां बरें नाहीं, म्हणून मला आपलें त्याला भेटणें बरें वाटत नाहीं, इतकेंच. बाकी त्याच्यामुळें, मला बेत बदलायची मुळींच जरूर नाहीं ! त्यानें माझ्याशीं दगलबाजी केली, तें मी वाटेल त्याला सांगूं शकेन; तो असा द्वाड निघाला, याविषयीं मला किती वाईट वाटतें आहे म्हणून सांगूं! त्याचा बाप अगदीं एक लाख माणूस होता, त्याचा माझ्यावर अत्यंत लोभ असे. त्याची आठवण झाली म्हणजे असें कांहीं मला होतें, कीं, यानें माझ्याशीं बेइमान केलें तें जळो, पण तसल्या सज्जनाच्या पोटीं हा असला दुर्जन कसा निपजला, अन् त्यानें त्याच्या नांवाला काळिमा कसा फासलान्! पण ह्मणतात ना, सूर्यापोटीं शनैश्वर ! "

ताराबाईची उत्सुकता वाढत चालली; पण इतक्यांत नागेशराव दुसऱ्या गोष्टी बोलूं लागले " या आमच्या पलटणीतले ऑफिसर फार मनमिळाऊ आहेत. दाणींनीं मला फार शिफारस केली, कीं, शिवदुर्गांतली इतर मंडळीहि फार नामी आहेत. मी मंडळीचा फार भुकेला आहें. माझें मन पोळलेलें आहे. मी चार मंडळींत असलों तर मागचें सहज मनांतून उडून जातें. आधीं मला पलटणींत नोकरी धरण्याची जरूर कोठें होती ह्मणा! वास्तविक म्हटलें तर आम्ही एक छोटेखानी इनामदार होऊन, चैनींत काळक्रमणा करीत राह्यचे, पण नाहीं परमेश्वराची इच्छा ! "

ताराबाईनें उत्कंठेनें विचारिलें " तें कां बरं ? "

नागेशराव म्हणाले " अहो, तसेंच ह्मणावें तर काय ? आपण मघाशीं बोलत होतां त्या माणसानें सरळ वर्तन केलें असतें, तर आज ही दगदग नको होती ! त्याच्या बापानें स्पष्ट लिहून ठेविलें होतेंन्सुद्धां, कीं, आह्माला एक सबंध गांव इनामी करून द्यावें; पण ज्याचा तो गेल्यावर कोण विचार करतो ! "

ताराबाई उद्गारली" म्हणजे ! वडलांनीं स्पष्ट लिहून ठेवलेलं मोडलं अं ? काय बाई तरी दुष्टपणा ! पण आपण कोर्टांत कां नाहीं गेलां ? "

नागेशराव शांतपणें म्हणाले " त्यानें एक गाय मारली म्हणून मी वांसरूं का मारूं ? त्याच्या वडलांच्या नांवाला त्यानें डांबर फासलें तेवढें पुरे, माझ्यावर मुलासारखें प्रेम करणाराच्या प्रत्यक्ष मुलाविरुद्ध मी कोर्टाची पाहिरी कशी चढूं !

जळो तें इनाम त्यापेक्षां! अंगांत धमक असली तर पोटाला कुठंहि मिळेल! शिवाय, बापाचें होतें सरळ लिहिणें, त्यांत वकिली खांचाखोंचा कुठल्या? पण हे राजश्री लागले त्या लिहिण्याचा विपरीत अर्थ करायला! मीं म्हटलें जाऊं द्या, कुठें फिर्यादीन् अपिलें करीत बसा! नाहीं आपल्याला ती व्यर्थ दगदग करवत! आपलें वर्तन सरळ असलें तर कुठेंहि भाकरी मिळेल!"

ताराबाई कळवळ्यानें म्हणाली "इतका मनाचा मोठेपणा क्वचित् आढळतो बाई! पण निदान चारचौघांत त्याची तुम्ही फटफजिती कां नाहीं उडवून देत?"

नागेशराव म्हणाले "उडेल, उडेल कधीं तरी, खरें तें बाहेर येईलच! पण माझ्या तोंडून कधीं ब्र सुद्धां बाहेर निघायचा नाहीं.—जोंवर मला त्याच्या वडलांचें स्मरण आहे, तोंवर तर खास नाहीं!"

हा विचार ताराबाईला किती तरी पसंत पडला. ती पुढें म्हणाली "पण इतका पाजीपणा करण्याचं कारण काय बरं असावं?"

नागेशराव म्हणाले "कारण काय? हजारों कारणें! वडलांचें माझ्यावर इतकें प्रेम कां असावें, हें एक कारण. दुसरें कारण मत्सर. नेहमीं आम्ही दरएक कामांत बरोबरीनें वागत होतों; कारण, त्याच्या बापाचा लोभच तसा होता माझ्यावर व माझ्या वडलांवर;—अन् हरएक कामांत मी त्याला मागें हटवीत असें; लहानपणापासून अढी पडली झालें त्याच्या मनांत! पण मला ती फार उशिरां कळून आली. पण त्या वेळीं त्याच्या मनांत पक्कें हाडवैरच बनून राहिलें होतें!"

ताराबाई म्हणाली "तें मात्र अगदीं बरोबर. त्यांनीं परवां मला स्वतःच सांगितलं, कीं, एकदां कुणाविषयीं त्यांच्या मनांत वांकडं आलं कीं वज्रलेपच!"

इतकें बोलून ताराबाई गप राहिली. पुनः कांही वेळानें "काय तरी बाई हा नीचपणा! आपल्या बरोबर लहानपणापासून मोठा झालेल्या, आपल्या बापाच्या लोभांतल्या माणसाशीं, हें वर्तन?" इतकें मोठ्यानें बोलून ती मनांत म्हणाली "अन् अशा माणसाशीं, कीं, ज्याच्या चेहऱ्यावरूनच त्याचा उदार व मनमोकळा स्वभाव स्पष्ट दिसून येतो!"

नागेशराव पुढें म्हणाले "अन् त्यांतहि खरोखर जास्त कांहींच नव्हतें. आमच्या वडिलांनीं त्याच्या वडिलांची दिवाणगिरी इतकी इमानेंइतबारें तीस वर्षें केली होती कीं, त्यांच्या व्यवस्थेमुळें इष्टेटीचें उत्पन्न दुपटीवर वाढून गेलें. आमचे वडील वारले तेव्हां त्यांनां थोरल्या दादासाहेबांनीं

सांगितलें, कीं, 'दिवाणजी, तुम्ही या तुमच्या मुलाची काळजी नका करूं; तो आपला मुलगा नव्हे, माझा आहे आजपासून!' तेव्हां गांव इनाम करून देण्याचें त्यांनीं जें लिहून ठेवलें होतें, तें मजवरच्या प्रेमाकरतां नसून माझ्या वडलांच्या इमानी नोकरीचें अंशतः उतराई होण्याकरतां म्हणून होतें!"

ताराबाई म्हणाली "हें सारं माहीत असून इतका नीचपणा अं! शर्थ आहे बाई या श्रीमंत लोकांच्या उलट्या काळजाची! तरी बाहेरून डामडौल व आढ्यता केवढी?"

नागेशराव म्हणाले "तें तर लोकांच्या डोळ्यांत धूळ टाकायला जरूरच लागतें! सार्वजनिक कृत्यांत नेहमीं मोठा आंकडा घालतील, मोठमोठ्या लोकांनां टोलेजंग मेजवान्या देतील, पण सारे आपस्वार्थी! त्याची बहीण आहे तिच्याकरतां तर केवढा खर्च आहे ठेवलेला, कारण लोकांनीं मोठे प्रेमळ बंधु म्हणून वाखाणणी केली पाहिजेना!"

ताराबाईनें विचारलें "बहीण तरी कशी काय आहे? का बंधूचाच नमुना?"

नागेशराव म्हणाले "अहो, ती तरी अलीकडे भावासारखी होणारच. अत्यंत गर्विष्ठ व फुशारखोर. लहानपणीं फार उत्तम होती. माझा तर तिला अतिशय ळळा. मी तिला तास न् तास खेळवली आहे. पण आतां काय संबंध आमचा? बाकी, अलीकडे अभ्यास खूप करते म्हणतात. डोक्यांत बुद्धि लहानपणापासूनच रगड होती, नाकाडोळ्यानेंहि पसंत आहेच."

इतक्यांत लाडिस खेळणें बंद झालें. नीलकंठराव, ताराबाई व मावशीबाईच्यामध्यें जाऊन बसले. कसा काय खेळ झाला म्हणून विचारतांच त्यांनीं मावशीला सांगितलें "आमच्यावर सारे डाव लागले; पण हळुहळू आमची सुधारणा होत जाईल असें दिसतें आहे. कारण, आम्हाला श्रीमंत मातुश्री राणी माईसाहेबांशीं खेळण्याचा वारंवार प्रसंग येणार, तर आतां आम्हाला तरबेज होऊन बसलें पाहिजे."

नंतर मंडळी फराळाला बसली. कर्मधर्मसंयोगानें नागेशरावांचें पान ताराबाई व भागवत वकील यांच्यामध्यें आलें. जेवणावर नानाप्रकारच्या गप्पा चालल्या होत्या. मंडळी एकमेकांला आग्रह करीतच होती. अशा गडबडींत नागेशरावांनीं ताराबाईला हळूच विचारलें "हे आपले नीलकंठराव सुवर्णपुरच्या घराण्याशीं बरेंच परिचित दिसतात?"

ताराबाई म्हणाली “ हो, त्यांनां गुरुघराण्यांतले म्हणून त्या राणीसाहेबांनीं मानून पदरीं ठेवलं आहे म्हणे. ”

नागेशराव म्हणाले “ खरेंच कीं काय ? सुवर्णपुरच्या माईसाहेब त्या भय्यासाहेबांच्या मामी लागतात हें आपल्याला ठाऊकच असेल ? माईसाहेबांच्या यजमानांचे भय्यासाहेब हे भाचे होत. ”

ताराबाई म्हणाली “ अस्सं काय ? मला नव्हतं तें ठाऊक. आधीं मुळीं माईसाहेबांचंच नांव परवांपर्यंत कधीं आम्हीं ऐकलं नव्हतं ! ”

नागेशराव हंसत म्हणाले “ ती मौजच आहे ! पैशाशीं पैसा जातो म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं ! कारण माईसाहेबांचा भारी हेतु आहे, कीं, आपली मुलगी भय्यासाहेबांनां द्यावी. एवंच त्यांची श्रीमंती आणखीच वाढेल! ”

ताराबाईच्या मनांत हे शब्द ऐकून कमलिनी व तिनें चालविलेले आटोकाट प्रयत्न मूर्तिमंत उभे राहिले, आणि तिला फार मौज वाटूं लागली. त्यावरून भाऊसाहेबांचीहि आठवण तिला झाली, व तिनें नागेशरावांनां विचारलें “ आपली चिंतामणराव भाऊसाहेबांची ओळख आहे का ?

नागेशराव म्हणाले “ नाहीं, मुळींच नाहीं ! ते कसे काय गृहस्थ आहेत ? बहुतकरून ‘ अहो रूपमहो ध्वनिः ’ असेंच असेल ! ”

ताराबाई म्हणाली “छे छे, ते अगदीं उलट आहेत त्यांच्या. अतिशय सज्जन, भला माणूस आहे तो. भय्यासाहेब इतका नीच असेल, अशी त्याला कल्पना दिखील नसेल ! ”

नागेशराव म्हणाले “ खुबी आहे ती इथेंच आहे ! हिऱ्याला जसे पैलू असतात, अन् बाजूनें पहाणाराला एकाद दुसराच पैलू दिसतो, त्याप्रमाणें भय्यासाहेबांनां रगड पैलू आहेत. त्यांनां हवा तेवढाच पैलू दाखवितां येतो, व बाकीचे पैलू बेमालुमपणानें झांकून टाकतां येतात ! ”

अशा तऱ्हेनें बोलतां बोलतां फराळ आटोपले व घरीं परत जायची वेळ झाली. एकंदर मुली मावशीनें नागेशरावांनां आणल्याबद्दल खूष होऊन गेल्या. ताराबाईचें डोकें तर तिनें नवीन मिळविलेल्या माहितीनें अगदीं तुडुंब भरून गेलें होतें. नागेशरावांची प्रत्येक चर्या व मुद्रा तिच्या हृदयांत अगदीं सांठवूनच राहिली होती, व अशा सुंदर माणसाशीं भय्यासाहेबांनीं इतकें नीचपणाचें वर्तन केल्याबद्दल त्यांच्याविषयीं अतोनात संताप उत्पन्न झाला होता; परंतु यांतलें एक अवाक्षर देखील शांतापाशीं तिला काढायला फुरसत मिळाली नाहीं.

सुंद्री एकसारखी लाडिसाविषयीं व नागेशरावांविषयीं मोठमोठ्यानें बडबडत होती, व नीलकंठराव, भागवत वकील व मावशीबाई यांची वाखाणणी, येवढा-सासा फराळ पण किती तरी पदार्थ त्यांनीं केले होते, गाडींत इतरांनां आपल्या-मुळें बसायला अडचण झाल्याबद्दल वारंवार क्षमा मागणें, वगैरे विषयांवर इतकीं लांबलचक भाषणें—कारणांसहित—करीत होते, कीं, शांतिसदनाशीं गाडी केव्हां येऊन दाखल झाली, तें कोणाला कळलेंहि नाहीं.

---

## प्रकरण सतरावें.

### भाऊसाहेबांचें आमंत्रण.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं ताराबाईनें चहा झाल्यानंतर शांताक्काला सर्व हकीगत सांगितली. नागेशरावांनीं ताराबाईला कळवलेली बातमी ऐकून शांताबाईला अति आश्चर्य वाटलें, व वाईटहि वाटलें. भाऊसाहेब जो हरएक बाबतींत भय्यासाहेबांनां इतका मान देतात, त्या मानाला ते इतके अयोग्य आहेत असें कसें ह्मणावें, हेंच तिला समजेना; आणि नागेशरावांसारखा दिलदार माणूस खोटें सांगत असेल, ही कल्पनाहि तिच्या स्वभावाला अशक्य वाटली. इतक्या नीचपणानें त्यांनां कोणीं वागवलें असेल या नुसत्या कल्पनेनें-सुद्धां त्यांच्याविषयीं तिच्या मनांत अत्यंत सहानुभूति उत्पन्न झाली; व कशी तरी कोठें तरी चूक होऊन दोघांचाहि एकमेकांविषयीं गैरसमज झाला असावा, असें मानल्याशिवाय दुसरा मार्ग नाहीं असें तिला वाटूं लागलें. ती म्हणाली "दोघांचीहि कांहीं तरी चमत्कारिक रीतीनें फसगत झाली असावी, त्याची आज आपणाला कल्पना होणं कठिण आहे. मध्यस्थ लोकांनीं खोटंनाटं सांगून एकमेकांत लावालावी केली असेल. असं कांहीं तरी असलंच पाहिजे. त्या-शिवाय कोणा एकाला तरी दोष दिल्यावांचून हें असं घडून येणं संभवत नाहीं."

ताराबाई म्हणाली "हो, अगदीं खरं. अन् आतां त्या मधल्या लावालावी करणाऱ्या माणसांची कशी वाट लावतां तुम्ही शांताक्का? कसा तरी त्यांच्याहि-वरचा दोष उडवून टाका. नाहीं तर त्या मध्यस्थांनां तरी तुह्माला दोष द्यावा लागेल!"

शांताबाई म्हणाली "तूं आपली तारा मला हंस हवी तितकी, पण तुझ्या हंसण्यानं माझं मत कांहीं फिरायचं नाहीं! कारण, तूं असा विचार कर, कीं,

नागेशरावांचं ह्मणणं जर अगदीं खरं मानून चाललं, तर भय्यासाहेब किती दुष्ट प्राणी ठरतो तें पहा. आपल्या वडलांचा अत्यंत लोभ असलेल्या माणसाला त्यांच्या वुइलांत लिहून ठेवलेल्या स्पष्ट इच्छेच्या विरुद्ध, एका लहानशा इनाम-गांवाकरितां ते इतका नीचपणा करतील, हें बाई मला तर केवळ अशक्य दिसतं! साधारण अब्रूचा माणूस, कीं, ज्याला लोकं काय म्हणतील त्याची थोडी तरी चाड आहे, तो दिखील असं वर्तन कधीं करणार नाहीं. अन् रोज रात्रंदिवस ज्यांच्यांत तो बसतो उठतो अशीं माणसं इतकीं कशीं फसून जातील? छे छे, तें अगदीं नाहीं."

ताराबाई म्हणाली "मला तर भाऊसाहेब फसत असतील हेंच जास्त शक्य वाटतं! नागेशरावांनीं येवढी मोठी निवळ कादंबरी खोटीच रचिली असेल,—नांव, इतर हकीगत इतकी बिनदिकत खोटी सांगितली म्हणणं, केवळ अशक्य. शिवाय, माणूस बोलत असलं म्हणजे त्याच्या मुद्रेवरनं आपल्याला खरं खोटं तेव्हांच ताडतां नाहीं का येत!"

शांताबाई म्हणाली "काय बाई म्हणावं—गूढच आहे एक. एकंदरींत वाईट खरं, काय समजावं तें कांहीं कळत नाहीं."

ताराबाई म्हणाली "माफ करा अक्का. पण काय समजावं तें माणसाला अगदीं बरोबर कळलंच पाहिजे."

शांताबाई म्हणाली "मला बाई एवढंच पक्कं खास कळतं आहे, कीं, हें सारं जर अगदीं खरं असलं, तर भाऊसाहेबांची खात्री झाली म्हणजे त्यांनां अत्यंत अत्यंत वाईट वाटेल."

हा संवाद बागेंत चालला होता, इतक्यांत एक गडी त्यांनां हांका मारीत आला, कीं, भाऊसाहेब बहिणींनां घेऊन आले आहेत. म्हणून त्या दोघी मागील दारानें घरांत शिरल्या, व केंसबीस साफ करून दिवाणखान्यांत गेल्या. इंदिराताई व कमलिनी या दोघींनीं शांताक्काला मोठ्या प्रेमानें जवळ बसवून घेतलें. "आपली भेट झाल्याला एक तप झालंसं वाटतं बाई, केव्हां एकदां पुनः गांठ पडेल असं झालं होतं," वगैरे भाषणें त्यांनीं ठराविक रीतीनें केल्यावर, भाऊसाहेबांनीं येत्या मंगळवारचें इव्हिनिंग पार्टीचें सर्वांनां आमंत्रण स्वतः आग्रहपूर्वक केलें. इतर कोणाशीं त्यांच्या बहिणी फारसें बोलल्या नाहींत, व सीताबाईकडे तर त्या पाठ करूनच

बसल्या होत्या. आमंत्रण करण्याचें झाल्याबरोबर त्या इतक्या झट्कन् जायला निघाल्या, कीं, भाऊसाहेबांनां देखील तें फार चमत्कारिक वाटलें. तितक्यांत सीताबाई त्यांनां पोंचवायला म्हणून उठल्या तों त्यांनां बोलायचीहि संधि न देतां, गाडींत जाऊन त्या बसल्या देखील !

तरी पण सीताबाईंनां फार आनंद झाला. कारण, ही इव्हिनिंगपार्टी केवळ सुंद्रीच्या बोलण्यावरून शांताच्या सन्मानार्थ इतक्या लवकर ठरली, असें त्यांनां खास वाटलें, व नुसतीं इतर लोकांप्रमाणें छापील कार्डें न येतां, स्वतः भाऊसाहेबांनीं खुद्द आमंत्रण केल्यामुळें तर त्यांचा आनंद दुणावला. शांता आपल्या मनांत भाऊसाहेबांशीं आपणाला दोनतीन तास आनंदानें घालवितां येतील, अशी सुखदायक कल्पना करूं लागली. ताराबाई आपणाला नागेशरावांबरोबर जास्त बोलायला मिळेल, व त्यांच्याशीं भय्यासाहेब कसें वर्तन करतात तें पाहून भय्यासाहेबांवर पक्केपणीं दोष लादायला आपणाला जास्त आधार सांपडेल, असें मनांत म्हणूं लागली. सुंद्रीहिरींनां इव्हिनिंगपार्टी असली ह्मणजे बस झालें! त्यांत अमुक एका व्यक्तीपासून अगर गोष्टीपासून विशेष आनंद व्हायचा होता, अशांतली गोष्ट नव्हती. आणि मथुरीनें देखील पार्टीला जाण्यांत लागणारा वेळ मोडण्याचें आनंदानें कबूल केलें. ती ह्मणाली " माझी मला सकाळची वेळ निवांत मिळाली, कीं, मला पुरे. कधीं कधीं संध्याकाळीं चार लोकांत मिसळणं ह्मणजे वेळेचा दुरुपयोग करणं असं मला कांहीं वाटत नाहीं. एकंदर समाजाचा तरी आपणा प्रत्येकावर थोडा तरी हक्क आहेच. आणि सगळ्यांत मुख्य गोष्ट ही, कीं, मनाला नेहमीं जखडून ठेवण्यापेक्षां, मधें मधें त्याला विसावा अथवा करमणूक करून देणं हेंहि अत्यंत इष्ट आहे. "

ताराबाईला पार्टीच्या विचारांनीं इतका हुरूप चढला, कीं, ती जरी नीलकंठरावांशीं विशेष कधीं बोलत नसे, तरी त्यांची थोडीशी चेष्टा करण्याच्या उद्देशानें त्यांनां एकदां तिनें विचारलें, कीं, "आपणाला या असल्या पार्टीबिर्टीला हजर राहणं रास्त दिसतं का? अन् तिथें विलायती तऱ्हेचीं बिस्कुटं वगैरे पदार्थ असतात ते चालतील का ? " परंतु त्यांनीं झटकन् ह्मटलें, कीं, "आह्माला कांहीं हरकत दिसत नाहीं तिथें जाण्यांत. आतां, बिस्कुटें आह्मी स्वतः खाणार नाहीं ह्मणजे झालें. मग आह्माला बोल लावा-

यला शंकराचार्यांनासुद्धां जागा मिळणार नाहीं ! ” इतकें बोलणें झाल्या-नंतर त्यांनीं गंभीर मुद्रा करून पुनः एका भाषणाला सुरुवात केली.

नीलकंठराव ह्मणाले “ भाऊसाहेबांसारख्या खानदानीच्या गृहस्थानें एकादा मेजवानीचा थाट उडविला, तर त्यांत गर्ह्य असें कधींहि असूं शकणार नाहीं, ही आमची खात्री आहे. ह्मणून तिथें आह्मांला हजर राहण्याला दिक्कत वाटत नाहीं. इतकेंच काय, पण आपल्यासारख्या तरुण मुलींनांसुद्धां जायला आमच्या दृष्टीनें कांहीं हरकत दिसत नाहीं. आह्मी आपणाला भेट ह्मणून ही मुद्दाम जीगची फीत पोल्क्यापुरती आणली आहे, तिचा स्वीकार करावा अशी आमची फार इच्छा आहे. आपल्या बहिणींकरितां ही तसली फीत आणली आहे. ती सर्वांनींच पोल्क्यांनां मुद्दाम लावूनच भाऊसाहेबांच्या इथें जावें, ह्मणजे आह्मांला विशेष आनंद होईल. ”

असें ह्मणून त्यांनीं आपल्या खिशांतून जीगच्या फितींचे चार चार वारांचे पांच तुकडे काढले. त्यांतला एक ताराबाईला दिला, व बाकीचे इतर बहि-णींनां दिले; ते एकसारखे होते, पण ताराबाईला दिलेला मात्र जास्त उंची होता. तो पाहून त्या मुलींनां जरा चमत्कारिक वाटलेंसें दिसलें. त्यावर नीलकंठराव लगेच ह्मणाले “आह्मांला सर्वजणी सारख्याच ह्मणायच्या. वास्त-विक शांताबाईनां वडिलपणाच्या मानानें, उंची आहे ती फीत देणें अगदीं रास्त होतें, हें आह्मी कबूल करतों, पण तशी न देण्यांत आह्मीं त्यांचा अपमान करतों, असें त्यांनीं क्षणभरहि मनांतसुद्धां आणूं नये, अशी आमची फार विनयपूर्वक सूचना आहे. इतकेंच नव्हे, तर आह्मांला अशी पूर्ण उमेद आहे, कीं, आमचें हें करणें अगदीं रास्त आहे, असें त्याच स्वतः एकदोन दिवसांत फार आनंदानें कबूल करतील ! ”

ताराबाईला, आपण कोठून यांची चेष्टा करायला गेलों, असें होऊन गेलें. कारण, हें भाषण ऐकून चौघीहि बहिणी तिच्याकडे अर्थपूर्ण नजरेनें पाहूं लागल्या. सर्वांच्या मनांत एकदमच कल्पना उद्भवली, कीं, नीलकंठरावांचा हेतु तिला आपल्या पर्णकुटिकेची स्वामिनी बनवून टाकण्याचा खास असावा. ही कल्पना उद्भवली खरी, पण कदाचित् ती चुकीची असण्याचाहि संभव होताच. त्यामुळें तिला त्याचें विशेष कांहीं वाटलें नाहीं. पण त्या दिवसांतून दोनतीन वेळां ती कल्पना दृढ होत जाण्याला नीलकंठरावांच्या वर्तना-

वरून कारण दिसूं लागलें. आईहि "ती नवी फीत तुझ्या त्या चाकोलेट पोल्क्याला लावून टाकच," म्हणून तिला आग्रह करूं लागली, व एकदां तर तिच्या कानावर अनपेक्षित तऱ्हेनें आईचे सुंद्रीशीं झालेले चार शब्द पडले, कीं, "छे छे, त्यांचं कांहीं भिक्षुकी घराणं नव्हे हो!" त्यामुळें तर आईसाहेबांनांहि तो हेतु पसंत असावा, असें स्पष्ट दिसूं लागलें. धाकट्या तिघी बहिणी पोल्क्याला नवी फीत लावूं लागल्या. कारण, त्या दिवशीं दुपारपासून वळिवाचा पाऊस पडून बाहेर बागेंतसुद्धां फिरायला जाण्याची सोय राहिली नव्हती. "मी नाहीं ती फीत लावीत," असें आईला म्हणावें, तर आतांच त्यांचा आपणावर राग होऊन जायचा, व नीलकंठराव प्रत्यक्ष मागणी करीपर्यंत आपण तरी उगाच तिच्याशीं तंटा कशाला करा ! त्यांनीं मागणी केलीच तर मग पाहतां येईल, तोंपर्यंत उगाच आईला तरी नाखूष कशाला करा, असा पोक्त विचार करून, ताराबाईनें इतर बहिणींप्रमाणें आपल्या पोल्क्याला ती नवी फीत लावून टाकली. नीलकंठराव व आई दोघेंहि खूष झालीं, तेंहि बरेंच झालें. कारण, पावसामुळें कोणाला कोठेंच हलतां येईना. अशा वेळीं आई नाखूष झाली असती, तर पीडाच होती. पावसामुळें पार्टीहि थांबते कीं काय, अशी भीति कांहीं वेळ पडली. डोकींत घालण्याच्या वेण्यांकरितां फुलांच्या कळया गडी पाठवूनच आणवाव्या लागल्या. पण मंगळवार दुपारपासून आकाश स्वच्छ झालें, व हवाहि जास्त सुखकर झाली, आणि पार्टी उत्तम होण्याचीं स्पष्ट चिन्हें दिसूं लागलीं.

———

## प्रकरण अठरावें.

### आनंदभुवनांतील इव्हिनिंग पार्टी.

मंगळवारीं संध्याकाळीं पांच वाजतां शांतिसदनांतील सर्व मंडळी आनंदभुवनांत जाऊन दाखल झाली. भाऊसाहेबांनीं इव्हिनिंग पार्टीचा बेत फारच थाटदार केला होता. आधीं आनंदभुवनासारखा उत्तम बंगला, व त्याच्या पुढची बाग, हींच कितीतरी प्रेक्षणीय होतीं. त्यांत आतां पावसाचा संभव मुळींच राहिलेला नसल्यामुळें, त्यांनीं पार्टीचा कार्यक्रम अंशतः थोरल्या दिवाणखान्यांत व अंशतः बागेंत, असा ठरविला होता. बागेंत ठिकठिकाणीं छोटीं छोटीं टेबलें मांडून त्यांच्या सभोंवतीं दोनदोन तीनतीन खुर्चा टाकून दिल्या

होत्या. एका बाजूला पिंगपाँगचें टेबल मांडून ठेवलें होतें, मधून मधून टेबलावर नानाप्रकारच्या खेळाचीं उपकरणें, किंवा स्टीरीऑस्कोप व त्यांतून पहाण्याचीं चित्रें, अथवा सुंदर सुंदर चित्रांनीं भूषित झालेले प्रसिद्ध मासिकांचे ताजे अंक वगैरे, ठेविले होते. दिवाणखान्यांतहि नानाप्रकारचीं वाद्यें तयार ठेवलीं होतीं. ग्वाल्हेरीकडचा सुप्रसिद्ध गवय्या नबीखां आपल्या परिवारासह एका प्रशस्त कोंपऱ्यांत बसवून ठेविला होता. सोडा, लेमोनेड, आइसक्रीम, चहा, कॉफी, वगैरेंची तर रेलचेल उडाली होती. शिवदुर्गांतल्या झाडून साऱ्या गृहस्थांनां सहकुटुंब सहपरिवार येण्याकरितां कार्डें पाठविलीं होतीं, व रिसाल्यांतलेहि ऑफिसर बोलावले होते. त्याप्रमाणें सुमारें दोनशें स्त्रीपुरुष पांच वाजल्याबरोबर जमा झाले होते. एकदोन वळिवाचे मोठाले पाऊस होऊन गेले असल्यामुळें झाडांवरचा उन्हाळ्यांत बसलेला धुरळा पार धुवून जाऊन तीं तजेलदार दिसूं लागलीं होतीं, व हवेंतील उष्माहि थोडासा मोडून माणसांनांहि हुशारी आली होती. खुद्द भाऊसाहेब आपल्या बहिणींनां घेऊन बागेंतल्या मुख्य श्रृंगारलेल्या फाटकाजवळ, पाहुणेमंडळीचें स्वागत करण्याकरितां उभे राहिले होते. प्रत्येक गाडी आली, कीं, त्यांतील मंडळीचें आग्रहपूर्वक स्वागत करून, त्यांनां दोन औपचारिक प्रश्न विचारून आंत सोडीत. त्यांनां आतां शिवदुर्गांतली बहुतेक मंडळी ओळखीची झाली होती. पण एकादा अनोळखी राहिलेला असल्यास त्याची ओळख करून देण्याकरितां रावबहादुरहि आपल्या कुटुंबासह फाटकाशींच उभे होते. सुमारें साडे पांच वाजेपर्यंत सर्व मंडळी बहुतेक आली असें पाहून फाटकाजवळ उभी राहिलेली मंडळी आंत गेली, व इव्हिनिंग पार्टी सुरु झाली.

ताराबाई आपल्या मंडळीबरोबर आनंदभुवनांत जाऊन पंधरावीस मिनिटें-पर्यंत ऑफिसर लोकांमध्यें नागेशराव कोठें दिसतात हें हुडकून काढीत होती; परंतु ते कोठें दिसेनात. तोंपर्यंत ते आज येथें आले नसतील, अशी शंका-सुद्धां तिच्या मनांत आज दोन दिवसांत आली नव्हती; परंतु बहुतेक ऑफिसर दृष्टीस पडले तरी जेव्हां नागेशराव कोठें दिसेनात, तेव्हां भय्यासाहेबांची मर्जी जाऊं नये या हेतूनें नागेशरावांनां आमंत्रणच गेलें नसेल, अशी कल्पना तिच्या मनांत उत्पन्न झाली. वास्तविक म्हटलें तर तिच्या चौकस मनाला तशी कल्पना अगोदरच यायला पाहिजे होती; पण त्यांनां भेटण्याची तिला इतकी उत्कंठा झाली होती, कीं, ती कल्पना तिच्या डोक्याला शिवलीसुद्धां नव्हती. आज नागेशराव खास भेटतील, व त्यांच्याशीं हंसण्याखेळण्यांत तास

दोन तास आपणाला घालवितां येऊन आपण आपली छाप त्यांच्यावर बसवून टाकूं, अशा हेतूनें तिनें नेहमींपेक्षां जास्त काळजीनें कपडालत्ता व वेणीफणीहि केली होती. नीलकंठरावांनीं आग्रह केल्याप्रमाणें त्यांनीं दिलेली उंची फीत आपल्या पोल्क्याला लावण्यामध्यें, आईशीं भांडण टाळण्यापेक्षां अनायासें एका दगडानें दोन पक्षी मारल्यासारखें होऊन ऐटबाज नागेशरावांच्या मनावर आपल्या सौंदर्याचा परिणाम होईल, असाहि विचार तिच्या डोक्यांत अगदीं खोल खोल अशा ठिकाणीं असावा, असा संभव आहे. पण नागेशराव मुळीं आलेच नाहींत! ही समजूत होऊं लागल्याबरोबर, आज दोन दिवस हौसेनें मनांत उभारले जाणारे सुखमय किल्ले धडाधड खालीं कोसळूं लागले. तितक्यांत तिला दाणी भेटले, त्यांनां सुंद्री ही जवळ होती तिनें स्पष्टच प्रश्न केल्यावरून, दाणींनीं "नागेशराव पुण्याला गेले आहेत," असें सांगितलें, व लागलीच म्हटलें "मला नाहीं वाटत त्यांनां इतक्यांतच पुण्याला जाण्यासारखें निकडीचें काम होतें असें! पण (हळूच) येथल्या एका गृहस्थाला भेटूं नये, असें त्यांनां वाटलें म्हणून त्यांनीं ही सबब काढली झालें!"

हें पुढचें वाक्य सुंद्रीनें ऐकलें नाहीं, पण ताराबाईनें अलबत् स्पष्ट ऐकलें. जरी भाऊसाहेबांनीं नागेशरावांनां वगळलें असें नाहीं, तरी एकंदरींत आपल्या कल्पनेप्रमाणें आज ते येथें नसण्याला कारण भय्यासाहेबच झाले, अशी आतां पक्की खात्री होऊन, भय्यासाहेबांविषयींच्या तिच्या मनांतल्या आढीवर आणखी एक वेष्टण बसून गेलें. तितक्यांत भय्यासाहेबच तिच्याजवळ येऊन औपचारिक प्रश्न तिला विचारूं लागले; पण त्यांचा तिला असा राग आला होता, कीं, ती त्यांच्या प्रश्नांनां सरळ उत्तरसुद्धां देऊं इच्छीना. भय्यासाहेब दोन मिनिटांत दुसरीकडे निघून गेले, तों भाऊसाहेब येऊन बोलूं लागले. तों "हे कसे असे आंधळे," असा त्यांच्याविषयींहि मनांत विचार येऊन, ती त्यांच्याशींहि नेहमींप्रमाणें मोकळ्या अंतःकरणानें बोलली नाहीं!

नागेशराव आज नाहींत, म्हणजे आपलें नव्वद हिस्से सुख आजच्या पार्टींतून साफ नाहींसें झालें, असें ताराबाईला वाटूं लागलें. आतां स्वतःला मौज राहिली नसून, फक्त शांताक्काची भाऊसाहेबांशीं चालणारी मौज पाहण्यांतच कायतें तिला कौतुक शिल्लक राहिलें. पांचदहा मिनिटें तिचें असें खट्टु मन राहिलें; पण स्वभावतः तिला ज्यास्त वेळ हिरमुसलेलें रहाणें शक्यच नव्हतें. मालती आठ दिवसांत भेटली नव्हती, ती दिसल्याबरोबर ताराबाई

तिच्याशीं गप्पागोष्टी करूं लागली, व हळहळू नीलकंठरावांची एक एक मौज सांगून दोघीजणी हंसूं लागल्या. त्या हंसत असतां नीलकंठराव तेथें आले, व त्यांनां गालांतल्यागालांत हंसतांना पाहून त्यांनीं तर्क केला, कीं, आपण उंची फीत दिल्यावरून सहज निघणाऱ्या तर्कावरून मालती ताराबाईची थट्टा करीत असावी, व ती थट्टा तिला आवडल्यामुळें ताराबाई इतकी आपणाकडे पाहून हंसत असावी. या तर्कामुळें खूष होऊन त्यांनीं मुद्दाम ताराबाईला म्हटलें, कीं, " आपणास कांहीं हवें असलें तर अगदीं हक्कानें आम्हाला खुशाल सांगा बरें ! " हे शब्द ऐकून मालतीहि चमत्कारिक तऱ्हेनें ताराकडे पाहूं लागली, व त्यामुळें तिला जास्तच हिरमुसल्यासारखें झालें. पण तितक्यांत कर्नल फडके तेथें आले त्यांच्याशीं ती बोलत इकडे तिकडे फिरूं लागली. फोनोग्राफमधून एका नवीन गाण्याचे मधुर सूर चालले होते, त्यांच्या आवाजांत मंडळी एकमेकांशीं हळुहळू बोलत फिरत चालली होती. पलटणीवरून गोष्टी सहज निघाल्यावरून त्यांनींहि सहज " आमच्या रिसाल्यांत नागेशराव म्हणून एक फार दिलदार व उमदे ऑफिसर नवीनच दाखल झाले आहेत, त्यांनीं चार दिवसांत सर्वांनां मोहून सोडलें आहे, पण आज ते गांवाला गेले आहेत, " वगैरे माहिती तिला सांगितली. नागेशरावांची स्तुति ताराच्या कानांनां अमृतासारखी गोड लागली, हें उघड आहे. नंतर कर्नल फडके दूर झाल्यावर कांहीं वेळानें पुनः मालती भेटली, तिला तिनें नागेशरावांविषयीं कर्नल फडके काय म्हणाले तें सांगितलें व भय्यासाहेबांविषयीं आपला वाईट ग्रह बळावत चालल्याचें दर्शविलें. पण मालती म्हणाली " हें पहा, वेडीच दिसतेस तूं मला ! असा तूं भय्यासाहेबांवर राग धरूं नको. छप्पन नागेशराव एका ठिकाणीं केले तरी भय्यासाहेबांची बरोबरी कधीं तरी होईल का? उगीच नागेशरावांकरितां भय्यासाहेबांनां कांहीं कमजास्त बोलून जाशील हो ! "

परंतु ही सूचना ताराबाईला रुचली नाहीं. भय्यासाहेबांशीं नीट बोलायसवरायचें, म्हणजे नागेशरावांविषयीं आपल्या मनांत उत्पन्न झालेल्या प्रेमयुक्त सहानुभूतीला अत्यंत विसंगत असें वागण्याप्रमाणें होईल, तें करण्यास मी कधींहि तयार होणार नाहीं, असें ती मनांत म्हणाली.

मालतीचें व ताराबाईचें हें संभाषण मुख्य थोरल्या दिवाणखान्यांत चाललें होतें. तितक्यांत भाऊसाहेबांनीं नबीखांला एकदोन चिजा म्हणण्यास सूचना

दिली. त्याप्रमाणें त्याचें गाणें चालू झालें. नबीखां स्वत: उत्तम गवय्या होता, व त्याच्या कंठांत खरोखरच माधुरी असल्यामुळें त्याचें गायन इतर गवयांप्रमाणें सामान्य लोकांस कंटाळवाणें होत नसे. आवाज इतका खडा होता, कीं, त्यानें सर्व दिवाणखान्यांतल्या मंडळीच्या मनाला आल्हाद करून सोडला. नेहमींप्रमाणें मंडळी आपापल्यांत हळुहळू बोलत होतीच; पण त्या सर्व गुणगुणण्यावर त्याच्या खड्या आवाजाची छाप बसली. मालती व ताराबाई जवळ जवळ होत्या, त्यांत मालतीला तिच्या आईनें जरा हांक मारल्यामुळें ती तिकडे गेली, व ताराबाई दोन मिनिटें एकटी राहिली. तिकडे नबीखांनें नवीन चीज सुरु केली, तिच्याकडे ताराबाई आनंदानें लक्ष देत होती. तितक्यांत तिच्यामागें भय्यासाहेब येऊन म्हणाले "या गाण्याची खरी बहार जरा दुरून ऐकण्यांत आहे. आपण चला बागेंतून हें ऐकूं, म्हणजे अत्यंत जास्त तें खुलेल!"

एकाएकीं भय्यासाहेब हें म्हणाले, व गाणें जास्त खुलेल असें वाटल्यावरून, आपण काय करीत आहों याचें भान न राहून, तारा एकदम "बरं तर चला," असें म्हणाली, व त्यांच्याबरोबर बागेंत जाऊं लागली. तें मालतीच्या लक्षांत येऊन तिनें तिला पुनः खुणावलें, कीं, "गप रहा, उगीच वेड्यासारखी कांहीं त्यांनां बोलूं नकोस बरं का!"

ती खूण ताराबाईला बरोबर समजली; पण मुळींच रुचली नाहीं. पूर्वींचा राग पुनः मनांत जागृत झाला, व त्यांच्याशीं आपण होऊन कांहींएक बोलायचें नाहीं, असा तिनें निश्चय केला.

तीं दोघें बागेंत इकडेतिकडे हळुहळू फिरत फिरत गायन ऐकत होतीं. इतरहि कांहीं मंडळी तशीच हिंडत फिरत होती. कितीक मिनिटें भय्यासाहेब कांहींच बोलले नाहींत, त्यामुळें तिच्या मनांत असा विचार आला, कीं, आपला न बोलण्याचा निश्चय त्यांनां अप्रिय नसून उलटा प्रियच आहे, तेव्हां त्यांनां बोलायला लावलें, तरच आपण योग्य केलें असें होईल! ही कल्पना मनांत येतांच ती आपणच होऊन म्हणाली "वा खरंच, जास्त आवाज खुलतो हो!"

भय्यासाहेबांनीं नुसती मान हलवली, हो म्हटलें व ते गप राहिले.

नंतर दोन मिनिटें जाऊं देऊन तारा पुनः म्हणाली "आतां बोलायची पाळी तुमची आहे बरं कां! मी गाणं खुलतं म्हणालें, आतां आपण कांहीं तरी तसलंच बोललं पाहिजे!"

भय्यासाहेब हंसत म्हणाले "मी जें कांहीं ह्मणावेंसें आपणाला वाटत असेल, तें मी ह्मणालों आहें, असें समजा!"

ताराबाई ह्मणाली "ठीक. इतकं बोलल्यानं झाली तुमची पाळी! आतां माझी! तर मी असं म्हणतें, कीं, गवयांचं गाणं नेहमीं असं गोड लागत नसतं."

भय्यासाहेब हंसून ह्मणाले "आपला काय आळीपाळीनें बोलायचा नियम आहे वाटतें?"

ताराबाई ह्मणाली "हो, कधीं कधीं! कांहीं तरी बोललं तर पाहिजे? पण कोणाकोणाची इच्छा अशी असते, कीं, संभाषणामधें आपणाला जितकं कमी बोलणं पडेल तितकं उत्तम!"

भय्यासाहेब म्हणाले "कोणाकोणामध्यें मी येतों, असा आपला समज आहे? का आपली स्वतःचीच तशी इच्छा असते?"

ताराबाई ह्मणाली "दोघांचीहि तीच इच्छा! मी पहातें आहें, कीं, आपल्या दोघांच्यामध्यें कितीक गोष्टी सारख्या आहेत. आपण दोघंहि भारी माणुसघाणीं, तुटक वागणारीं, अशीं आहोंत. आणि कांहीं तरी सगळ्या जगाला चकित करून सोडण्यासारखं बोलायचं असल्याशिवाय, आपणा दोघांनांहि तोंड उघडायला नको असतं!"

भय्यासाहेब म्हणाले "आपल्या स्वभावाचें तरी हें खास वर्णन नव्हे! माझ्याचें तें कितपत असेल, तें मला कांहीं सांगवत नाहीं; पण हें आपण रेखाटलेलें चित्र हुबेहुब माझें आहे, असें आपणाला वाटतें, नाहीं बरें?"

ताराबाई म्हणाली "हें पहा, मींच काढलेल्या चित्रावर मीच अभिप्राय कसा देऊं?"

भय्यासाहेबांनीं कांहींच उत्तर दिलें नाहीं. नबीखांची अजून तीच चीज घोळून घोळून चालली होती. जरा वेळानें त्यांनीं तारेला सहज विचारलें "आपण नेहमीं गांवामध्यें फिरत फिरत येतां वाटतें?"

तिनें "होय कधीं कधीं," म्हणून उत्तर दिलें, व लागलींच त्यांनां बोंचण्याच्या हेतूनें मुद्दाम पुढें ती म्हणाली "परवां आपण आम्हांला गांवांत भेटलांना, तेव्हां आमचा एका नवख्या गृहस्थाशीं परिचय होत होता?"

या शब्दांचा ताबडतोब परिणाम झाला. भय्यासाहेबांची मुद्रा एकदम फिरली; पण ते कांहीं बोलले नाहींत. तो टोमणा मारल्याबद्दल तारेला कांहीं वाईट वाटलें नाहीं; पण तिनें तो विषय पुढें चालंवला नाहीं. नंतर अंमळशानें तेच निराळ्या स्वरानें बोलले! " नागोपंतांना देवानें मुद्रा आणि बोलण्या-संवरण्याची ढब अशी ऐटबाज दिली आहे, कीं, ते कोठेंहि गेले, कीं, त्यांना रगड मित्र होतात; बाकी, एकदां मिळवलेले मित्र त्यांच्यानें कितपत कायम राखतां येतात, तो भाग वेगळा ! "

ताराबाई त्यावर जोरानें म्हणाली " आपल्या स्नेहाला तर ते दुर्दैवानें मुकले आहेतच, अन् ते अशा तऱ्हेनं, कीं, त्याचं प्रायश्चित्त त्यांना कदाचित् जन्मभर भोगावं लागेल ! "

भय्यासाहेब कांहींच बोलले नाहींत. तितक्यांत रावबहादुर तिकडून चालले होते ते जवळ येऊन म्हणाले " काय पण बहार उडाली आहे या गाण्यानें आज! हें असलें शास्त्रोक्त गायन, अन् इतकें गोड, या बाजूला तरी कोणीं ऐकलें नव्हतें. आह्मीं एकदोनदां गणेशखिंडींत त्या रहिमतखांचें असलेंच ऐकलें होतें ह्मणा ! पण या गांवांत तरी तें अपूर्व आहे. अगदीं ' न भूतो न भविष्यति' ह्यः ह्यः ह्यः ह्यः! बाकी, न भूतो एवढेंच खरें, न भविष्यति कां म्हणावें ? ती एक अगदीं अत्यंत इष्ट गोष्ट घाटत आहे, ( भाऊसाहेब व शांता एकमेकांशीं बोलत गायन ऐकत होतीं तिकडे डोळे करून ) ती देवाच्या कृपेनें घडून आली, म्हणजे नबीखांचीं किती तरी गाणीं इथें या गांवांत होतील ! मग काय आमची चंगळ ! हॉ हॉ हॉ हॉ ! कां भय्यासाहेब, मी खरें बोलतों कीं नाहीं? हेः हेः हेः ! पण आपल्या गायन ऐकण्यामध्यें माझा व्यत्यय कशाला? ही तुमची सोबतीण पहा माझ्यावर कसे डोळे करते आहे ती, मध्यें मी व्यत्यय आणल्याबद्दल ! "

रावबहादुरांचे शेवटले शब्द भय्यासाहेबांनीं फारसे ऐकलेच नाहींत. त्यांचें लक्ष, भाऊसाहेब व शांताबाई बागेंत एकमेकांशीं गुलगुल गोष्टी बोलण्यांत अगदीं दंग होऊन इकडे तिकडे फिरत होतीं, तिकडे विशेष दृढपणानें वेधून गेलें. पण दोनचार मिनिटांत ते भानावर आले व म्हणाले " हे रावबहादुर आले, तेव्हां आपण काय बरें बोलत होतों ? "

ताराबाई म्हणाली " मला नाहीं वाटत आपण कांहीं बोलत होतोंसं ! आपल्याला बोलायला आहे कुठं काय, तर रावबहादुरांचा व्यत्यय झाला म्हणायचा ! एकदोन गोष्टी आपल्या झाल्या, आतां आहे काय बोलायला ?"

भय्यासाहेब हंसत म्हणाले " पुस्तकांविषयीं कांहीं बोललों तर ? "

ताराबाई म्हणाली " पुस्तकं ! छे छे, मला नाहीं वाटत आपण दोघं तींच पुस्तकं वाचतों, निदान तींच वाचीत असलों, तरी त्याविषयीं आपल्या दोघांचा एकच अभिप्राय कधीं असेल असं !"

भय्यासाहेब म्हणाले " आपणाला तसें कां वाटतें कोण जाणे ! पण तें जर खरें धरलें, तर मग बोलायला काय तोटा ? पाहूं तरी भिन्न अभिप्राय कां होतात ते ! "

ताराबाई म्हणाली, " छे, छे, अशा सुंदर स्थळीं पुस्तकांचा काथ्याकूट कोण करतं ! माझ्या डोक्यांत अशा वेळीं निराळंच कांहीं तरी भरलेलं असतं. "

भय्यासाहेब म्हणाले " आपल्या डोक्यांत बहुतकरून अशा वेळीं प्रत्यक्ष होत असलेल्या गोष्टी वसत असतील, नव्हे ? "

ताराबाई म्हणाली " हो तेंच खरं. " असें ती कांहीं तरी वरवर बोलली. कारण तिच्या डोक्यांत या वेळीं फार दूरचे विचार आले होते, त्यांत ती गढून गेली होती. त्यावरून तिनें एकदम भय्यासाहेबांना विचारलें " कां हो, भय्यासाहेब, आपण म्हणालांत, कीं, आपणाला क्षमा करणं कधींच ठाऊक नाहीं, अन् एकदां आपली कोणावर इतराजी झाली, कीं, अगदीं वज्रलेप म्हणून ! असं जर आहे, तर मग प्रथम इतराजी उत्पन्न होऊं देतेवेळीं आपण फार काळजी घेत असाल, नाहीं बरं ? "

" हो हो, अलबत घेतों तर ! "

" अन् उगाच गैरसमजुतीनं कोणावर इतराजी होऊं देत नसाल नाहीं, आपण ? "

" तसें मला तर वाटतें. "

" पण ज्यांचा राग इतका वज्रलेप असतो, त्यांनीं तर प्रथमच आपली चूक होऊं नये म्हणून अत्यंत खबरदारी ठेवणं फार जरूर आहे, असं नाहीं का आपणाला वाटत ? "

" या प्रश्नाचा काय रोंख आहे तें विचारूं का ? "

" रोंख कसला ? आपल्या स्वभावाचा मी अभ्यास करून निर्णय ठरवितें आहें. मी पहातें आहें कांहीं नक्की निघतं आहे का ! "

" असें काय ? मग कांहीं नक्की निर्णय झाला का ? "

" छे हो, अजून कांहीं नक्की धागा हातीं लागत नाहीं. मी इतके भिन्न-भिन्न मासले ऐकतें आहें, कीं, अजून मला ठावच लागत नाहीं ! "

"माझे अगदीं भिन्नभिन्न मासले आपल्या कानीं हल्लीं येतात यांत मला नाहीं कांहीं नवल वाटत. अन् माझें जर ऐकाल, तर सध्यां तुम्ही माझ्या स्वभावाचें खरें चित्र रेखाटण्याचा प्रयत्नच न करणें बरें. तो प्रयत्न, तुम्हाला किंवा मला, कोणालाच श्रेयस्कर होणार नाहीं ! "

" पण आतां नाहीं केला, तर कदाचित् अशी संधि तरी फिरून मला मिळेल हें कोणीं सांगावं ? "

" तर मग मी आपलें मन मोडूं इच्छीत नाहीं. "

इतकें बोलणें होत आहे तों नबीखांची चीज आटोपली, व दोघेंहि एकमेकांवर नाखूष होऊन निराळीं झालीं. ताराबाई त्यांच्यापेक्षां जास्त नाखूष झाली होती. त्यांच्या अंतःकरणांत तिच्याविषयीं असा एक प्रकारचा आदर उत्पन्न झाला होता, कीं, आजच्या तिच्या बोलण्याचा राग त्यांच्या मनांत फार वेळ न राहतां, तो लवकरच नागोपंतानें तिची तशी समजूत करून दिली असावी, असें वाटून त्याच्याकडे वळला.

नबीखांच्या दोनतीन चिजा झाल्या असल्यामुळें त्यानें आतां गायन पुरें केलें, म्हणून मंडळी बरीचशी दिवाणखान्यांतून बागेंत आली. अंमळशानें ताराबाईची कमलिनीशीं गांठ पडली, त्याबरोबर ती तुच्छतादर्शक स्वरानें ताराला म्हणाली "वा वा, ताराबाई, आपणाला ते नागोपंत फार पसंत पडले आहेत म्हणे ! शांताबाई त्यांच्याबद्दल खूपसं मला विचारीत होती आतां. त्यानं तुम्हाला तो भय्यासाहेबांच्या कारकुनाचा मुलगा आहे तें सांगायचं लपवून ठेवलंसं दिसतं. तें असो म्हणा, पण मी आपली तुम्हाला तुमची मैत्रीण म्हणून सांगतें, कीं, तो सांगतो तें सारंच अगदीं खरं समजूं नका ! भय्यासाहेबांशीं तो इतक्या वाईट तऱ्हेनं वागला आहे, कीं, त्याचं नांवसुद्धां घेतलेलं त्यांनां खपत नाहीं. त्याला आजचं कार्ड पाठवलं आम्हीं, तें दिखील केवळ नाइलाजानं पाठवलं. कारण, सगळ्या ऑफिसरांत एकट्यालाच कसं वगळावं ? पण तोच आपला उमजून इथें आला नाहीं, इतकी तरी बरी

अक्कल राहिली त्याला. त्याचं भय्यासाहेबांनीं नुकसान केलं असं तो म्हणतो, त्यांत कांहीं अर्थ नाहीं. मला कांहीं कच्ची हकीकत ठाऊक नाहीं; पण तें सारं खोटं आहे. अरेरे! आपल्या पसंतीस उतरलेल्या माणसाविषयीं हें असं आपल्या कानीं यावं ना! अहो, पण त्याचं कूळच हलकं, तें तसं व्हायचंच!"

ताराबाई रागावून म्हणाली. "मला या तुमच्या एवढ्या बोलण्यावरून त्यांचं कूळ तुमच्या इतकं श्रीमंत नाहीं, एवढाच त्यांचा अपराध दिसतो आहे. कारण, तो दिवाणजीचा मुलगा यापेक्षां तुम्ही कांहीं मला वाईट सांगत नाहीं, अन् तें तर त्यांनीं स्वतःच मला आधीं सांगितलं!"

तुच्छतापूर्ण स्वरानें कमलिनी म्हणाली "असं काय? मग आपण मला हें बोलल्याबद्दल क्षमा करा. माझा हेतु चांगला होता."

ती गेल्यावर ताराबाई रागानें आपल्याशींच म्हणाली "काय पण चांगला हेतु! असलं ऐकून माझ्या मनावर परिणाम होण्याइतकी का ही मला बेअकली समजते आहे? मला तर त्यांत भय्यासाहेबांच्या दुष्टपणापेक्षां दुसरं कांहीं दिसून येत नाहीं!"

नंतर ती शांताक्का कोठें आहे तें पाहूं लागली. कारण, भाऊसाहेबांनां काय माहिती आहे तें विचारण्याचें तिनें कबूल केलें होतें. शांताक्का दृष्टीस पडतांच तिच्या चेहऱ्यावर इतकी आनंदाची छटा दिसत होती, कीं, आजच्या पार्टी-पासून होणार असें वाटलेलें सर्व सुख तिच्या पूर्णपणें अनुभवास आलें आहे असें तिला वाटलें. तिची संतुष्ट मुद्रा पाहून ताराहि आनंदून जाऊन आपलें स्वतःचें दुःख ती सहज विसरून गेली. अंमळशानें शांताबाईच म्हणाली "माझं ठीक चाललं आहे, म्हणून मी तुझी गोष्ट अगदींच विसरून गेलें असं मात्र समजूं नकोस. पण सांगण्यासारखं मजपाशीं कांहीं विशेष नाहीं. भाऊसाहेबांनां कच्ची हकीगत कांहीं ठाऊक नाहीं, कीं, नागेशरावांवर भय्या-साहेबांची इतकी इतराजी कां झाली, व अखेर अगदीं अबोला होण्याला काय कारण झालं, तें मुळींच माहीत नाहीं. पण एवढं ते म्हणतात, कीं, भय्यासा-हेब कधींहि अयोग्य वर्तन करावयाचे नाहींत, अन् ते वागले त्यापेक्षांसुद्धां नागेशरावांशीं त्यांनीं कडक वागणं रास्त झालं असतं. अन् खरंच तुला सांगा-यला मला वाईट वाटतं, कीं, त्यांच्या स्वतःच्या व त्यांच्या बहिणींच्या सांग-ण्यावरून, नागेशराव कांहीं सच्च्या माणूस दिसत नाहीं. त्यानंच बहुतकरून भय्यासाहेबांनां इतका राग येण्यासारखं कांहींतरी वर्तन केलं असावं!"

ताराबाई म्हणाली "भाऊसाहेबांची प्रत्यक्ष नागेशरावांशी ओळख आहे का ?"

शांताबाई म्हणाली "छे, त्यांनीं मुळी परवां त्यांनां प्रथम पाहिलं !"

ताराबाई म्हणाली "तर मग, त्यांचा हा सारा अभिप्राय भय्यासाहेबांच्या एकतर्फी हकीगतीवरूनच आहे! आतां मला बरं वाटलं; पण गांव इनाम देण्याविषयीं ते काय म्हणाले ?"

शांताबाई म्हणाली "त्यांनां नक्की असं कांहींच स्मरत नाहीं; पण इनाम कायशाशा अटीवर द्यायचं होतं, असं भय्यासाहेब एकदां त्यांनां म्हणाले होते."

ताराबाई म्हणाली "भाऊसाहेबांच्याविषयीं माझा वादच नाहीं; पण त्यांच्या नुसत्या ऐकीव गोष्टी सांगण्यावर माझा कसा विश्वास बसावा ? पण त्यांनां बराचसा भाग मुळींच माहीत नाहीं, अन् जो थोडासा माहीत आहे, तोहि एकतर्फी–भय्यासाहेबांच्याचपासून ऐकलेला, मग माझा पूर्वीचा ग्रह कसा बरं बदलावा ?"

नंतर ती भाऊसाहेबांवरून शांताक्काचा विनोद करूं लागली. दोघींमध्यें पडदा नव्हताच. मनांत येईल तें एकमेकींशीं बोलण्याला हरकत कशाची ? दोघीजणी आनंदल्या. तितक्यांत भाऊसाहेबच तेथें आले, व अंमळशानें तारा मालतीकडे गेली. मालतीनेंहि हंसत हंसत भय्यासाहेब कसे काय बोलत होते म्हणून विचारल्यावरून ती उत्तर देणार, तों मागून नीलकंठरावांची स्वारी येऊन त्यांच्यापुढें उभी राहिली, व त्यांनीं मोठ्या उल्हासानें एक अत्यंत महत्त्वाची बातमी नुकतीच आपणाला लागल्याचें कळवलें. ते म्हणाले "आह्मांला आत्तां इतक्यांत अशी बातमी लागली, कीं, आमच्या श्रीमंत सरकार मातुश्री राणी माईसाहेबांचे एक जवळचे नातेवाईक आज येथें आहेत. त्यांचें व श्रीमंत अक्कासाहेबांचें नांव घेतांना आम्ही त्या गृहस्थांनां खुद्द ऐकलें. ते गृहस्थ इतक्यांत या घरच्या त्या मुख्य बाई आहेत ना?–त्यांच्याशीं बोलत असतां, तीं नांवें माझ्या सहज कानावर आलीं. काय पण परमेश्वराची लीला अगाध आहे! या प्रांतांत श्रीमंतांच्या नात्यांतलें माणूस भेटेल, अशी कधीं कल्पना तरी शक्य होती का ? बरें तर बरें, कीं, ही बातमी मला वेळींच लागली. केवढी ईश्वराची आमच्यावर आज कृपा झाली, कीं, ही पार्टी संपून घरीं गेल्यावर नाहीं ती गोष्ट आह्मांला समजली ! आम्ही आत्तां आधीं जाऊन त्यांनां योग्य असा मुजरा करून असें ह्मणतों, कीं, एवढा वेळ

मुजरा न करण्याचें कारण, केवळ आह्माला आपण कोण तें माहीत नव्हतें, सबब आह्माला माफी असावी—"

हें भाषण ऐकून ताराबाई आश्चर्यानें ह्मणते "ह्मणजे ? तुम्ही आत्तां या गर्दींत का त्यांच्याकडे जाऊन मुजरा करणार ?"

नीलकंठराव ह्मणाले "अलबत्, त्यांत काय संशय ? मी आधीं मुजरा केला नाहीं ह्मणून फार फार क्षमा मागेन. मला वाटतें, ते मुळीं श्रीमंतांचे भाचे आहेत. त्यांच्या मामी श्रीमंत राणी माईसाहेब आठा दिवसापूर्वी खुशाल होत्या, ही गोष्ट सांगतां येईल ना मला त्यांनां ?"

ताराबाई ह्मणाली "तें खरं, पण आत्तांच अगदीं इतकी घाई कशाला ? असं एकदम जाऊन त्यांच्यापुढं दहाजणांत मुजरा करण्याचं त्यांनां कदाचित् आवडणारहि नाहीं. उद्यां आगाऊ चिठी पाठवून, मग रीतीप्रमाणं भेटायला जावं, तें बरं. एकाएकीं ते बोलले तर एक शोभेल, कारण ते थोर आहेत; पण आपणासारख्यांनीं मुद्दाम पुढं कशाला व्हावं ?"

नीलकंठरावांनीं अशा मुद्रेनें हें ताराबाईचें बोलणें ऐकून घेतलें, कीं, आपण केलेला निश्चय अगदीं बरोबर असून, आपण केवळ तिच्या मुरवतीस्तव तिचें बोलणें ऐकत आहों. तिचें बोलणें संपल्यावर ते मोठ्या आढ्यतेनें ह्मणाले "ताराबाई, आपल्या सल्लयाला मी फार मान देतों, आणि आपल्या बुद्धीच्या आटोक्यांतल्या सर्व बाबतींतली आपली सल्ला मला फार ग्राह्य आहे; परंतु या अशा बाबतींत आह्माला स्वतःच्या बुद्धीप्रमाणें केलें पाहिजे. आपण त्यांनां थोर ह्मणतां, पण वास्तविक पाहिलें तर, राजगुरु सर्वांहूनहि थोर आहेत ! ह्मणूनहि आम्हींच प्रथम बोललें पाहिजे. आपण मला क्षमा करा, आम्ही या बाबतींत आपली अमूल्य सल्ला पतकरीत नाहीं. पण इतर सर्व बाबतींत मी सदैव आपल्या ह्मणण्याप्रमाणें, फार आनंदानें जन्मभर वागेन, असें मी आपणाला वचन देतों."

इतकें गंभीरपणानें बोलून, हास्य करून, ते झटकन् निघून गेले, ते थेट भय्यासाहेबांपुढें जाऊन त्यांनीं त्यांनां फार नम्रपणानें लवून मुजरा केला. ताराबाई दुरून पहातच होती. तिला भय्यासाहेबांच्या चर्येवरील आश्चर्य स्पष्ट दिसलें; पण नीलकंठरावांचें भाषण मात्र गडबडीमुळें ऐकूं येत नव्हतें. तरी पण त्यांच्या हालणाऱ्या ओंठावरून "श्री. मा. माईसाहेब, सुवर्णपुर माफी" वगैरे शब्द दुरून तिनें स्पष्ट ओळखले. त्यांचें लांबलचक

भाषण संपल्यावर भय्यासाहेबांनीं चार अक्षरांत कांहीं तरी उत्तर दिलें, तरी नीलकंठरावांनीं पुनः एक भाषण केलें. दर क्षणीं भय्यासाहेब जास्त रागावत होते, असें स्पष्ट दिसत होतें. अखेर त्यांनीं दुसरीकडे मोर्चा वळवला, तेव्हां नीलकंठराव परत ताराबाईकडे आले व म्हणाले " पाह्यलेंत ! मी गेलों तें किती तरी छान झालें. त्यांनां माझें बोलणें चांगलें आवडलें. ते इतकें देखील म्हणाले, कीं, माईसाहेब भलत्याला गुरु कशा मानतील ? वाः काय ही त्यांची नामी कल्पना ! पहा बरें, आह्मीं आपलें ऐकलें असतें, तर ही सारी मजा कशी बरें झाली असती ? "

इतक्यांत फराळाची सर्व तयारी असल्याची वर्दी आल्यावरून मंडळी तिकडे गेली. सीताबाईनां आज पोटांत न मावण्याइतका आनंद झाला होता. त्या रावबहादुरीणबाईनां नानाप्रकारानें भाऊसाहेब आपले जांवई झाले म्हणजे काय मौज व थाट उडेल, तें सर्व वर्णन करीत होत्या; पण समोरच भय्यासाहेब कांहीं अंतरावर होते त्यांनां हें सर्व ऐकूं जात आहे, असें ताराबाईला वाटून तिनें आईला जरा हळू बोल म्हणून सुचविलें. तरी आईचें तसलें बोलणें थांबेना, किंवा ती हलक्या स्वरांत बोलेना, म्हणून तिनें पुनः एकदां आईला सूचना केली. त्याबरोबर सीताबाई उसळून म्हणतात " असे भय्यासाहेब कोण आहेत ग तारे, कीं, आह्मीं सर्वांनीं त्यांनां भिऊन रहावें ? आह्मांला काय भीति आहे कोणाची, आमच्या मनांत येईल तें बोलून दाखवायला ? "

ताराबाई थोडी त्रासून म्हणाली "अग पण आई, जरा हळू कां बोलेनास ? भय्यासाहेबांनां उगाच चिडवून तर कांहीं फायदा नाहींना होणार ? त्यांनां चिडवलेलं भाऊसाहेबांना तरी बरं वाटेल का ? "

तरी सीताबाई तेंच तेंच बोलत होत्या. अखेर रावबहादुरीण बाईनां अगदीं कंटाळा येऊन गेला, व त्या जांभया देऊं लागल्या, व फराळहि संपले, तेव्हां एकदां तें सीताबाईचें पुराण आटोपलें. आपणाकडे भय्यासाहेब वारंवार पहात होते, हें ताराबाईनें जाणलें होतें; पण इलाज काय ?

फराळानंतर पानसुपारी होतांना कोणींसें म्हटलें, कीं, "आज स्त्रियांनीं गाणीं म्हटलीं नाहींत तीं म्हणावीं. "

रावबहादुरांनीं 'हॉ हॉ हॉ' करून त्या सूचनेला आपली संमति दिली. वास्तविक म्हटलें तर नबीखांच्या गाण्यानंतर स्त्रियांचें गाणें कोणाला कसें

गोड लागावें ! त्यांतून तें साधें असतें तर तेंहि चाललें असतें. पण स्त्रियांच्या गाण्याची सूचना होतांच हपापलेली मथुरी पेटीवर जाऊन बसली, व नेहमीं-प्रमाणें शास्त्रीय तऱ्हेच्या चिजा गाऊं लागली. एक झाली, तों लगेच तिनें दुसरी सुरू केली. अर्थात्च कोणाला तें कसें आवडणार ? ताराबाईनें तिला खुणेनें पुरे म्हणण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, पण मथुरी तिच्याकडे बघेल तर ना ! ताराबाई शांताक्काकडे मदतीकरितां बघूं लागली; पण ती आप-ल्याच नादांत भाऊसाहेबांशीं व त्यांच्या बहिणींशीं बोलत होती, तिचें इकडे लक्षहि नव्हतें. अखेर तिनें वडलांनां खुणावलें, व त्यांनीं ती खूण समजून मथुरीची ती चीज संपल्यावर मोठ्यानें म्हटलें " शाबास मथुरे, बहार केलीस ! पण आतां तुझें गायन मंडळींनां रगड झालेंसें वाटतें आहे ! आतां दुसऱ्या कोणा नें प्रदर्शन व्हायला वेळ दे थोडासा ! "

हे शब्द ऐकून ताराबाईला कुठून आपण वडलांनां सूचना केली असें झालं. नंतर दुसऱ्या कोणी म्हणा म्हणून कोणींशी सूचना केली; पण कोणीहि स्त्री पुढें येईना; तितक्यांत नीलकंठराव म्हणाले " आम्हाला जर गायन येत असतें, तर ऐशी बहार उडवून दिली असती म्हणतां ! कारण, आमच्या मतानें गायनवादनाची कला आमच्या गुरुघराण्याच्या पेशाला विसंगत नाहीं. आतां, आमच्यासारख्यांनीं तिच्या अगदीं अधीन होऊन जाऊन आपलीं इतर कर्तव्यकर्मे विसरूं नयेत, म्हणजे झालें. कारण, आम्हाला फार गोष्टीं-कडे पहायचें असतें ! आमच्या उच्च स्थितीला अनुरूप असें जपजाप्य, प्रवचनें वगैरे तर केलीं पाहिजेत, घरगुती कामधाम नीटपणें पाहलें पाहिजेच. कारण, तें तर ज्याच्यात्याच्यामागें लागलेंच आहे. त्याचप्रमाणें मुख्यत्वेंकरून ज्या थोरांच्या आश्रयाला आपण आहों, त्या श्रीमंत मातुश्री राणी माईसाहेब यांचा यथायोग्य सन्मान ठेवला पाहिजे. इतकेंच काय, पण श्रीमंतांप्रमाणेंच त्यांच्या गोतांतल्या गृहस्थांनांहि सदैव यथायोग्य मान देण्यांत कधींहि कसूर करतां कामा नये ! " असें भाषण संपवतांना त्यांनीं भय्यासाहेबांनां फार लवून मुजराहि केला !

ताराबाईला हें अचरटपणाचें भाषण ऐकतांना शरम वाटूं लागली होती; पण तें संपल्याबरोबर सीताबाई सारजाबाईजवळ होत्या, त्यांनां म्हणाल्या "वः कितीपण उत्तम बोलले नीलकंठराव! मला ठाऊकच होतं, कीं, ते विशेष चतुर आहेत ! "

नीलकंठराव एकसारखे त्या पार्टीमध्यें ताराबाईच्या मागेंमागें असून "चहा मागवूं का ? आइसक्रीम तरी पहा कसें उत्तम झालें आहे तें," असें तिला म्हणत होते. अखेर तिनें एकदां म्हटलें "मला किनई आतां कांहीं नको आहे. आपण इतकी तसदी कां घेतां ? आपणाला हवं असेल तें खुशाल घ्या."

यावर ते हंसत म्हणाले "आम्ही तर घेतोंच आहोंत, पण आपणाला अशा नाजुक गोष्टी बोलून आमचा कांहीं हेतु साधायचा आहे ! आम्हाला आपलें वाटतें, कीं, आपल्याला कांहीं हवें असलें तर आपण हक्कानें आम्हाला सांगावें !"

सरतेशेवटीं नऊ वाजण्याचा सुमार झाल्याबरोबर मंडळी हळुहळू निरोप घेऊं लागली. पण सीताबाईनीं गाडीवाल्याला काय सांगून ठेवलें होतें कोण जाणे, सारीं गेलीं तरी यांच्या गाड्या पांचदहा मिनिटें येईनातच ! त्यामुळें इंदिराताई व कमलिनी या आपणाला किती कंटाळल्या आहेत, तें मात्र स्पष्ट नजरेस पडलें. भय्यासाहेब कांहींच बोलले नाहींत. कमलिनी तर "अरे गणू, यांचा गाडीवाला गेला तरी कुठें ? लवकर बोलाव त्याला, कोण माणसं आतां कंटाळलीं आहेत !" असें स्पष्ट म्हणाली. सीताबाई भाऊसाहेबांशीं एकसारखी बोलत होती. अखेर गाड्या आल्या, तेव्हां उठतां उठतां सीताबाई त्यांनां म्हणाल्या "आतां आमच्या घरीं कधीं याल भाऊसाहेब ? अगदीं संकोच धरूं नका बरं. केव्हां तरी येऊन अगदीं आमच्या कुटुंबांतल्या माणसाप्रमाणं जेवून गेलांत तर खरे !"

भाऊसाहेब म्हणाले "हो हो, अवश्य. मी काय वाटेल तेव्हां येईन. पण उद्यां सकाळीं मी मुंबईला जातों आहें, तेथून आल्यावर पाहूं."

सीताबाईनीं यावर "ठीक आहे," म्हटलें, व एकदांची मंडळी निघाली. वाटेनें नीलकंठराव बोलतच होते, सीताबाई त्यांनां उत्तरें देत होत्या व आनंदराव मौजेनें तें सारें ऐकत होते. ताराबाईला वाटलें, कीं, आपल्या मंडळीनें अचरटपणाचें प्रदर्शन करण्याचा बेत करून जर मुद्दाम पार्टीला सारीं गेलों असतों, तरी झालें त्यापेक्षां जास्त प्रदर्शन करतां आलें असतें कीं नाहीं कोण जाणे ! ती एकंदरींत फार नाखूष होऊन घरीं चालली होती. नागेशराव दिसलेच नाहींत. आणि नीलकंठरावांचें एक शुष्ककाष्ठ पाठीस लागण्याचा रंग वाढत चालला होता. सीताबाई मात्र आपल्या दोन मुली लवकरच विवाहित होण्याच्या मार्गांत आहेत, असें वाटून अत्यंत आनंदून गेल्या.

# प्रकरण एकोणिसावें.

## नीलकंठरावांची मागणी.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं शांतिसदनांत एक नवीनच अंक सुरू झाला. नीलकंठरावांची रजा संपत आली, तेव्हां एकदां ज्या हेतूनें आपण इकडे आलों तो हेतु साध्य करून टाकावा, असें त्यांनां इष्ट वाटूं लागलें. त्यांतूनहि तो साध्य होण्याला कांहीं अडचण आहे, असेंहि त्यांनां वाटत नव्हतें; मग विलंब कशाला? असा पोक्त विचार करून, काय काय केव्हां केव्हां बोलायचें त्याची त्यांनीं रात्रीं मनांत जुळणी करून ठेवली. व सकाळीं चहा आटोपल्यानंतर सीताबाईच्या जवळ दिवाणखान्यांत फक्त हिरी व ताराबाई आहेत अशी संधि पाहून त्यांनीं सुरुवात केली. ते सीताबाईनां म्हणाले "आपली सुंदर मुलगी ताराबाई यांच्याशीं आम्हाला चार शब्द एकांतीं बोलायचे आहेत, तर त्यांनीं ते ऐकून घ्यावे अशी आम्हाला आजच्या दिवसांत मेहरबानीनें संधि आणून द्याल काय?"

ताराबाईच्या लक्षांत तें सर्व येऊन ती कांहीं बोलणार, तों आधींच सीताबाई झटकन् म्हणाल्या "हो हो, अलबत्. तिची कुठें हरकत आहे? तिला तर बरंच वाटेल. या आम्ही इथून आत्तांच जातों. चल बाळ हिरे, आपण माडीवर जाऊं!"

असें म्हणून त्या दोघी हातांतलें शिवणकाम गोळा करून निघतात, तों ताराबाई मोठ्यानें म्हणाली "आई, मी दिखिल येतें. माझ्याशीं काय असं एकांतीं यांनां बोलायचं असणार? आपण सारींच ऐकूं काय आहे तें, नाहीं तर मीहि निघालेंच!"

सीताबाई गडबडीनें म्हणाल्या "भलतंच एकादं तारे! ते काय म्हणतात. तें तूं ऐकून तर पहा."

पण ताराबाईचा जाण्याचा रंग पाहून त्या पुनः म्हणाल्या "माझं नाहीं ऐकत कां? मी सांगतें आहें ना इथेंच रहा म्हणून!"

आतां ताराबाईचा नाइलाज झाला; पण लागलीच तिला वाटलें, कीं, हें केव्हां तरी एकदां आतां चुकत नाहीं, मग एकदां त्याचा निकाल लावलेला काय वाईट? असा विचार मनांत आणून ती होती तेथेंच बसून व हातांनीं झटझट शिवणकाम करीत राहिली. एकीकडे कोण ही पीडा म्हणून वाईट

वाटत होतें, तर दुसरीकडे नीलकंठरावांच्या वेडगळपणाचें हंसूं येत होतें; पण चेहऱ्यावर कांहींच न दाखवितां ती बसून राहिली.

तारा आतां खास निघून जात नाहीं अशी खात्री करून सीताबाई हिरीला घेऊन निघून गेल्या. त्याबरोबर नीलकंठरावांनीं बोलण्यास सुरुवात केली. नीलकंठराव म्हणाले " अत्यंत प्रिय तारा ! हा तुमचा विनय तुमच्या अंगच्या इतर सद्‌गुणांनां जास्तच शोभा आणीत आहे, व या विनयामुळें माझ्या डोळ्यांनां तुह्मी किती तरी जास्त रमणीय दिसत आहां ! असा विनय तुह्मीं नसता दाखवला, तरच तुह्माला कमीपणा आला असता. पण मी तुह्माला खरेंच सांगतों, कीं, मीं आगाऊ तुमच्या आईसाहेबांची परवानगी घेऊनच ठेवली आहे. मी आतां काय बोलणार याचा तुह्माला संशय असणें शक्यच नाहीं. कारण, आज चारपांच दिवसांत मीं नाना प्रकारच्या नाजुकसाजुक गोष्टींनीं माझें अंतःकरण इतकें उघड करून दाखविलें आहे, कीं, तुमच्यासारख्या धूर्त व चतुर स्त्रीनें तें खास केव्हांच ताडलें असलें पाहिजे. या घरांत आह्मीं पाऊल घातल्यापासून लवकरच, आह्मीं आपणाला आमच्या हृदयमंदिरांत स्थापन करून ठेविलें. आमचें आपणांवर किती अलोट प्रेम जडलें आहे, त्याचें वर्णन आपणापाशीं करण्यांत आह्मी आमची तहानभूक विसरून जाण्याच्या अगोदर, आम्हाला विवाहशृंखलेनें स्वतःला कां बांधून घ्यावेंसें वाटूं लागलें आहे, त्याचीं सविस्तर कारणें सांगून टाकणें इष्ट आहे. आणि योग्य नवरी पसंत करण्याकरितां आह्मी इकडे आपल्या घरीं कां आलों, तें तर फारच जरूर सांगितलें पाहिजे—"

हें भाषण नीलकंठराव जलद पाठ केल्यासारखें बोलत होते. त्यांच्या-सारख्या वेदाभ्यासजड दिसणाऱ्या माणसानें प्रेमाचें वर्णन करतांना तहानभूक विसरून जाणें ही कल्पना ताराबाईला इतकी हंसूं आणूं लागली, कीं, आतां त्यांनीं एक क्षणभर विसावा घेतला तों तिचा तो क्षण हंसूं दाबण्यांतच जाऊन तिला बोलण्याला संधिच राहिली नाहीं. इतक्यांत त्यांची पुनः गाडी सुरू झाली:—" आह्मीं लग्न करण्याचें कां मनांत आणलें आहे, त्याचीं कारणें येणेंप्रमाणें:—पहिलें कारण हें, कीं, आह्मी श्रीमंत् रंगनाथ स्वामीमहाराज यांच्या शिष्यपरंपरेपैकीं गृहस्थाश्रमी असे सच्छिष्य म्हणवतों. त्यामुळें गृहस्थाश्रमाली लग्न करणें अत्यंत आवश्यक आहे. दुसरें कारण असें, कीं, लग्न करून संसार

थाटल्यानें आमच्या हल्लींच्या गृहसौख्यांत अत्यंत भर पडेल अशी आमची मनोदेवता आम्हाला सांगते आहे. आणि तिसरें कारण,—अथवा हें तिसरें म्हणण्यापेक्षां त्याला अग्रेसरत्वाचाच मान देणें कदाचित् जास्त योग्य झालें असतें,—हें कारण असें आहे,कीं,ज्यांच्या महनीय आश्रयाखालीं आमचा योगक्षेम चालत आहे, त्या श्रीमंत मातुश्री राणी माईसाहेब सुवर्णपूरकर यांची आम्हाला तशी अत्यंत आग्रहाची अनुज्ञा आहे. दोन वेळां त्यांनीं आपण होऊन—आम्हीं विचारलें नव्हतें तरी केवळ आपणच होऊन—लग्न करा म्हणून सांगितलें. आम्ही इकडे येण्याच्या आधींच्याच गुरुवारीं रात्रीं, आम्ही उपोषण सोडण्यास त्यांच्या बंगल्यावर त्यांच्या अत्यंत आग्रहावरून गेलों होतों. तेव्हां श्रीमंतांजवळ अक्कासाहेब बसल्या होत्या, व त्यांच्या डोकींत नवीन तयार होऊन आलेली वेणी त्यांची दासी बसवीत होती, तेव्हां सरकार महाराज आम्हाला म्हणाल्या ‘ नीलकंठराव! आतां तुम्ही जरूर लग्न करा. एकादी गरीब घराण्यांतली चांगलीशी मुलगी पहा. घरांत कामाकाजांत हुशार असावी, तिच्या डोक्यांत अलीकडच्या फाजील कल्पना नसाव्यात, आपल्या घरीं असलेल्या कोंड्याचा मांडा करून तुम्हाला घालील अशी आपली एकादी मुलगी हुडकून काढा, अन् इकडे घेऊन या. आम्हाला तरी आपल्या घरांत घरकरीण असली म्हणजे आणखी एक हक्काचं माणूस झालेंसें होईल. ’ इतकें श्रीमंतांनीं आर्जवून सांगितल्यावर आम्हीं त्याच क्षणीं निश्चय केला. असें मनापासून सांगण्यासारखीं श्रीमंत माणसें असतात कधीं कोणाच्या नशिबांत ! श्रीमंतांचा इतका दाट परिचय आपल्याला घडेल, हा कांहीं आपणाला सामान्य लाभ व्हायचा नाहीं. तुमच्या नजरेससुद्धां कधीं त्यांच्यासारखीं थोर माणसें इथें पडावयाचीं नाहींत. त्यांच्यासमोर तुम्ही अगदीं गप होऊनच जाल प्रथम. पण हळुहळू भीड चेपून तुम्ही थोडें थोडें बोलूं लागलां, म्हणजे श्रीमंतांना तें आपलें चतुराईचें भाषण अत्यंत पसंत पडेल. येथवर विवाहाचीं सामान्य कारणें सांगितलीं. आतां त्या उद्देशानें मुद्दाम इकडे येण्याचीं कारणें सांगतों तीं ऐका:—कारण, आमच्या सुवर्णपुराच्या आसपास आमच्या योग्य अशा मुली नाहींत असें थोडेंच आहे. वास्तविक कारण हें आहे, कीं, आपल्या वडलांच्या निधनानंतर ( आणि तें निधन अजून पुष्कळ वर्षें देव न करो ) ही सर्व इस्टेट पूर्वीं ठरल्याप्रमाणें आमच्या हातीं येणार आहे. म्हणून तशा प्रसंगीं ती इस्टेट आपल्या हातून अजिबात हिसकली जाण्यापेक्षां, अन्य रूपानें आपल्या-

पैकीं एकीच्या हातीं लागली, तर त्यांतल्यात्यांत कांहीं तरी बरें होईल असा विचार करून, आपणांपैकीं एकीशीं लग्न करण्याचा ठाम निश्चय करूनच आम्ही इकडे आलों, व अशा निश्चयाबद्दल आपण मला दोष देणार नाहीं अशी आम्हाला फार उमेद आहे. हीं कारणें सांगून झालीं. आतां फक्त या हृदयांत आपणाविषयीं किती अपरंपार प्रेम सांठून राहिलें आहे, तें शक्य तितक्या शब्दांनीं व्यक्त करून दाखविलें म्हणजे झालें. रुपयांविषयांची आम्ही परवा करीत नाहीं, व आह्मी तसली कांहीं ज्यास्त मागणी तुमच्या वडिलांजवळ करणार नाहीं. कारण, ती करून उपयोग होणार नाहीं हें आह्मी जाणून आहों! म्हणून तुमच्या आईच्या मरणानंतर (तेंहि देव लवकर न घडवो) तुम्हाला फक्त एक एक हजार रुपये मिळावयाचे आहेत असें ऐकलें आहे, त्यापेक्षां आह्मी जास्त कांहीं मागत नाहीं. इतकेंच तर काय, आपलें लग्न झाल्यावरहि कधीं, आपणा स्वतःला हुंडा न मिळाल्याबद्दल एका शब्दानें दुखवणार नाहीं. आतां राह्यलें—"

ताराबाईला हें भाषण आणखी ऐकून घेणें अशक्यच झालें. ती एकदम मध्येंच म्हणाली " आपण फार घाई करतां आहां, नीलकंठराव! मीं अजून एका शब्दानंहि तुम्हाला उत्तर दिलं नाहीं तें आपल्या लक्षांत नाहीं आलं अजून. पण आतां मला तें देण्याला थोडी सवड द्या. आपण ही मला मागणी घालतां आहां, त्यांत माझा अतिशय सन्मान करतां आहां, हें खरं. मी आपले याबद्दल फारफार आभार मानतें; परंतु आपली ही मागणी कबूल करणं मला केवळ अशक्य आहे—"

नीलकंठराव मध्येंच म्हणाले "आम्हाला ठाऊक आहे, कीं, स्त्रियांच्या मनांत जी गोष्ट आनंदानें पतकरायची असते, तिच्याविषयीं त्या नेहमीं ओढूनताणून चंद्रबळ आणीत असतात; इतकेंच काय, तर दोनदां तीनदांसुद्धां नाहीं नाहीं म्हणण्याची त्यांची वहिवाट असते. म्हणून या आपल्या उत्तराचें आम्हाला बिलकुल आश्चर्य वाटत नाहीं, व लवकरच आपण आमच्या अर्धांगी व्हाल अशी आम्हाला पूर्ण उमेद आहे, "

ताराबाई स्थिरस्वरानें म्हणाली " पण मी स्पष्ट नाहीं म्हटल्यावर ही तुमची उमेद विलक्षण नव्हे का? मी आपणाला अगदीं खरंखरं सांगतें आहें, कीं, आपण म्हणतां तशा जर कोणी वर वर उगाच नाहीं नाहीं म्हणणाऱ्या स्त्रिया असतील, तर त्यांतली मी नाहीं! मी मनापासून तुम्हाला नाकारतें आहें.

आपले स्वभाव मुळींच जुळत नाहींत, म्हणून असल्या लग्नापासून मला सुख व्हायचं नाहीं, अन् तुम्हालाहि खास व्हायचं नाही! इतकंच काय, तुमच्या माईसाहेबांनासुद्धां मी पसंत पडण्यासारखी नाहीं!"

नीलकंठराव विचारांत पडल्यासारखे झाले; पण म्हणाले "तसें होईल तर... कांहीं नको! पण मला नाहीं तरी कांहीं शंका येत. आपण उगीच त्यांनां भितां आहां. मी त्यांच्यापाशीं आपली फार शिफारस करीन, व आपल्या सद्गुणांचें उत्तम वर्णन त्यांच्याजवळ अगोदरच करून ठेवीन."

ताराबाई म्हणाली "पण त्याची मुळीं जरुरीच नाहीं. मला कोण पसंत आहे वा नापसंत आहे तें माझं मला ठरवतां येतं. मीं काय म्हणतें आहें तें खरं माना, म्हणजे मी संतुष्ट होईन. इतक्या लांब येऊन तुह्मी मला ज्या हेतूनं मागणी घालतां आहां, तो तुमचा हेतु मोठा स्तुत्य आहे; पण आपली मागणी मला कबूल नाहीं, त्याला माझा नाइलाज आहे. तुम्ही आपल्याकडून पुष्कळ प्रयत्न करून आपल्या मनाच्या दोषांतून मुक्त झालांत. आतां प्रसंग आला म्हणजे ही सारी इष्टेट तुम्ही बिलकुल किंतु न बाळगतां खुशाल घ्या. तेव्हां हें बोलणं संपलं असं आतां समजा."

इतकें म्हणून ती बाहेर जाण्याला निघाली, तों नीलकंठराव पुनः म्हणाले "मी दुसऱ्यांदां याविषयीं बोलेन, तेव्हां मला जास्त चांगलें उत्तर मिळेल अशी मला खात्री आहे. स्त्रियांनां वाटत असतें, कीं, एकदम पहिल्या मागणीला हो म्हटलें, कीं आपली किंमत कमी होते. अन् म्हणून पहिल्या प्रसंगाच्या दृष्टीनें पाह्यलें, तर आपलें उत्तर उमेद आणण्यासारखेंच मला दिसतें आहें!"

ताराबाई जरा रागावून म्हणाली "मोठे चमत्कारिकच आहां आपण! मी इतकी सांगत असून जर तुम्हाला तें आशादायकच वाटतें, तर आणखी कोणच्या तऱ्हेनें मी स्पष्ट करून सांगूं तरी, कीं तुम्हाला तें खरें वाटेल?"

नीलकंठराव म्हणाले "इतकें जरी आपण बोलतांहां, तरी आम्ही अजूनहि तें केवळ ओढून आणलेलें चंद्रबळच समजतों. तसें मानण्याचीं कारणें आतां मी सांगतों. एक तर अस्मादिकांसारखा गृहस्थ आपलें पाणिग्रहण करण्यास अयोग्य आहे असें कोणाला वाटणार नाहीं; दुसरें असें, कीं, आमच्या दर्जाचा माणूस—अन् त्यांतून श्रीमंतांचा आश्रय असलेला—पाहूं गेलें तरी मिळत नाहीं, असल्या स्थळीं पडण्याचें केवळ नशीबींच पाहिजे! शिवाय,

तुमच्या वडलांजवळ पैसा इतका थोडा आहे, कीं, तुमच्या अंगीं इतके गुण असूनहि तुम्हाला दुसरा कोणी कधीं मागणी घालील कीं नाहीं, याचीच शंका आहे. तस्मात्, अशी घरीं चालून आलेली मागणी परतवणें, तुम्हाला मुळींच शक्य नाहीं. म्हणून तर आम्ही पक्कें समजतों, कीं, नाहीं म्हणण्याची ही तुमची केवळ पुरुषाला जास्त बांधून घेण्याची जी स्त्रियांची युक्ती असते त्यांतलीच आहे. ”

ताराबाई म्हणाली “ मी पण स्पष्ट सांगितलंना, कीं, एकाद्या गृहस्थाला उगीच नाहीं म्हणून अखेर पतकरणारी मी नाहीं ! तुम्ही मागणी घातलीत ते तुमचे मोठे उपकार झाले. आम्हाला भिकाऱ्यांनां नाहीं तर कोण मागणी घालायला आलं असतं ? पण भिकाऱ्याला ओकारी म्हणताताना, तशी आमची गत आहे, असं तुम्ही समजा पाहिजे तर ! पण मी सांगतें तें खरं समजा, इतकी मेहरबानी करा ! मी तुम्हाला पतकरण्याचं नांवसुद्धां कधीं मनांत आणूं नका ! आणखी किती सांगूं ? ”

नीलकंठराव म्हणाले “ वा वा, हा आपला आविर्भाव आपणाला फारच खुलून दिसतो आहे ! माझी खात्री आहे, कीं, आपल्या आईबापांनीं नीट समजूत करून सांगितलें, कीं, आपण अस्मादिकांनां खास माळ घालणार ! पैज पाहिजे तर तुमचीच् आमची ! ”

या अचरटाशी आणखी जास्त बोलण्यांत अर्थ नाहीं असें समजून ताराबाई निघून गेली. मनांत तिनें निश्चय केला, कीं “अशा तऱ्हेनें स्पष्ट बोलण्याचा जर हे भलताच अर्थ करून जर भलतीच आशा धरूं लागले, तर त्या बाबतींत एकदां बाबांकडून स्पष्ट शब्दांनीं नाहीं म्हणून यांनां कळवावें. त्यांच्या नाहींचा असा यांच्या डोक्यांत उजेड पडेल, कीं, यांत ओढूनताणून चंद्रबळ आणण्याचा बिलकुल अंश नाहीं अशी यांची खात्री होईल ! ”

---

## प्रकरण विसावें.

### आपखुशीनें परत घेतों !

आपल्या मागणीला बरेंचसें यश आलें, या सुखमय स्वप्नाच्या आनंदांत नीलकंठराव फार वेळ राहिले नाहींत. कारण, सीताबाई दिवाणखान्याच्या बाहेर बाहेर टेहळणी करीतच होत्या. त्यांनीं ताराला बाहेर येऊन झटकन् तिच्या खोलीकडे जातांना पाहिल्याबरोबर, त्या दिवाणखान्यांत शिरल्या, व “ आपला

आमच्याशीं आतां जास्त निकट संबंध होणार, ” असल्याविषयीं त्यांनीं नीलकंठरावांचें व स्वतःचें अभिनंदन केलें. नीलकंठरावांनींहि तसेंच अभिनंदनपर उद्गार काढल्यावर कची हकीगत सर्व निवेदन केली, व “जरी स्त्रियांच्या नैसर्गीक विनयामुळें ताराबाईनें आज नकार दिला आहे, तरी एकंदरींत झालेला प्रकार अत्यंत समाधानकारक आहे, ” असें म्हटलें !

पण तें ऐकून सीताबाई चरकल्या. नीलकंठरावांप्रमाणें तारेच्या नकाराचा त्यांनां अर्थ करतां आला असता, तर ठीकच होतें; पण त्यांनां तिची पुरी माहिती असल्यामुळें तो अर्थ खरा दिसेना, ह्मणून त्या ह्मणाल्या “ कांहीं हरकत नाहीं, नीलकंठराव, त्याची नको काळजी. सहज तिला आतां ताळ्यावर आणूं आम्ही. मीच जाऊन तिला आतां दोन गोष्टी सांगतें. नाहीं तरी ती मोठी मूर्खन् हट्टी मुलगी आहे, अन् आपलं हित कशांत आहे तें जाणत नाहीं ती! पण मी आत्तां तिची चांगली समजूत घालतें पहा कशी !”

नीलकंठराव ह्मणाले “तें खरें मामीसाहेब, पण ती खरोखरीच जर मूर्खन् हट्टी असेल, तर माझ्यासारख्या माणसानें तरी ती पत्करावी कीं नाहीं कोण जाणे ! आम्ही आपले सुखासाठीं लग्न करणार, अन् ती अशी जर आडमुठी असली, अन् असा जर वेड्यासारखा हट्ट करण्याची तिला संवय असली, तर मग तिच्या जर मनांतून खरेंच नको असलें, तर उगीच जुलमानें रामराम करण्यांत तरी काय अर्थ आहे ? ”

सीताबाई गडबडीनें ह्मणाल्या “छे हो नीलकंठराव, माझं बोलणं आपल्या नाहीं नीटसं लक्षांत आलं ! अहो, ती कधीं एकादे वेळेला क्वचित् हट्ट करते इतकंच; बाकी एरवीं, तिच्यासारखी सरळ मुलगी नाहीं कुठे सांपडायची. मी आत्तां आधीं त्यांच्याकडे जातें, अन् आम्ही दोघं मिळून तेव्हांच कसं छान ठरवून टाकतों पहा ! ”

इतकें बोलून नीलकंठरावांनां उत्तर देण्याची संधि न देतां, त्या एकदम निसटल्याच तेथून, त्या थेट आनंदराव लायब्ररींत होते तेथें जाऊन धाडकन् दार उघडून आंत गेल्या, व मोठ्यानें ह्मणाल्या “ अहो, पुरे झाला तो तुमचा टाइम्स! कोण बाहेर आम्ही गडबडींत आहोंत-आधीं उठा अन् तारीला नीट समजून सांगा, कीं, तिनं नीलकंठरावांनां पतकरलंच पाहिजे म्हणून ! कारण, ती साफ नाहीं म्हणते आहे, अन् तुम्हीं जर गर्दी केली नाहींत, तर तेहि बदलतील, अन् नको ह्मणायला लागतील ! ”

आनंदराव सीताबाई आल्या तेव्हां स्वस्थपणें टाइम्स वाचीत होते. सीताबाई इतकी गडबड करीत होत्या तरी अत्यंत शांतपणें त्यांच्या तोंडाकडे आरशींतून पाहत त्यांनीं उद्गार काढले "आपण काय ह्मणतां त्यानें आमच्या डोक्यांत कांहीं प्रकाश नाहीं पडला ! काय ह्मणणें आहे आपलें, तें पुनः एकदां स्पष्ट करा बरें !"

सीताबाई म्हणाल्या " अहो दुसरं काय ? तारी ह्मणते आहे, कीं, मला कांहीं नीलकंठराव नकोत, अन् तेहि आतां ह्मणूं लागले आहेत, कीं, मलाहि ताराबाई नको ! "

आनंदराव ह्मणाले "मग,कोणाचा आग्रह आहे त्यांनां? अन् नकोत ह्मणजे? काय नकोत ? "

सीताबाई त्रासून ह्मणाल्या " काय बाई तरी, इतकं का कळेना ! अहो, मी त्यांच्या लग्नाची गोष्ट बोलतें आहें हो ! "

आनंदराव ह्मणाले " असें का ? अन् तर मग मी काय करूं ? नवरा कबूल नाहीं, नवरी कबूल नाहीं, मग सगळें संपलेंच ! "

सीताबाई ह्मणाल्या " असं कसं ? तारीला चांगली समजून सांगा. ह्मणे संपलं सगळं ! तिला स्पष्ट सांगा, कीं, तिनं नीलकंठरावांनां वरलंच पाहिजे."

आनंदराव ह्मणाले " बोलाव त्या तारीला इकडे. मी सांगतों तिला माझें काय ह्मणणें आहे तें. "

सीताबाई ताबडतोब जाऊन तारीला घेऊन पुनः लायब्ररींत आल्या. त्यांनां पाहतांच आनंदराव ह्मणाले " तारे, अशी इकडे ये पाहूं. " तिला जवळ उभी करून ते पुढें म्हणाले " हें पहा, तुला कनई, फार महत्त्वाच्या कामाकरितां इथें बोलावून मीं आणली आहे. तुला कायशी नीलकंठरावांनीं सकाळीं मागणी घातली ह्मणतात. खरें का हें ? "

तारानें नुसतें मानेनें हो म्हटलें.

" हं, फार चांगलें ! अन् ती मागणी तूं नाकारलीस ? "

" होय, बाबा. "

" असें काय ? ठीक. तर मग आतां ऐक. या तुझ्या मातुश्रींचा अगदीं आग्रह आहे, कीं, ती मागणी तूं पतकरलीच पाहिजे. असेंच ना हो ? "

सीताबाई म्हणाल्या " अलबत् ! नाहींतर मी पुनः हिचं तोंड दिखील पहाणार नाहीं ! "

आनंदराव म्हणाले " आज तारे तूं मोठ्याच कचाट्यांत सांपडली आहेस! कारण, आजपासून तूं आईबापांपैकीं एकाला पारखी होण्याचा तुझ्यावर दुर्धर प्रसंग ओढवला आहे. तूं जर नीलकंठरावाला पतकरीत नसलीस तर मातुश्री तुझें तोंड पहाणार नाहीं आहेत. आणि जर पतकरणार असशील, तर मी सांगतों, मी कधीं पहाणार नाहीं ! "

एवढ्या गंभीर सुरुवातीचा असा शेवट झालेला पाहून ताराबाईला खुद्‌कन् हंसूंच आलें; पण सीताबाईंनां वाटलें होतें, कीं, आपल्या इच्छेप्रमाणें आनंदराव बोलणार आहेत, त्यांची माल फार निराशा झाली. त्या म्हणाल्या " हें काय असं भलतंच बोलणं ? आपण मला म्हणालांत, कीं, मी तिला सांगतों म्हणून ना?"

आनंदराव म्हणाले "हें पहा, आम्ही दोनच गोष्टी आपणाजवळ मागून घेतों; पहिली ही, कीं, आमच्या बुद्धीप्रमाणें आम्हाला बोलूं द्या; दुसरी ही, कीं, या लायब्ररींत ही गडबड आतां बस् करा ! "

आतां सीताबाईंनां तेथें आशाच राहिली नाहीं. म्हणून त्या बाहेर आल्या; पण त्यांनीं अजून प्रयत्न सोडला नाहीं. पुन्हां तारीला बोलूं लागल्या, तिची समजूत घालूं लागल्या, धाकदपटशा दाखवूं लागल्या. शांतालाहि त्या आपल्या बाजूचें बोलण्यास सांगूं लागल्या. पण तिनें फार गोडीनें सांगितलें, कीं, "असल्या गोष्टींत मला कशाला पडायला सांगतेस?" ताराबाई आईला कधीं गंभीरपणानें तर कधीं उडवाउडवीचीं अशीं उत्तरें देऊं लागली, पण तिचा नकार मात्र केव्हांहि ढळला नाहीं.

इकडे नीलकंठराव दिवाणखान्यांत एकटेच विचार करीत राहिले होते. आपल्यासारखें स्थळ नको म्हणण्याला ताराबाईला काय कारण झालें असेल, याची त्यांनां मुळींच कल्पना होईना ! या नकारामुळें त्यांच्या गर्वाची थोडी मानखंडना झाली, इतकेंच. बाकी, ताराबाईविषयीं त्यांच्या मनांत खरें प्रेम थोडेंच होतें, तर त्यांच्या मनाला वाईट वाटलें असेल ! उलट कदाचित् सीताबाईच्या म्हणण्याप्रमाणें ती खरोखरच हट्टी असली, तर बरी अनायासेंच आपली सुटका झाली, असेंच त्यांनां वाटलें. अशी घरांत गडबड चालली असतां, दोन दिवस आधीं ठरल्याप्रमाणें, मालती त्यांच्या घरीं आज रहायला आली. तिला बागेंत पाहूनच सुंद्री तिच्याकडे धांवत गेली, व तिला हळूच म्हणाली " तूं आलीस तें फार छान झालं. आज घरांत अशी जंमत चालली आहे ! सांग बरं, आज सकाळीं काय आमच्या इथें झालं असेल तें ! नाहींच

तुला कल्पना व्हायची ! मी सांगूं आतां ? आज सकाळीं नीलकंठरावांनीं आमच्या ताराला मागणी घातली, अन् तिनं तर ती नाकबूल केलीन् !"

मालती कांहीं बोलणार, तों हिरीनें धांवत येऊन तीच बातमी सांगितली. तिघी मागच्या दारीं जातात तों तेथें सीताबाई बसल्या होत्या त्या तिला म्हणाल्या "मालती, बरी तूं बाई आज आलीस. दोन शहाणपणाचे शब्द तूं तरी त्या तुझ्या मैत्रिणीला सांग. तिला ह्मणावं, सगळ्यांच्या इच्छेच्या उलट जाणं चांगलं नाहीं. तूं तरी माझ्या कामीं मदत कर. या घरांत कोणी मला मानीत नाहीं. जें तें माझ्या आपलं उलट. माझं हें डोकं मग कलकलून जातं अगदीं, त्याची कोणी पर्वा नाहीं करीत."

मालतीचें उत्तर, तितक्यांत शांताबाई आणि ताराबाई तेथें आल्यामुळें तसेंच राहिलें. ताराला पाहून सीताबाई म्हणाल्या "पहा पहा, कशी हिंडते फिरते आहे ती ! जसं कांहीं कांहीं झालंच नाहीं ! तिला आईबापांची कांहीं पर्वा आहे का ? जशी कांहीं आम्ही इथें नसून कुठें दूर गांवाला आहोंत. आम्हीं कितीक म्हटलं, तरी तिचं तें खरं ! पण तूं काय समजली आहेस ! तारे, अशा जर तूं एकूनएक मागण्या परतवल्यास, तर बघ तुला कधीं नवराच मिळायचा नाहीं ! अन् मग कसं पोट भरशील तें पाहीन ! ते आहेत तोंवर हें सगळं गोड वाटतं आहे. पण मागून भीक मागावी लागेल, लक्षांत ठेव ! मी तर माझ्या घरांत पाणीसुद्धां प्यायला उभी करायची नाहीं तुला. मी तर मघांशींच तुला सांगितलं, कीं, मी तुझं पुनश्च तोंड दिखील पहाणार नाहीं— तें कांहीं उगाच बोलणं नव्हे ! मला अशीं आईची अवज्ञा करणारीं पोरं बिलकुल आवडत नाहींत ! मी कधीं तसल्यांशीं अक्षरसुद्धां बोलत नसतें. आधीं नाहीं तरी मला कोणाशींच फारसं बोलणं आवडत नाहीं ह्मणा. माझ्यासारख्या नेहमीं डोकं कलकलणाऱ्या माणसांनां फार बोलवतं कुठें ? कोण मला त्रास होतो तो कुणाला कळतो आहे का तरी ? पण हें नेहमींचंच आहे ! माझ्यासारखीं जीं माणसं आपलं दुखणं उचारून दाखवीत नाहींत, त्यांची कोण कींव करतं ?"

मुली कोणी कांहींच बोलल्या नाहींत. कारण, या वेळीं तिची समजूत घालण्याची खटपट करण्यानें, अथवा तिचें सांत्वन करण्याचा प्रयत्न करण्यानें, सीताबाईचा राग जास्तच वाढण्यासारखा होता, हें त्या जाणत होत्या. म्हणून त्या उगीच स्तब्ध बसल्या. सीताबाईचें वरच्याप्रमाणें आणखी तसलेंच बोलणें

चालू होतें. अखेर तेथें नीलकंठराव कशालासे आले. त्यांनां पाहून सीताबाई म्हणाल्या " अगदीं पोरींनों आतां गप् रहा, अक्षर बोलाल तर खबरदार ! मला आतां त्यांच्याशीं थोडंसं बोलूं द्या. चला हो नीलकंठराव, आपण दिवाणखान्यांतच जाऊं. "

पण नीलकंठराव मालतीशीं प्रथम औपचारिक भाषा बोलूं लागले, व तिच्या घरच्या साऱ्यांचीं नांवें घेऊन सारीं खुशाल आहेत अशी खात्री करून घेतल्यावर ते दिवाणखान्यांत गेले. थोरल्या दोघी बहिणी तिकडे गेल्याच नाहींत, तशीच हिरीहि मागेंच राहिली; पण सुंदर आईची लाडकी, ती त्यांच्या मागोमाग दिवाणखान्यांत गेली. आंत नीलकंठराव येतांच सीताबाई केविलवाणा स्वर काढून म्हणाल्या " काय करूं हो, नीलकंठराव ! "

पण त्यांनां जास्त बोलूं न देतां नीलकंठराव जरासे नाखुषीदर्शक स्वरानें ह्मणाले " हें पहा, आपण आतां त्याविषयीं मुळींच कांहीं बोलूं नये तें फार चांगलें. आम्हाला म्हणजे आपल्या कन्येचा राग आला आहे, अशांतला भाग नाहीं. आल्या प्रसंगाला माणसानें नेहमीं तयार असलें पाहिजे. त्यांतून आमच्यासारख्या सुस्थितींतल्या माणसानें तर विशेष तयार असलें पाहिजे. आणि त्याप्रमाणें आम्ही अगदीं तयार आहोंत. कारण, न जाणों आपल्या कन्येनें आमचा स्वीकार केला असता तर आम्हाला सुखहि कदाचित् लागलें नसतें ! आमचा असा अनुभव आहे, कीं, द्राक्षें कदाचित् खरोखरीच आंबट असतील अशी शंका आलेली असली, म्हणजे मग तीं द्राक्षें न मिळाल्याबद्दलचें दुःख सहन करायला माणूस सहज तयार होतो ! म्हणून माझी आपणाला अशी नम्रतापूर्वक विनंती आहे, कीं, आपणां आईबापांनीं आपलें वजन आम्हाकरितां खर्च करावें अशी आपणाला भीड न घालतां, आम्ही आमची मागणी आपखुशीनें परत घेतों. यांत आम्हीं आपल्या घराण्याचा अपमान करतों असें समजूं नये. आपल्या तोंडून नकार घेण्यापेक्षां आम्ही आपल्या कन्येच्या तोंडून नकार घेतला, यांत आमची कदाचित् चूक झाली असेल; पण माणसाच्या हातून नेहमीं चूक होतच असते, हें आपण जाणत आहांच ! एकंदरींत आमचा हेतु अतिशय स्तुत्य होता, इतकें खास. आम्हाला योग्य पत्नी मिळून त्यांतल्यात्यांत तुमचा फायदा झाला तर हरकत नाहीं, असा आमचा अत्यंत उच्च हेतु होता; पण असा विचार मनांत आणण्यांत जर आमची कांहीं चूक झाली असेल, तर आम्ही अंतःकरणापासून आपली माफी मागतों !"

## प्रकरण एकविसावें.

### मंडळी एकाएकीं कां गेली ?

नीलकंठरावांच्या मागणीचा वादविवाद आतां बहुतेक थंडावला. मात्र सीताबाई मधून मधून एकाददुसरा त्रासिक शब्द ताराला लागण्या-सारखा इतरांनां बोलत असत, तेवढ्यानेंच ताराला वाईट वाटे इतकेंच. निलकंठरावांच्या वागणुकींत, आपलें प्रेम अशा तऱ्हेनें व्यर्थ गेलें याविषयीं मनाची हुरहुर अथवा उदासीनता यांपैकीं कांहींच न दिसतां, केवळ ते नाखूष होऊन जरासे फुगून गेले आहेत एवढेंच दिसत होतें. ते कोणाशींच फारसे बोलत नव्हते, व ताराबाईकडे तर पहातसुद्धां नव्हते. जणूंकाय तिचें अस्तित्वच त्यांच्या जगांतून नाहीसें झालें होतें. ताराबाईसुद्धां मंडळींत आली नसती, पण मालती आजच घरीं राह्यला होती ह्मणून तिलाहि बाहेर आल्याशिवाय चालण्यासारखें नव्हतें. मालतीच्या येण्याचा एक फायदा असा झाला, कीं, नीलकंठरावांचा रोष नाहीं असें एक माणूस त्यांनां बोलायला मिळालें, व तीहि त्यांचें भाषण मन लावून ऐकूं लागली. त्यामुळें इतरांनां बरीच मोकळीक झाली.

दुसऱ्याहि दिवशीं सीताबाईंचा घुस्सा कमी झाला नाहीं. तसाच नीलकंठरावांचाहि रुसवा मोडलासा दिसेना. ताराबाईला वाटलें होतें, कीं, ते आतां आपला मुक्काम कमी करून लवकर गाशा गुंडाळतील; पण तसा कांहीं रंग दिसेना. प्रथमपासूनच ते शनवारीं पहांटेस निघायचे होते, व अजूनहि त्यांचा तोच बेत कायम होता.

सकाळीं चहानंतर मुली शिवदुर्ग गांवाकडे जायला निघाल्या. थोरल्या दोघींनां घरांत करमत नव्हतें, व सुंद्रीहिरीला नागेशरावांची बातमी काढायची होती. मंडळी गांवांत शिरतात तोंच नागेशराव व दाणी दृष्टीस पडले, व सर्वच मंडळी भागवत वकिलांच्या घरीं मावशीबाईकडे गेली. तेथें नागेशराव ईव्हिनिंग पार्टीला कां आले नव्हते याविषयीं सुंद्रीनें विशेषें-करून, व इतरांनींहि त्यांनां पुनःपुनः विचारलें. व केवळ काम आल्यामुळें मला नाइलाजानें जावें लागलें, असें त्यांनीं इतरांनां सांगितलें. ताराबाईला मात्र त्यांनीं एकीकडे हळूच कबूल केलें, कीं, "जों जों तेथें जाण्याचा दिवस येत चालला, तों तों मला वाटूं लागलें, कीं, तिथें जाऊन भय्यासाहेबांनां भेटावें तें कांहीं ठीक नाहीं. तिथें जाऊन एकाच ठिकाणीं दोन तीन तास

घालवणें आपल्याच्यानें व्हायचें नाहीं; न जाणों त्यांचा आमचा खटकाविट्का उडाला, तर विनाकारण आपल्यामुळें सर्वांचा विरसच व्हायचा. ”

हा त्यांचा विचार तिला फारच नामी वाटला, व ती त्यांनां त्यामुळें जास्तच चाहूं लागली. नंतर जरा वेळानें मंडळी परतली तों नागेशरावहि त्यांच्या बंगल्यापर्यंत त्यांच्याबरोबर येतों म्हणाले. हा त्यांनीं आपल्याला विशेष मान दिला असें समजून ताराबाई विशेष खूष झाली, व तिनें आग्रह करून त्यांनां घरांत बोलावून वडलांशींहि परिचित करण्याची संधि साधून घेतली.

घरीं परत येऊन जेवणें होतांच शांताक्काच्या हातीं शिपायानें एक पत्र आणून दिलें; तेव्हां फक्त ताराबाई जवळ होती. तें आनंदभुवनांतून आलें होतें. उत्तम गुलाबी जाड पाकिटांत तसाच जाड कागद, वर रंगीत मोनोग्राम असलेला असा, सबंद चार बाजू भरलेला मजकूर स्त्रीच्या हातचा लिहिलेला असें तें पत्र होतें. तें वाचतां वाचतां शांताक्काची मुद्रा मध्येंच उतरली, असें ताराच्या लक्षांत आलें. शांताक्कानें तिला “चल आपल्या खोलींत जाऊं” असें म्हटल्यावरून दोघीहि तिच्या खोलींत गेल्या. नंतर शांता म्हणाली “कमलिनीचं हें पत्र आहे. तें वाचून मला भारी विलक्षण वाटलं. ती सारी मंडळी आज एकाएकीं इथून निघणार—आतां निघून गेलीसुद्धां असतील. आज संध्याकाळीं तीं जेवायला पुण्यास पोंचणार, अन् पुन्हां इकडे चार महिने यायचा विचार नाहीं, असं ती लिहिते आहे; मी तुला तें वाचूनच दाखवते ऐकः— ‘आतां एकदम इथून निघून सर्वांनींच पुण्याला भाऊसाहेबांच्याकडे जावें, असें ठरलें आहे; आज संध्याकाळीं आम्ही ताईच्या वाड्यांत पुण्यांत मुक्कामाला पोंचूं. असें अवचित जाणें झालें म्हणून मला आपला प्रत्यक्ष निरोप घ्यायला फुरसत मिळत नाहीं, यामुळें अत्यंत परमावधीचें दुःख होत आहे. आपणाशिवाय या गांवांत मला कोणीहि प्रिय माणूस नाहीं, हें मी लिहून दाखविलें पाहिजे असें नाहीं. मला रोज दहादां आपली आठवण झाल्याशिवाय राह्यचीच नाहीं. पुढेंमागें केव्हां तरी आपली भेट होऊन आपल्या प्रेमळ सहवासाचा पोटभर लाभ कधीं होईल तो सुदिन. मी त्याची अगदीं चातकासारखी वाट पहात राहीन. तोंपर्यंत वारंवार पत्रद्वारें तरी भेट होईल अशी अत्यंत आशा आहे. ”

ताराबाईला ही केवळ नाटकी भाषा वाटली. मंडळी अवचित कां जावी हें जरी तिला चमत्कारिक लागलें, तरी त्यांत मनाला लागून घेण्यासारखें

कांहीं तिला वाटलें नाहीं. कारण, मंडळी गेली म्हणून खुद्द भाऊसाहेब परत यायचे राहतील, असें तिला वाटेना. अथवा इतर मंडळी असली काय नसली काय, आपणाला एकच, असा तिचा समज होता. ती म्हणाली "ही मंडळी जायच्या आधीं औपचारिक रीतीनें आपणाला त्यांचा निरोप घेतां आला नाहीं, तें कांहीं चांगलं नाहीं झालं. पण कमलिनीला वाटतं आहे त्यापेक्षां कदाचित् फार अगोदर तिचीन् तुमची गांठ पडून तुमचा 'प्रेमळ सहवास तिला मिळेल' अशी आपण अपेक्षा कां करूं नये? इतकंच तर काय, तिला म्हणावं, कीं, नुसत्या मैत्रिणीपेक्षां नणंदाभावजयांच्या नात्यानं तो प्रेमळ सहवास जास्तच प्रेमळ होऊन जाईल, असा संभव आहे. कारण, अलबत त्या भाऊसाहेबांनां तर कांहीं अडकवून ठेऊं शकत नाहींत?"

शांताबाई म्हणाली "ती तर स्पष्ट लिहिते आहे, कीं, आम्ही कोणीच चार महिने तरी परत येत नाहीं. तेंहि तुला वाचून दाखवतें पाहिजे तरः— 'काल भाऊसाहेब येथून गेले तेव्हां त्यांनां वाटलें होतें, कीं, दोनतीन दिवसांत त्यांचें काम आटपेल; पण आम्हांला माहीत आहे, कीं, असें उभ्या उभ्या तें कधीं होणें नाहीं, त्याला दहापंधरा दिवस तरी लागतील. शिवाय त्यांचा स्वभाव असा आहे, कीं, एकदां तिथें ते स्थिरस्थावर झाले, कीं, मग त्यांनां पुन्हां मुक्काम हलवणें आवडत नाहीं. म्हणून आम्हींच सर्वांनीं तिकडे जायचें ठरवलें आहे. तेथें आमच्या अनेक मैत्रिणी आहेत. आपण जर चार महिने याल तर काय बहार होईल! पुण्यांत या चार महिने सीझन असतो; त्यामुळें नानातऱ्हेची मौज असते. पण आपण येणें कांहीं शक्य दिसत नाहीं, तेव्हां मी एवढेंच म्हणतें, कीं, आपणाला दसरा दिवाळी पूर्ण सुखाची होवो. यावरून उघडच झालं, कीं, दिवाळीपर्यंत ते कांहीं येत नाहींत!"

ताराबाई म्हणाली "यावरून इतकंच उघड झालं, कीं, कमलिनीच्या मनांतून त्यांनीं येऊं नयेसं आहे! जास्त कांहीं नाहीं!"

शांताबाई म्हणाली "असं कसं म्हणतेस? हें सारं त्यांच्याच संमतीनं असलं पाहिजे. त्याशिवाय कसं असं ती लिहील? पण यांत कांहीं तितकं नाहीं. मला जें विशेष बोंचतं आहे तें आतां तुला वाचून दाखवतें. तुझ्यापासून कशाला चोरायचं? 'भय्यासाहेबहि बहिणीकडे जायला उतावळे झाले आहेत. किंवा वास्तविक म्हटलं तर, आम्ही सारींच तिला कधीं भेटूं असें म्हणतों आहों. सरला-

देवीसारखी सुस्वरूप, मनामिळाऊ व सर्वगुणसंपन्न स्त्री त्रिभुवनांत क्वचितच सांपडेल. अन् आम्हां बहिणींचें जें तिच्यावर प्रेम आहे तें हल्लीं जरी निवळ मित्रत्वाचं आहे, तरी आमची उत्कट आशा आहे, कीं, लवकरच त्याचं रूपांतर होऊन आम्ही तिला वहिनी म्हणण्याचा सुयोग परमेश्वरकृपेनं येईल. मी ही गोष्ट पूर्वीं कधीं आपणाला बोललें होतें कीं नाहीं, तें मला आठवत नाहीं; पण भाऊसाहेबांचं तिच्याकडे भारी लक्ष असल्याचं स्पष्ट दिसत असतं. आतां तर तीहि पुण्याला येईल अन् मग दोघांचा जास्त सहवास होऊं शकेल. अशा तऱ्हेनं भाऊसाहेबांच्या व तिच्याहि आप्तजनांनां अत्यंत इष्ट असा संबंध घडून यावा अशी सर्वांची परमेश्वराजवळ प्रार्थना असणं साहजिकच आहे. कारण, त्यांच्या इतका योग्य जोडा पाहूं गेलं तरी आढळणार नाहीं. असाच तो संयोग घडून येणार आहे."

शांता पुढें म्हणाली "पाह्यलंस तारा ! आतां अगदीं स्पष्ट नाहीं कां झालं ? याचा अगदीं असा स्पष्ट अर्थ नव्हे का, कीं मी तिची भावजय व्हावं अशी कमलिनीची कल्पना नाहीं, इतकंच तर काय, इच्छाहि नाहीं ! तिला स्पष्ट दर्शवायचं आहे मला, कीं, तिच्या भावाचा हेतु मजकडे बिलकुल नाहीं. आणि माझा तसा कांहीं हेतु असल्याची तिला शंका आल्यावरून ती मला—अगदीं चांगल्या हेतूनं—इशारा देऊन सावध करते आहे या पत्रानं, कीं, तूं कसल्या भलत्याच भ्रमांत आहेस ? बोल, तारा, या तिच्या अर्थाविषयीं मतभेद होणं शक्य आहे का ?"

ताराबाई म्हणाली "हो. शक्य आहे तर काय झालं ? कारण माझं मत अगदीं भिन्न आहे. सांगूं का तुम्हांला ?"

शांताबाई म्हणाली "हो हो, खुशाल सांग."

ताराबाई म्हणाली "मी अगदीं तें थोडक्यांत सांगतें पहा. मी या पत्राचा असा अर्थ करतें, कीं, कमलिनींच्या लक्षांत तुमच्यावरचं भाऊसाहेबांचं प्रेम स्पष्टपणं आलं आहे. पण तिची इच्छा अशी आहे, कीं, त्यांचं लग्न सरलादेवीशीं व्हावं. म्हणून ती भावाच्या मागोमाग पुण्यास निघून जाते, व भावाला तिकडेच राहून घेण्याचा प्रयत्न करते, आणि इकडे तुम्हाला भासवते, कीं, त्यांचं तुमच्याकडे मुळींच मन नाहीं !"

शांताला ही विचारसरणी पटेनाशी स्पष्ट दिसली. ती मान हालवून तसें दाखवूं लागली. त्यावर तारा पुढें म्हणाली "मी तुम्हाला सांगतें, आक्का,

अगदीं अस्संच आहे तें. ज्यानं म्हणून कोणीं तुम्हां दोघांनां एकत्र पाहिलं असेल त्याला भाऊसाहेबांच्या मनाविषयीं शंका राह्यचीच नाहीं. ज्याला त्याला तें स्पष्टच दिसत होतं, अन् तें कमलिनीला दिसलं नसेल हें केवळ अशक्य आहे; इतकी कांहीं खास ती भोळी नाहीं. त्यांचं तुम्हांवर जेवढं प्रेम दिसतं त्याच्या निम्यानं जरी तिच्या स्वतःवर भय्यासाहेबांचं दिसलं असतं, तर तिनं लग्नाचं आपलं साहित्यसुद्धां करायला केव्हांच सुरु केलं असतं, छे छे, तें नाहींच. मला जें दिसतं आहे तें हें, कीं, त्यांच्या दृष्टीनं आपण मुळींच श्रीमंत किंवा खानदानीचीं नाहीं आहोंत. दुसरा एक हेतु सरलेचं अन् भाऊसाहेबांचं लग्न जमावंसं वाटण्यांत कमलिनीचा असा असेल, कीं, एक लग्न जमलं म्हणजे त्याच घराण्याशीं आपलं स्वतःचंहि लग्न जुळणं जास्त संभवेल. या असल्या विचारांत मोठं धोरण व धूर्तता आहे खरी, पण मधें एक लचांड श्रीमंत राणी माईसाहेबांच्या इंदुमतीदेवीचं आहे ना ? तें नसतं तर कदाचित् कांहीं वळलं असतं. तें असो म्हणा. पण आक्का, कमलिनी तुम्हाला सांगते, कीं, भाऊसाहेबांचं लक्ष सरलेकडे आहे, एवढ्यावरून तुमचं मन जें तुह्माला त्यांच्याविषयीं स्पष्ट सांगत आहे तें तुम्ही खोटं मानणार कीं काय ? किंवा कमलिनीची तशी इच्छा आहे एवढ्यावरून भाऊसाहेब तरी आपलं स्वतःचं मन मोडून कमलिनीच्या मैत्रिणीवर प्रेम करायला लागतील इतके का ते तिच्या मुठींत आहेत असं तुह्माला वाटतं ? ”

शांताबाई म्हणाली “ कमलिनीविषयीं आपल्या दोघींचं जर सारखंच मत असतं, तर हें तुझं ह्मणणं मीं कबूल केलं असतं. तुझ्या मतानं कमलिनी इतका लपंडाव करून लावालावी करणारी आहे; मला तसं मुळींच वाटत नाहीं. म्हणजे तुझ्या या अर्थाचा मूळ पायाच चुकीचा आहे. कमलिनी कधींहि मुद्दाम कोणाला अशी खोटं खोटं सांगून फसवायची नाहीं. मला थोडीशी आशा एवढीच दिसते आहे, कीं, तिची स्वतःचीच अशी चुकीची समजूत झालेली असावी, कीं, भाऊसाहेबांचं माझ्यावर प्रेम नाहीं. ”

ताराबाई म्हणाली “ बरं, तसं कां होईना ! मी म्हणतें तें तुम्हाला नाहीं पटत, तरी ही तुमची कल्पना मला पटते आहे. मी म्हणतें तशी ती तुम्हाला जाणूनबुजून फसवीत नाहीं असं जरी धरलं, आणि ती स्वतः चुकते आहे असंहि मानलं, तरी आपलं कार्य झालं. मग तुम्हाला त्या पत्रावरून वाईट

वाटायचं आतां कांहीं कारण राहिलं नाहीं, अन् कमलिनीलाहि लबाड म्हणायला नको. ”

शांताबाई म्हणाली “ तें खरं, पण हें पहा तारा, माझ्याशीं त्यांचें लग्न होऊं नये अशी जर त्यांच्या आप्तइष्टांची खरोखरच इच्छा असेल, तर मला तरी त्यांच्याशीं लग्न लावून घेण्यांत सुख होईल का ? ”

ताराबाई म्हणाली “ हा प्रश्न तुमचा तुम्हींच सोडवला पाहिजे आक्का ! भाऊसाहेबांशीं लग्न लावून तुम्हाला होणारा आनंद, तुमच्या दृष्टीनं त्यांच्या बहिणीला त्या लग्नानं जें दुःख होईल त्या दुःखापेक्षां जर कमी असला, तर बेलाशक तुम्ही लग्नाचा विचार सोडून द्या, अशी मींच तुम्हाला शिफारस करीन ! ”

शांताबाई हंसत म्हणाली “ हें काय तुझं म्हणणं ? त्यांच्या बहिणी नाखुष झाल्या, म्हणून मला जरी वाईट फार वाटेल, तरी त्यामुळं मी मागें कसं घेईन ? ”

ताराबाई म्हणाली “ झालं तर मग ! मग एवढं त्या पत्राचं तुम्हाला काय वाटून राह्यलं आहे ? ”

शांताबाई म्हणाली “तें खरं ! पण भाऊसाहेब इकडे कधीं आलेच नाहींत तर मग ? चार महिन्यांत पुण्यांत कितीक तरी घडामोडी होऊन जातील. ”

ताराबाई म्हणाली “ मला मुळीं स्वप्नांतसुद्धां तें कधीं खरं वाटायचं नाहीं, कीं, ते इकडे येणार नाहींत. ही केवळ कमलिनीची इच्छा आहे; पण असल्या इच्छेला ते भीक घालतील असं मला तरी वाटत नाहीं. त्या बहिणींनीं किती जरी युक्त्या केल्या, अथवा लपंडाव लढवले, तरी त्यांच्यापुढें तें सारं फिक्कं पडलंच पाहिजे. तुम्ही अगदीं ही भीति हांकून द्या मनांतून. ”

अशा तऱ्हेनें ताराबाईनें पुष्कळ सांगितल्यावर शांताच्या मनाची खात्री होऊं लागली. तिचाहि स्वभाव विनाकारण दुःखमय कल्पना करीत बसणारा नव्हता. अखेर तिचें पूर्ण समाधान झालें. इतकें मात्र ठरलें, कीं, यांतलें घरांत कोणाला विशेष कांहीं न सांगतां इतकेंच कळवावें, कीं, सारी मंडळी आज पुण्याला निघून गेली. पण तेवढेंच कळल्याबरोबर सीताबाईंना कसेंसेंच वाटूं लागलें. कितीक वेळ त्या आश्चर्य, काळजी, उद्वेग, राग वगैरे नाना-प्रकारच्या विकारांनां उद्गार देत होत्या. नंतर कांहीं वेळानें त्यांच्या मनांत विचार आला, कीं, “ जरी मंडळी गेली तरी भाऊसाहेब एकटे खास येतील,

व ते एकटेच आले तर एक प्रकारें तेंहि जास्त चांगलें. कारण, मग वारंवार त्यांनां आपल्या घरीं जेवायला ठेवून घेतां येईल. अशा वेळीं आपण आपल्या घरच्या सुग्रणपणानें अगदीं त्यांनां दिपवून टाकूं, व निदान दोन तरी पक्वान्नें केल्याशिवाय जेवण सुनें जाऊंच देणार नाहीं. ''

या शेवटच्या कल्पनेनें सीताबाईचें विशेष समाधान झालेंसें दिसलें !

---

## प्रकरण बाविसावें.

### नीलकंठरावांचें नवीन संधान !

त्या दिवशीं संध्याकाळीं नगरकरांच्या घरची मंडळी रावबहादुरांच्या घरीं फराळाला गेली होती. आनंदराव तेवढे गेले नाहींत; पण रावबहादुरीणबाईच्या विशेष आग्रहावरून नीलकंठरावहि गेले होते, व आजहि ते बहुतकरून मालती शिवाय दुसऱ्या कोणाशीं फारसे बोलत नव्हते. ती त्यांच्याशीं लक्ष देऊन बोलते हें ताराबाईला फार बरें वाटलें, व तसें तिनें मालतीला बोलूनहि दाखविलें. ''या तुझ्याशीं बोलण्यासंवरण्यानं ते बरे खुशींत असतात, अन् सर्वांनां मन-मोकळं होतं. तूं तरी बरी एक आम्हांला या अडचणींत मिळालीस.''

मालती यावर म्हणाली ''मला कांहीं त्यांत मी विशेष करतेंसं वाटत नाहीं. तुमच्या उपयोगी मी पडत असलें तर उत्तमच आहे. ''

पण मालतीचा हेतु ताराबाईच्या उपयोगी पडण्यापुरताच केवळ नसून, त्यांतल्या त्यांत आपल्यालाहि उपयोग करून घेण्याचा होता, ही कल्पना ताराच्या मनांत आली नव्हती. कालची बातमी ऐकल्यापासूनच तिच्या मनांत कल्पना उद्भवली होती, कीं, अनायासानें मोकळें राहिलेलें हें स्थळ मिळवण्याचा आपण कां प्रयत्न करूं नये ? म्हणूनच कालपासून मालती मुद्दाम तशी वर्तणूक ठेवूं लागली होती, व आजचा रावबहादुरीणबाईच्या घरचा फराळाचा घाईनें केलेला बेत खरोखरी नीलकंठरावांकरितांच होता. आणि रुसलेले नीलकंठराव, राव-बहादुरीणबाईच्या या विशेष आग्रहाच्या आजच्या आमंत्रणामुळें, व तेथें गेल्या-वर एकंदर माणसांनीं केलेल्या सन्मानामुळें, इतके खूष होऊन गेले, कीं, तारा-बाईनें दिलेल्या नकाराचा सूड उगाविण्याची ही एक आपणाला योग्य संधि आली आहे असें त्यांनां वाटलें. जरी ते नवीन प्रचारांत आलेल्या मिश्र समा-जांतल्या प्रौढ विवाहाच्या उत्तम पद्धतीप्रमाणें बाह्यतः वागण्यास तयार होते,

तरी त्या पद्धतीचा केवळ आत्मा—म्हणजे तरुण स्त्रीपुरुषांनीं एकमेकांच्या स्वभावाची पारख करून आपल्या स्वभावास जुळेल अशी निवड करणें—हा त्यांनां मुळींच कळला नव्हता. एकीनें नाहीं म्हटलें कीं एकदोन दिवसांत दुसरीनें आपणास पतकरिलें असें जर आपण पहिलीला दाखवूं शकलों तरच आपली शिताफी, व तरच आपला पुरुषार्थ, असा त्यांचा समज होता; आणि तसें आपल्या हातून झालें तर आपण पहिलीची खूप फजिती उडविल्यासारखें होईल, असें त्यांनां वाटत असे. ज्याप्रमाणें आपल्या समजांत निवळ बालविवाह चालू असत त्या वेळीं, आपल्या मुलाला देऊं केलेली मुलगी तिच्या आईबापांनीं आयत्या वेळीं कांहीं कारणांमुळें देत नाहीं म्हटलें असतां, जसा मुलाच्या आईबापांनां अत्यंत राग येई, व "आमच्या मुलाचें लग्न आम्ही त्याच मुहूर्तावर ठोकूं, आम्हांला काय मुली कमी आहेत!" अशी प्रतिज्ञा करून, ती तडीस नेण्यांत त्या आईबापांनां धन्यता वाटत असे, त्याचप्रमाणें ताराबाईनें नाहीं म्हणतांच "मालतीनें मला एका पायावर हां हां म्हणतां पत्करिलें आहे," असें विजयाच्या मुद्रेनें ताराबाईला व तिच्या आईबापांनां सांगतां येण्यांत अत्यंत धन्यता मानणारा नीलकंठराव होता. ह्मणून मालती जरी ताराबाईच्या मानानें स्वरूपानें अगदींच टाकाऊ होती, व काल सकाळीं ताराबाईनें नकार देईपर्यंत मालतीकडे त्यानें लग्नाच्या दृष्टीनें एक क्षणमात्रहि कधीं पाहिलें नव्हतें, तरी अवघ्या एका दिवसांत—अथवा खरें ह्मटलें तर अवघ्या दोन तासांच्या अवधींत—तो तिच्याकडे अर्थपूर्ण दृष्टीनें पाहूं लागला होता. अर्थात्च मूळ ताराबाईवरहि जर प्रेमाच्या नांवानें त्याच्याजवळ आंवळ्या एवढें पूज्य होतें, तर मालतीवरहि त्याहिपेक्षां कमी असणें हें उघडच आहे! नीलकंठरावाच्या डोक्यांत "प्रेमामुळें लग्न करणें," या कल्पनेला मुळींच उदय नसून, "आधीं लग्न व मागून नशिबानें उत्पन्न झालें तर प्रेम" अशी बालविवाहाला योग्य अशीच समजूत वसत असे, व ह्मणूनच मालतीचें वर्तन थोडेंसें बोटचेपें असल्याचें दिसून येतांच, तोहि त्या दिशेनें जास्त प्रयत्न करूं लागला होता. व इतक्यांतच इतकीं सुचिन्हें मालतीला दिसूं लागलीं होतीं, कीं, नीलकंठराव परवांच जर परत सुवर्णपुराला जाण्याला निघायचे नसते, व आणखी दोनचार दिवस जर त्यांचा मुक्काम इकडे असता, तर त्यांच्यांकडून मागणी होऊन आपण तिचा स्वीकारहि करून टाकला असता, असें तिला वाटूं लागलें होतें!

पण एकदां निश्चय मनांत ठाम केल्यावर, तो ताबडतोब अमलांत आणण्याची तडफ, वेदाभ्यासजड अशा दिसणाऱ्या नीलकंठरावांच्या अंगीं किती पूर्णपणें भरलेली होती, त्याची मालतीला कोठून कल्पना असणार ? दुसऱ्या दिवशीं सकाळीं चहा झाल्याबरोबर त्या तडफीमुळें नीलकंठराव कोणाला कळूं न देतां शांतिसदनांतून हळूच निघाले, ते थेट लुकाश्रमाकडे सरकले. शांतिसदनांत कोणाला कळूं न देण्याचा त्यांचा हेतु असा, कीं, आपण लुकाश्रमाकडे गेलों आहों असें जर कोणाला समजलें, तर तें मालतीला मागणी घालायलाच गेलों असलों पाहिजे, हें लोक खास ओळखतील. कारण चोराच्या मनांत चांदणें ! म्हणून त्यांची इच्छा अशी होती, कीं, आपल्या मागणीचा स्वीकार झाल्याची वार्ता सांगतां येण्यापूर्वीं, आपण मागणी करणार आहोंत ही कोणाला कल्पनाच होऊं नये. मागणीचा स्वीकार मालतीकडून नव्याण्णव हिश्शानीं होईल, अशी त्यांनां तिच्या दोन दिवसांच्या वर्तनावरून खात्री वाटतच होती. पण एकदां ताराबाईनें अद्दल घडविली असल्यामुळें "दुधानें तोंड पोळल्यावर ताकहि फुंकूनच प्यावें" या न्यायानें, त्यांच्या मनानें ते सावधगिरी करीत होते. पण त्यांची उत्कृष्ट संभावना झाली. त्यांनां येतांना मालतीनेंच प्रथम वरच्या एका खिडकींतून दुरून पाहिलें, व त्यांची अकस्मात् व अवचित गांठ पडण्याकरितां तीहि त्याच बाजूच्या बागेंत फिरत फिरत गेली. पण आपणापुढें या घटकेला प्रेमाच्या भाषणांचा एवढा मोठा पूर लोटणार आहे अशी तिला कल्पनाहि झाली नव्हती. त्या पुरांतून बाहेर पडल्यावर तीं दोघें घराकडे जात असतां दोघांच्याहि संमतानें सर्व कांहीं ठरून गेलें. मात्र तिच्या "आईबापांनीं मुहूर्त नेमायचा तो या ज्येष्ठांतच अवश्य अवश्य नेमून घेऊन मजला सर्वस्वीं आनंदसागरांत यथेच्छ पोहत राहण्यास मोकळीक व्हावी," अशी नीलकंठरावांनीं इच्छा प्रदर्शित केली. अर्थात्च ती गोष्ट मालतीलाहि अत्यंत इष्टच होती. ज्याप्रमाणें विद्यार्थ्यांच्या परीक्षेचे कागद लिहून झाल्यापासून तों परीक्षेचा निकाल लागेपर्यंतचा काळ, त्यांनां अत्यंत सुखाचा असतो, त्याचप्रमाणें प्रौढ विवाहाच्या पद्धतींत पुरुषानें केलेली मागणी स्त्रीनें स्वीकारल्या दिवसापासून तों दोघांचा विवाहविधि साजरा होईपर्यंतचा काळ, तरुण जोडप्याला अत्यंत अत्यंत आनंदमय असा साधारणतः असतो. कारण त्या काळांत आपल्या मनाला इष्ट अशी निवड झाली असल्यापासून होणारा आनंद, त्याच्या

नवीनपणामुळें विशेष आल्हाद्कारक असतो, व लग्नविधि उरकल्यानंतर उत्पन्न होणाऱ्या ससारांतील हजारों लहान मोठ्या अडचणींचा त्या काळांत लेशहि ठाऊक नसतो. अशा प्रकारामुळें मागणीपासून लग्नापर्यंतचा काळ होतां होईल तोंवर कमी होऊं नये अशी नेहमीं तरुण विवाहेच्छु जोड-प्यांची इच्छा असते. पण नीलकंठरावांच्या चमत्कारिक कल्पनांमुळें त्यांनां ज्याप्रमाणें प्रौढ विवाहाचा आत्मा समजला नव्हता, त्याच कारणांमुळें या मधल्या आनंदमय काळाचेंहि स्वारस्य त्यांनां समजणें अशक्य होतें ! अर्थात्च तो काळ जितक्या लवकर संपेल, तितका त्यांनां पाहिजे होता. किंबहुना ज्याप्रमाणें बालविवाह समाजांत रूढ असतांना जी बहुशः मुलां-मुलींच्या आईबापांची इच्छा असे, कीं, "एकदां लग्न निश्चित झाल्यावर विलंब न लावतां झटकन् बार उडवून द्यावा," तशीच इच्छा नीलकंठरावांची होती. त्यांच्या सुदैवानें मालतीचीहि तशीच इच्छा होती; कारण नीलकंठ-रावांच्या अचरटपणाच्या भाषणांनीं व तसल्याच वर्तनानें भरलेला काळ जास्त वाढावा अशी तिची इच्छा कशी असूं शकणार ? आपल्यासारख्या कुरूप स्त्रीला नीलकंठरावांइतक्या स्थितींतल्या तरी माणसाकडून पुनः मागणी होते कीं नाहीं, याचा दृढ संशय वाटल्यावरूनच केवळ तिनें नीलकंठ-रावांनां स्वीकारलें होतें. अर्थात्च अशा हेतूनें स्वीकारलेला नवरा जितक्या लवकर आपल्या पदरांत पडून आपल्या स्वतःच्या संसारास सुरुवात होईल, तितकी तिला इष्टच होती !

घरांत शिरल्याबरोबर नीलकंठरावांनीं रावबहादुरांच्या खोलींत जाऊन त्यांची अनुमति मागितली, व इकडे मालतीनें आईलाहि विचारली. दोघेंहि आपली संमति अत्यंत आनंदानें देतील यांत मुळींच शंका नव्हती. राव-बहादुरांजवळ द्रव्यसंचय बराच असल्यामुळें, मालतीच्या लग्नाकरितां पांच हजारांपर्यंत खर्च करण्याची त्यांची खुशी होती, व यांच्या लहानपणीं बाल-विवाह होत असत तसे जर हल्लीं प्रचलित असते, तर मालती काळीसांवळी व कुरूप असूनहि, येवढ्या रकमेंत त्यांनीं आपल्या लेंकीला फांकडा नवरा सहज मिळवून दिला असता. पण प्रौढविवाहपद्धति प्रचलित झाल्यामुळें बापाच्या द्रव्यानें कुरूप मुलीला नवरा विकत घेणें, बहुतेक अशक्य झालें होतें, व म्हणूनच मालतीला विसावें वर्ष संपलें असूनहि ती अजून कुमा-रीच राहिली होती. रावबहादुर श्रीमंत झाले म्हणून काय पांचपंचवीस हजार

रुपये जांवयास देऊन त्याचें जन्माचें दारिद्य घालविण्यास थोडेच समर्थ होते ? त्यामुळें मध्यम स्थितींतल्या तरुणांनां एकदोन हजारांची लालुच कुरूप मुलगी स्वीकारण्यास मुळींच पुरत नसे. मालती आजन्म अविवाहित राहते कीं काय, अशी आईबापांस काळजी लागून राहिली होती. ती अशी अचानकपणें घरीं बसल्या जांवई चालत येऊन दूर झाली, ही बातमी त्यांच्या कानांनां अमृतासारखी गोड लागली, यांत नवल तें काय ? कारण नीलकंठरावांची आजचीच स्थिति किती तरी त्यांच्या कल्पनेच्या बाहेर चांगली होती. तरुण, प्रथम वर, बेतापुरतें उत्पन्न असलेला, व सुवर्णपुरकर राणीसाहेबांच्या पदरीं मान्यतापूर्वक राहणारा, असा जांवई आपणांस मिळेल असें त्यांनां अलीकडे स्वप्नांत देखील वाटेनासें झालें होतें. पण या सर्व गोष्टी आज प्रत्यक्ष असून शिवाय आणखी आनंदरावांच्या पश्चात् त्यांची सर्व इस्टेट नीलकंठरावांनां मिळणार होती. मग रावबहादुरांनां परमानंद झाला हें उघडच आहे. त्यांच्या बायकोला तर दोन बोटें स्वर्ग उरला. आनंदराव फार तर आणखी किती दिवस जगतील या प्रश्नाला आजपर्यंत कधीं नव्हतें इतकें त्यांच्या दृष्टीनें महत्त्व येऊन, नवराबायकोंत त्याचा खल होऊं लागला. धाकट्या लेंकीला आतां स्वतःच्या लग्नाची जास्त उमेद येऊं लागली, व धाकट्या भावाला " आतां मालुताई कांहीं खासबेगम रहात नाहीं " अशी खात्री होऊन, तिला चिडविण्याची एक जंमत नाहींशी होणार म्हणून वाईट वाटूं लागलें !

मालतीचे स्वतःचे विचार अत्यंत आनंदाचे जरी नसले, तरी बहुतांशी ते समाधानकारक असेच होते. दोन दिवसांपूर्वीं बिलकुल ज्याची वार्ताहि नव्हती ती गोष्ट आज आपण हस्तगत करून बसलों; दुसऱ्याच्या भांडणापासून आपणाला, हा अचानक लाभ झाला, त्यांत आपल्याहि धूर्ततेला बरेंच श्रेय दिलें पाहिजे, असें वाटून आपल्या प्रसंगावधानाचें तिला एक प्रकारचें कौतुक वाटूं लागलें होतें. आतां, नीलकंठराव मोठेसे चतुर अथवा मोहक माणूस होते, असें नाहीं. इतकेंच नव्हे, त्यांच्या लांबलचक भाषणांचा कोणालाहि लवकर कंटाळा येईल हें उघड होतें. त्याचप्रमाणें त्यांनीं आपणावर जो प्रेमाच्या शब्दांचा वर्षाव केला, तो केवळ शाब्दिक असून नाटकांतील नायकाच्या मनांत नाटकांतील नायिकेवर जितकें प्रेम असतें, तितकेंहि आपणांवर नीलकंठरावांच्या अंतःकरणांत प्रेम होतें कीं नाहीं, याचा वानवाच

होता, हें मालती पूर्णपणें जाणून होती. ती जरी ताराबाईपेक्षां स्वरूपानें फार कमी होती, तरी बुद्धीनें तिच्याबरोबर होती, व तिच्याप्रमाणें पुस्तकें वाचून वगैरे तिनें आपली नैसर्गिक बुद्धि प्रगल्भ केलेली होती, व म्हणूनच तिचें ताराबाईशीं इतकें सख्य होतें. ताराबाईच्या नजरेला नीलकंठरावामध्यें जे दोष दिसले होते, ते म्हणजे मालतीला दिसले नव्हते असें थोडेंच होतें ? परंतु जन्मभर कुंवारीणपणांत दिवस घालविण्यापेक्षां, आपला आपल्याला कसा बसा कां होईना, पण स्वतःचा संसार असावा, अशी तिची फार इच्छा होती. उघडच आहे. वडील व मातुश्री आहेत तोंवर जरी आपली दैना झाली नाहीं, तरी त्यांच्या मागें धाकट्या भावाच्या व त्याच्या बायकोच्या अंगावर आपण ओझें होऊन रहावें, हें तिला मुळींच पसंत नव्हतें. अथवा भावाला सोडून स्वतःच्या श्रमानें मास्तरणीचा किंवा डाक्तरणीचा धंदा करून जरी अब्रूनें पोट भरून दिवस काढले, तरी नुसतें एक पोट भरलें म्हणजे जीविताचें साफल्य झालें, अथवा मुलांबाळांच्या अमूल्य प्रेमास मुकल्याचें दुःख, चार पैसे मिळवून पोट भरल्यानें नाहींसें होईल, असें मानणारी मालती नव्हती. अशा कष्टमय, प्रेमशून्य स्थितींत, सारा जन्म घालवण्यापेक्षां थोडासा मंद बुद्धीचा कां होईना, पण आपल्या हक्काचा नवरा मिळून, स्वतःचा संसार थाटण्यांत आपण फार इष्ट अशी गोष्ट मिळविली, असें तिचें मत होतें. आपल्याला श्रीमंती अगर स्वरूप अथवा गौरवर्ण नसतां, या सर्वांच्या योगानें प्राप्त होणारें जें गृहसौख्य, तें आपण आज साध्य करून घेतलें, त्यांत नीलकंठरावांच्या डोक्यांत थोडीशी कमी अक्कल असल्यानें म्हणण्यासारखी गौणता आली, असें तिला कधींहि वाटलें नव्हतें.

अशा प्रकारच्या समाधानकारक विचारांत तिला एकच गोष्टीची काळजी वाटत असे, ती ही, कीं, आपल्याला ताराबाई काय म्हणेल ? आजपर्यंत पंचवीसदां आपल्या वादविवादांत आपण तिच्याशीं जें जें बोलत आलों, व तिच्याप्रमाणें जगांत कुठेंहि अचरटपणा दिसून आला असतां तिच्याबरोबर पोटभर हंसून करमणूक करून घेत होतों, त्या आपणच नीलकंठरावासारख्या अचरट माणसाशीं जन्म घालविण्यास तयार झालों, याविषयीं ताराबाई किती आश्चर्य करील ? या एका गोष्टीनेंच मात्र तिच्या समाधानाला जरासा धक्का बसे. जरी आपण टाकलेलें पाऊल अगदीं योग्य आहे अशी आपण तिची वादविवादानें खात्री करून देऊं असें मालतीला वाटत होतें, निदान

तिची जरी आज खात्री झाली नाहीं, तरी आपणाला तरी आपण चुकलों असें कदापि वाटणार नाहीं, अशी तिची खात्री होती. तरी ताराबाईला ही आपण केलेली गोष्ट आपणाकडूनच प्रथम समजावी, असा तिनें निश्चय केला. ह्मणून नीलकंठराव परत अकरा वाजतां शांतिसदनांत जाण्याला निघाले तेव्हां तिनें, यापैकीं तेथें आपण कांहींच सांगूं नका अशी त्यांनां फार आग्रहानें विनंति केली. ही विनंति मान्य करणें त्यांनां किती जड गेलें असेल याची सहज कल्पना करता येईल. कारण दोन दिवसांत लगबग करून मालती-सारखी कुरूप बायको पत्करण्यांत त्यांचा एक बराच महत्त्वाचा हेतु, ताराबाईला व तिच्या इतर मंडळीला मोठ्या विजयाच्या मुद्रेनें ही गोष्ट आपण सांगून थक्क करून सोडूं, किंबहुना इतकें उत्कृष्ट स्थळ विनाकारण हातचें घालविल्या-बद्दल हळहळ वाटायला लावूं, असा होता. या विशिष्ट हेतूवर मालतीची विनंति केवळ मूलेकुठारःच होती. घराकडे जायला निघतांना घरीं पोंचलों म्हणजे आपण अशी मौज करून घेऊं असे मांडे मनांत खाणाऱ्या नीलकंठ-रावाला ही विनंति मान्य कशी व्हावी ? पण आपल्या नुकत्याच मिळविलेल्या "प्रियपत्नीची" ही अगदीं पहिलीच विनंति अमान्य तरी कशी करावी, असा विचार करून त्यानें केवळ नाइलाजानें मालतीचें म्हणणें मोठ्या कष्टानें कबूल केलें. पण ते घरीं पोंचतात तों सुंद्रीनें त्यांनां नाना प्रकारचे प्रश्न करून इतकें भंडावून सोडलें, कीं, कितीकदां तरी आपली गुप्त गोष्ट अगदीं त्यांच्या जिभेवर आली, पण ती परत फिरवितांना त्यांनां कोण प्रयास पडले असतील, तें त्यांचें त्यांनांच माहीत !

जेवणानंतर बराच पाऊस पडूं लागला त्यामुळें कोणालाच बाहेर जाणें शक्य नव्हतें. नीलकंठराव आपली आटपाआटपी करूं लागले. आज त्यांचें मन प्रसन्न झालें असल्यामुळें दोन दिवस स्पष्ट दिसत असलेला त्यांचा रुसवा आज पार नाहींसा झाला होता. ते दुपारीं चहाच्या वेळीं मन मोकळें असल्या-प्रमाणें हंसत खेळत होते. रात्रीं जेवणें झाल्यानंतर त्यांनीं सीताबाई व त्यांच्या लेकींचे मोठ्या आदरपूर्वक निरोप घेतले. कारण पहांटे तीन वाजतां निघून त्यांनां दोन कोस स्टेशनावर जाऊन पांचाची गाडी साधायची होती. इतक्या पहांटे आपणाकरितां उठण्याची स्त्रियांनां तसदी देणें त्यांनां बिलकुल पसंत नव्हतें. म्हणून त्यांचा निरोप घेण्याचा विधि रात्रींच उरकून घेण्यांत आला. आज त्यांची वृत्ति प्रसन्न असल्यामुळें सीताबाईहि विशेष खूष झाल्या होत्या.

त्यांनीं त्यांनां निरोप देऊन निवळ औपचारिक पद्धतीनें म्हटलें "आपण पुनः कधीं फुरसत करून चार दिवस इकडे याल तर आम्हां सर्वांनां फार आनंद होईल. नवीन परिचय झाला आहे तो विसरून जाऊं नये."

नीलकंठराव म्हणाले "हो हो, हें काय विचारावें! आपण असें म्हणाल हें आम्हाला फार वाटलेंच होतें. आम्ही अलबत् लवकरच पुनः येऊं."

हें उत्तर ऐकून सर्वांनां फार अचंबा वाटला. ही ब्याद पुन्हां कशाला येते आहे असें वाटून आनंदराव लगेच म्हणाले "पण हें पहा, श्रीमंत मातुश्री राणी माईसाहेबांची गैरमर्जी होईल असें मात्र कधीं करीत जाऊं नका. आमच्याकडे प्रत्यक्ष नाहीं आलां तरी बेहत्तर, पत्रद्वारें भेटी होतच जातील. पण श्रीमंतांची इतराजी होईल तर तें मुळींच इष्ट नाहीं!"

नीलकंठराव म्हणाले "आपण वडिलपणीं ही सूचना योग्यच केलीत. आम्ही तिच्याबद्दल आपले अत्यंत आभारी आहों. पण आम्ही मुळीं श्रीमंतांच्या अनुज्ञेवांचून कोणचीचि गोष्ट होतां होई तों करीत नसतों."

आनंदराव म्हणाले "म्हणूनच म्हणतों, त्यांनां कदाचित् असें वारंवार रजा घेऊन तुम्ही दूर गांवीं जाणें आवडायचें नाहीं. श्रीमंत माणसें बोलून नाहीं तसें दाखविणार, पण आपणच आपलें उमजून रहावें तें चांगलें. आमच्यासारख्या सग्यासोयऱ्यांची पत्रद्वारें भेट घेतलीत कीं बस!"

नीलकंठराव म्हणाले "आपण माझ्या हिताबद्दल इतकी काळजी घेतां हे आपले फार उपकार आहेत. आम्ही सुवर्णपुराहून आपणांस सविस्तर पत्र जरूर लिहूं, त्यांत आपल्या आदरातिथ्याविषयीं आमची कृतज्ञता पूर्णपणें व्यक्त केल्याशिवाय आम्ही राहणार नाहीं. सर्वांनां, आपल्या ताराबाईनां सुद्धां, आतां आम्ही अत्यंत प्रेमपूर्वक आशीर्वाद देऊन आतां निरोप घेतों, व लवकरच पुनः भेट होईल असें आश्वासन देतों."

सीताबाई व मुली आश्चर्यानें विचार करीत आपापल्या खोल्यांत गेल्या. नीलकंठरावांनीं पुनः लवकर येण्याची प्रस्तावना कां केली असावी याविषयीं तर्क चालून, अखेर सीताबाईनीं मनांत ठरविलें, कीं, आपल्या मथुरीला मागणी घालण्याचा त्यांचा विचार असावा. कारण, तिचा नंबर तिसरा होता, व थोडासा आग्रह केला तर मथुरी नीलकंठरावांला पतकरायला कबूलहि झाली असती. त्यांच्या भाषणांत विशेष खुमारी आहे असा तिचा समज होता, व आपल्या इतकी जरी बुद्धि नाहीं, तरी पुष्कळ कमावतां येण्या-

सारखी त्यांनां बुद्धि आहे, व आपल्याप्रमाणें ग्रंथवाचनाची त्यांनां गोडी लावली तर ते बरेच मोहक गृहस्थ बनतील, अशी तिची खात्री होती. सीताबाईप्रमाणेंच मधुरीहि रात्रीं विचार करीत बऱ्याच आनंदांत झोंपीं गेली. पण दुसऱ्या दिवशीं सकाळीं चहालाच मालती फिरत फिरत म्हणून आली, तिनें ताराबाईच्या खोलींत जाऊन तिला कालची महत्त्वाची गोष्ट इत्थंभूत सांगितली. ती ऐकतांच ताराबाई उद्गारली "काय, नीलकंठरावांनां तूं पतकरलं म्हणतेस ? अशक्य, मालु, अगदीं अशक्य !"

मालतीनें आपली हकीकत सांगतांना जी सौम्यमुद्रा ठेवली होती ती ताराबाईचे हे उद्गार ऐकून एकदम गडबडून गेली. पण असले उद्गार येतील असा तिनें आगाऊ अंदाजच केलेला असल्यामुळें ती तावडतोब पुनः शांत झाली, व तिनें धिम्मेपणानें विचारलें "कां बरं तुला, तारा, तें इतकं अशक्य वाटावं? नीलकंठराव तुला पतकरण्यासारखे नाहींत, म्हणून त्यांनां आज कोणीहि स्त्री पतकरणार नाहीं, असं कां तुला वाटतं ?"

वास्तविक म्हटलें तर ताराबाईला खरोखरच तसें वाटत होतें. निदान मालतीसारख्या शहाण्यासुर्त्या मुलीला ते पसंत पडणें, हें तिला बहुतेक स्वतःच तिनें पसंत करण्याइतकेंच, अशक्य वाटत होतें. गेल्या एकदोन दिवसांत ती त्यांच्याशीं विशेष लक्ष देऊन बोलतचालत असे, तरीसुद्धां मालतीच्या मनांत तसा विचार असेल ही तिला कधींहि कल्पना आली नव्हती. म्हणून आतां प्रत्यक्ष तिच्या तोंडून ती गोष्ट ऐकून तिला अत्यंत आश्चर्य वाटलें, व त्याच्या भरांत तिच्या तोंडून वर लिहिलेले जोराचे उद्गार निघून गेले. पण एकदां गोष्ट होऊन गेली, तर आतां असे वेडेवांकडे उद्गार काढण्यांत अर्थ नाहीं, हें तिच्या तावडतोब ध्यानांत आलें, व फार प्रयत्नानें मन आवरून ती म्हणाली. "नाहीं नाहीं, मी आपली उगीच सहज म्हणालें. तसं काय त्यांच्यांत वावगं आहे? तरुण आहेत, प्रथम वर आहेत, उत्पन्नहि चांगलं आहे, ठीक आहे. बरं झालं गडे मालती, तुझं मी मनापासून अभिनंदन करतें, व तुला त्यापासून सर्व प्रकारें आनंद होवो अशी माझी फार इच्छा आहे. आपण आजपर्यंत निवळ मैत्रिणी होतों, पण आतां लवकरच जवळच्या नातेवाईक होऊं !"

मालती म्हणाली "तुला इतकं आश्चर्य कां वाटलं तें मी समजलें. नुकते परवां ते तुला मागणी घालीत होते, अन् एका दिवसांत त्यांनीं मला कशी

पुनः मागणी घालावी, याचं तुला नवल वाटतं आहे. पण तेवढी गोष्ट बाजूला ठेवलीस घटकाभर, तर तुला असं कबूल करावं लागेल, कीं, सर्व दृष्टीनं विचार केला तर माझं करणं अगदीं बरोबर आहे. माझा स्वभाव उगीच हवेमधें भराऱ्या मारीत बसण्याचा नाहीं, हें तुला ठाऊकच आहे. लग्न करणं म्हणजे केवळ स्वतःला हक्काचं घर व संसार मिळवणं, असं मी समजतें. व मला जें स्थळ पसंत झालं आहे त्या घरीं, इतर स्त्रियांनां त्यांच्या संसारांत सुख मिळण्याचा जेवढा संभव असतो, तितकंच मलाहि नीलकंठ-रावांपासून मिळण्याचा संभव आहे, असं मला माझं मन सांगतं."

ताराबाई म्हणाली "हो हो, न मिळायला काय झालं? अलबत् मिळेल. सुख लागणं न लागणं हें केवळ नशिबावर आहे!"

तें बोलणें तितकेंच संपलें, व अंमळशानें मालती घरीं निघून गेली. ताराबाईच्या डोक्यांत नाना प्रकारचे विचार येत होते. दोन दिवसांच्या अंतरानें दोन स्त्रियांनां एका माणसानें मागणी घालावी, व ही मागणी अगदीं अंतःकरणापासून प्रेमपूर्वक आहे असें प्रत्येकीला सांगावें, यासारखें दुसरें हास्यास्पद काय असेल, असें तिला वाटलें. बालविवाह जरी बाह्यतः नष्ट झाला आहे, तरी फार वर्षें बसलेली त्याची मगरमिठी, व तिच्यामुळें उत्पन्न झालेल्या आनुषंगिक समजुती, अजूनहि पूर्णपणें निघून गेलेल्या नाहींत, अशी तिला नीलकंठरावांच्या या कृत्यामुळें साक्ष पटतेशी वाटली. पूर्वीं ज्याप्रमाणें आईबापें आपल्या "मुलाकरितां दोनशें मुली सांगून आल्या, व रोज आम्ही पांचदहा मुली पहात होतों" असें सांगण्यांत धन्यता मानीत असत, व त्या कालीं त्या प्रकारच्या सांगून येणाऱ्या मुलीविषयीं प्रेमाचा लवलेश असणें जसें केवळ अशक्य असे, त्याचप्रमाणें दोन दिवसांत दोन मुलींनां मागणी करणाऱ्या नीलकंठरावांविषयीं तिला वाटलें. पण लग्न करणें म्हणजे एकादी बाजारांतून जिन्नस आणणें असें मानणाऱ्या असल्या प्रेमशून्य माणसाला, मालतीसारखी शहाणी व विचारी मुलगी डोळे आंधळे करून, निवळ पोट भरण्याच्या काळजींतून जन्माची मोकळी होण्याकरितां, स्वीका-रील, तर एकट्या नीलकंठरावाला तरी कां हंसावें? शहाण्यासुर्त्या समजुत-दार मालतीनें तरी प्रेमाची काय जास्ती किंमत करून दाखविली? कधीं कधीं बोलतांना मालती लग्नाविषयीं जे विचार प्रदर्शित करीत असे, ते ताराबाईच्या विचारांशीं जुळत नसत, हें ताराबाईच्या लक्षांत होतें. पण निवळ

द्रव्यलोभाच्या हेतूनें ती प्रसंग आला असतां आपल्या मतांप्रमाणें प्रत्यक्ष वर्तन करील, असें तिला कधीं क्षणभरहि वाटलें नव्हतें. नीलकंठरावांसारख्या अचरट व केवळ अशुद्धाळ माणसाची बायको होऊन, त्याच्या घरीं ताटाखालचें मांजर होऊन मालतीसारखी हुशार स्त्री रहावी, हा विचारच तिला अत्यंत चमत्कारिक वाटूं लागला. व बिचारी निवळ पोटाकरितां फसते आहे, त्यांत तिला खऱ्या सुखाचा वाराहि लागणार नाहीं, असें वाटून तिची तिला फार कींव वाटूं लागली. परमेश्वरानें दिलेल्या बुद्धीचा योग्य प्रसंगीं उपयोग करायचा नाहीं, तर त्यानें ती देऊन तरी उपयोग काय, असेंही तिला वाटलें.

---

## प्रकरण तेविसावें.

### सीताबाईंचा तडफडाट !

ताराबाई नंतर दिवाणखान्यांत गेली. तेथें सीताबाई व दुसऱ्या मुली बसल्या होत्या. मालतीनें इतक्यांत आपणाला एकीकडे नेऊन सांगितलेली गोष्ट त्यांनां आपण सांगावी न सांगावी, अशा विचारांत ताराबाई होती. कारण, एक तर सीताबाई अजून थोड्याशा तिच्यावर नाखुष होत्याच. ती नाखुषी, आपली बातमी ऐकून जास्तच वाढेल, असें तिला वाटत होतें. अशा विचारांत कांहीं वेळ गेला, तों रावबहादुरच खुद्द तेथें आले, व आपल्या दोन्ही घराण्यांचा आजपासून नवीन तऱ्हेचा संबंध होणार आहे, वगैरे प्रथमतः संदिग्धपणें बोलून, व ऐकणारांचें कौतुक बरेंचसें वाढवून, त्यांनीं अतिशय आनंदानें नीलकंठरावांनीं घातलेली मागणी आमच्या मालतीनें स्वीकारल्याची बातमी सांगितली. पण पहिल्यानें कोणाला ती खरीच वाटेना ! सीताबाई देखील "असं कसं होईल रावबहादुर ? आपली कांहीं तरी समजण्यांत चूक झाली असली पाहिजे !" असें उद्गारल्या. त्यांची लाडकी शेफारलेली लेक सुंद्री तर एकदम निर्भीडपणानें त्यांच्या तोंडावर म्हणाली "कांहीं तरी लोणकढी थाप ठेवून देतांहां झालं, तुम्ही, रावबहादुर ! नीलकंठरावांच्या मनांतून तर आमची ताराबाई पाहिजे आहे. ते पुन्हां लवकर येणार आहेत दिखील त्याकरतां !"

रावबहादुर हे शांततेचे मूर्तिमंत पुतळे होते, म्हणूनच त्यांनीं हे मायलेंकींचे उद्धट उद्गार स्वस्थ चित्तानें ऐकून घेतले. पण ताराबाईला आपल्या

माणसांच्या शब्दांची लाज वाटूं लागली, व तसला प्रकार जास्त होण्याचा तरी थांबावा या हेतूनें तिनें "मलाहि आतांच मालूनें येऊन हें सर्व सांगितलं" असें म्हटलें. नंतर तिनें व शांताबाईनें योग्य तऱ्हेनें त्यांचें अभिनंदन केलें.

शांताबाई म्हणाली, "फार चांगलं झालं बाई ! अखेर मालतीनं तर आघाडी मारली. सुवर्णपुरहि बरं दूर कुठें नाहीं. स्थळ फार चांगलं, जवळच आहे."

रावबहादुरांनींहि त्यांचें अभिनंदन मनापासून स्वीकारून ती आनंदाची बातमी इतरांनां सांगण्याकरितां ते निघून गेले. नंतर सीताबाईंचें तोंड सुरुं झालें. "मला अजूनहि हें खरं वाटत नाहीं. रावबहादुरांची कांहीं तरी चूक झाली असेल ! अन् खरं असलंच, तर काय बाई लबाड आपस्वार्थी माणसं हीं ? त्या बिचाऱ्याला फसवून आपली एक घूस दिली झालं त्याच्या गळ्यांत अडकवून ! कसं बरं त्याला क्षणभर तरी तिच्यापासून सुख लागावं ? माझा होरा असा आहे, कीं, त्यांच्या त्या श्रीमंत माईसाहेबांनां ही असली घूस आहे असं कळलं, कीं, खास त्या मोडून काढतील ! मग तें लग्न कसं होतं ? नाहींच व्हायचं ! अन् मग खूप फजिती होईल सगळ्यांचीच. त्यांची होवो म्हणा, पण त्या बिचाऱ्या नीलकंठरावांची नाहीं का त्यांत होणार ? ही एक आमची पोरगी आहेना हे सगळे खेळ करणारी ! तिनं जर पतकरलं असतंन्, तर आज कांहीं इतक्या धिंडवड्याची जरूर का होती ? मी चांगली माझा जीव तोंड तोडून सांगत होतें बरं तेव्हांच ! पण माझं ऐकतं कोण या घरांत ? मला आपली जशी काय वेडीच बडबडते आहे असं समजतात सारीं ! आतां घ्या म्हणावं. फिटूं द्या एकदां हौसा ! कोण माझ्या जिवाला असल्या यांच्या खेळांनीं त्रास होतो, डोकं जसं गरगर फिरायला लागतं, पण पर्वा आहे का कोणाला त्याची ?"

अशा तऱ्हेनें किती वेळ तरी त्यांचें चाललें होतें. या बातमीनें सीताबाईंचा राग इतका वाढला, कीं, आठ दिवस झाले तरी त्या तारा दिसल्याबरोबर तिला बोचून घ्यायला लागत, एक महिना झाला तरी रावबहादुरीणबाईशीं नीटपणीं बोलत नसत, आणि कित्येक महिने झाले तरी ताराबाईवर पहिल्याइतकी त्यांची मर्जी बसली नाहीं !

आनंदरावांनां ती बातमी कळल्याबरोबर ते म्हणाले, "फार चांगलें झालें बोवा ! मला भारी समाधान वाटतें आहे ! मला वाटलें होतें, कीं, मालतीच्या

डोक्यांत कांहीं थोडीशी अक्कल आहे कीं काय ! पण ती माझी भीति व्यर्थ होती असें झालें आतां ! मालती आमच्या बायकोइतकीच शहाणी, अन् आमच्या तारिपेक्षां तर मूर्ख ठरली. त्यानें मला भारी छान वाटलें ! "

शांताक्काला फक्त त्यांनां रगड सुख मिळो इतकेंच वाटलें. ताराबाईच्या म्हणण्याप्रमाणें मालतीला या लग्नापासून सुख मिळणें, अशक्य आहे, असें शांताबाईला मुळींच वाटेना. सुंद्री हिरी यांनां कांहींच वाटलें नाहीं. नीलकंठराव कांहीं ऑफिसर नव्हते, तर त्यांच्याविषयीं त्या मालतीचा हेवा करतील ! " मालतीबाई बनताहेत एक शास्त्रीणबाई झालं. " इतकेंच त्यांनां वाटलें. दुसरें मात्र एक बरें वाटलें, कीं, गांवांत मावशींनां सांगायला ही एक बरी बातमी आपल्याला झाली.

आठदहा दिवसांपूर्वीं सीताबाईनीं शांताच्या भावी अथवा काल्पनिक विवाहसौख्याबद्दल कोण आपणाला गप्पा मारल्या होत्या, त्यांचें उट्टें फेडण्याची ही बरी संधि आली आहे असें वाटून, रावबहादुरीणबाईनीं सीताबाईकडे येऊन तें देणें सव्याज फेडून टाकलें !

ताराबाईला वाटलें, कीं, आतां आपली व मालतीची पूर्वींप्रमाणें मैत्री राहाणें शक्य नाहीं. पूर्वींप्रमाणें आतां एकमेकींशीं मन मोकळें करून बोलण्याची सोयच राहिली नाहीं. म्हणजे आपली एक जिवाची मैत्रीण अंतरली, असें ताराबाई समजूं लागली. याचा परिणाम इतकाच झाला, कीं, तिचें अंतःकरण शांताक्काकडे जास्त ओढूं लागलें. आपण मालतीविषयीं फसलों, तसें शांताक्काविषयीं खास फसणार नाहीं अशी तिला खात्री वाटत होती. आनंदभुवनांतली मंडळी जाऊन आठ दिवस होत आले होते तरी त्यांचें पत्रबित्र कांहींच आलें नव्हतें, तीहि थोडीशी काळजी वाटण्याचीच बाजू होती. कमलिनीच्या पत्राचें उत्तर शांताबाईनें ताबडतोब पाठविलें होतें, व ती रोज पुनः तिचें पत्र येण्याची वाट पहात होती. नीलकंठराव सुवर्णपुराला पोंचून त्यांचें कबूल केल्याप्रमाणें आभारप्रदर्शनानें भरून गेलेलें असें पत्र देखील येऊन दाखल झालें. त्यांत त्यांनीं अत्यंत आनंदानें रावबहादुरांची मुलगी कुमारी मालतीबाई इनें आपली मागणी स्वीकारल्याची, व ही गोष्ट श्रीमंत मातुश्री राणी माईसाहेब यांनांहि अत्यंत पसंत असल्याची, हकीगत सविस्तर लिहिली होती, व येत्या सोमवारीं आपणास सूचना केल्याप्रमाणें आपल्या आमंत्रणाचा स्वीकार करण्यास शांतिसदनांत येईन, व नंतर आम्हां

सर्वांनां इष्ट असा मंगलमुहूर्त ज्येष्ठांतच ठरवून आपल्या मदतीनें लग्नसमारंभ साजरा करण्याचा आपला विचार असल्याचेंहि त्यांत होतें. "आह्माला आपल्यावांचून कोणी सोयरींधायरीं नाहींत, ह्मणून आपणच आमच्या बाजूनें वऱ्हाडी होऊन हें मंगलकार्य तडीस नेलें पाहिजे, त्याबद्दल आह्मीं जन्मभर ऋणी राहूं." वगैरे वगैरे.

या पत्राची संभावना शांतिसदनांत कशी झाली असेल त्याची वाचकांनां सहजच कल्पना होईल. आनंदरावांनांसुद्धां ही घोरपड कोठून आपल्यावर येते आहे असें झालें. सीताबाईंच्या तर अंगाची लाही लाही झाली. भाऊसाहेब कधीं येतात या काळजींत त्या रात्रंदिवस असत. त्यांची कांहींच वार्ता न लागतां, ही ब्याद जास्तच चिकटूं लागली, व ती कशी उडवून द्यावी तेंहि मुळींच सुचेना. लोक हळुहळू बोलायला लागले, कीं, भाऊसाहेब आतां इकडे येतच नाहींत. तें ऐकलें, कीं, सीताबाई अगदीं चिडून जात, व "काय लोकं खोट्यानाट्या गप्पा उठवतात बाई, शर्थ आहे पण त्यांची!" असें संतापानें त्या म्हणत. रोज टपालांतून भाऊसाहेबांच्या पत्राची वाट पहावी, तर तें न येतां नीलकंठरावांचेंच कांहीं तरी लग्नाच्या खटपटीसंबंधीं यावें, असा प्रकार चालला होता. ताराबाईला त्यामुळें रोज आईचे शब्द सोसावे लागत. अखेर तिला एकादे वेळीं असेंसुद्धां वाटे, कीं, हे सर्व हाल टाळण्याकरितां तरी निदान आपण नीलकंठरावांनां पतकरलें असतें तरी बरें झालें असतें!

ताराबाईला बहिणीविषयींहि काळजी लागून राहिली होती. भाऊसाहेबांचें मन शांतावर होतें याबद्दल तिची बालंबाल खात्रीच होती. पण त्यांचा स्वभाव अगदीं लवचिक असल्यामुळें दोघी बहिणी व स्नेही भय्यासाहेब यांच्या आपमतलबी लपंडावांनीं त्यांचें मन कितपत कायम राहील कोण जाणे, असें तिला वाटत होतें. त्यांतून पुण्यांतल्या शेंकडों गमतींत, व विशेषतः सरलादेवींच्या सहवासांत हे गडी रंगून दंग होणार नाहींत म्हणून तरी काय सांगावें? शांताक्का बाहेरून शांतता दाखवीत होती; इतकी कीं, ती आपण होऊन ताराबाईजवळसुद्धां तो विषय काढीत नसे. पण आईला इतका नाजुकपणा कोठें होता? ती साऱ्यांच्या देखत आपली नाखुषी स्पष्ट उद्गारून दाखवी. "एक दोन दिवसांत भाऊसाहेबच अवाचित येतील, आलेच पाहिजेत, इतकं कसं अशाश्वत मन त्यांचं असेल, अन् तसं असलं तर कांहीं अर्थच नाहीं म्हणायचा त्या पुरुषांत! चार दिवस आमच्याशीं काय चेष्टा का करीत होते?"

असें नानाप्रकारें ती गडीमाणसांदेखत स्पष्ट बोले, तों तों थोरल्या दोघींनां फार वाईट वाटे.

असें होतां होतां नीलकंठराव ठरल्याप्रमाणें पुनः दाखलसुद्धां झाले. आज ते कोणालाच मनापासून नको होते हें उघडच आहे; पण करतां कसें? आवड नावड बाजूला सारून नाक मुठींत धरून योग्य तो पाहुणचार करावा लागला. दुःखांत सुख एवढेंच झालें, कीं, ते आतां फक्त रात्रीं इकडे असत, बाकीचा सर्व वेळ रावबहादुरांकडे घालवीत. एकादे दिवशीं ते मालतीला घेऊन फिरत फिरत शांतिसदनाकडे येत, तेव्हां सीताबाईला अगदीं विंचू लागत. मालती जरी दिवाणखान्यांत स्वस्थ बसली असली, तरी त्यांनां वाटे, कीं, आपल्याला राह्यला हा दिवाणखाना लवकरच मिळो, असें ती मनांत म्हणत आहे. आपणाला हांकून देऊन ती येथें मालकीण म्हणून रहा-णार हा विचार मनांत आला, कीं, त्या अगदीं देहभान विसरून वाटेल तें बोलण्यापर्यंत त्यांची मजल येई. एकदिवशीं अशीच मालती येऊन गेल्या-वर त्या आनंदरावांनां म्हणाल्या "आपणाला बरं वाटतंना हें, कीं या पोरीनं मला इथनं हांकून देऊन इथें राजरोस राज्य करावं?"

आनंदराव म्हणाले "पण आपण तसें कां वाटून घेतां? चांगली कल्पना कां नाहीं मनांत आणूं? माझ्याआधीं आपण नाड्या आंखडल्यात तर तुम्ही भितांहां तो प्रसंग तुम्हावर नाहीं यायचा!"

सीताबाई म्हणाल्या "माझं मेलीचं काय मोठंसं! मला राग येतो तो आधीं तिला सारी इष्टेट मिळावीच काय म्हणून? तें तसलं वुइल नसतं, तर मला कांहीं त्याचं एवढं वाटलं नसतं!"

आनंदराव म्हणाले "कशाचें वाटलें नसतें म्हणतां आपण?"

सीताबाई चिडून म्हणाल्या "मला कश्शाचंच मग कांहींच वाटलं नसतं!"

आनंदराव म्हणाले "अरे बापरे! कश्शाचेंच कांहींच वाटलें नसतें अशी वेड लागल्यासारखी स्थिति आपली झाली असती अं? बरें बोवा, देवानें उपकारच केले आहेत आम्हावर तें वुइल करून. नाहीं तर तुमची इतकी वाईट स्थिति झाली असती!"

सीताबाई म्हणाल्या "अहाहा, काय पण देवाचे उपकार? म्हणे वुइल केलं तें बरं झालं! कसं बाई आपल्या लेकींच्या हातांतनं इस्टेट हिसकवून

नेलेलं आवडतं कोण जाणें यांनां? अन सारं हें, हें कोणाकरतां, तर कधीं देखला नव्हता अशा नीलकंठरावाकरतां हो! अगदीं येवढा दाणा कुठला शोधून काढलात इस्टेट द्यायला?"

आनंदराव ह्मणाले "आपणच ठरवा या प्रश्नाचें उत्तर! दुसऱ्या कोणीं दिलेलं आपणाला नाहीं पटत, तर आतां आपणच ठरवाल तें खरें!"

---

## प्रकरण चोविसावें.

### शांताबाईची निराशा.

अखेर एकदां कमलिनीकडून पत्र आलें व सर्व आशा संपली. पहिल्याच वाक्यांत, आम्ही चार महिने सारींजणें येथेंच राहणार आहोंत असा मजकूर होता; त्याचप्रमाणें शेवटीं शेवटीं, भाऊसाहेबांनां शिवदुर्गांतून निघतांना तुमच्या सर्व क्लबच्या मंडळीचा निरोप घेतां आला नाहीं म्हणून वाईट वाटत असल्याचेंहि कळविलें होतें. अशा रूपुस्तांत मध्यंतरीं सरलादेवीची ओतप्रोत स्तुति, आम्हां सर्वांनां दिवसेंदिवस ती किती तरी जास्त मोहून टाकते आहे, व मागच्या पत्रीं सुचवलेला श्लाघ्य संबंध आतां लवकरच अस्तित्वांत येईल अशी बळकट आशा, वगैरे बाबती होत्या. आणखी कांहीं किरकोळ गोष्टी असून शांताबाईचें आपणाशीं सख्य सदैव असेंच राहो ही इच्छाहि व्यक्त केलेली होती!

तें पत्र वाचून शांताबाईनें ताराला बहुतेक सर्व मजकूर सांगतांच तिला फार राग आला, व शांताची फार कींव वाटूं लागली. सरलादेवीवर भाऊसाहेबांचें मन बसत चालल्याचा मजकूर तर तिला मुळींच खरा वाटेना. कारण त्यांचें मन शांतावर एकेकाळीं तरी निदान गुंतलें होतें, ही तिला पूर्ण खात्री होती. पण तसें असून भाऊसाहेबांनीं आपल्या मनावर इतर लुच्चा लोकांचा इतका पगडा कसा बसूं द्यावा, इतका आपल्या मनावर आपला हक्क त्यांनीं कसा चालवूं नये, लोक सांगतील तें आपल्या मनाच्या साक्षीच्या विरुद्ध खरें समजून वागावें, इतका लवचीक स्वभाव असल्याबद्दल ती भाऊसाहेबांनां दोष देऊं लागली, असें दुसऱ्याच्या तंत्रानें वागण्यांत आपल्या स्वतःच्याच सुखाचा निवळ प्रश्न असता, तर त्यांचे ते हवे तसे वागले असते तर हरकत नव्हती. पण आपणाबरोबर दुसऱ्याच्या अंतःकरणाची अशी पायमल्ली करण्यास ते कसे तयार झाले, शांताच्या मनाचा त्यांनीं

मुळींच कसा विचार केला नाहीं, याचें तिला फार नवल वाटूं लागलें. तिनें किती विचार केला, पण मनाचें समाधान ह्मणून होईना. भाऊसाहेबांचें खरोखरच प्रेम इकडे नसून चार दिवस त्यांनीं निवळ तसा आविर्भाव दाखविला, कीं, खरोखर प्रेम असून बहिणींच्या सांगीवरून तें उडून गेलें, कीं, अजून पूर्वींप्रमाणें कायम आहे आणि इकडे येण्याची ते संधि पहाताहेत, कीं, शांताचें आपल्यावर इतकें प्रेम आहे ही गोष्टच त्यांच्या लक्षांत आली नाहीं, कीं, आतां इतर नादांमध्यें ते विसरून गेले—कोणचीहि गोष्ट खरी धरली तरी ती भाऊसाहेबांनां कमीपणा आणणारीच होती, आणि त्यामुळें शांताक्काची मात्र विनाकारण पायमल्ली झाली असें वाटून तिला फार वाईट वाटे.

दोन दिवस त्या बहिणी एकमेकींशींसुद्धां त्या विषयावर अक्षर बोलल्या नाहींत. सीताबाईंचा मात्र वेळीं अवेळीं तडाखा चालूच होता. एक दिवस सारजाबाई आल्या असतां त्यांच्या देखत तर त्या बेसुमार बोलल्या. नंतर सारजाबाई निघून गेल्यावर, शांता व तारा एकट्याच असतां शांता म्हणाली "काय आतां या आईच्या स्वभावाला करावं? तिन्हाइतांच्या देखत तरी थोडं मन आवरील तर चांगलं नाहीं का? जेव्हां तेव्हां भाऊसाहेबांनां असं अद्वातद्वा बोलण्यापासून मला कोण त्रास होतो त्याची आईला कल्पना तरी आहे का? पण तिच्याशीं बोलून काय उपयोग? ती एकदां बोलायची राहली म्हणजे आपलीहि रोज टोंचणी संपेल अन् आपण सारीं सगळं विसरून जाऊन पहिल्यासारखीं होऊं!"

ताराला हें बोलणें खरें वाटलें नाहीं असें तिच्या चर्येवरून स्पष्ट दिसलें; पण ती कांहींच बोलली नाहीं. त्यावर शांता म्हणाली, "तारा, तुला माझं बोलणं खरं नाहीं वाटत? कां बरं वाटूं नये? भाऊसाहेब हे माझ्या स्मरणांत एक सुशील माणूस म्हणून फार तर शिल्लक रहातील. यापेक्षां जास्त मला राग अथवा लोभ अथवा वाईट वाटण्यासारखं कांहीं जर नाहींच आमच्यामधें कधीं घडलं, तर काहीं काळ गेला म्हणजे मी त्यांनां विसरेन इतकं—"

हे शब्द बोलतांना शांताचा गळा थोडासा दाटून आल्यासारखा झाला. पण तितक्यांत प्रयत्नानें सांवरून ती पुढें म्हणाली "आज एवढं तरी समाधान आहे, कीं, आपल्या स्वतःच्याच समजुतींत थोडीशी माझी चूक झाली होती; पण त्या समजुतीच्या चुकीनं दुसऱ्या कोणाचं कांहीं नुकसान तरी झालेलं नाहीं!"

## शांताबाईची निराशा.

ताराबाई म्हणाली " धन्य आहे आक्का तुमच्या गोड स्वभावाची! केवळ एकाद्या शांततेच्या देवीलाच शोभेल अशी शांति व विवेक तुमच्यांत भरलेला आहे. मलासुद्धां तुमची इतकी कल्पना कधीं झाली नव्हती. तुमच्या या अत्यंत सात्विकवृत्तीचं किती तरी कौतुक करावं! "

शांताबाई म्हणाली " मला नाहीं वाटत माझ्यांत कांहीं विशेष शांतता आहेशी. तुला बहिणीला मायेच्या पोटीं तसं वाटतं इतकंच! "

ताराबाई म्हणाली " हें काय बरं? आपण मात्र सगळ्या जगाला उत्तम म्हणतां, व मी कोणाविषयीं वांकडं बोललें तर तुम्हाला तें आवडत नाहीं; अन् मी जगांत तुम्हाला एकटीला उत्तम म्हणतें तेंहि मला तुम्ही म्हणूं देत नाहीं! मी तुमच्या गोड स्वभावाचं अनुकरण करून कदाचित् फार जणांनां उत्तम म्हणूं लागेन अशी भीति नको वाटायला तुम्हाला. माझ्या दृष्टीनं चांगले असे थोडेच लोक या जगांत आहेत, अन् मला मनापासून आवडतात असे तर त्याहूनहि थोडे आहेत! जों जों जगाचा मला अनुभव येत आहे, तों तों त्याचा जास्तच वीट येऊं लागला आहे. दररोज मला दिसून येत चाललं आहे, कीं, मनुष्यस्वभावांत कायमपणा व स्थिरता मुळीं फार कमी असून, चंचलपणा ओतप्रोत भरलेला आहे. तसंच दुसरं हेंहि दिसून येत चाललं आहे, कीं, जें जें प्रथमदर्शनीं मोठं गुणवान् अथवा शहाणं दिसतं तें म्हणजे अखेरपर्यंत तसंच ठरेल हें क्वचित्! नुकतीं नुकतीं मला याचीं दोन उदाहरणं दिसून आलीं. एकाविषयीं मी बोलत नाहीं आतां; दुसरं त्या मालतीच्या लग्नाचंच. कोणच्याहि बाजूनं पाहिलं तरी मला तें कांहीं उमजत नाहीं. "

शांताबाई म्हणाली " असं वाटून घेऊं नको तारा! असा समज जर तुझा पक्का झाला तर तुला सुखाचा लाभ कोठून होईल? ज्याचा त्याचा कल, इच्छा, आशा, स्वभाव निरनिराळा असतो, त्याप्रमाणं माणूस वर्तन करतं. नीलकंठराव तरुण आहेत, प्रकृतीनं चांगले आहेत, निर्व्यसनी आहेत, उत्पन्नदार आहेत; तशीच मालतीहि शांत व समाधानी अशी आहे. घरीं नेहमीं बापाभावावर राहण्यापेक्षां सत्तेचा नवरा न् घर मिळालं तर तिनं असं काय वावगं त्यांत केलं? एकंदरींत त्यांच्याविषयीं तिच्या मनांत आदरबुद्धि येणं अशक्य आहे, असं तूं कां मानावंस बरं? "

ताराबाई म्हणाली " आपल्याकरितां म्हणून मीं काय हवं तें मानायला तयार होईन, पण अशा मानण्यानं कोणाचा कधीं फायदा का व्हायचा आहे?

कारण मालतीच्या डोक्यांत नीलकंठरावासारख्याविषयीं आदरबुद्धि उत्पन्न होणार असेल, तर मालतीला अक्कल म्हणून कांहीं नाहींच असं मी समजेन. नीलकंठराव म्हणजे एक अचरट, गर्विष्ठ, मूर्ख व खुशामतखोर माणूस आहे, हें का तुम्हाला ठाऊक नाहीं ? असं असून जी त्याच्याशीं लग्न करायला तयार होते, तिला अक्कल आहे असं कसं म्हणावं ? मालती माझी मैत्रिण झाली म्हणून काय झालं ? निवळ पोटापाण्याची सोय पाहिली, म्हणजे बाकीच्या सगळ्या गोष्टी बघायला नकोत का ? आप्पलपोटेपणाला तुम्ही दूरदर्शीपणा का मला ह्मणायला सांगतां ? अन् अडचणी येतील कीं नाहीं याचा विचारच करणं सोडून दिलं, म्हणजे काय त्याला सुख लागण्याची खात्री आहे, असं का म्हणायचं ? ”

शांताबाई म्हणाली “मला आपलं वाटतं, कीं, तूं उगीच राईचा डोंगर करते आहेस. तूं जेव्हां पहाशील, कीं, दोघांनांहि एकमेकांपासून सुख लाभत आहे, तेव्हां तुझी खात्री होईल पहा. बरं हें राहूं दे. दुसरं उदाहरण तूं सोडून दिलंस, तें मला ऐकूं दे. मालतीप्रमाणं ते गृहस्थहि तुझ्या मनांतून उतरले, अन् तिच्याप्रमाणें तूं त्यांनांहि दोष लावते आहेस हें पाहून मला तर भारी वाईट वाटूं लागलं आहे. आपणाला कोणींहि मुद्दाम वाईट केलं असं सहसा कधीं वाटून घेऊं नये. त्यांतून, त्यांच्यासारख्या श्रीमंत, उमद्या, तरुण पुरुषानं अगदीं तोलून बोलावं, अन् दहादां विचार करून वागावं, अशी आपण आशा करणं, ही आपलीच चूक आहे. अन् ती चूक बहुतकरून आपली आपणच अहंपणानं करून घेत असतों. प्रत्येक स्त्रीला आपल्या अंगच्या गुणांचा असा अभिमान असतो, कीं, जरा कुठें एकाद्या पुरुषानं दोन गोड शब्दानं बोललं, कीं, त्याची आपणावर प्रीति आहे असं आपण विनाकारण समजूं लागतों. ”

ताराबाई म्हणाली “ अन् म्हणूनच मला वाटतं पुरुष इतके गोड गोड बोलतात स्त्रियांशीं ! ”

शांताबाई म्हणाली “ ते जर लबाडीनं मुद्दाम गोड गोड बोलते, तर त्यांचं तसं वागणं रास्त होणार नाहीं खरं ! पण मला कधींहि इतकी जाणून बुजून लबाडी जगांत भरली आहे, असं नाहीं वाटत. इतरांनां पुष्कळांनां तसं वाटलं तर खुशाल वाटो ! ”

ताराबाई म्हणाली "मी कुठें म्हणतें आहें, कीं, भाऊसाहेबांनीं लबाडीनं जाणून बुजून गोड गोड भाषणं केलीं असं ? पण दुसऱ्याला फस-वायचा अथवा दुःखी करण्याचा उद्देश नसूनहि जरी चूक केली, तरी तिच्या-पासून भयंकर परिणाम होणारच! लबाडी प्रत्यक्ष नाहीं केली, पण अविचार केला, दुसऱ्याला काय समज उत्पन्न होईल ह्याची पर्वा केली नाहीं, अथवा मनाची चंचलता होऊं दिली, म्हणजे तरी परिणाम तोच—दुसऱ्याला दुःख!"

शांताबाई म्हणाली "या तिहींतलं त्यांनीं कोणचं पाप केलंसं तुला वाटतं ?"

ताराबाई म्हणाली "अलबत मनाची चंचलता ! पण हें पहा, मी जर अशी बोलत राहीन, तर तुम्हाला जास्तच वाईट वाटेल माझ्या बोलण्याचं. म्हणून मला आतां बंद करा पाहिजे असलं तर."

शांताबाई म्हणाली "तर मग तुझं अजून असंच म्हणणं, कीं, बहिणींच्या सांगीवरून त्यांनीं आपलं मन फिरवलं ?"

ताराबाई म्हणाली "हो, बहिणी व भय्यासाहेब आहेतना ते त्यांचे जीवश्च कंठश्च !"

शांताबाई म्हणाली "मला नाहीं हें अगदीं खरं वाटत. बहिणींनां तरी अशी ढवळाढवळ करून फायदा कोणचा ? येऊन जाऊन भावाला सुख लागावं हाच ना त्यांचा उद्देश असणार ? त्या भावाचं मन मजवर जर गुंतलं असेल खरोखर, तर दुसऱ्या कोणच्याहि स्त्रीपासून त्याला सुख कसं वाटेल ? एवंच, त्यांनां मधें पडण्याचं कारणच नाहीं."

ताराबाई म्हणाली "तुमचं पाहिलं म्हणणंच बरोबर नाहीं. नुसत्या भावाच्या सुखाशिवाय त्यांचे दुसरेहि पुष्कळ उद्देश असूं शकतील. त्याची श्रीमंती वाढावी, इभ्रत वाढावी, अशीहि त्यांची इच्छा असेल. म्हणून, जिच्याशीं लग्न केल्यानं जास्त दौलत, मोठमोठ्या घराण्यांशीं संबंध, व एकंदर मानमान्यता लौकिकांत वाढेल, अशीच बायको त्यानं करावी, असं त्यांनां वाटत असेल."

शांताबाई म्हणाली, "अलबत सरलादेवीशीं त्यांचं लग्न व्हावं अशी बहिणींची फार इच्छा आहे. पण त्याला कारणं तूं म्हणतेस त्याहून चांगलीं असूं शकतील. माझ्यापेक्षां तिची त्यांनां जास्त सलगी आहे, अर्थात् मज-पेक्षां तिच्याकडे त्यांचा ओढा जास्त आहे. पण त्यांची कांहीं जरी इच्छा

असली तरी भावाच्या इच्छेच्या विरुद्ध त्या बहिणी कशा जातील? कोणची बहीण, अगदीं तसंच स्पष्ट कारण असल्याशिवाय, भावाच्या उलट जाईल? जर भावाचं मन मजवर खरोखर आहे अशी त्यांची समजूत असती, तर त्यांनां त्यांनीं असं दूर नेलं नसतं. खरंच जर मजवर मन असतं, तर बहिणी दूर रहा म्हणाल्या एवढ्यावरून ते तरी कां दूर गेले असते? एवंच भाऊसाहेबांचं तसं मजवर मन होतं हें गृहीत धरून तूं सगळ्यांच्या पदरीं लबाडी व मूर्खपणा बांधते आहेस. अन् मग मला वाईट वाटूं लागतं! तर ही कल्पनाच सोडून देऊं या आपण. माझी गैरसमजूत झाली असं कबूल करायला मला तर बाई लाज नाहीं वाटत. निदान सगळ्या बहिणींनांन् स्नेह्यांनां लबाड लुच्चे मानण्यापेक्षां आपणच थोडीशी चूक केली हें मानणं, मला फार पत्करतं. अशा तऱ्हेनं कोणालाहि लबाड न समजतां जर त्याची वाट लावतां येते आहे, तर आपण ती कां लावूं नये? निदान मला तरी तशी लावून घेऊंदे कशी!"

ताराबाई म्हणाली "बरं बाई. तुमचं जर अशानं समाधान होत आहे तर मी कशाला नको ह्मणूं?"

त्यानंतर त्या दोघींमध्यें तो विषय काढायचा नाहीं असा तिनें निश्चय केला. सीताबाई मात्र तिच्याशीं पुनः पुनः तें बोलणें काढीत असत, व प्रत्येक वेळीं ताराबाई कांहीं तरी तर्क काढून त्यामुळें भाऊसाहेब परत आले नाहींत, अशी आईची समजूत घाली, पण ती कधीं तिला पटत नसे. ताराबाईच्या तरी मनाला ते तर्क कोठें पटत असत, तर सीताबाईनां ते पटावेत? आतां भाऊसाहेब दिवाळी नंतर तरी खास येतील, एवढ्याच आशेवर त्या जीव धरून होत्या.

आनंदरावांनां हा सर्व प्रकार पाहून मौजच वाटे. एके दिवशीं ते ताराला म्हणाले "मग कसें काय तारे, तुझ्या बहिणीला त्या भाऊसाहेबानें चकवलें म्हणायचें तर! वा, छानदार मौजच झाली ही! लग्नापर्यंत मजल नाहीं आली, तर निदान असें एकाद्या तरुणानें आपल्याला चकवावें, अशी तरी मुलींनां हौस असते म्हणतात! कारण तशामुळें त्यांनां बरोबरच्या मुलींच्या नजरेनें बरेंचसें महत्व येतें, अन् रोज बोलायला कांहीं तरी एक चूष होते. पण आतां तुझी पाळी आली आहे जवळ! आक्कांच्या पाठीमागें फार दिवस राहाणें कसें तुला आवडेल? तर झटपट करून घे. हल्लीं अनायासानें रिसाल्यांतले

रगड ऑफिसर इथें आहेत. तुम्ही साऱ्या तरुणींनीं चकायचें मनांत आणलेंत तरी पुरून उरतील! मी म्हणतों, तुला ते नागेशराव बरे आहेत! छान रंगेल गडी दिसतो आहे, अन् तुला मोठ्या झोंकदार तऱ्हेनें तो पाहिजे तर चकवील!"

ताराबाई म्हणाली "आपण, बाबा, सूचना तर पसंत केलीत. पण त्यांच्याहून कमी रंगेल गडी मला चालेल! सगळ्यांनांच शांताक्कांच्यासारखा उमदा प्राणी कोठून मिळावा?"

आनंदराव म्हणाले "तेंहि खरेंच. पण त्यांतल्यात्यांत ही एक समाधानाची गोष्ट आहे, कीं, तसें जर कांहीं तुला घडून आलेंच, तर त्याचें रगड कौतुक करायला मातोश्री अगदीं एकापायावर तयार आहेत!"

नागेशराव अलीकडे वारंवार शांतिसदनांत येत. त्यामुळें तेथल्या मंडळींचा अलीकडे झालेला विरस बराच त्या वेळेपुरता तरी नाहींसा होई. हल्लीं तर ते सर्वांशींच मोकळ्या मनानें सर्व कांहीं सांगत असत. पूर्वीं ताराला एकीकडे गुप्त म्हणून ते जें बोलत असत—ह्मणजे भय्यासाहेबांनीं आपणाला कसें अन्यायानें वागविलें वगैरे—तें आतां ते वाटेल त्याच्याजवळ इत्थंभूतपणानें सांगत असत, व त्यामुळें जेथें तेथें तो एक सर्वसाधारण चर्चेचा विषयच झाला होता. जो तो "मला तेव्हांच तर्क झाला होता, कीं, तो भय्यासाहेब महा हलकट," असें म्हणून आपल्या धूर्ततेची तारिफ करून घेत असे. एक शांताबाई काय ती "आपणाला सर्व हकीगत ठाऊक नाहीं, कांहीं तरी त्यांतलं इंगित निराळं असेल, तें समजलं म्हणजे कोणाचाच दोष नाहीं असं आपणाला दिसून येईल," असें तिच्या स्वभावाप्रमाणें वारंवार ह्मणे. पण इतर सर्व मंडळी तिला भोळी समजत!

---

## प्रकरण पंचविसावें.

### मामामामी अवचित आलीं.

या खेपेला नीलकंठराव इकडे फक्त तीनच दिवस राहिले. तितक्या मुदतींत त्यांच्या 'अत्यंत प्रिय' मालतीशीं रगडशा प्रेमळ गोष्टी बोलून, व पुढील सुखाबद्दल त्याहून जास्त बेत ठरवून, त्यांनीं अत्यंत आग्रहानें ज्येष्ठांतला अगदीं अखेरचा मुहूर्त निश्चित करून घेतला. व तो मंगल दिवस अजून सात आठ दिवस दूर असल्यामुळें ते लगेच सुवर्णपुरास जाण्याला

निघाले. आपल्या भावी पत्नीचा विरह इतके दिवस कसा सहन करावा, हा त्यांनां एक मोठा गहन प्रश्न पडला होता; पण तिच्या स्वागताकरितां आपल्या पर्णकुटिकेंतहि बरीचशी त्यांनां तयारी करायची होती, ती करण्यांत तिची मूर्ति आपल्या हृदयांत कायमची राहील, या खात्रीवर त्यांनीं महत्प्रयासानें विवेक केला. पूर्वींप्रमाणेंच मोठ्या समारंभानें त्यांनीं शांति-सदनांतल्या मंडळीचा निरोप घेतला, सर्व चिरंजीव मंडळींनां वेदोक्त आशीर्वाद दिले, व सुवर्णपुराहून आभारप्रदर्शक पत्र पाठविण्याचें अभि-वचन देऊन ते निघून गेले.

ते गेले त्या दिवशीं सीताबाईची स्थिति काय वर्णन करावी ? लग्नाचा मुहूर्त सात दिवसांवर असल्यामुळें, व तें लग्न आपल्या घरीं होण्याचें चुकणें त्यांनां अशक्य दिसत असल्यामुळें, त्यांच्या अंगाची लाही लाही होत होती. प्रत्यक्ष मावसभाच्याच्या लग्नाला आनंदरावांना नाहीं तरी कसें म्हणण्यास सांगावें, आणि सीताबाई घरांत असतांना चार लोकांसमक्ष कांहींतरी तमाशा झाल्याशिवाय तें कसें उरकणार, हा मोठाच प्रश्न सर्वांनां येऊन पडला होता. आनंदराव काय, "तिनें डोकें दुखतें म्हणून खोलींतच निजून रहावें पाहिजे तर" असें म्हणून तिच्या डोकें दुखण्याची चेष्टाच करूं लागले. "हें तुमचें डोकें कलकलणें बरें अगदीं हुकुमी तर आहे, हवें तेव्हां बंद्या गुलामासारखें येऊन उभें राहातें ! मग याच वेळेला अडलें तर आम्हांला काय ? तीहि एक बरीच मौज झाली म्हणूं आम्ही झालं !" पण हा उपाय थोरल्या दोघींनां पसंत पडेना. मातुश्रींनां चार शब्द सांगून विवेक करा म्हणण्याची तर मुळींच सोय नव्हती. धाकट्या तिघी लग्नांत मुलाकडच्या करवल्या म्हणून आपणाला मिरवायला सांपडेल याकरतां खूषच झाल्या होत्या. आतां या गोष्टीला काय तोड काढावी अशा फार विवंचनेंत शांता व तारा पडल्या होत्या.

असे चार दिवस गेले. पांचव्या दिवशीं सीताबाईचे बंधु वसंतराव केळ-कर व त्यांची बायको शारदाबाई या अकस्मात् शिवदुर्गास येऊन दाखल झाल्या. वसंतराव फार हुशार व सज्जन असा गृहस्थ होता, व स्वभावानें व समजुतदारपणानें सीताबाईपेक्षां अगदीं उलट होता. त्यांची बायको शारदा-बाई तर शांतीपेक्षां पांचसात वर्षांनींच मोठी होती, व तिला अजून मुलें-

बाळें फारशीं नसल्यामुळें ती थोरल्या मंडळीपेक्षां या आपल्या थोरल्या भाच्यांमध्येंच जास्त मिसळत असे. वसंतरावांचा मुंबईत दलालीचा धंदा फार उत्तम प्रकारचा चाललेला असे, व त्यामुळें त्यांनां हजार पांचशें रुपये दरमहा पडत असत. कॉलेज शिक्षण बी. ए. पर्यंत झालें होतें, पण परीक्षेला न बसतां एका गुजराथी स्नेह्याच्या बापानें आग्रह केल्यावरून ते व्यापारांत पडले होते. ते बहुश्रुत असत व दिसण्यांतहि चलाख दिसत. कमलिनी इंदिरांनीं त्यांनां पाहिलें असतें तर "कांदे बटाट्याची दलाली करतो त्यांचा मामा" असे तिरस्कारदर्शक शब्द त्यांनां बिलकुल लागू नाहींत असेंच त्यांनां वाटलें असतें. कामानिमित्त बाहेरगांवीं फिरतां फिरतां या बाजूला आले आणि एकादा दिवस सवड असली तर ते आपल्या बहिणीला व भाच्यांनां भेटायला कधीं कधीं येत असत. या खेपेला तर शारदाबाईनांहि घेऊन ते दोन दिवसांकरितां आले होते.

ही मंडळी अवचित अनपेक्षित आली त्यामुळें घरांत गडबड उडून गेली. शारदाबाईनीं भाच्यांच्यासाठीं खण, मखमाली, साटणी, किनारी वगैरे आणल्या होत्या त्या देऊन टाकल्या. अलीकडे पोल्क्यांच्या नव्या पद्धति काय निघाल्या होत्या त्या सविस्तर वर्णन केल्या. नंतर मग सीताबाईचें गाणें सुरू झालें. आपल्या भावजयीला तिच्या मैत्रिणी शांता व तारा या दोघींचें गाऱ्हाणें सांगायचें होतें तें त्यांनीं सुरू केलें.

"काय सांगू तुला वहिनी, अगदीं या दोघींचीं आज लग्नं सुद्धां होऊन गेलीं असतीं अशी वेळ आली होती. पण अखेर सारं फुस्सच झालं. शांतीकडे कांहीं बोल नाहीं माझा. तिच्याकडून सगळी तयारी होती अगदीं. पण ही दुसरी तारी—काय सांगू तुला, तिनं जर तसा स्वैच्छपणा नसता केला, तर आज ती नीलकंठरावांची बायको होऊनसुद्धां जाती! याच खोलीमधें त्यांनीं तिला प्रत्यक्ष मागणी घातली अन् हिनं आपली ती नको कीं ग म्हटली! आम्हीं आकाशपाताळ एक केलं साऱ्यांनीं, पण तिचं तें आपलं खरं! झालं. अखेर त्यांनीं मागणी परत घेतली, ती मालतीनं कशी ताबडतोब पतकरली. एवंच काय? माझ्या लेकीच्या आधीं रावबहादुरीणबाईच्या लेकीचं लग्न होणार, अन् तें आणखी माझ्या घरांत! तीं रावबहादुरांची सारींच माणसं मोठीं आपस्वार्थी अन् लबाड आहेत. त्यांनीं मुळीं मला चिडवायलाच

हें सारं जुळवून खास आणलं ! जेवढं मिळेल तेवढं घशांत घालायचं हें तर त्यांचं सदाचंच आहे. मी असं म्हणतें हें बरं दिसत नसेल, पण तसं आहेच जर, तर मी तरी कशी नको बोलूं ? या माझ्या घरांत कोणी मला पुसत नाहीं, का माझं कांहीं चालत नाहीं. आतां सारीं नाचताहेत कीं इथें लग्न झालंच पाहिजे ! कां म्हणून ? नीलकंठराव कोण तर त्याची एवढी यांनां मुर्वत वाटते आहे कोणास ठाऊक ? तो धरील का त्यांची एक क्षणभर तरी मुर्वत वेळ आली म्हणजे ? पहा बरं त्यांच्यामागून एका क्षणांत साऱ्यांनां हांकून काढतो कीं नाहीं ! पण मला त्या साऱ्याची अगदीं ओंकारी आली आहे. मी आपली तुमच्याबरोबर चार दिवस मुंबईलाच येते कशी !"

शारदाबाईंनां यांत नवें असें कांहींच नव्हतें. पत्रद्वारें शांतातारांकडून हें सारें वेळोवेळीं त्यांनां समजलेंच होतें. त्या सीताबाईंनां काय उत्तर देणार? कांहीं तरी बोललेंसें करून त्यांनीं वेळ मारून नेली, व आपल्या मैत्रिणींकडे दृष्टि देऊन बोलणेंच फिरविलें. पण आईच्या शेवटल्या शब्दांतली कल्पना शांतातारांनां बरी वाटली, व तसें केलें तर अगदींच तमाशा व्हावयाचा तो तरी टळेल, असें त्यांनां वाटलें. पण या वेळीं एकाएकीं आईनें मुंबईला जायची काय सबब काढावी, हा मोठा त्यांनां विचार पडला.

जेवणानंतर शारदाबाई ताराच्या खोलींत बसायला गेल्या असतां म्हणाल्या "शांताचं भाऊसाहेबांशीं जुळतं तर फारच उत्तम होत होतं. कां बरं विना-कारण मधेंच तें थंडावलं ? पण असं, मी पहातें, कितीकदां तरी होत असतं. भाऊसाहेबांसारखा तरुण माणूस एकाद्या सुंदर तरुणीवर महिनापंधरा दिवस लुब्ध होतो—इतका कीं, साऱ्यांनां वाटूं लागतं, कीं, हें आतां लग्न जुळणार. पण मधेंच कांहीं तरी अनपेक्षित कारणानं तो कुठें दूर गांवाला जाऊन राह्यला, कीं, मागचं हळुहळू थंडावत जातं झालं, अन् शेवटीं फुसकुली होते !"

ताराबाई म्हणाली "एका तऱ्हेनं हा समाधानाचा मार्ग उत्तम आहे. पण तो प्रस्तुत ठिकाणीं लागू पडत नाहीं. आमचं बिघडलं तें कांहीं अशा अकस्मात् आलेल्या कारणानं नव्हे. अगदीं इतकं ओतप्रोत प्रेम त्या गृह-स्थाच्या नखशिखांत भरलेलं दिसत होतं, कीं, त्यांच्या बहिणींनीं व स्नेह्यानें जर आपली मात्रा चालविली नसती, तर तें खास थंडावलं नसतं. असं नसेल बाई कधीं कुठें नेहमीं होत !"

# मामामामी अवचित आलीं.

शारदाबाई म्हणाल्या "माझ्या समजुतीनं 'ओतप्रोत प्रेम' हे शब्दच अलीकडे कुचकामाचे झाले आहेत! वाटेल त्याला वाटेल तेव्हां हे शब्द माणसं लावीत असतात. त्यांच्या अर्थाला आतां ताळ ना तंत्र! एक अर्ध्या तासाच्या भेटींत जरा आवड दिसायला लागली, वस्तुतः अगर खरोखरच अत्यंत दृढ प्रेम असलं, तरी दोन्ही वेळां 'ओतप्रोत प्रेम' हेच शब्द वापरतात! मला सांग बरं, भाऊसाहेबांचं प्रेम कितपत ओतप्रोत होतं तें?"

ताराबाई म्हणाली "मीं तर कुठें इतकीं स्पष्ट चिन्हं पाहिलीं नव्हतीं. जों जों त्यांचा परिचय दाट होत चालला तों तों ते इतरांकडे दुर्लक्ष करूं लागले, अन् अगदीं शांताकाशीं बोलण्याचालण्यांत दंग असायचे. दिवसेंदिवस तें लोकांच्या दिखील लक्षांत येऊं लागलें. त्यांच्याच घरीं पार्टी झाली, त्या वेळीं दुसऱ्या दोघींनां त्यांनीं न बोलल्यामुळें रागसुद्धां आला. अन् मीं दोनदां कायसं त्यांनां विचारलं, तें त्यांनीं मुळीं ऐकलंच नाहीं! याहून आणखी काय चिन्हं असायचीं? आपल्या प्रणयिजनांत गुरफटून जाऊन दुसऱ्या कोणाची पर्वा न करणं हें अगदीं ओतप्रोत प्रेमाचं रामबाण लक्षण नव्हे का?"

शारदाबाई म्हणाली "हो हो, अलबत! या असल्या दोनचार महिने टिकणाऱ्या ओतप्रोत प्रेमाचं तें अगदीं बिनचूक चिन्हच मी समजतें! तें असो म्हणा, पण हें झालं तें कांहीं ठीक नाहीं झालं. निदान बिचाऱ्या शांताला तरी तें व्हायला नको होतं. ती कितीक दिवस तरी तें सगळं मनाला लागून घेईल. तुला तसं झालं असतं तर हरकत नव्हती! तूं दोन चारदां त्या गोष्टीला हंसली असतीस, कीं, झाली असतीस मोकळी! पण शांताचा खोल स्वभाव आहे. मला वाटतं, ती रोज हेंच उगाळीत बसत असेल मनामधें. मजबरोबर घेऊन जाऊं का महिना दोन महिने, म्हणजे नव्यानव्या गोष्टी पाहून लवकर विसरेल तरी हें सारं. अन् आईपासून जरा दूर झाली म्हणजे तेंहि एकप्रकारें बरंच!"

ताराबाईला तो विचार आवडला व शांतालाहि तो पसंत पडेल असं ताराला वाटलं. शारदाबाई म्हणाल्या "आम्ही दोनचार दिवस आधीं पुण्यांत राहणार आहों. पण त्याचं कांहीं भय नको वाटायला! आम्ही राहणार गांवांत सदाशिव पेठेंत भणग्याच्या बोळांत, अन् ती मंडळी राहतात दोन मैलांवर बंडगार्डनजवळ. त्यांची आमची कधीं गांठसुद्धां पडणं शक्य नाहीं. तेच होऊन कधीं आले तर न जाणों."

ताराबाई म्हणाली "तें तर केवळ अशक्य. हल्लीं ती स्वारी आहे आपल्या मित्राच्या कैदेंत अगदीं. अन् ते राजश्री असे विलक्षण आहेत, कीं, सदाशिवपेठचा त्यांनां वारासुद्धां खपायचा नाहीं. त्यांनीं भंग्यांचा बोळ हें नांव कधीं ऐकलं तर स्नान करतील. मग त्या बोळांत त्यांचे स्नेही गेले तर काय दोनचारदां त्यांनां नखशिखांत स्नान घालून तरी शुद्ध समजतील कीं नाहीं कोण जाणे ! छे छे भलतंच कसं बोलतां तुम्ही मामी ? अन् त्यांच्यावांचून भाऊसाहेब कुठें पाऊलसुद्धां टाकीत नाहींत !"

शारदाबाई म्हणाल्या "मग तर फारच छान. मी तर म्हणतें, गांठ न पडलेलीच बरी. पण कमलिनीचं कधीं पत्रबित्र नाहीं येत का शांताला ? ती भेटायला आल्याशिवाय राहून कसं भागेल ?"

ताराबाई म्हणाली "मला वाटतं ती जर कुठें भेटली तर ओळखदेख-सुद्धां नाहींसं दाखवील !"

असें तारा बाह्यतः बोलली खरी, पण मनांतून निराळेंच तिला वाटत होतें. ही मंडळी पुण्यांत असतांना जर त्यांचीन् भाऊसाहेबांची भेट झाली, तर तेंहि कांहीं वावगें नाहीं, असें एकप्रकारें तिला वाटत होतें. जरी कदाचित् त्यांच्या मनांत थोडासा थंडावा आला असला, तरी पुनः शांताबाईला प्रत्यक्ष पाहून पूर्वींचें प्रेम पुन्हां उत्पन्न होणार नाहीं कशावरून ? व शांताच्या सहवासानें बहिणींचे लपंडाव उघडकीला येऊन अखेर गोड परिणाम नाहींच होणार, तें तरी कोणीं सांगावें ? भाऊसाहेब इकडे येत नाहींत, तर शांतानें तरी तिकडे कां जाऊन प्रयत्न करूं नये ?"

मामींचें बोलावणें शांताबाईला आवडलें. पुण्यांत दोन दिवस राह्यचेंहि तिला बरें वाटलें. कारण, बंडोपंतांच्या वाड्यांत त्यांची मैत्रीण इंदिराताईंची तरी निर्वेधपणें भेट घेतां येईल, असें शांताक्कांनां वाटलें.

संध्याकाळीं सीताबाईनीं भावाला भेटायला म्हणून मुद्दाम गाडी पाठवून गांवांतून रमाबाईच्या नवऱ्याला आणवलें. रमामावशी दुपारीं जेवण होतांच निरोप गेल्याबरोबर आल्या होत्या. भागवत वकिलांबरोबर नागेशराव होते तेहि त्यांजबरोबर आले. ते आले त्याबरोबर ताराबाईची थोडीशी चल-बिचल झाली, ती शारदाबाईच्या तीक्ष्ण नजरेंत येऊन चुकली. संध्याकाळच्या दुसऱ्याहि कांहीं वर्तनावरून येथें कांहीं तरी पाणी मुरतें आहे, असें त्यांच्या सहज लक्षांत आलें. म्हणून त्यांनीं नागेशरावांशीं ज्यास्त सलगी करून,

ते कसे काय गृहस्थ आहेत तें कळून घेण्याचा प्रयत्न केला. आणि अशी गंमत झाली, कीं, शारदाबाई आपल्या आईच्या आजोळीं लहानपणीं दोन वर्षे उत्तरहिंदुस्थानांत होत्या, त्यामुळें त्या दोघांनां बोलण्याला रगड विषय मिळाले. इतकेंच नव्हे, तर कांहीं कांहीं माणसें दोघांच्याहि ओळखीचीं निघालीं. व जरी भय्यासाहेबांचा बाप पांच वर्षांपूर्वीं वारल्यापासून नागेशराव त्या बाजूला कधीं गेले नव्हते, तरी शारदाबाई दहापंधरा वर्षांत तिकडे नसल्यामुळें त्यांनां नागेशरावांनीं कांहीं कांहीं ज्यास्त बातमी सांगितली. शारदाबाईनीं दिलबहार महालहि पूर्वीं एकदां पाहिला होता, व भय्यासाहेबांच्या वडलांनांहि तेव्हां पाहिलें होतें. मग तर काय खूपच बोलायला निघालें, व त्यांची शारदाबाई वाखाणणी करूं लागल्यानें नागेशरावांनां आनंद झाला. पण त्याच माणसाच्या प्रत्यक्ष मुलानें आपणाला इतकें अन्यायानें वागविल्याचें नागेशरावांनीं इत्थंभूत सांगतांच, त्यांनींहि आपणाला कांहीं त्या वेळीं भय्यासाहेबांविषयीं लोक काय म्हणत होते तें आठवतें कीं काय म्हणून प्रयत्न करून पाहिला. आणि अखेर शारदाबाईंनांहि आठवलेंसें वाटलें, कीं, बापाच्या अगदीं उलट भय्यासाहेब होणार असें कोणींसें त्यांनां ह्मटलें होतें खरेंच !

---

## प्रकरण सव्विसावें.

### शांताबाईचें पत्र.

दुसऱ्या दिवशीं चार मंडळी जेवायला बोलवायचा सीताबाईंनीं बेत केला. त्यांत नागेशरावांनांहि बोलावलें होतें, भागवत वकील होते, रावबहादुर होते, व सारजाबाईहि होत्या. रीतीप्रमाणें सर्वांचीं एके जागीं जेवणें झालीं. व घरची तेवढी मंडळी व रमाबाई इतकींच राहिलीं. नागेशरावांनां कां बोलावलें तें शारदाबाईंनीं ताबडतोब ओळखलें. दुपारीं चार वाजतां चहा झाल्यावर, शारदाबाई व तारा बागेंत हिंडत असतांना शारदाबाई म्हणाल्या, "मी काल आल्यापासून पहातें आहें तों मला कांहीं तरी वास येतो आहे. तुला मी माझं मत स्पष्ट सांगितलं तर राग नाहींना येणार? मला आपलं बोलावंसं वाटतं आहे, बोलूं का ?"

ताराबाई म्हणाली "अगबाई, मामी, आपण फारशी प्रस्तावना करतां आहां? खुशाल बोला !"

शारदाबाई म्हणाल्या " मी नागेशराव इतके कां येतात यावरून कांहीं ह्मणणार आहें. तो स्वतः मला बरा योग्य माणूस दिसतो, बोलायचालायला ठीक आहे, हुशार आहे, हें सारं खरं; पण त्याची नुकती नेमणूक झाली आहे. त्याला पगार तो कितीसा असणार? दुसरं कांहीं उत्पन्न असलं तर मग माझं इतकं कांहीं ह्मणणं नाहीं; पण तसं असेलसं दिसत नाहीं. बोलूं का पुढें ? "

ताराबाई ह्मणाली " अशा भितां कशाला मामी ? बोलून टाका एकदां !"

शारदाबाई म्हणाली " मला थोडंसं गुळगुळीत दिसतं आहे इथें. पण तुलाहि द्रव्य नाहीं अन् त्यालाहि नाहीं. असं कसं चालावं ? द्रव्यावांचून इतर सगळीं सोंगं कशीं होतात ? त्यांतून तूं आपली साधीभोळी असतीस, कीं, आपली घराच्या बाहेर कांहीं समजत नाहीं अशी, तर निराळी गोष्ट होती. पण तुझ्यासारख्या हुशार व धूर्त मुलीनं जन्मभर भाकरी भाजीत अन् पोरं संभाळीत रहावं म्हणजे सारं व्यर्थच झालं ह्मणायचं ? ह्मणून ह्मणतें, कीं, नुसत्या त्यांच्या उमदेपणावर भुलून जाऊं नको. आह्मां सर्वांचा अगदीं हिरमोड होईल तशानं ! तुझ्या बाबांनां तर फार वाईट वाटेल ! "

ताराबाई म्हणाली " अरे वा मामी ! आपण अगदीं खऱ्या भावानंच हें बोलतांहां. मी समजलें होतें, कीं, कांहीं नुसती चेष्टा करणार होतां माझी!"

शारदाबाई म्हणाली " नाहीं, बिलकुल चेष्टा नाहीं करीत, अन् तूंहि चेष्टेवर नेऊं नको. "

ताराबाई म्हणाली " तर मग मी सांगतें. आपणाला एवढी भीति वाटण्याचं मुळींच कारण नाहीं. मी स्वतः सावधगिरी राखीन, अन् नागेशरावांनांहि सावध करीन. होतांहोईल तोंवर मी त्यांच्यावर मन जाऊं देणार नाहीं ! "

शारदाबाई म्हणाली " ही चेष्टा नव्हेना, तारे ? "

ताराबाई म्हणाली " नाहीं नाहीं, माफ करा मामी ! मी पुनः सांगतें. आज तर माझं प्रेम त्यांजकडे नाहीं—अगदीं खास नाहीं ! पण मला ठाऊक आहेत त्या सगळ्यांत त्यांच्याइतका पसंत माणूस मला दिसत नाहीं. अन् त्यांचं जर मजकडे लक्ष लागलं—पण खरोखरच न लागावं तें चांगलं. अशा द्रव्याच्या अडचणींत जन्मभर राहणं बरं नव्हे, हें मीहि कबूल करतें. अरेरे, किती बरं त्या नीच भय्यासाहेबानं क्रूरपणाचं काम केलं आहेन् ! बाबांचं मजबद्दल इतकं चांगलं मत आहे त्याचा मला मोठा अभिमान आहे, व तें मत नाहींसं होऊं नये ह्मणून मी नेहमीं जपत जाईन. पण त्यांनांहि नागेशराव

पसंत दिसतात. थोडक्यांत इतकंच सांगतें, कीं, तुह्मां कोणालाहि माझ्याविषयीं वाईट वाटेल असं मी कधींहि करणार नाहीं. पण आपण हल्लीं पुष्कळदां पहातोंना, कीं, एकदां जर खरोखर मनं जुळून आलीं, तर निव्वळ आजच चांगला पगार नाहीं एवढ्याचकरितां, तरुण मंडळी लग्नाचा वाङ्निश्चय करायला मागं सरत नाहींत, अन् मग पगार वाढला म्हणजे लग्नं करतात. तसं जर इथं झालं, तर काय सांगावं ? इतर तरुणींपेक्षां मी जास्त मन आवरीन, हें मी आज कसं सांगूं ? अन् पैशाच्या अडचणीकरतांच केवळ अशीं जुळलेलीं मनं तोडणं शहाणपणाचं आहे, हें तरी कोणीं ह्मणावं ? तेव्हां आज मी एवढंच सांगूं शकतें, कीं, मी होऊन उगीच घाई करणार नाहीं. त्यांचं माझ्यावर मन आहेच असंसुद्धां मी घाईघाईनं ठरवून टाकणार नाहीं. मंडळींत ते असले तर त्यांचं आपणाकडे मुद्दाम मन ओढायची खटपटहि मी करणार नाहीं. एकंदरींत काय, मी आपल्याकडून होईल तितकी जपेन. ”

शारदाबाई ह्मणाल्या “मला तर वाटतं, त्यांनां इतकं वारंवार इकडे येण्याचं उत्तेजनसुद्धां न दिलेलं बरं. निदान त्यांनां जेवायचं आमंत्रण करायचं तूं आईला सुचवणं ठीक नव्हे ! ”

ताराबाई हंसत ह्मणाली “ आज सकाळीं सुचवलं तसं होय ? खरंच, तेंसुद्धां कांहीं बरं नाहीं. पण ते रोज असे इकडे येतात असं समजूं नका तुह्मी. काल सहज आले होते, आज चार मंडळी बोलावली त्यांत त्यांनां बोलावलं ह्मणून आले इतकंच. पण आतां अगदीं मी खरं सांगतें तुह्माला, कीं, हें तुमचं सांगणं लक्षांत ठेवून मी वागेन. आतां झालं ना तुमचं समाधान? ”

शारदाबाई म्हणाल्या “हो झालं. पण माझा राग नाहींना आला इतकी नाजुक गोष्ट बोलल्याबद्दल ? ”

ताराबाई म्हणाली “ छे छे, इतकं नीट मनापासून बोललांत हेंच मी भारी समजतें ! ”

इतक्यांत छोटा मधु बोलवायला आला ह्मणून त्या दोघी घरांत गेल्या. उद्यां पहांटे वसंतराव व शारदाबाई जायच्या, त्यांच्याबरोबर शांताहि जायची असें ठरलें. पण आपण गेलें तर ताराला एकटीला आईचा राग सोसावा लागेल ह्मणून तीहि जावें न जावें करीत होती. सीताबाई येथून चार दिवस गेल्या तर बरें होईल, पण कांहीं योग्य कारणाशिवाय गेल्या तर तिकडूनहि वाईट दिसेल. पण तितक्यांत परमेश्वरानें त्यांची विवंचना विलक्षण रीतीनें दूर केली.

सीताबाई दुपारच्या जेवणावर दांतांत कांहीं अडकलें ह्मणून दांत कोरून दुपारीं जरा वामकुक्षी करायला गेल्या; तों दाढेला एकसारखा ठणका लागला. पांच वाजतां तर दाढ सुजून गालहि गुरवळीसारखा सुजून आला. डाक्तरला आणून दाखवितां त्यानें नेहमींप्रमाणें ऑपरेशन केलें पाहिजे ह्मणून सांगितलें. मग त्यांची धायकुत काय विचारावी ? सरतेशेवटीं वसंतराव म्हणाले "तुह्मी मजबरोबर पुण्याला चला. तिथें डाक्तर चांगला कुशल पाहून ताबडतोब उपचार करूं आणि नच भागलें तर लगेच ऑपरेशन करवूं. जरा बरें वाटल्यावर परत या."

हें ह्मणणें सर्वांनांच पटलें व पहांटे सीताबाई भावाबरोबर शांताला घेऊन पुण्यास चालत्या झाल्या.

अशा तऱ्हेनें बोभाट न होतां सीताबाई निघून गेल्या. नीलकंठराव दुसऱ्या दिवशीं ठरल्याप्रमाणें आले. त्यांनां आनंदरावांनीं घरीं केळवण वगैरे सर्व यथास्थित केलें. ताराबाईचा नीलकंठरावांवर राग नव्हताच व मैत्रिणीचें लग्न म्हणून उलट थोडासा उल्हासच होता. सुंद्रीहिरींनां मिरवायला मिळालें व नवऱ्याच्या पक्षाकडील (नवऱ्यामुलाकडील नव्हे!) करवल्या या नात्यानें रावबहादुरीणबाईंनां थोडेंसें वांकवतां आलें. आणखी काय-पाहिजे? नवऱ्याच्या पक्षाकडे फारशी तयारीची जरूर नव्हतीच. रावबहादुरांनीं अत्यंत हौसेनें सर्व कांहीं व्यवस्था उत्तम ठेवलीच होती. सकाळपासून सुरुवात होऊन गोरज मुहूर्तावर विवाहविधि होऊन लगेच गृहप्रवेश होऊन परत जोडपें रावबहादुरांकडे गेलें. तेथें दुसऱ्या दिवशीं मोठी मेजवानी सर्व मंडळींनां होऊन तिसऱ्या दिवशीं पहांटेच्या गाडीनें नीलकंठराव कुटुंबाला घेऊन सुवर्णपुरास निघूनसुद्धां गेले !

लग्नाच्या दुसरे दिवशीं ताराबाई मालतीशीं बोलत असतां मालती म्हणाली " तारा, तुजकडून नेहमीं पत्र यावं अशी फार इच्छा आहे माझी. "

ताराबाई म्हणाली " अलबत् खास येईलच. पण आपण मात्र संसारांत गुरफटून उत्तर ल्याहायला विसरूं नका! "

मालती म्हणाली " छे छे, बघ माझं येतं का नाहीं तें. दुसरं असं, कीं, दोनतीन महिन्यांनीं बाबा अन् शेवंती आमच्या तिकडे सुवर्णपुराला यायच्चीं आहेत. त्यांच्याबरोबर तूं आलीस तर मला अत्यंत आनंद होईल. "

ताराबाई म्हणाली " पण तूं आधीं परत नाहीं का येणार माहेरीं ? तेव्हां भेट होईलच. "

मालती म्हणाली "छे ग, मी बरेच महिने येणार नाहीं आहें. म्हणून म्हणतें, कीं, तूं येशील तर फार बरं वाटेल. जरूर येच."

ताराबाई म्हणाली "बरं बाई, येईन तुझा संसार पहायला. मग तर झालं?"

सुवर्णपुराहून मालतीचीं पत्रें ताराबाईला येऊं लागलीं, तेव्हां आपल्या नव्या घराबद्दल ती काय म्हणते तें जाणण्याची ताराला फार उत्सुकता वाटत होती. पूर्वींप्रमाणें मनांत आलेली गोष्ट निर्वेधपणानें एकमेकींजवळ स्पष्ट सांगणें अलीकडे ताराला अशक्य झालें होतें, तरीहि ती पत्राचीं उत्तरें बिनचुक पाठवीत असे. श्रीमंत राणी माईसाहेब तिच्याशीं कशा वागतात, व एकंदरींत नव्या संसारांत तिला किती सुख होतें, तें समजण्याची तिला फार उतावळी झाली होती. मालतीचीं पत्रें सविस्तर असत, पण येथून तेथून साऱ्या गोष्टींची स्तुतिच त्यांत असे, व स्वतःहि फार आनंदांत असल्याचें ती वारंवार लिही. एकंदरींत नीलकंठरावांच्या वर्णनांतली अतिशयोक्ति—अचरटपणाची अतिशयोक्ति—वजा केली तर त्या वर्णनाचीच दुसरी आवृत्ति मालतीच्या पत्रांत असे. घरदार, शेजारपाजार, सामानसुमान सर्व उत्तम पसंत आहे, श्रीमंत राणी माईसाहेब अत्यंत प्रेम करतात असेंच नेहमीं असे. अखेर ताराला वाटूं लागलें, कीं, वास्तविक खरी स्थिति काय आहे त्याची कल्पना आपण स्वतः जाऊन प्रत्यक्ष सर्व पाहिल्याशिवाय होणार नाहीं.

सीताबाई गेल्यापासून आठव्या दिवशीं परत शिवदुर्गाला आल्या. तेवढ्यांत त्या पुण्यांत दोनतीन दिवस राहून मुंबईलाहि जाऊन आल्या होत्या. त्यांच्या मनांत पुण्यांत भाऊसाहेबांनां जाऊन भेटायचें फार होतें, पण ऑपरेशनमुळें त्यांनांहि बाहेर पडतां येत नव्हतें. शिवाय, शारदाबाईनीं फारसें त्या नादांत पडूं नका म्हणून सुचविल्यावरून भेट घेण्याचा प्रयत्न न करितां त्या परत आल्या होत्या. शांताबाई मुंबईत मामामामींच्या जवळ राहिली. अथवा नुसत्या मुंबईत राहिली म्हणण्यापेक्षां पुण्या-मुंबईत राहिली, हें म्हणणें जास्त बरोबर होईल. कारण, पुण्यामुंबईत फक्त दोन तासांचा रस्ता राहिला होता. दर तासाला गाडी दोन्ही ठिकाणाहून सुटे ती दोन तासांच्या आंत जाऊन पोंचे. मुंबईत ऑफिसांकरतां जाणारी कित्येक मंडळी हमेश पुण्यास राहूनच साडे नवांच्या एक्सप्रेसनें निघून पावणेअकराला मुंबईस पोंचत व संध्याकाळीं पांचाला निघून सवा सहाला पुण्यास परत येत! यामुळें हरएक कामानिमित्त दोन्ही शहरांत इतकें दळण-

वळण चाले, कीं, दोनहि शहरें मिळून एकच शहर असल्याचें वाटूं लागलें होतें. टेलिफोन कंपनीनें तर दोन्ही शहरांत टेलिफोननें बोलण्याची सोय केली होती. त्यामुळें बंडगार्डनवरील भाऊसाहेबांच्या बंगल्यांतून त्यांच्या मुंबईतल्या महालक्ष्मीवरच्या बंगल्यांतील माणसांशीं टेलिफोननें सहज बोलण्याची सोय झाली होती. या व इतर सोयींमुळें पुणें व मुंबई अशीं दोन शहरें नसून केवळ एका शहराचे दोन भाग आहेत, असा सार्वत्रिक ग्रह होऊन गेला होता. श्रीमंत लोकांची तर गोष्ट राहोच पण साधारण मध्यम स्थितींतलेहि लोक दोन्ही ठिकाणीं सहजगत्या जातयेत असत, व दोन्ही ठिकाणीं जरूर वाटल्यास निजण्याबसण्याचीहि ज्याची त्याची सोय असे. दिवसभर मुंबईच्या कोंकणी हवेंत श्रम करून रात्रीं विसाव्याकरितां घाटमाथ्यावरच्या शांत हवेंत थंडीचा उपभोग घेण्याकरितां कितीक उद्योगधंदेवाले लोक दोन्ही ठिकाणीं जागा घेऊन ठेवीत असत. वसंतराव यांचीहि सदरप्रमाणें दोन्ही ठिकाणीं सर्व सोय असे, हें आतां निराळें सांगण्याची जरूर नाहीं. ह्यामुळें शांताला शारदाबाईबरोबर पाहिजे तेथें राहतां येत असे.

सीताबाई परत गेल्यावर शांताकडून ताराबाईलें पत्रें येऊं लागलीं. त्यांत भाऊसाहेबांची भेट झाल्याचा मजकूर केव्हां येतो म्हणून तारा फार उतावीळ झाली होती. पण पाहिल्या चार पत्रांत तसा कांहीं मजकूर येईना. शांताला कमलिनी किंवा इंदिराताई भेटली नाहीं इतकेंच नाहीं. तर तिला त्यांच्याकडून बोटभर चिठीहि आली नाहीं. " पण मला वाटतें मी त्यांनां शिवदुर्गाहून पाठविलेंलें पत्र त्यांनां मिळालेंच नसेल असें शक्य आहे. उद्यां मामी पर्वतीकडे जाणार आहेत, त्या वेळीं मीहि इंदिरातांईच्या वाड्यांत जाऊन त्यांनां भेटेन असें म्हणतें, " असा एका पत्रांत मजकूर होता.

यानंतरचें पत्र पर्वतीच्या बाजूकडे बंडोपंतांचा वाडा होता तिकडे शांताबाई जाऊन आल्यानंतरचें होतें. तेथें सुदैवानें तिला इंदिराताई व कमलिनी या दोघींचीहि गांठ पडली होती. " कमलिनी मला कांहीं मोठीशी हुशारींत दिसली नाहीं. पण मला पाहून तिला आनंद झालासा दिसला. इकडे पुण्याला यायच्या आधीं आम्हांला आगाऊ कां कळवलें नाहीं, असें त्यांनीं मला आवर्जून विचारलें. यावरून उघड होतें, कीं, त्यांनां माझें पत्र मिळालेंच नाहीं. त्यांच्या भावाचें नांव निघाले होतें. पण तें व भय्यासाहेब कांहीं कामांत फार गढून गेले आहेत, त्यांनां कोणालाच भेटायला फुरसत नाहीं. असें कमलिनी

म्हणाली. आमचीसुद्धां फारशी भेट होत नाहीं, असेंहि इंदिराताई बोलली. मी कांहीं फार वेळ बसलें नाहीं. सरलादेवी कुठेंशी यायची होती म्हणून त्या दोघी जराशा चुळबुळ करूं लागतांच मीं त्यांचा निरोप घेतला. पण आतां पुनः भेटी होतील असें वाटतें. "

हें पत्र वाचून ताराबाईची खात्री झाली, कीं, हे सर्व त्या दोघींचे लपंडाव आहेत व त्यांच्या मनांतून शांताबाई पुण्यांत असल्याचें भावाला समजूं द्यायचें नाहीं, व आतां केवळ अकस्मात् त्याची तिची कुठें गांठ पडल्यावांचून भाऊसाहेबांनां ती पुण्यांत आल्याचें खास कळत नाहीं.

आणखी महिना लोटला, तरी भाऊसाहेब शांताच्या दृष्टीस पडले नाहींत. ती आतां आपल्या मनाची अशी समजूत घालूं लागली होती, कीं, हें असें होण्यापासून आपणाला मुळींच वाईट वाटत नाहीं. पण त्यांच्या दोघी बहिणीहि आपली भेट घेऊं इच्छीत नाहींत हें तिला आपल्या मनापासून लपवून ठेवणें केवळ अशक्य झालें. त्या आपल्या घरीं परत भेटीला येतील व त्या वेळीं आपण कोठें बाहेर गेलेल्या असलों तर चुकामूक होऊं नये या हेतूनें ती सबंध पंधरा दिवस त्यांची वाट पहात घरीं बसून राहिली; पण त्यांचा मागमूसच नव्हता. अखेर एक दिवस ऐन दिवे लागणीला कमलिनी अगदीं उभ्याउभ्या आली आणि जरा बसलेंसें करून लगेच चालती झाली. या तिच्या वर्तनानें शांताबाईला किती वाईट वाटलें तें तिनें लिहिलेल्या पत्रावरून ताराबाईला स्पष्ट दिसून आलें. तें पत्र येणेंप्रमाणें:—

**" अनेक प्रेमपूर्वक आशीर्वाद. वि वि.—आम्ही सर्व खुशाल आहोंत. इकडील मजकूर. मला अगदीं कबूल करणें भाग आहे, कीं, कमलिनीचें मजवर प्रेम आहे असें मी जें समजत होतें, ती माझी मोठी चूक होती, व तुझ्या म्हणण्याप्रमाणें तें अगदीं खोटें ठरलें आहे. पण अखेरीस तुझें मत जरी खरें झालें आहे तरी, त्या वेळच्या तिच्या माझ्याशीं असलेल्या सलगीच्या मानानें, मला जी खात्री वाटत होती, ती तुला वाटणाऱ्या शंकेच्या इतकीच साहाजिक होती, असें तूं सुद्धां कबूल करशील. तुझें मत खरें ठरलें यांत तुला आनंद वाटणार नाहीं हें अगदीं उघड आहे.**

**अशा तऱ्हेनें कमलिनीनें प्रथम माझ्याशीं इतकी सलगी कां केली तें समजणें मला तरी अशक्य वाटतें. पण माझी कांहीं चूक होती असें नव्हे. पुनः कोणी तसें मजशीं वागेल तर मीहि पुनः तशीच फसेन.**

## आजपासून पन्नास वर्षांनीं !

कालपर्यंत कमलिनी परतभेटीला आली नाहीं, तोंवर बोटभर चिठी देखील नाहीं कीं निरोप नाहीं. आणि काल आली ती जशी काय नाइलाजास्तव आपली टाकणें टाकायचें ह्मणून आलीशी दिसली. पुन: कधीं कोठें भेट होईल त्याचें नांव नाहीं, कीं, आज माहिन्यांत काय काय केलेंत त्याची विचारपूस सुद्धां नाहीं. तिची वागणुक इतकी फिरलेली मला वाटली, कीं, मीं तर ओळख सोडून द्यायचा निश्चय केला आहे.

असें ती वागली म्हणून मीं तिला दोष दिला पाहिजे. पण मला उलटी तिची कींवच येते. प्रथम मी कांहीं तिच्याशीं सलगी करायला गेलें नव्हतें, तर उगाच इतका तिनें खटाटोप कां केला कोण जाणें ? मला तिची कींव येते ती अशी, कीं, तिचें मन तिला खात असलेंच पाहिजे, कीं, हें आपण नीट करीत नाहीं. ती हें असें आपल्या भावाच्या हिताकरितां करित असेल हें उघडच आहे. यापेक्षां स्पष्ट काय लिहूं? तुला मला माहीत आहे, कीं, हे तिचे लपंडाव विनाकारण चालले आहेत. पण तिचा भाऊ जर तिला प्रिय, तर हे तिचे लपंडाव साहाजिक तऱ्हेनेंच होत असले पाहिजेत, आणि म्हणून ते क्षम्य आहेत हें उघड आहे.

पण अजून तिला माझी भीति कां वाटत रहावी तें कळत नाहीं. कारण तिच्या भीतीला जर कांहीं आधार असता तर आजपर्यंत भाऊसाहेबांची आणि माझी केव्हांच भेट नसती का झाली ? कारण मी पुण्यांत आहें असें त्यांच्या कानावर गेलें असल्याचें तीच स्वतः कायसेंसें बोलली. पण तिचा स्वतःचा ओढा सगळा सरलेकडे आहे, व त्यांचेंहि मन तिकडेच आहे, असा ती आपल्या स्वतःचा समज करून घेत आहे. मला कांहीं हें नीटसें कळत नाहीं. मला कोणाविषयीं वाईट अभिप्राय करून घ्यावयाचा नाहीं आहे म्हणन. नाहींतर त्यांत सर्व कांहीं लपंछपं आहे असें मी साफ ह्मणणार होतें.

पण ही कर्मकथा पुरे आतां. आपला संबंध एकदांचा तुटला. आतां तुझ्या माझ्या पत्रांत हें रडगाणें कशाला? आनंद देणाऱ्या चार गोष्टी कां नाहीं लिहिल्या? मामामामी मला अत्यंत ममतेनें वागवतात व मी फार मौजेंत काळ घालवीत असतें—निदान आतां घालवणार आहें. तुमची हकिगत कळवीत जा. कमलिनी अर्धवट बोलली कीं, आनंदभुवन तीं लवकरच आजिबात सोडून देणार आहेत; पण कांहीं अजून नक्की नाहीं असेंहि ह्मणाली. तूं त्याविषयीं कांहींच कोणाला बोलूं नकोस. सुवर्णपुरच्या मंडळीची मजेची हकीगत पत्रांतून येते ह्मणून लिहिलेंस त्यानें फार आनंद झाला. तूंहि स्वत: रावबहादुरां-

बरोबर तिकडे जरूर जायाचें कर. तुला फार आनंद होईल अशी माझी खांत्री आहे. कळावें हें आशीर्वाद !"

या पत्रानें ताराबाईला फार वाईट वाटलें; परंतु कमालिनिबद्दल शांता पुनः तरी फसायची नाहीं हा विचार मनांत येऊन तिला थोडेंसें बरें वाटलें. भाऊसाहेबांचा नाद आतां अजिबात सुटलाच, इतकेंच तर काय, पण पुनः त्यांनीं शांताकडे पाहूं सुद्धां नये, असेंहि तिला वाटूं लागलें. एक तऱ्हेनें ती मनांत अशीहि इच्छा करूं लागली, कीं, एकदां स्वारीचें लग्न सरलादेवीशीं लागलें तर भली खोड मोडेल, व परस्परा शांताक्काच्या खऱ्या योग्यतेचें त्यांनां ज्ञान होईल. कारण नागेशरावांच्या सांगण्यावरून असें होतें, कीं, जर सरलेशीं लग्न झालें तर भाऊसाहेबांनां लवकरच त्या विषयीं पश्चात्ताप वाटण्याचा बराच संभव होता.

याच सुमाराला शारदाबाईचें ताराला एक पत्र आलें. त्यांत त्यांनीं विचारलें होतें, कीं, मला कबूल केलेंस त्या गृहस्थाविषयीं पुढें कशी काय खबरबात आहे? ताराबाईला उत्तर देतांना, स्वतःला जरी नसली, तरी मामीला संतोषकारक अशी हकीगत सुदैवानें लिहितां आली. कारण, नागेशरावांची ताराबाईवरील मर्जी हळुहळू कमी कमी होत जाऊन हल्लीं तर त्यांचें सर्व लक्ष दुसऱ्याच ठिकाणीं लागलेलें होतें. ही गोष्ट ताराच्या पूर्णपणें लक्षांत आली होती; तरी तिला त्याविषयीं मामीला उघड लिहिण्यांत किंचित्‌हि वाईट वाटत नव्हतें. कारण, एकंदरींत तिच्या अंतःकरणांत वास्तविक प्रेम उद्भवलें नव्हतेंच. आपल्याजवळ किंवा नागेशरावांजवळ पैसा असता तर त्यांच्यासारख्या देखण्या व उमद्या गृहस्थानें सर्वांत आपणाला पहिल्यानें पसंत केलें असतें, इतकें स्वारस्य आपणांत आहे, एवढ्याच विचारावर ती हल्लीं समाधान मानून घेत होती. अवचित पंधरा हजार रुपये द्वारकाबाईला तिच्या आईच्या आईकडून मिळाले, तें ऐकतांच पुष्कळ लोकांनां, कधीं पूर्वीं कल्पना नव्हती असे गुण, द्वारकाच्या अंगीं दिसूं लागले होते. त्यांत नागेशराव प्रमुख होते. पण चमत्कार असा, कीं, जी तारा मालतीला एका गोष्टीकरितां नांवें ठेवीत होती, ती त्याच गोष्टीकरितां नागेशरावांला हंसत नव्हती; इतकेंच नाहीं, तर त्यांचें वर्तन सरळ व रास्त आहे असें ह्मणूं लागली होती !

ही सारी हकीगत मामीला पत्रांत लिहून पुढें ती आणखी म्हणाली: "यावरून माझी आतां खात्री होते, कीं, मी खरोखरच त्यांच्यावर तसें प्रेम कधींच

करीत नव्हतें. कारण, तसें जर कांहीं असतें, तर आज ते द्वारकाकडे लक्ष देतात हें पाहून, माझ्या अंगाची आग व्हायला हावी होती, व द्वारकाला मीं शिव्या शाप देत असायला पाहिजे होतें. पण मला तसें कांहीं न होतां, मी मनापासून त्यांचें व द्वारकाचें लग्न होऊन तीं दोघें सुखी होवोत, असें ह्मणतें आहें. यावरून उघड दिसेल, कीं, प्रेमाचा भाग मजमधें मुळींच नव्हता. मी तुमच्या सांगण्याच्या आधींपासूनच सावध होतें, त्याचा हा फायदा आहे. मी त्या वेळीं मोठी रागावलें असतें, अथवा मत्सर दाखवून स्वतःशीं जळफळतें आहें असें लोकांनां दिसलें असतें, तर लोकांच्या दृष्टीनें मला मोठें महत्त्व आज आलें असतें खरें; पण तसलें महत्त्व येण्यांत मला मुळींच तात्पर्य वाटत नाहीं. माझ्या मानानें पाहिलें तर सुंद्री हिरी नागेशरावांच्या या वर्तनानें त्यांजवर कितीतरी रुसल्या फुगल्या आहेत. पण त्यांनां अजून जगाचा अनुभव बिलकुल नाहीं. अजून त्या अगदीं कच्चा आहेत. त्या बिचाऱ्यांनां अजून हा एक कडू धडा शिकायचा आहे, कीं, माणूस कितीहि देखणा व उमदा असला तरी त्याला दिखील, इतर साधारण माणसांप्रमाणें, मध्यान्हीच्या वेळेला पोटाची सोय पहावी लागते, त्या वेळीं नुसत्या प्रेमाच्या गोष्टींनीं भूक रहात नाहीं !"

---

## प्रकरण सत्ताविसावें.

### पुन्हां मामींची भेट.

मागील प्रकरणांत सांगितलेल्या हकीगतीला आतां एक महिना होऊन गेला होता. भाद्रपद महिना सुरू होऊन गौरीगणपतींची जिकडे तिकडे गर्दी चालली होती. मेघराजानें कृपा केल्यामुळें जिकडे नजर फेंकावी तिकडे सृष्टी हिरवीगार होऊन अत्यंत शोभिवंत दिसत होती. शिवदुर्गांत अथवा शांतिसदनांत या अवधींत सांगण्यासारखी विशेष गोष्ट झालेली नव्हती. शांताबाई अजून मामाकडेसच होती. तिच्याकडून आतां येणाऱ्या पत्रांवरून तिचेंहि मन तिकडे रमत चाललें असल्याचें स्पष्ट दिसूं लागलें होतें. मधून मधून सुवर्णपुराहूनहि मालतीचें ताराबाईला पत्र येत असे, व दर पत्रांत ती तिला पुनः पुनः आग्रह करून बोलावीत असे. पहिल्यानें ताराबाईचा बेत तिकडे जाण्याचा नव्हता; पण शांताक्का जवळ नसल्यामुळें तिलाहि कंटाळा येत चालला होता. तशांत मालतीचा असा आग्रह पाहून, व तिकडे गेलों तर वाटेनें

शांताचीहि एकदोन दिवस गांठ पडेल व मालतीच्या संसाराचें स्वरूप प्रत्यक्ष दृष्टीस पडेल, या विचारानें तिच्याहि मनांत तिकडे जाण्याची इच्छा हळुहळू उत्पन्न झाली होती. मुली चार ठिकाणीं गेल्या आल्या तर तितक्या जास्त ओळखी होऊन त्यांनां अनुरूप स्थळें मिळण्याचा संभव जास्त होईल, या हेतूनें सीताबाईहि तसल्या विचाराच्या कधीं विरुद्ध नसत. शांता दिवाळीला परत येणार तोंपर्यंत आपणहि घरांतल्या घरांत कुचंबून राहण्यापेक्षां, एक-दोन दिवस पुण्यामुंबईत फेरफटका करून सुवर्णपूर पाहून यावें, असें ताराला फार वाटूं लागलें. हरकत काय ती एकट्या आनंदरावांची. कारण, शांता व तारी घरांत नसली म्हणजे घरांतली बहुतेक सर्व अक्कल नाहींशी झाली, असें त्यांनां वाटे. पण आपण रात्रंदिवस लायब्ररींत गढून राहून ताराला दिवसभर कंटाळवाणें रहाण्यास एकटें ठेवावें, हेंहि त्यांनां पसंत नव्हतें. “ बरें आहे, तूं जा. मी नको ह्मणत नाहीं. मात्र मला वारंवार पत्र पाठवीत जा. माझें उत्तर येईल अशी वाट मात्र पहात राहूं नकोस. पण बहुतकरून मी उत्तर केव्हां केव्हां लिहीन, असें मला आत्तां वाटतें आहे,” इतकेंच ते अखेर म्हणाले.

पूर्वीं ठरल्याप्रमाणें रावबहादुरांच्या शेवंतीबरोबर आपणहि महिनाभर सुवर्णपुरास रहावें, असा तारेचा बेत झाला. रावबहादुर मात्र फक्त आठ दिवसांत परत येणार होते. रावबहादुरीणबाईच्या मनांत इतक्यांत स्वतः जाण्याचें नव्हतेंच. कारण, त्यांचा मुलगा जरासा अशक्त होता. त्याला पावसापाण्यांत अशी हवापालट करणें इष्ट नव्हतें. अश्विनाचा महिना निघतांच ही मंडळी निघण्याचें ठरलें. ताराबाई परत येईपर्यंत रिसाल्याचा मुक्काम शिवदुर्गांत राहीलच असा नेम नव्हता, ह्मणून निघण्यापूर्वीं तिनें नागेशरावांचा विशेष निरोप घेतला. आपण या गांवांत प्रथम आलों तेव्हां आपलें पहिल्यानें जिच्याकडे लक्ष विशेष वेधलें, व जिनें प्रथम आपणाला विशेष प्रेमयुक्त सहानुभूति दाखविली ती ही स्त्री होय, ही जाणीव त्यांच्या डोक्यांतून अजून गेली नव्हती. ह्मणून त्यांनींहि विशेष अगत्यानें तिचा निरोप घेतला; व आज जरी नागेशरावांचें लक्ष आपणाकडे नाहीं, तरी असा अत्यंत देखणा व मनमिळाऊ गृहस्थ पुन्हां दृष्टीस फारसा पडेल न पडेल या विचारानें तिलाहि त्यांचा निरोप घेतांना फार अवघड गेलें.

दुसऱ्या दिवशीं तीं तिघें शिवदुर्गाहून निघालीं. रावबहादुरांप्रमाणेंच त्यांची मुलगी शेवंती सुस्वभावी पण डोक्यांत विशेष राम नव्हतें. अशी होती. तिच्याशीं

बोलण्यांत नवीनपणा तो काय असणार ? रावबहादुरांच्या आपणाला पदवी मिळाल्या वेळच्या व इतर गोष्टी तर हजारदां आवृत्ति झाल्यामुळें तोंडपाठ झाल्या होत्या. त्यांच्या योगानें त्यांत हंसण्यासारखें पुष्कळ असूनहि आतां ताराबाईला हंसूं येणें शक्य नव्हतें. गाडीच्या खडखडाटाप्रमाणेंच स्टेशनावर पोंचण्यास लागणाऱ्या पांच मैलांतच तिला त्यांचा कंटाळा आला. पण एकदां स्टेशन गांठल्यावर मौजेला काय तोटा ? सदर्नमराठा रेल्वेनें पुण्यास पोंचेपर्यंत संध्याकाळ झाली. आगाऊ मामींनां लिहून ठेवल्यावरून मामी व शांताबाई या मंडळींची वाटच पहात होत्या. रावबहादुरांनांहि पुण्यांत एकदां कलेक्टर साहेबांनां भेटावयाचें होतें. ह्मणून अनायासेंच दोन दिवस पुण्यास मुक्काम व्हायचा होता. यांची गाडी जाऊन उभी राहतांच वरच्या माडीच्या खिडकींत शांताबाई आली, व छोटा मधु व सुशी धांवत रस्त्यांत आलीं. दोघांनांहि तारुताई भारी आवडत असे ह्मणून तीं दोघेंहि तिची अगदीं वाट पहात होतीं. पण गाडींतून ह्मातारेबोवा व शेवंती उतरतांना पाहून तीं दोघें जीं पुनः पळालीं तीं थेट आईजवळ जाऊन म्हणालीं "नाहीं, तालुताई आली नाहीं. कोणी ह्मातालाबुवा आला आहे !" ती एक मजाच उडाली. मागाहून 'तालुताई' खरोखरीच आलेली पाहून त्यांनां जो आनंद झाला आहे तो काय वर्णून सांगितला पाहिजे !

शांताबाईच्या मुद्रेवरून अलीकडे ती खरोखरीच मौजेनें काळ घालवीत आहे अशी ताराबाईची खात्री झाली, व तिला त्यामुळें फार आनंद झाला. दुसऱ्या दिवशीं गप्पाटप्पा, खाणेंपिणें सर्व यथास्थित झालें. वसंतराव मुंबईला होते त्यांच्याकडे जाऊन मुंबईहून परस्पर नाशकाकडे या मंडळींनीं जावें, असा त्यांचा आग्रहाचा निरोप शारदाबाईनीं रावबहादुरांनां सांगितला व तो त्यांनीं नेहमींच्या सुस्वभावानें मान्यहि केला. त्याप्रमाणें तिहींच्या एक्सप्रेसनें सर्व मंडळी मुंबईस निघाली. वाटेनें शारदाबाईनीं ताराला शांताची एकंदर स्थिति बरी असल्याचें सांगितलें. परंतु अजूनहि केव्हां केव्हां तिला पूर्वीची आठवण होतेशी दिसते, मात्र कमलिनीचें ती नांवसुद्धां काढीत नाहीं, वगैरेहि सांगितलें. नंतर हंसत शारदाबाई म्हणाल्या, "अरेरे! अखेर त्या एवढ्या देखण्या माणसानं तुला आयत्या वेळीं ढकलून दूर सारलं ना ? काय पण एक माणूस अगदीं मनांत मांडे खात होतं ! पण अशी ती द्वारका आहे का तरी तुला दूर हटवण्यासारखी सुरेख ? कां आपला केवळ द्रव्यराशीचा हा प्रताप आहे ?"

## पुन्हां मामींची भेट.

ताराबाई म्हणाली " हें पहा मामी, लग्नाच्या गोष्टीमधें द्रव्यासंबंधीं दूरदृष्टि आणि द्रव्यराशीचा हावरेपणा यांत तुमच्या मतानं किती अंतर आहे तें आधीं सांगा! निवळ दूरदृष्टी कुठं संपते अन् हावरेपणा कुठं सुरू होतो सांगा पाहूं! दोन महिन्यांपूर्वीं मला तुम्हीच म्हणत होतां, कीं, मजपाशीं द्रव्य नाहीं म्हणून त्यांनीं माझ्याशीं लग्नाचा विचार करणं अगदीं कोत्या दृष्टीचं होईल; अन् आज ते पैसेवाल्या मुलीच्या मागं आहेत तर आतां तुम्ही त्यांनां द्रव्यराशीचे हावरे ह्मणतां आहां!"

शारदाबाई म्हणाल्या " मला आधीं ती द्वारका कशी आहे, कितपत देखणी आहे, तें सांग. म्हणजे मग मी उत्तर देईन तुला."

ताराबाई म्हणाली " ती काय विशेष असायची आहे? दहाजणींसारखी आहे. वावगी नाहीं कांहीं!"

शारदाबाई म्हणाल्या "पण त डबोलं तिच्या हातीं येईपर्यंत तिच्याकडे त्या गृहस्थांनीं कधीं लक्ष दिलं नव्हतं ना?"

ताराबाई म्हणाली "नव्हतं, कबूल. पण कां बरं तें त्यांनीं तेव्हां द्यावं? मला पैसा नाहीं म्हणून त्यांनीं मजकडे लक्ष दिलेलं जर तुम्हाला कबूल नव्हतं, तर मग माझ्यासारख्याच दरिद्री असलेल्या त्या द्वारकाकडे तरी त्यांनीं विनाकारण लक्ष द्यावं असं तुम्हाला कां वाटतं?"

शारदाबाई म्हणाल्या "पण असं पहा, तिच्या हातीं डबोलं आल्याबरोबर तिच्या भोंवतीं घिरट्या घालूं लागणं जरासं गैर दिसतं, नाहीं बरं?"

ताराबाई म्हणाली "हा विचार, कनई, करायला निर्धन माणसाला तितका अवसर रहात नाहीं. दुसरं असं पहा, द्वारकाला जर त्यांत कांहीं गैर दिसत नसलं तर आम्हांला तरी कां दिसावं?"

शारदाबाई म्हणाल्या "तिला गैर वाटत नसलं तें, एवढ्यान तें रास्त होतं का काय? आम्ही त्यावरून एवढंच म्हणूं, कीं, तिला तें गैर आहे असं समजायची अक्कल तरी नाहीं, किंवा दिक्कत तरी नाहीं!"

ताराबाई म्हणाली "बरं बाई, तुमच्या म्हणण्याप्रमाणं कां होईना. त्यांनां म्हणा पैशाचे ललचावलेले अन् तिला म्हणा बेअक्कली."

शारदाबाई म्हणाल्या, "अंहं, तसं म्हणण्याचा माझा नाहीं आग्रह. तुला ठाऊकच आहे, कीं, माझं बाळपण वर हिंदुस्थानांत गेलं असल्यामुळं,

तिकडे इतकीं वर्षं घालवलेल्या कोणाहि माणसाविषयीं वाईट बोलणं मला नाहीं आवडत."

ताराबाई म्हणाली "हात्तेच्या. तसंच म्हणाल तर उत्तरहिंदुस्थानांत राहिलेल्या तरुण माणसांविषयीं माझं तर फारच वाईट मत आहे. अन् तसंच पाह्यलं तर तसल्यांचे मित्र इकडे राहणारे असले तरी तेहि बहुतेक त्याच माळेचे मणी मी समजतें! मला तसल्या सार्‍यांचाच अगदीं कंटाळा आला आहे. म्हणून तर मी आतां नाशिक जिल्ह्यांत सुवर्णपुराला चाललें आहें. तेथें मला असे एक गृहस्थ भेटणार आहेत, कीं, ज्यांच्यांत मोहक असं कांहींच नाहीं, त्यांच्यांत छानदार रीतभात नाहीं, कीं, डोक्यांत अक्कलहि नाहीं. एकंदरींत मी म्हणतें, कीं, अशीं अचरट वेडीं खुळींच माणसं बरीं!"

शारदाबाई म्हणाल्या "असं काय, तारे! पहा बरं, या बोलण्यांत जरा मन् कोणीं खट्टू केलं असल्यासारखी झांक मारते आहे!"

तितक्यांत गाडी कल्याणच्या स्टेशनांत शिरली, आणि हें बोलणें मध्येंच आटोपलें. रावबहादुरांनीं सार्‍यांकरितां चहा आणवला. तो होईपर्यंत भायखळासुद्धां जवळ आला. मग आटपाआटपी करतात तों मुंबई आली. घरीं पोंचतांच वसंतरावांनीं उत्तम व्यवस्था ठेवली होती, तिनें रावबहादुर फार खूष झाले.

रात्रीं जेवणानंतर वसंतराव म्हणाले "येत्या नाताळाच्या सुमाराला आम्ही काश्मीर बघायला जाणार आहोंत. शांताबाईला चार महिने जशी आमच्या जवळ ठेवली, तसें ताराबाईला कांहीं नाहीं केलें तर ती आमच्यावर रागावेल. पण तुझ्या मनांत पसंत असलें तर आम्ही तारे, तुला आतांच बोलावणें करून ठेवतों. नुसता पैसा सांठवून काय करायचा! आपण स्वतः त्याचा उत्तम रीतीचा उपभोग घेतला पाहिजे. काश्मीरापर्यंत जाऊन येण्यासारखा दुसरा उत्तम उपभोग कोठून मिळेल? अमेरिकेंतून लोक हिमालय पाह्यला येतात, अन् आम्ही लोक कधीं मुळींच तिकडे जाण्याचें मनांत आणीत नाहीं. म्हातारीं कोतारीं झालों म्हणजे काशीयात्रेला जाण्यापेक्षां धडधाकट शरीर आहे तोंवरच अशीं उत्तम स्थळं पाहिलीं तर खरी मौज. आहे तुझी मर्जी तारे?"

असल्या आमंत्रणापेक्षां ताराबाईला जास्त प्रिय काय असणार? तिनें ताबडतोब तें स्वीकारून टाकलें. ती म्हणाली "वा, काय सुंदर बेत तरी हा!

तो ऐकूनच मला नवी हुशारी आल्यासारखं वाटूं लागलं आहे. मूर्ख माणसं आणि अचरट माणसं बघून कंटाळलेल्या मनाला हिमालयासारख्या प्रचंड, प्रशांत व अत्यंत शुभ्र अशा पवित्र पर्वताच्या दर्शनासारखं दुसरं काय रममाण करूं शकणार आहे! आणि आपण परत आलों म्हणजे येतांना काय काय पाहिलं तें इतर प्रवाशांसारखं विसरून येणार नाहीं बरं का! कुठं गेलों, काय पाहिलं तें सारं नीट लक्षांत ठेवूं. नाहीं तर कांहीं लोकांनीं विचारलं, कीं, इतर प्रवाशांसारखीं आपण लागूं भांडायला आपसांत, कीं, अमुक असं नाहीं न् तसं नाहीं. वा, वा, मामासाहेब आज हें तुम्हीं भारी भारी गोड बोलावणं केलंत!"

---

## प्रकरण अठ्ठाविसावें.

### सुवर्णपुर.

दुसऱ्या दिवशीं मंडळी नाशकाकडे चालती झाली. कल्याणपासून पुढचा प्रांत ताराबाईनें कधींच पाहिला नसल्यानें तिला सर्व नवीनच होतें. शांताकाला हुशारींत असलेली पाहिली होती ह्मणून तिचीहि कांहीं काळजी राहिली नव्हती. शिवाय काश्मीरच्या प्रवासाविषयीं मनांत सुखदायक कल्पना रचण्याचाहि तिचा आनंदकारक उद्योग मधून मधून चालू होता.

नाशिकचें स्टेशन सोडल्यापासून दोन स्टेशनें जाऊन ती मंडळी उतरली. तेथून सुवर्णपुर सहा मैल होतें. तेथें जाण्याला उत्तम टांगे मिळत. नीलकंठ-रावांनीं आपला नोकरहि त्यांनां आणण्याकरितां स्टेशनवर पाठविला होता. टांगे चालू झाल्यापासून सुवर्णपुर, व नीलकंठरावांची पर्णकुटिका केव्हां दृष्टीस पडते ह्मणून तिघेंहि उत्सुक झालीं होतीं. अखेर गांव जवळ आल्याचीं चिन्हें दिसूं लागली, व प्रथम मोठा बाग दिसूं लागला. त्यांत सरकारस्वारी राहतात म्हणून नोकरानें सांगितलें. त्या सरकारस्वारीविषयीं आपण काय काय वर्णन वेळोवेळीं ऐकलें होतें त्याचें स्मरण होऊन ताराबाईला हंसूं येऊं लागलें. त्या बागेच्या एका बाजूला लागूनच नीलकंठरावांची पर्णकुटिकाहि दिसूं लागली. पुढच्या बाजूला एक छोटीशी बाग असून त्यांतून गेलें ह्मणजे पुढें त्यांचें बंगलीवजा घर स्पष्ट दिसूं लागलें. थोड्या वेळानें थोरल्या फाटकांतून टांगे आंत शिरून नंतर एका लहानशा झाडाशीं उभे राहिले. नीलकंठराव व मालती तितक्यांत घरांतून लगबगीनें बाहेर येऊन मंडळी टांग्यातून उत-

रतात तों त्यांचें स्वागत करायला सामोरीं आलीं. एकमेकांनां पाहून अतिशय आनंद झाला. मालती ताराबाईला इतकी प्रेमपूर्वक कडकडून भेटली, कीं, आपण आलों हें फार चांगलें केलें, अशी तिची खात्री झाली. लग्न झाल्यापासून बायकोच्या सहवासानें नीलकंठरावांत मात्र कांहीं फरक झालेला तिला दिसेना. त्यांची दरबारी तऱ्हेची रीतभात अगदीं पाहिल्याप्रमाणेंच दिसत होती. उतरल्याबरोबर त्यांनीं तिला तेथें अडवून घरच्या प्रत्येक माणसाबद्दल पृथक् पृथक् कुशल प्रश्न विचारले, व त्यांचीं उत्तरें बरोबर मिळाल्यावर ते मंडळीला घेऊन घराकडे चालूं लागले. जोत्यावर चढण्याकरितां सहा पाहिऱ्या घोटींव दगडाच्या होत्या त्यांजकडे पाव्हण्यांचें लक्ष घालवून त्यांची वाखाणणी ऐकल्यावर मंडळी ओटीवरून मुख्य दिवाणखान्यांत गेली. तेथें त्यांनीं पुन्हा एकदां सर्वांचें योग्य प्रकारें स्वागत करून आपल्या गरिबाच्या पर्णकुटिकेंत येण्याची तसदी घेतल्याबद्दल सर्वांचे मनःपूर्वक आभार मानिले. व नंतर हात तोंड धुवून थोडासा चहा घेण्याची विनंति मालतीनें केली होती, तिला त्यांनींहि इमानेंइतबारें दुजोरा दिला.

नीलकंठरावाचें हें सगळें वैभव पहाण्याच्या तयारीनेंच ताराबाई इकडे आली होती. प्रत्येक दालन दाखवून त्याची वाखाणणी करतांना नीलकंठरावांची नजर मुद्दाम आपणाकडे असते, असें तिला खास वाटे. जणूं काय आम्हाला नाकारण्यांत ताराबाईनें केवढी सोन्यासारखी संधि आलेली घालवली, त्याची तिला पुरी जाणीव व्हावी, या हेतूनेंच ते तें सर्व करीत होते, असें तिला वाटूं लागलें. परंतु जरी एकंदरींत घरदार व आंतील व्यवस्था तिला नीटनेटकी व बरी अशी वाटली, तरी आपण त्याला मुकल्याबद्दल सुस्कारा सोडून नीलकंठरावांचा हेतु पूर्ण करण्याइतकें त्यांत तिला विशेष दिसलें नाहीं. आपल्या घरीं मुद्दाम बोलावून आणलेल्या पाव्हणीशीं असें वागणें मालतीला कसें पसंत पडतें, याचेंच तिला नवल वाटलें. एकादे वेळीं एरवींपेक्षां जास्त अचरटपणाचें, अथवा ऐकणाऱ्या मालतीला लाज वाटण्यासारखें ते कांहीं बोलले, म्हणजे तिचे डोळे एकदम मालतीकडे वळत, कीं, ती तें कसें सहन करते ? एकदोनदां अशा प्रसंगीं मालतीच्या मुद्रेवर लज्जित झाल्याची झांकहि तिला दिसलीशी वाटली; पण अशा प्रसंगीं ती बहुशः शहाणपणानें ऐकलें न ऐकल्यासारखें दाखवीत असे. दिवाणखान्यांत चहापाणी झाल्यावर तेथले आरसे, तसबिरा वगैरेंची सविस्तर माहिती देऊन स्तुति

ऐकल्यानंतर, व पाव्हणे मंडळीच्या प्रवासाची संपूर्ण हकीगत विचारून घेतल्या-नंतर त्यांनां इतर सर्व घराचे भाग दाखवून नीलकंठरावांनीं मागीलदारच्या परड्यांत नेलें. व तेथली प्रत्येक वाट व प्रत्येक वेल व झाड यांची सवि-स्तर हकीगत सांगून त्यांच्या तोंडची वाखाणणी बाहेर पडण्याला पुरेशी फुरसतहि न देतां त्यानें त्यांनीं एका कोंपऱ्यांत नेलें. तेथून श्रीमंत मातुश्री राणी माईसाहेबांच्या बंगल्याचें छप्पर दिसत होतें. ज्याप्रमाणें पंढरीस जाणारे लाखों वारकरी प्रत्यक्ष विठोबाचें दर्शन होत नसल्यास निवळ विठो-बाच्या देवळाच्या शिखरासच वंदन करून समाधान मानतात, त्यापेक्षां जास्त समाधान नीलकंठरावांनां त्या कोंपऱ्यांतून सरकारांच्या बंगल्याचें छप्पर पाहून होत होतें, असें त्यांच्या वक्तृत्वाच्या प्रचंड पुरावरून ताराबाईला वाटूं लागलें.

तो विधि आटपल्यावर दूरपर्यंत पसरणाऱ्या माळावर त्यांच्या मनांत त्यांनां न्यावयाचें होतें; पण संध्याकाळ होत चालली म्हणून आज तो बेत शिलकींत ठेवून, या पूर्वेकडच्या झाडींत अमूक झाडें आहेत, त्या पलीकडच्या वेळूच्या बेटांत गतवर्षीं साडे तीनशें कळक निघाले पण आम्हीं ते तोडून विकले, वगैरे इतकी कच्ची हकीगत सांगितली, कीं, एकंदर देखावा आल्हाद-कारक होता तरी, या असल्या पृथक्करणानें त्याचें स्वारस्य अनुभवास येण्याला नीलकंठरावांनीं अवसरच ठेवला नाहीं. नंतर स्त्रिया थकल्याच्या निमित्तानें मालतीनें त्यांनां परत आणलें, व नीलकंठराव रावबहादुरांशीं बागेंत हिंडत राहिले. मालतीशीं एकटी असल्यावर ताराबाईला जरा मोकळें वाटूं लागलें. घर मोठें नव्हतें तरी टुमदार असून जिकडे तिकडे उत्तम व्यवस्थेनें सामान-सुमान लावलेलें दिसलें, व या सगळ्याचें श्रेय कोणाला असेल तें तिनें सहज ओळखलें. या घरांतल्या स्थितींत नीलकंठरावांचें अस्तित्व वजा केलें तर कोणाहि समंजस माणसाला सहज सुख लागण्यासारखें तें होतें, असें ताराबाईला वाटलें; व मालती हुशारींत दिसत होती यावरून ती त्यांचें तेथलें अस्तित्व बरेच वेळां विसरून जात असावी, असाहि ताराबाईनें तर्क केला.

दुसऱ्या दिवशीं जेवणावर नीलकंठरावांनीं ताराबाईला सांगितलें "तुम्हांला सरकारस्वारी केव्हां नजरेस पडेलसें झालें असेल नाहीं ! पण थोडा दम धरा. येत्या शुक्रवारीं गांवांतल्या रामाच्या देवळांत कीर्तन आहे तेथें तुम्हाला त्यांचें खास दर्शन होईल. श्रीमंतांचा स्वभाव म्हणजे केवळ खडीसाखरे-

सारखा मधुर आहे. आपल्याहून खालच्या दर्जाच्या माणसाशीं तर त्या मुद्दाम आपण होऊन बोलतात. कीर्तन संपलें, कीं, माझी खात्री आहे, कीं, त्यांची नजर तुम्हांकडे जाऊन एकदोन शब्द बोलल्याशिवाय श्रीमंत राहणार नाहींत. आम्हाला व आमच्या पत्नींनां नेहमीं बोलावणीं बंगल्यावरचीं येतात, त्यांत आतां आपलाहि अवश्य समावेश होईल. आमच्या पत्नींवर तर त्यांचा अतिशयच लोभ आहे. आम्हीं दर आठवड्यांतून दोन वारीं त्यांच्याकडे पार्टीला जातोंना? अन् आम्हांला परत कधीं श्रीमंत पायीं येऊं देत नाहींत. श्रीमंतांच्या एका गाडीला नेहमीं आमच्याकरितां वर्दी झालेली असते असें म्हणायला हवें. कारण, त्यांनां गाड्यांनां काय तोटा!"

मालती म्हणाली "श्रीमंत माईसाहेब खरोखरच फार हुशार व समजूतदार आहेत. अन् शेजारधर्माला तर फारच तत्पर असतात."

नीलकंठराव म्हणाले "अलबत् अलबत, आम्ही तरी तेंच म्हणतों! त्यांच्यासारख्यांपुढें आपण जितकीं लीन व नम्र होऊं तितकें थोडेंच!"

जेवणानंतर ताराबाई व शेवंतीला एक खोली दिली होती, तेथें ताराबाई विचार करीत बसली होती. मालती या स्थितींत जें समाधान दाखविते त्यांतलें वास्तविक किती, व लोकांनां उगीच दाखविण्याचें किती, नवऱ्याला योग्य वळण लावण्याच्या प्रयत्नांत तिला किती श्रम करावे लागत असतील, व ते साधले नाहींत म्हणजे खट्टू झालेलें मन ती कसें सोशीत असेल, असे किती तरी विचार तिच्या डोक्यांत चालले होते, व एकंदरींत मालती आपल्या कल्पनेपेक्षां बरीच जास्त सुखी आहे, असा तिनें अंदाज अखेर बांधला होता. आपला येथें महिनाभर मुक्काम कसा घालवावा, कांहींतरी येथें होण्यासारखें काम हातीं घ्यावें कीं काय, व तें काय घ्यावें, नीलकंठरावांचा वारंवार मध्यें मध्यें गोंधळ चालणारच, त्यानें बिघडूं नये असलें काय काम काढावें, वगैरे विचारांत ताराबाई असून तिनें कांहीं कांहीं गोष्टी नक्की ठरवूनहि टाकल्या होत्या; व आतां आधीं घरीं वडिलांनां व मुंबईंत शांताक्काला पत्रें लिहिलीं पाहिजेत, असा विचार ठरवून ती लिहिण्यास प्रारंभ करणार, तों खालीं तळमजल्यावर इतका गलबला ऐकूं येऊं लागला, कीं, साऱ्यांची कांहीं तरी कारणानें धांवपळ चालली असावी, असा तिला भास झाला. स्वतः खालीं पळत जाण्याला निघणार, तों आपणालाच हांका मारीत शेवंती जिन्यावरून धांवत येत आहे, धांवण्यानें तिला दम लागला आहे, शब्द

बाहेर येऊं शकत नाहीं, अशी तिला तिनें पाहिली. अंमळ दम खाऊन शेवंती म्हणाली "ताराबाई, अग ताराबाई, चल चल, पळ, खालीं दिवाणखान्यांत पळ. काय पण बघण्यासारखी जंमत आहे! मी इथें नाहीं ती सांगत. तूं झटकन् चल अन् पहा आपणच काय आहे तें!"

ताराबाईनें "काय आहे! काय आहे ती सांग तर खरी?" म्हणून पुष्कळ विचारिलें, पण शेवंतीला बोलायला वेळ कुठें आहे! ती धांवत खालीं गेली म्हणून ताराबाईहि काय चमत्कार आहे तो बघायला दिवाणखान्यांत धांवली. तों तेथें कांहीं नव्हतें. तितक्यांत शेवंती खिडकींतून बोट दाखवून म्हणाली "तें पहा काय आहे तें!"

ताराबाई पहाते तों एका दोन घोड्यांच्या व्हिक्टोरिआंत दोन स्त्रिया बसल्या असून बागेच्या फाटकाशीं व्हिक्टोरिआ उभी होती. तें पाहून ताराबाई म्हणाली "हीच का एवढी काय ती जंमत! मला वाटलं होतं, कीं, निदान दोनचार तरी साप निघून त्यामुळं एवढी गडबड चालली आहे! इथें तर काय फक्त श्रीमंत माईसाहेब अन् त्यांची मुलगी गाडींत दिसताहेत!"

शेवंती म्हणाली "अग काय हें भलतंच बोलणं! अशी कशी चूक घोड्याएवढी करतेस! त्या बाई श्रीमंत माईसाहेब नव्हेत हो! त्या मुळीं आक्कासाहेबांच्या मास्तरीणबाई आहेत हो. ती मुलगी मात्र आक्कासाहेब खरी. पहा तर खरी कशी नाजुक साजुक दिसते आहे ती. आक्कासाहेबांच्या नांवावरून त्या इतक्या फिकट अन् किरकोळ असतील असं वाटेल का कधीं?"

ताराबाई म्हणाली "पण या असल्या कडक उन्हांत मालतीला किती वेळ उभी त्यांनीं गाडीशीं ठेवली आहे, तें बरं दिसतं का त्यांना? एवढं पुष्कळ बोलायचं असलं तर आंत कां नाहीं येत त्या?"

शेवंती म्हणाली "अग छे, मालुताई म्हणते, त्या बहुतेक कधींच आंत येत नाहींत. आक्कासाहेब गाडींतून उतरून आंत आल्या म्हणजे त्यांचा केवढा उपकार झाला असें नीलकंठराव म्हणतात!"

ताराबाईच्या मनांत दुसरेच विचार येऊन ती म्हणाली "मी तर म्हणतें या आक्कासाहेब भारी पसंत आहेत. बऱ्या पिकुटलेल्या अन् चिडखोर दिसतात. वा, अगदीं स्वारीच्या लायख आहेत! जोडा मोठा नामी शोभेल दोघांचा!"

मालती व नीलकंठराव दहापंधरा मिनिटें गाडीशीं उभीं राहून आक्कासाहेबांशीं व मास्तरीणबाईशीं बोलत होतीं. आक्कासाहेब समोर असलेल्या

डबींतून विडे व चांदीच्या चौफुल्यांतून चिकणी सुपारी व बदामाचे तुकडे व खोबरें एकसारख्या खातच होत्या. जवळच एका झाडाखालीं रावबहादुर अत्यंत आदबीनें उभे राहून आक्कासाहेबांनीं त्यांच्या बाजूकडे मान वळविली, कीं, पुनः पुनः दरबारी तऱ्हेचा मुजरा करीतच होते. तो प्रकार पाहून ताराबाईला मौज वाटूं लागली. नंतर बोलणें संपून मंडळी गाडीला मुजरे करून परत आली. दिवाणखान्यांत ताराबाईला व शेवंतीला पाहून "तुमचें नशीब फार जोरावर आहे बुवा," असें नीलकंठराव हंसत म्हणाले.

[redacted]त्यांनां या शब्दांचा बोधच होत नाहीं असें पाहून मालतीनें फोड केली, कीं, "श्रीमंत सरकारांनीं उद्यां आपणां सर्वांनांच तिकडे चहाला बोलावलं आहे!"

---

## प्रकरण एकोणतिसावें.

### माईसाहेबांची मुलाखत.

या आमंत्रणामुळें नीलकंठरावांचें वैभव अगदीं पूर्णतेस पोंचलें. आपण ज्यांच्या पदरीं आहों त्यांची श्रीमंती पाव्हण्यांनां दाखवून व आपणाशीं श्रीमंत सरकार किती प्रेमानें वागतात तें त्यांच्या प्रत्यक्ष अनुभवास आणून त्यांनां अगदीं चकित करून सोडूं, ही नीलकंठरावांची फार उत्कट इच्छा होती. पण आपली इच्छा इतकी लवकर तृप्त होईल अशी त्यांनां आशा नव्हती. ते म्हणाले "आम्हाला नव्हतें वाटलें, कीं, श्रीमंत मातुश्री इतक्या लवकर आपणाला बोलावतीलसें. येत्या रविवारीं दुपारीं फार तर नेहमीं प्रमाणें तुम्हांला आमंत्रण येईल, असा माझा तर्क होता. कारण त्यांची आमची नेहमींचीच पद्धत आहे, कीं, आम्हीं तिसऱ्या प्रहरीं फराळाला जावें व संध्याकाळपर्यंत तेथें काळ घालवावा. पण तुम्ही मंडळी काल आलां नाहीं तों आज मुद्दाम आमंत्रण येईल, अन् तें झाडून साऱ्यांनां, अन् खुद्द आक्कासाहेबांच्या तोंडून—छे छे, हें सारें आमच्या नेहमींच्या अनुभवाच्या अगदीं पलीकडचें झालें!"

रावबहादुर म्हणाले "आम्हाला नाहीं येवढें नवल वाटत. कारण आमच्या पदवीदानसमारंभापासून आम्हाला थोर थोर लोकांचा भारी अनुभव आहे. गवर्नरसाहेबांच्या बंगल्यावर गणेशखिंडींत असे प्रकार नेहमीं घडून येतात."

त्या सर्व संध्याकाळीं व दुसऱ्या दिवशीं दुपारीं दोन वाजेपर्यंत नीलकंठरावांच्या तोंडीं याखेरीज विषयच नव्हता. तेथें कसें वागावें, काय बोलावें,

काय करावें, त्याबद्दल नीलकंठराव एकसारख्या सूचना करीतच होते. "नाहीं तर एवढाले दिवाणखाने, अन् हुजरे, अन् चांदीचीं भांडींबिंडीं पाहून तुम्ही सारीं भांबावून जाल, म्हणून मी हें सारें सांगतों आहें."

स्त्रिया तिकडे जाण्याकरितां पोषाख करायला निघाल्या तेव्हां नीलकंठराव ताराबाईला म्हणाले "हें पहा, तुमच्या पोषाखाविषयीं इतकें कांहीं तुह्मी मनाला लागून घेऊं नका. श्रीमंत सरकारांनां अथवा आक्कासाहेबांनां जशीं उंची उंची वस्त्रें वापरावीं लागतात, तसलीं आपण गरीबांनीं कधीं वापरूं नयेत, असा त्यांचा फार अभिप्राय आहे. माझी सल्ला तुम्हांला इतकीच आहे, कीं, तुमच्या पोषाखांत जो सर्वांत उंची असेल तो घाला, झालें. त्यापेक्षां जास्तीची मुळींच जरूर नाहीं. तुमचा पोषाख साधा असला म्हणून त्यांनां कांहीं वाटणार नाहीं. कारण, ज्यानें त्यानें आपआपल्या पायरीनें रहावें, असें त्यांनां फार हवें असतें."

स्त्रिया पोषाख करायला लागून पांच मिनिटें झालीं नाहींत तों ते दोनदां बाहेर दाराशीं येऊन चुटक्या वाजवीत म्हणाले "हं आटपा, जलदी करा, श्रीमंतांनां तिष्ठत बसवलें कोणीं तर त्यांनां भारी राग येत असतो!"

बिचाऱ्या शेवंतीला ही सगळी गर्दी पाहून भीतिच वाटूं लागली. इतकी कीं, रावबहादुरांनां गणेशखिंडींत पदवी घ्यायला जाण्याच्या वेळींसुद्धां तितकी भीति वाटली नसेल! कशी एकदांची मी या श्रीमंतांच्या मुलाखतींतून पार पडतें, असें तिला होऊन गेलें.

हवा पावसाळी होती, पण पाऊस पडत नव्हता. म्हणून घरांतून नजरबागेंत बंगल्याशीं येईपर्यंत जवळ जवळ अर्ध्या मैलाचें चालणें त्यांनां त्रासदायक वाटलें नाहीं. श्रीमंतांचीच ती बाग होती, त्यामुळें तींत बरीच रमणीयता होती. पण नीलकंठरावांची कल्पना होती त्याप्रमाणें ताराबाईला ती बाग कांहीं नंदनवन वाटली नाहीं. तसेंच त्यांनीं बंगल्याच्या पश्चिम बाजूस कितीशा खिडक्या आहेत त्यांचा आंकडा सांगितला व सर्वांनां कांचा लावायला प्रथम कितीशें रुपये लागले तें सांगितलें, त्याचें तर तिला मुळींच कांहीं वाटलें नाहीं. मंडळी बंगल्याच्या पायऱ्या चढूं लागली तों तों शेवंती जास्त भांबावत चालली, व रावबहादुरहि अगदीं शांत दिसले नाहींत. ताराबाईला मात्र कांहीं विशेष झालें नाहीं. आपणाला भेटणाऱ्या स्त्रिया कांहीं अत्यंत विलक्षण तऱ्हेच्या बुद्धिवान अथवा त्यांच्या अंगीं कांहीं अद्भुत गुण आहेत

असें तिला मुळींच वाटत नव्हतें, आणि निवळ हुजऱ्यांच्या अथवा सोन्या-चांदीच्या भांड्यांच्या प्रदर्शनाला ती दाद देणारी नव्हती.

पाहुण्या चढून थोरल्या दिवाणखान्यांत शिरतांच नीलकठंरावांनीं नेहमीं-प्रमाणें त्याचें वर्णन सुरू केलें; पण हुजऱ्याच्या मागोमाग सर्वांनां जावयाचें असल्यामुळें तें अर्धवटच थांबलें. तेथून एका मधल्या दालनांतून श्रीमंतांची स्वारी होती त्या दालनांत सर्व मंडळी गेली. आंत येतांच श्रीमंत मातुश्रींनीं व आक्कासाहेबांनीं जाग्यावरून उठून नीलकंठरावांनां व नंतर मालतीस वंदन केलें, व दोघांनींहि आशीर्वाद दिल्यानंतर पाव्हण्यांचा परिचय करून देण्याचा विधि नवराबायकोंनीं आपसांत शहाणपणानें ठरविल्याप्रमाणें मालतीनें उरकला. तिनें तो योग्य प्रकारें करून टाकला त्यामुळें नीलकंठरावांचें 'आनंदानें व माफीनें व कारणांनीं' भरून गेलेलें असें त्यांचें एक भाषण मंडळीचें सुदैवानें चुकलें.

रावबहादुरांनां थोरथोर लोकांचा रगड परिचय होता तरी ते सुद्धां नजर-बागेंत इतके भांबावून गेले, कीं, त्यांनीं फक्त एकदां अत्यंत नम्रपणानें लवून श्रीमंतांनां त्रिवार मुजरा केल्यावर ते कांहीं न बोलतां जागच्याजागीं राहिले. शेवंतीची याहिपेक्षां जास्त त्रेधा उडाली. अशी कीं, ती मुजरा करण्याचेंहि भांबावून विसरली, व नीलकंठरावांनीं तिला पुनः पुनः खुणांनीं सुचविलें तरी तिला उमज पडेना. ताराबाई ही सर्व मौज स्वस्थपणें पहात होती, व एकीकडे माईसाहेबांकडे व आक्कासाहेबांकडे लक्ष लावून पहात होती. माईसाहेब शरीरानें फार भव्य होत्या व त्यांचा वर्णहि सडकून गोरा होता. नाकडोळे तरतरीत होते, त्यामुळें त्या आपल्या पणांत असतांना फार मोहक असाव्यात, अशी सहज कल्पना होई. त्यांच्या भाषणांत श्रीमंती ऐट ओतप्रोत भरलेली असे, त्यामुळें त्यांच्या शब्दांत विनय, शालीनता वगैरे मुळींच नसून हुकमतीनें युक्त असें त्यांचें बोलणें येई. आपल्याकडे भेटायला आलेल्या माणसांनां सहृदयतेनें वागवून त्यांनां मनमोकळें करून बोलण्यास लावण्याची कला माईसाहेबांनां अवगत नव्हती. गंभीरपणानें मोजके शब्द बोलून ऐकणाराच्या मनांत आपणाविषयीं आब उत्पन्न करणें त्यांनां मुळींच ठाऊक नव्हतें. त्या रगड बोलत, पण तें नेहमीं बहुत करून आशार्थी असल्यामुळें आजच्यासारख्या तिऱ्हाईत भेटणाराच्या कानाला ठीक लागत नसे. एकंदरींत नागेशरावांनीं केलेलें वर्णन बरोबर आहे, असें ताराबाईला वाटलें.

## माईसाहेबांची मुलाखत.

मातुश्रींच्याहून आक्कासाहेब अगदीं निराळ्या होत्या. त्यांची मुद्रा कांहींशी भय्यासाहेबांसारखी ताराबाईला वाटली. त्यांच्या अगदीं उलट या इतक्या पिकुटलेल्या व किरकोळ व ठेंगण्या कशा असाव्यात, हें तिला शेवंतीप्रमाणेंच कळेना. मायलेंकींत मुळींच कोणचेंच साम्य नव्हतें. आक्कासाहेब गौरवर्ण होत्या खऱ्या, पण तापांतून उठलेल्यासारख्या त्या निस्तेज दिसत. रूपानें जरी कुरूप नव्हत्या तरी अवयव रेखलेले मुळींच नव्हते. अंगावर मांस तर कसें तें मुळींच नव्हतें. त्या या मंडळींशीं अक्षरहि बोलल्या नाहींत, नुसत्या मास्तरीणबाईशीं पडद्याच्या आडून कायसें एकसारखें बोलत होत्या, व मधूनमधून खिदीखिदी हंसतहि होत्या.

छोटे महाराज एकदां आंत आले होते, पण मंडळींचें मुजरे घेऊन तिन्हाईत नवख्या मंडळींनां पाहून ते जे पळाले, ते पुनः आलेच नाहींत !

कांहीं वेळ मंडळी बसल्यावर सहज गोष्टी निघाल्यावरून माईसाहेबांनीं पाव्हण्यांनां उत्तर बाजूच्या खिडकींतून डोंगरांची फार उत्तम शोभा दिसते ती पाहून या, म्हणून हुकूम केला; "म्हणून मंडळींनीं तसें जाऊन केलें."

रावबहादुर म्हणाले " फारच उत्तम देखावा दिसतो खरा, सरकार !"

माईसाहेब म्हणाल्या " छे, या दिवसांत नाहीं इतका चांगला दिसत. आणखी रगड पाऊस पडला म्हणजे उत्तम दिसतो ! "

नंतर फराळाची तयारी असल्याची वर्दी आली, म्हणून सर्व मंडळी शेजारच्या दालनांत गेली. तेथें नीलकंठरावांनीं वर्णन केलेलीं सर्व सोन्या चांदीचीं भांडीं, वगैरे थाटमाट रगड होता. नीलकंठरावांचें पान श्रीमंत माईसाहेबांच्यासमोर त्यांच्याचसारख्या थाटानें एका चौरंगावर मांडलें होतें. तेथें ते बसल्यावर त्यांनीं ताराबाईकडे अशा जयश्रीयुक्त मुद्रेनें पाहिलें,- कीं, ताराबाईपेक्षां कमी मख्ख अशी स्त्री तर अगदीं चीतच झाली असती ! त्यांच्याखालीं रावबहादुर, नंतर मालती, नंतर ताराबाई व शेवंती अशी एक पंगत होती. समोर प्रथम श्रीमंत माईसाहेब, नंतर आक्कासाहेब, मग मास्तरीण-बाई आणि एक आश्रित दुसरी स्त्री अशी मंडळी होती. दोन पंक्तीच्या-मध्यें छोट्या महाराजांचें पान होतें, पण ते आलेच नाहींत. तीन्ही श्रीमंतांनां सोन्याचीं ताटें, वाट्या व इतर भांडीं असून इतर सर्वांनां चांदीचीं मांडलेलीं होतीं. श्रीमंतांच्या बिनकल्हई केलेल्या पितळेसारख्या दिसणाऱ्या सोन्याच्या ताटांपेक्षां लखलख करणारीं पांढरीं स्वच्छ चांदीचींच आपलीं

भांडीं बरीं, असें ताराबाईला वाटल्याखेरीज राहिलें नाहीं. हुजरे बिजरे, वाढपे शागीर्द रगड होते, व पदार्थहि दहापांच तऱ्हेचे होते. ते खरोखरच फार रुचकर झाले होते. पण जसजसा पदार्थ पानांत पडे तसतशी त्याची भरपूर वाखाणणी नीलकंठराव करीत, व रावबहादुरहि आतां त्या वाखाणणीची दुसरी आवृत्ति बहुतेक त्यांच्याच शब्दांनीं करण्याइतके सावध झाले होते. इतकी एकसाखी चाललेली स्तुति माईसाहेबांनां कशी पटते त्याचें ताराबाईला नवल वाटलें; पण त्यांनां खरोखरच समाधान होत असल्याचें दिसे. इतर प्रकारचें संभाषण फराळावर कांहीं झालेंच नाहीं. संधि साधून ताराबाईनें बोलणें सुरू करण्याचा प्रयत्न केला असता. पण तिच्यासमोर मास्तरीणबाई होत्या त्या एकसारख्या आक्कासाहेबांत दंग झाल्या होत्या. "या वडीचा तरी थोडासा तुकडा मोडा आक्कासाहेब, थोडासा सांजा पहा तरी किती उत्तम झाला आहे. काय बाई यांची ही भूक, पण तब्बेत तरी बरी आहेना ? असें एकसारखें मास्तरीणबाईचें चालू होतें. शिवाय स्वतः भरपूर खाण्याचेंहि त्यांनां काम होतें, मग त्यांनां दुसऱ्या कशाविषयीं बोलायला वेळ कसा व्हावा ? मालती श्रीमंतांनां हुंकारे देण्यांत गढून गेली होती. पुरुषांनां वाखाणणीचा मोठाच उद्योग होता, मग ताराबाई काय शेवंतीशीं बोलणार ?

फराळ संपल्यावर मंडळी परत पहिल्या दालनांत आली, व विडे चाललेले असतांनां व त्यानंतरहि माईसाहेब एकसारख्या कांहींना कांहीं तरी बोलत होत्या. मालतीच्या घरांतल्या बारीकसारीकहि गोष्टी त्यांनीं विचारल्या व प्रत्येकीसंबंधानें कसें करावें तें अधिकारयुक्त वाणीनें तिला त्या शिकवल्यासारखें बोलत असत. ताराबाईला दिसून आलें, कीं, गाईम्हशींचे गोठे कसे साफ ठेवावे, व त्यांनां चूण फोल किती घालावें, असल्या विषयांवर देखील त्या आग्रहानें आपलेंच मत प्रस्थापित करीत बसत. मधून मधून ताराबाईला व शेवंतीलाहि त्या रगड प्रश्न विचारीत. "तुझे भाऊ किती आहेत, बहिणी किती, काळ्या का गोऱ्या, लग्नं झालीं आहेत का नाहींत, होण्याचा संभव आहे का नाहीं, सुरेख आहेत का नाहींत, घरीं गाड्याघोडीं किती आहेत, आईच्या माहेरचं अडनांव काय ?" वगैरे नानाप्रकारचे प्रश्न—कांहीं कांहीं तर दोनदोनदां—त्यांनीं ताराबाईला विचारले. इतके खाजगी विषय एकाद्याच्या पहिल्याच भेटीला तिऱ्हाइतांदेखत विचारलेले ताराबाईला

आवडले नाहींत; पण तिनें बाह्यात्कारीं शांतपणानें त्यांचीं उत्तरें दिलीं. नंतर माईसाहेब म्हणाल्या "तुझ्या बापाची इस्टेट आमच्या नीलकंठरावांनां यायची आहे, नाहीं का? तुमची लाट आहे नीलकंठराव! पण मुलींनां वगळून दुसरीकडे इस्टेट जाईल असं वुइल करण्याचं मला नाहीं बरं दिसत. पोरींनीं काय अगदीं पाप केलेलं असतं? पेटी वाजवतेस का तूं ताराबाई कधीं?"

ताराबाई म्हणाली "हो, थोडीशी."

माईसाहेब म्हणाल्या "असं का. मग एकाद दिवशीं आपण ऐकूं तुझं वाजवणं. आमची पेटी भारी उंची आहे. कदाचित् तूं तसली कधीं—पण एकाद्यावेळीं पाहूं तूं कशी वाजवतेस ती. तुझ्या बहिणींनां येतं का कांहीं त्यांतलं?"

ताराबाई म्हणाली "एकीला येतं साधारण."

माईसाहेब म्हणाल्या "सगळ्याच कां नाहीं शिकत? सगळ्यांनां आलं पाहिजे. या आमच्या लेल्यांच्या सगळ्या पोरी शिकतात, तरी त्यांच्या बापाचं तुझ्या बापाइतकंसुद्धां उत्पन्न नाहीं. बरं असो, कांहीं चित्रंबित्रं येतात का काढायला?"

ताराबाई म्हणाली "नाहीं, मुळींच नाहीं."

माईसाहेब आश्चर्यानें म्हणाल्या "काय एकीलाहि नाहीं?"

ताराबाई म्हणाली "कुणालाच नाहीं."

माईसाहेब म्हणाल्या "मोठं आश्चर्यच आहे म्हणायचं. पण मला वाटतं, तुम्हांला कधीं तें शिकायला संधिच मिळाली नसेल. तुमच्या आईनं तुम्हाला एकदोन वर्षे तरी पुण्यांत हायस्कुलांत ठेवायचं होतं."

ताराबाई म्हणाली "आईची आमच्या हरकत नव्हती. पण बाबांनां तें नाहीं आवडत!"

माईसाहेब म्हणाल्या "तुमच्या घरची गवर्नेस कधीं गेली?"

ताराबाई म्हणाल्या "आमच्या घरीं नव्हतीच कधीं गवर्नेस!"

माईसाहेब पुनः आश्चर्यानें म्हणाल्या "काय? गवर्नेसच नव्हती कधीं? अजबच आहे. पांच मुली घरीं वाढायच्या. त्यांच्याकरितां नेहमीं घरांत राहणारी अशी एकादी चांगली मास्तरीण नको होती का ठेवायला? माझी नव्हती तशी कधीं कल्पना! तुमच्या त्या आईला तुम्ही अगदीं भंडावून सोडलं असेल!"

ती कल्पना ऐकून ताराबाईला हंसू येऊं लागलें, व तिनें म्हटलें–"तसं नाहीं कांहीं कधीं झालं!"

माईसाहेब म्हणाल्या "तसं नाहीं झालं! मग तुमची रोज उस्तवारी कोण करीत असे? अन् शिकवीत तरी कोण असे?"

ताराबाई म्हणाली "आह्मी मराठी आमच्या गांवांतच शिकलों, अन् इंग्रजीकरितां साताऱ्च्या कन्याशाळेंत होतों. तेथलं पांचसहा यत्तेपर्यंत इंग्रजी झाल्यावर ज्यांनां हवं होतं त्यांनां शिकवायला घरींच मास्तर येत असत. हवे ते मास्तर आम्हांला मिळत. ज्यांनां नको असे शिकायला त्या घरीं स्वस्थ बसत."

माईसाहेब ह्मणाल्या "तेवढ्याचकरितां तर गवर्नेस लागते. बा, माझी जर तुमच्या आईबापांची ओळख असती तर मीं नसतं कधीं असं होऊं दिलं. मी तर नेहमीं ज्याला त्याला सांगत असतें, कीं, गवर्नेस ठेवल्यावांचून मुळींच नीट शिक्षण होत नाहीं. मींच स्वतः मुळीं किती तरी घराण्यांत गवर्नेस पाहून दिल्या आहेत. या आमच्या गवर्नेसच्या चार भाच्या आहेत. त्यांनां मींच चांगलीं घरं पाहून दिलीं. मला तसं लोकांनां उपयोगी पडणं भारी आवडतं. सहज परवां एका मुलीचं नांव कुठेसं ऐकलं तें मला आवडलं. ह्मणून मीं त्या मुलीला दिली चिकटवून एका घराण्यांत. मीं सांगितलं का तुह्माला, मालुबाई, कीं काल त्या पटवर्धनीणबाई आल्या होत्या, त्या मीं गवर्नेस पाहून दिली त्याबद्दल माझे आभार किती तरी मानीत होत्या. त्या ह्मणाल्या, कीं, नवी गवर्नेस अगदीं रत्न आहे. आणखी काय? तुझ्याहून धाकट्या बहिणी कोणी लग्नाजोग्या प्रौढ अशा सभासंमेलनांत मिसळूं लागल्या आहेत का?"

ताराबाई म्हणाली "होय, सगळ्याच आहेत."

माईसाहेब ह्मणाल्या "सगळ्या? काय, साऱ्या पांची एकदम? चमत्कारच आहे मोठा! थोरल्यांचीं लग्नं व्हायच्या आधींच धाकट्या लागल्या सभांतून वावरायला! त्या तर अजून फार लहान असतील?"

ताराबाई म्हणाली "हो. सगळ्यांत धाकटी अजून पंधराची नाहीं. ती सभांतून यायला जराशी लहान आहे खरी. पण एकंदरींत, सरकार, थोरल्या बहिणींचीं लग्नं नाहीं झालीं म्हणून धाकट्यांनां घरीं अटकून ठेवावं, हा तरी धाकट्यांच्यावर जुलूमच नाहीं का होणार? मग अशानं धाकटी बहीण होणं

मोठं पातकच होईल. अन् मग त्यांचं आपल्या थोरल्या बहिणींवर प्रेम तरी कसं रहावं?"

माईसाहेब म्हणाल्या "अरे वा, एवढीशी तूं बरीच खणखणीत अभिप्राय बोलून दाखवतेस! तुला असं कितवं वरीस आहे?"

ताराबाई हंसत म्हणाली "तीन लहान बहिणी अविवाहित, सभांतून मिसळूं लागल्या आहेत, तर मी आपलं वय कसं कबूल करूं?"

सरळ उत्तर आलें नाहीं तें पाहून माईसाहेबांनां आश्चर्य वाटलें. श्रीमंतांच्या असल्या फाजील चौकसपणाला आजपर्यंत आपल्यासारखें कोणीं तेढें उत्तर दिलें नसेल, असें ताराबाईला खास वाटलें. पण माईसाहेबांनीं पुनः विचारिलें "तूं विसांहून जास्ती दिसत नाहींस. मग एवढं वय लपवायचं काय कारण आहे?"

ताराबाई म्हणाली "मला अजून एकविसावं लागलं नाहीं, हें खचीत!"

इतक्यांत मास्तरीणबाईनीं पट मांडून सोंगट्या काढल्या. दोघे पुरुष व मालती व माईसाहेब खेळूं लागल्या. इंदुमतीदेवींनां (आक्कासाहेबांनां) साधे पत्ते आवडत, म्हणून त्यांच्याशीं मास्तरीणबाई व ताराबाई आणि शेवंती खेळत बसल्या. आतां पत्त्यांखेरीज इकडे शब्दहि निघेना. फक्त मध्येंमध्यें मास्तरीणबाई आक्कासाहेबांनां "सुपारी हवी का, वारं का लागतं आहे? का उकडतं आहे?" वगैरे विचारीत तितकेंच. त्या खेळांत मात्र रगड गप्पा चालल्या होत्या. माईसाहेब बहुतकरून बोलतच होत्या. लोकांच्या दान देण्यांत त्या चुका काढीत होत्या किंवा पूर्वींची आपली कांहीं हकीगत तरी सांगत होत्या. नीलकंठराव त्यांची हकीगत श्रवण करण्यांत इमानानें गुंतलेले असत, अथवा त्यांच्यापेक्षां आपल्याला जास्त दान पडलें किंवा त्यांची एकादी सोंगटी मारायचा प्रसंग आला तर क्षमा मागत असत. रावबहादुर कांहीं फारसें न बोलतां आपल्या क्लबांतल्या मंडळींनां ही सारी ऐकलेली हकीगत पुनः सांगतां येण्याकरितां डोक्यांत सांठवून ठेवीत होते!

माईसाहेबांनां व इंदुमतीदेवींनां पुरेसें होईपर्यंत खेळणें झाल्यावर चहा आला, व गाडीची वर्दी आली. नीलकंठरावांनीं अत्यंत आभारपूर्वक गाडीचा स्वीकार केला. ती येईपर्यंत उद्यां हवा कशी काय होणार याविषयीं माईसाहेब अंदाज सांगत होत्या त्याला नीलकंठरावांनीं संमति दिली. गाडी आल्यावर नीलकंठरावांनीं पुनः एकवार आभार मानले. रावबहादुरांनीं

आदबीनें मुजरा केला व सर्व मंडळी गाडींत बसून निघाली. नज़रबागेंतून बाहेर पडल्याबरोबर नीलकंठरावांनीं फार उत्साहानें ताराबाईला "कसें काय आपल्याला वाटलें?" म्हणून प्रश्न केला. त्याचें उत्तर तिला खरोखर वाटलें होतें त्यापेक्षां फार जास्त चांगलें वाटल्याचें तिनें मालतीकरितां केवळ दिलें. पण तितक्यानेंहि नीलकंठरावांचें समाधान होईना. ह्मणून अखेर त्यांनीं माईसाहेबांची व फराळाची वाखाणणी करण्याचें काम स्वतःच्याच हातीं घेऊन टाकलें, व घरीं पोंचेपर्यंत ते दुसरें कांहीं बोललेच नाहींत.

---

## प्रकरण तिसावें.

### भय्यासाहेबांचें आगमन.

रावबहादुर फक्त आठच दिवस सुवर्णपुरीं राहिले. पण तेवढ्या मुदतींत आपल्या लेंकीला कितीकांनां न मिळण्यासारखा नवरा व उत्तम शेजार प्राप्त झाला आहे, व त्यांच्या योगानें तिला अत्यंत सुख लागलेंच पाहिजे, अशी त्यांची बालंबाल खात्री होऊन गेली. रावबहादुर होते तोंपर्यंत नीलकंठरावांचा सकाळचा वेळ त्यांनां आपल्या टांग्यातून घेऊन जाऊन आपली शेतीवाडी दाखवण्यांत जाई. ते गेल्यानंतर त्या घरांत नेहमींचे रोजचे व्यवहार व्यवस्थितपणें सुरू झाले. परंतु त्यामुळें नीलकंठरावांचा सहवास जास्त आपणाला होत नाहीं असें पाहून ताराबाईला बरें वाटलें. ते बहुतकरून सकाळीं बागेंत झाडांझुडपांची व्यवस्था लावण्यांत, अथवा दिवाणखान्याशेजारच्या त्यांच्या खासगी खोलींत लिहिण्यावाचण्यांत, अथवा त्या खोलीच्या खिडकींतून दिसणाऱ्या थोरल्या रस्त्यावरून कोण येतेंजातें तिकडे लक्ष देण्यांत आपला वेळ घालवीत असत.

घरांतल्या स्त्रियांची नेहमींची बसायची जागा मागच्या बाजूला होती. दिवाणखान्याच्या एका बाजूला नीलकंठरावांची खोली होती, व त्याच्या दुसऱ्या बाजूला एक आडवें प्रशस्त दालन होतें, त्याला पश्चिमेच्या खिडक्या असल्यामुळें तेथें उजेडहि चांगला होता. तें दालन आपणाला नेहमीं बसाउठायला मालतीनें कां पसंत केलें नाहीं, तें ताराबाईला प्रथम समजेना; पण लवकरच तिचें करणें अगदीं वाजवी आहे. असें तिला दिसून आलें. कारण, मालतीनें तें आडवें प्रशस्त दालन जर रोज बसायला वापरलें असतें, तर त्यांतूनहि थोरला रस्ता दिसत असल्यामुळें नीलकंठरावांची स्वारी आपल्या

खोलींत न राहतां त्याच दालनांत बहुतेक वेळ घालवूं लागली असती, व त्यांच्या लांबलचक भाषणांनीं मालतीचा उद्योग चांगल्या रीतीनें पार पडला नसता. हल्लींच्या दालनांतून रस्ता दिसत नव्हता म्हणून तेथें फार वेळ बसून राहणें त्यांनां अशक्य होतें. तरी पण रस्त्यावर कांहीं साधारण गोष्ट घडली, कीं, ते इमानानें आंत येऊन बायकोला सांगत ! विशेषेंकरून श्रीमंत इंदुमतीदेवी गाडींतून हिंडायला रोज जात—त्या जाऊं लागल्या म्हणजे आज गाडी व्हिक्टोरिआ होती का फैटण होती, घोडे कोणचे होते, कोचमन कोण होता, गाडींत कोण कोण होतीं, वगैरे सविस्तर माहिती ते न चुकतां आपल्या बायकोला सांगत, व त्यावरून पांचदहा मिनिटें तरी गप्पा मारीत बसत.

श्रीमंत आक्कासाहेब रोज दारावरून जात व पुष्कळदां गाडी उभी करून मालतीशीं गाडींतूनच चार शब्द बोलत. पण उतरून आंत मात्र क्वचितच् येत. नीलकंठराव मात्र रोज निदान एकदां नजरबागेंत फेरी टाकून येत, व बायकोलाहि दोनतीन दिवशीं बरोबर घेऊन जात. माईसाहेबांच्या हातीं अजून नीलकंठरावांनां देण्यासारख्या इनामी जमिनी पुष्कळ होत्या असें ताराबाईच्या लक्षांत आलें, तेव्हां या त्यांच्या रोजच्या होणाऱ्या फेरीची बरोबर समजूत तिला पटली. माईसाहेबहि खुद्द कधीं कधीं त्यांच्या घरीं येत त्या वेळीं यःकश्चित् कांहीं गोष्ट वावगी असली तरी तीहि त्यांच्या तीक्ष्ण नजरेंत आल्याशिवाय रहात नसे. त्या वेळीं त्या गडीमाणसांची खरडपट्टी काढीत, व हरएक बाबतींत मालतीला उपदेश देत. कधीं कांहीं थोडासा उपहार करण्याची विनंति मान्य केलीच, तर अमुक पदार्थ चांगला झाला नाहीं, तो तसा करायला हवा होता. एवढें सांगण्याच्या उद्देशानें जणूं काय त्या थोडासा मासला चाखून बघत असत. सरकारानें त्यांनां दिवाणी फौजदारी अधिकार दिले नव्हते, तरी कोणाची तक्रार कानावर आली, कीं, त्या गाडी जुंपून मुद्दाम जाऊन त्या गुन्हेगारांनां व फिर्याद करणारांनां अशा दोघांनांहि सडकून रागें भरून त्यांची कानउघाडणी करीत.

आठवड्यांतून दोनदां बहुतकरून ही मंडळी बंगल्यावर टीपार्टीला जात. रावबहादुर कमी झाले त्यामुळें सोंगट्यांचा व पत्त्यांचा असे दोन डाव न चालतां कोणचा तरी एक डाव चाले, एवढा फरक वजा केला तर पहिल्यानें वर्णन केल्यासारख्याच या सर्व टीपार्टी असत. इतर कोणाशीं नीलकंठरावाची

गांवांत फारशी सलगी नसे. कारण, ते वरिष्ठांशीं जितके नम्र तितकेच कडक कनिष्ठांशीं असत, त्यामुळें गांवांत कोणी फारसें त्यांच्या घरीं येत नसे. ताराबाईला त्यापासून कांहींच कमतरता वाटली नाहीं. कारण, माणसांच्या गडबडीशिवाय काळ कसा घालवावा अशा विवंचनेंत पडण्याइतकें तिचें डोकें पोकळ नव्हतें. तिनें आपल्या वेळाची उत्तम व्यवस्था लावून टाकली होती. मालतीशीं खुद्द बोलत बसण्यांत तिचा रोज बराच वेळ जाई. शिवाय, सुवर्णपुरची हवा व सभोंवतालचा देखावा मोहक असल्यामुळें ती सकाळसंध्याकाळ सृष्टीची शोभा पहाण्याकरितां दोन दोन मैल हिंडाफिरायला जात असे. पश्चिमेच्या बाजूला एक गर्द आंबराई होती ती तिला फार आवडे, व ती तिकडे नेहमीं जाऊन एकादें सुंदर पुस्तकहि वाचीत बसे.

अशा तऱ्हेनें ताराबाईचे पंधरा दिवस गेले. मध्यंतरीं दसरा होऊन गेला पण त्यांत विशेष सांगण्यासारखें कांहीं नव्हतें. एक दिवशीं नीलकंठरावांनीं बातमी आणली, कीं, भय्यासाहेब आपल्या मामींनां भेटायला चारआठ दिवसांत खास येताहेत. ते येणार यामुळें एक नवीन गृहस्थ येणार यापलीकडे तिला त्या बातमींत महत्त्व प्रथम वाटलें नाहीं. पण मागाहून तिला सुचलें, कीं, ते नजरबागेंत असतांना जर आपण तेथें गेलों तर आपल्या दृष्टीस एक मौज पडेल. ती अशी, कीं, श्रीमंत इंदुमतीदेवींशीं भय्यासाहेब कसें वर्तन करतात, तें आपण प्रत्यक्ष पाहिल्यावर कमलिनीचें जे आटोकाट परिश्रम भय्यासाहेबांनां खूष करण्याचे चाललेले असतात, त्यांत तिला यश येण्याचा किंवा न येण्याचा कितपत संभव आहे, त्याचा आपणाला बराच अंदाज करतां येईल. कारण, माईसाहेबांचा असा फार हेतु होता, कीं, भय्यासाहेबांनीं आक्कासाहेबांनां पसंत करावें, व त्याकरतांच त्यांची नेहमीं खटपट चालू असे. भय्यासाहेब यायचे नक्की ठरल्यापासून माईसाहेबांनां त्यांच्या व्यवस्थेखेरीज दुसरा उद्योगच नाहींसा झाला. आपण आक्कासाहेबांकरतां ठरवलेला वर तुह्मांला जरूर दाखवीन, ह्मणून माईसाहेबांनीं मोठ्या मायेनें मालतीला व ताराबाईला सांगितलें. पण आमची व त्यांची रगड ओळख आहे असें ताराबाईनें उत्तर देतांच त्यांनां थोडासा घुस्सा आल्यासारखा दिसला.

ठरल्या दिवशीं भय्यासाहेब सुवर्णपुरीं आले. नीलकंठराव मुळीं त्यांच्या येण्याच्या वाटेवर त्यांच्या येण्याच्या सुमाराला जशी कांहीं अकस्मात् गांठ पडली असें दाखवण्याच्या हेतूनें मुद्दाम तासभर टेहळणी करीत फिरत होते, व गाडी

आल्याबरोबर त्यांनां अत्यंत अदबीनें त्रिवार मुजरा करून नंतर ते आल्याची वर्दी झटकन् बायकोला देण्याकरितां ते लगबगीनें घरीं आले. दुसऱ्या दिवशीं सकाळीं तर नजरबागेंत लवकर जाऊन पाव्हण्यांनां वेदोक्त आशीर्वाद देऊन थोडा वेळ बसून ते घरीं परतत होते; पण तितक्यांत भय्यासाहेबांबरोबर त्यांचे चुलत बंधु कॅप्टन् बाळासाहेबहि आले आहेत असें समजल्यावरून त्यांचा परिचय होण्याकरितां ते थांबले. अंमळशानें तोहि परिचय झाला. बाळासाहेबांनीं त्यांजबरोबर हिंडायला जाण्याची इच्छा प्रदर्शित केली ह्मणून नीलकंठराव अत्यंत हर्षभरित होऊन हास्यमुख करतात, तों भय्यासाहेबहि त्यांच्याबरोबर निघाले. मैल दोन मैल फिरणें होऊन ते तिघे नीलकंठरावांच्या घराशीं येतात तों ते दोघेहि त्यांजबरोबर फाटकांतून आंत शिरले. मालतीनें तें दिवाणखान्यांतल्या खिडकींतून पाहिलें व मागच्या दालनांत ताराबाई, शेवंती होत्या त्यांनां जाऊन सांगितलें. ती म्हणाली "हा आमच्या गरीबांवर मोठ्या लोकांचा प्रसाद केवळ आपल्यामुळं होतो आहे बरं का, ताराबाई! आपण इथें नसतां तर आह्मांला भेटायला कांहीं भय्यासाहेब इतक्या लवकर येते ना!"

ताराबाई कांहीं नकारार्थीं उत्तर देणार, इतक्यांत तिघेहि पायऱ्यांवरून दिवाणखान्यांत आले सुद्धां. कॅप्टन् बाळासाहेब तिशीच्या आंत बाहेर दिसले. ते देखणे नव्हते, पण बोलण्याचालण्यांत अत्यंत प्रतिष्ठित गृहस्थ दिसत होते. भय्यासाहेब नेहमींप्रमाणें मुखस्तंभ—एकदां मालतीशीं औपचारिक बोलून स्तब्ध राहिले. कॅप्टन् बाळासाहेब मात्र मोकळ्या मनानें संभाषण करूं लागले. भय्यासाहेब उगीच मधून मधून एकाददुसरें वाक्य बोलत. अखेर त्यांचें त्यांनांच चमत्कारिक वाटून ते ताराबाईजवळ येऊन "तुमची सर्व मंडळी खुशाल आहेत ना?" असें तिला म्हणाले. तिनें हो म्हटलें व नंतर एका क्षणानें ती पुढें बोलली "माझी थोरली बहीण पुण्यांत आज तीन महिने आहे. आपली कधीं नाहीं का तिच्याशीं गांठ पडली?"

तिला पक्कें ठाऊक होतें, कीं, त्यांची मुळींच कोठें गांठ पडली नव्हती; परंतु कमलिनी व इंदिराताईशीं शांताबाईची भेट झाली होती ही गोष्ट भय्यासाहेबांनां ठाऊक आहे कीं नाहीं, तें आपणाला त्यांच्या मुद्रेवरून चटकन् समजेल, अशा हेतूनें तिनें तो प्रश्न विचारला होता. भय्यासाहेब म्हणाले "नाहीं, त्यांची माझी गांठ पडण्याचा सुयोग कोठें नाहीं आला." पण हें उत्तर देतांना

ते जरासे गांगरले, असें ताराबाईला दिसलेंसें वाटलें. नंतर तो विषय तितकाच राहिला व जरा वेळानें ते दोघे गृहस्थ निघून गेले.

---

## प्रकरण एकतिसावें.

### नजरबागेंत मजेदार संवाद.

कॅप्टन बाळासाहेबांच्या बोलण्याचालण्याच्या चालीरीतीवरून नीलकंठरावांच्या घरांतल्या मंडळीवर चांगली छाप पडली, व ते नजरबागेंत आहेत तोंपर्यंत आपण तेथें जाऊं त्या वेळच्या भेटी त्यांच्या सहवासाच्या योगानें आजपर्यंतच्याप्रमाणें अगदींच बेचव होणार नाहींत, असा ताराबाईचा ग्रह झाला. पण दोनचार दिवस यांनां तिकडचें आमंत्रणच आलें नाहीं. कारण, घरांत भाचे आल्यावर माईसाहेब त्यांच्यांत इतक्या रमून गेल्या, कीं, नेहमींच्या मंडळींची त्यांनां जरूर वाटेनाशी झाली. पांचसहा दिवस माईसाहेब अथवा इंदुमतीदेवी यांचें त्यांनां दर्शनहि नव्हतें. अखेर रामाच्या देवळांतल्या कीर्तनाच्या वेळीं माईसाहेब भेटल्या, तेव्हां त्यांनीं फक्त तोंडीं "उद्यां बंगल्यावर सारीं या," म्हणून म्हटलें. दरम्यान बाळासाहेब मात्र एकदोनदां फिरायला गेलें असतां यांच्या घरीं येऊन गेले होते. पण भय्यासाहेब पुनः कीर्तनप्रसंगींच दृष्टीस पडले होते.

निमंत्रणाप्रमाणें अर्थात्‌च सर्व मंडळी नजरबागेंत गेली, व माईसाहेबांनीं रीतीप्रमाणें त्यांचें स्वागतहि केलें; परंतु आज आपली जरूर त्यांनां नेहमींप्रमाणें मुळींच नाहीं, असें स्पष्ट दिसूं लागलें. दोघां भाचांमध्यें माईसाहेब अगदीं गुंग होऊन त्यांच्याशीं, व विशेषें करून भय्यासाहेबांशीं बोलण्यांत त्या एकसारख्या दंग असत. कॅप्टन बाळासाहेब मात्र ही मंडळी पाहून खूष झाले. नजरबागेंतल्या कंटाळवाण्या परिस्थितींत कांहींहि नवीन प्रकार आला तर त्यांनां पाहिजेच होता; त्यांतून ताराबाईचा सुंदर चेहरा त्यांनां खरोखरच मोहक वाटला होता. ते तिच्या शेजारीं बसून सातारा, वाई व नाशिक यांतील हवापाणी, प्रवास करणें व घरीं कोंडून राहणें, नवीं प्रसिद्ध झालेलीं पुस्तकें व नवीन संगीत, वगैरे नानाप्रकारच्या विषयांवर तिच्याशीं इतक्या मौजेनें संभाषण करीत होते, कीं, त्या दिवाणखान्यांत आपली याच्या निम्यानेंहि कधीं करमणूक झाली नव्हती, असें दोघांनांहि वाटलें. अर्धा तास त्या भाषणांत तीं दोघें अशीं रमून गेलीं, कीं, अखेर माईसाहेबांचें लक्ष

तिकडे वेधलें. भय्यासाहेबांची तर नजर वारंवार तिकडे जातच असे. तें शेवटीं माईसाहेबांच्या लक्षांत येऊन त्या आपल्या नेहमींच्या आशार्थी स्वरांत उघड ह्मणाल्या "कशाबद्दल तुम्ही बोलतांहां बाळासाहेब ? ताराबाईशीं काय बोलतां आहां ? आम्हाला सांगा पाहूं काय बोलतां तें !"

आतां उत्तर न देणें शक्य नाहीं असें पाहून बाळासाहेब म्हणाले "कांहीं नाहीं, आम्हीं संगीताविषयीं बोलत होतों."

माईसाहेब म्हणाल्या "संगीताविषयीं का ? तर मग मोठ्यानं बोला! मला त्यासारखी गोडी कशांतच नाहीं वाटत. मला तसल्या विषयांत माझं म्हणणं सांगितलंच पाहिजे. मला नाहीं वाटत माझ्या इतका या हिंदुस्थानांत कोणाचा कान गायनलुब्ध असेल, अथवा माझ्या इतकी तरी कोणालाहि जन्मतःच त्यांतली खुमारी कळत असेल. मीं जर कधीं गायन शिकलें असतें, तर माझा कोणाला हात नसता धरूं दिला मीं त्या विद्येंत! अन् तश्शाच अगदीं आमच्या आक्कासाहेब ! त्यांची प्रकृति जर बरी असती, तर त्या दिखील अशा तरबेज झाल्या असत्या म्हणतां ! भय्यासाहेब, तुमची सरलादेवी कशी काय वाजवतेबिजवते ?"

भय्यासाहेबांनीं "ती चांगली वाजवते" असें उत्तर दिल्याबरोबर माईसाहेब पुढें बोलूं लागल्या "वा, तें तर फार चांगलं. तिला माझा निरोप जरूर कळवा, कीं, रोज रगड सराव ठेवल्यावांचून त्यांत त्या निपुण होऊं शकणार नाहींत."

भय्यासाहेब म्हणाले "त्यांनां कांहीं जरूर नाहीं या निरोपाची. त्या फारच मेहनत घेत असतात आपल्या बाजावर."

माईसाहेब म्हणाल्या "मग तर उत्तमच. जेवढा सराव ठेवला तितका थोडाच. मी त्यांनां कधीं पत्र पाठवीन, त्यांत हेंच लिहीन, कीं, कांहीं अड-चण आली, तरी गायनवादनाची हयगय करूं नका. मी नेहमीं या तरुण मुलींनां सांगत असतें ना, कीं, रोज सडकून मेहनत केल्याविना संगीत कधीं चांगलं येणार नाहीं. मीं ताराबाईला या परवांच सांगितलं, कीं, तिनं जास्त सराव केल्यावांचून तिच्या वाजवण्यांत खरी गोडी उत्पन्न होणार नाहीं. अन् मालूबाईच्या घरीं बिचारीच्या पेटीच नाहीं, तरी पण मी तिला नेहमीं सांगतें, कीं, तूं रोज इथें येऊन मास्तरीणबाईच्या खोलींत जो आमचा जुना बाजा आहे, तो वाजवीत बसलीस तर आमची कांहीं हरकत नाहीं.

त्या बाजूला वाजवीत राहिली, तर आम्हांला कोणाला तिची कटकट नाहीं होणार. खरं कीं नाहीं?"

चारचौघांत आपल्या गुरुपत्नीचा असा उणेपणा काढून माईसाहेबांनीं उपमर्द करावा, याची भय्यासाहेबांनां लाज वाटूं लागली. म्हणून ते कांहींच बोलले नाहींत.

अंमळशानें कॉफी पिऊन झाल्यावर बाळासाहेबांनीं ताराबाईला पेटी वाजवण्याचें कबूल केल्याची आठवण केली, व त्याप्रमाणें तीहि बाजा उघडून वाजवूं लागली. बाळासाहेब तिच्या जवळच आपली खुर्ची ओढून ऐकत बसले. एक अर्धें पद झालें नाहीं, तोंच माईसाहेबांनीं पूर्वींप्रमाणें भाचाशीं मोठ्यानें बोलण्यास सुरुवात केली. पण तें भय्यासाहेबांनां बरें न वाटून बोलणें टाळण्याकरितां ते उठून, ताराबाई वाजवीत होती तिच्यापुढें बाजाशीं येऊन, तिच्यासमोर उभे राहून ऐकूं लागले. अगदीं आपल्या चेहऱ्याकडे ते निरखून पहात आहेत हें तिच्या लक्षांत आलें. म्हणून एक कडवें संपून विसांवा घेतांना ती त्यांच्याकडे चेष्टेनें पाहून हंसतहंसत म्हणाली "मी आपला हेतु समजलें, भय्यासाहेब, तुम्ही माझ्यासमोर इतके कां उभे राह्यला आहांत ते! तुमच्या मनांत मला घाबरवायचं आहे! तुमची बहीण किती जरी उत्तम वाजवीत असली, तरी मला येतं तसं वाजवायला मी कांहीं घाबरायची नाहीं! माझ्या स्वभावांत असा कांहीं हट्टीपणा आहे, कीं जों जों मला कोणी घाबरवूं लागतं, तों तों मला जास्तच धीर येत जातो, मी कधीं कोणाच्या म्हणण्यानं भीत नसतें."

भय्यासाहेब म्हणाले "असा आपला माझ्याविषयीं समज होण्यांत आपली चूक होते आहे, असें मी कांहीं म्हणत नाहीं. कारण, आपणाला खरोखरी घाबरवण्याचा हेतु माझा असेल, असें तुम्हाला मुळीं वाटणें शक्यच नाहीं. मला आपली आतां रगड ओळख झाली आहे. त्यावरून मला पक्कें माहीत झालें आहे, कीं, वास्तविक खरीं तुमचीं नसलेलीं मतें, तुमचींच आहेत असें सांगण्यांत, तुम्हाला कधीं कधीं मोठी मौज वाटत असते!"

भय्यासाहेबांनीं केलेलें हें आपलें वर्णन ऐकून ताराबाईला खूपच हंसूं आलें. नंतर ती बाळासाहेबांनां म्हणाली "हे भय्यासाहेब माझ्याविषयीं तुमची मोठी छानच कल्पना करून देतील, अन् माझा एकहि शब्द खरा समजूं नका, म्हणून तुम्हाला सांगतील! काय माझं दुर्दैव पहा, मी इकडे

या गांवांत आलें तेव्हां मला फार आशा होती, कीं, इथें तरी लोकं माझं बोलणं खरं मानतील. पण इथेंहि मी लबाड आहें, असं सांगत फिरणारं माणूस माझ्या दुर्दैवानं मला भेटलं! हें काय बरं असं भय्यासाहेब! तिकडच्या प्रांतांतल्या माझ्या वाईट गोष्टी या प्रांतांत लोकांनां सांगत फिरणं हें कांहीं मोठेपणाचं लक्षण नव्हे! अन् तें बरंच धोक्याचंहि आहे बरं का! कारण, मग त्यामुळं मलाहि उसनं फेडायची बुद्धि होईल, अन् मग अशा कांहीं आपल्या गोष्टी बाहेर पडतील, कीं, या आपल्या मंडळींनां आश्चर्यच वाटेल!"

भय्यासाहेब हंसत हंसत म्हणाले "हो हो येऊं द्या बाहेर. मी कांहीं भीत नाहीं."

बाळासाहेब कौतुकानें म्हणाले "सांगा सांगा, ताराबाई, काय यांच्या गोष्टी असतील त्या सांगा. तिऱ्हाईत मंडळीमध्यें हे गृहस्थ कसे वागतात तें ऐकूंद्या तर खरें!"

ताराबाईहि हंसतच म्हणाली "ऐका तर मग मी सांगतें. पण पहा हो, अगदीं अत्यंत भयंकर असं ऐकायला तयार व्हा! अगदीं प्रथम यांची न् आमची शिवदुर्गांत गांठ पडली, ती क्लबच्या वार्षिक संमेलनाच्या प्रसंगीं. तेव्हां पहा हे कसे वागले ते. तुम्हाला वाईट वाटेल, पण आतां त्याला माझा नाइलाज आहे! हे तेव्हां नुसते इकडे तिकडे आपल्याच डौलांत फिरत राहिले. कितीक स्त्रीपुरुष तिथें होते, पण एकाशींहि बोलले सवरले असतील तर शपथ. काय भय्यासाहेब, मी खोटं नाहीं ना हें सांगत?"

भय्यासाहेब म्हणाले "पण त्या वेळीं आमच्या मंडळींच्या बाहेर, माझी कोणाचीच मुळीं ओळख झालेली नव्हती!"

ताराबाई म्हणाली "बरोबर आहे. संमेलनाच्या प्रसंगीं कधीं कोणी नवा परिचय करीत असतं का? भलतंच एकादं! बरं, पुढं काय बाळासाहेब? काय आतां वाजवूं? आपण सांगाल तें वाजवतें."

भय्यासाहेब म्हणाले "मी नवीन परिचय करण्याचा प्रयत्न करायला हवा होता, हें कदाचित् खरें असेल, पण अनोळखी माणसांशीं परिचय करून, त्यांचा स्वतःविषयीं चांगला ग्रह करून घेणें मला येत नाहीं बुवा!"

ताराबाई म्हणाली "बाळासाहेब, मी विचारूं का यांनां, तें कां येत नाहीं म्हणून? चांगला शहाणासुर्ता समंजस माणूस, चारचौघांत हिंडणारा, अशाला नव्या लोकांचा परिचय करून घेणं, इतकं अवघड कां व्हावं?"

बाळासाहेब म्हणाले "या प्रश्नाचें उत्तर यांनीं द्यायच्या आधींच मला देतां येतें. तें अगदीं थोडक्यांत आहे, कीं, यांनां तितकी तसदी घ्यायची नसते!"

भय्यासाहेब म्हणाले "कांहीं लोकांच्या अंगांत तिऱ्हाइतांनां खूष करायची जी हातोटी असते ती खरेंच मला साधत नाहीं बुवा. कांहीं लोकांनां जसें एकदम नवख्या माणसांत मिळूनमिसळून वागतां येतें, अन् त्यांच्या संबंधाच्या गोष्टींत आपलें मन आहेसें खोटेंच दाखवतां येतें, तसें माझ्यानें नाहीं होत बुवा!"

ताराबाई म्हणाली "या पेटीच्या पडद्यांवर दुसऱ्या कांहीं स्त्रियांचीं बोटं जशीं झरझर चालतांना मी पहातें, तशीं माझीं बोटं कांहीं चालत नाहींत. त्या दुसऱ्या स्त्रियांच्या बोटांनीं जसे बाजांतून गोड सूर अथवा ताना निघतात, तशा ताना माझ्या बोटांनीं निघत नाहींत. पण त्याचा सारा दोष माझा आहे, असं मी समजत असतें. कारण, मी त्या स्त्रियांइतकी बाजावर मेहनत करीत नाहीं, हें त्याचं कारण. पण माझ्या बोटांमधेंच इतर स्त्रियां-प्रमाणं ताना काढण्याचा गुण नाहीं, असं मी कधीं समजत नाहीं!"

भय्यासाहेब हंसले व म्हणाले "तुमचें म्हणणें अगदीं रास्त आहे ताराबाई. नुसता बाजा वाजवीत बसण्यापेक्षां तुम्ही आपल्या वेळाचा जास्त चांगला उपयोग केलेला आहे. ज्याला म्हणून तुमच्या सहवासाचा लाभ झालेला आहे, त्याला तुमच्यांत उणेपणा दिसणार नाहीं. आपण दोघेंहि निवळ तिऱ्हाइतांनां खूष करण्याकरितां कधीं श्रम घेत नसतों!"

येथें माईसाहेबांनीं "काय तुम्ही बोलतां आहां हो?" असें म्हणून त्यांच्या संभाषणांत व्यत्यय आणला. त्याबरोबर ताराबाई पुढचें कडवें वाजवूं लागली. माईसाहेब उठून बाजाजवळ आल्या, दोनचार मिनिटें ताराबाई वाजवीत होती तें त्यांनीं ऐकलें, व लगेच भय्यासाहेबांनां म्हणाल्या "ताराबाई जर पुष्कळ जास्ती मेहनत घेईल, अन् एकाद्या मुंबईतल्या हुशार वाजवणाऱ्याजवळ शिकेल, तर केवळ अगदींच वाईट नाहीं वाज-वणार. तिचा हात कांहीं फारसा वाईट दिसत नाहीं. तरी पण आमच्या आक्कासाहेबांसारखी तिच्यांत खुमारी नाहीं. काय करावं हो, त्यांची प्रकृति भारी नाजुक पडली, नाहीं तर त्यांनीं अशी बहार करून दिली असती—!"

ही आपल्या मामेबहिणीची वाखाणणी भय्यासाहेबांनां कितपत पटते, तें पाहण्याकरितां ताराबाईनें त्यांच्याकडे नजर फेंकली; परंतु त्या वेळीं, अगर

इतर केव्हांहि, इंदुमतीदेवीविषयीं त्यांचें प्रेम असल्याचें तिला चिन्ह दिसेना. म्हणून तिनें कमलिनीकरितां एवढी समाधानाची गोष्ट मनाशीं नक्की ठरवून ठेवली, कीं, जर मी स्वतः त्यांची नातेवाईक असतें तर माझ्याशीं लग्न करायला भय्यासाहेब जितके खुषी असते, तितकेच खुषी ते इंदुमतीदेवीशीं लग्न करण्याला आहेत; आणि म्हणून या बाजूनें तरी कमलिनीला भीति बाळगण्याचें कारण नाहीं.

माईसाहेबांची ताराबाईच्या वाजवण्यावर टीका पुढें चालूच होती, व मधून मधून त्या गायनवादन कसें करावें याविषयीं रगड सूचनाहि करीत होत्या. शिष्टाचाराला अनुसरून ताराबाई हें सर्व आपलें मन आवरून ऐकून घेत होती. आणि पुरुषांच्या आग्रहास्तव, माईसाहेबांची गाडी पोंचवायला येईपर्यंत, ती पेटीवरच बसून होती. मध्यें एकदां आक्कासाहेबांनीं वाजवून दाखविण्याची बाळासाहेबांनीं विनंति केली, पण त्यांनां मुळींच वाजवितां येत नसल्यामुळें श्रीमंतांनीं त्यांची तब्बेत बरोबर नाहीं असा बहाणा करून कशी तरी संपादणी करून घेतली!

---

## प्रकरण बत्तिसावें.

### याचा अर्थ काय बाई ?

दुसरे दिवशीं सकाळीं ताराबाई एकटीच दिवाणखान्यांत शांताक्काला पत्र लिहीत बसली होती. मालती व शेवंती कोणालाशा भेटावयाला सुवर्णपुरांत गेल्या होत्या. इतक्यांत बाहेर कोणी आल्याची तिला चाहूल लागली. गाडीचा आवाज ऐकूं आला नव्हता, म्हणून तिला वाटलें, कीं, कदाचित माईसाहेब अशा अवचित येत असतात तशा आल्या असतील. त्यांनीं आपणाला पत्र लिहितांना पाहिलें, तर उगीच त्याबद्दल सतरा प्रश्न विचारूं लागतील तें चुकवण्याकरितां, ती तें अर्धवट लिहिलेलें पत्र टेबलाच्या खणांत लपवून ठेवीत होती, इतक्यांत दार उघडलें. आणि तिला फार आश्चर्य वाटलें, कीं, भय्यासाहेब—आणि तेहि एकटेच—आंत आले!

ताराबाई एकटीच आहे असें पाहून त्यांनांहि आश्चर्य वाटलेंसें दिसलें, व "मी समजलों आपण सर्वजणी आंत आहांत म्हणून मी आंत आलों," असें ते म्हणाले. नंतर दोघेंहि बसल्यावर नजरबागेंतील सर्व मंडळी ठीक आहेतना, म्हणून तिनें विचारतां त्यांनीं होय म्हटलें. तेहि पुढें कांहीं

बोलेनात; निवळ स्वस्थ बसावें तर तेंहि चमत्कारिकच; म्हणून काय विषय काढावा अशा विचारांत ताराबाई पडली. शेवटीं त्यांची आपली गांठ शिवदुर्गांत कोठें पडली होती, व त्या दिवशीं जाण्याची मुळींच बोलवा नसतां दोन दिवसांत सर्व मंडळी कशी निघून गेली, हें लक्षांत येऊन त्याविषयीं भय्यासाहेब काय म्हणतात तें समजण्याच्या इच्छेनें ती म्हणाली "आनंद-भुवनांतून किती तडकाफडकी तुम्ही सारीं निघून गेलांत, भय्यासाहेब! भाऊसाहेबांनां तुम्हांला सर्वांनां मागोमाग आलेलीं पाहून बरंच आश्चर्य वाटलं असेल नव्हे? कारण, मला आठवतं, कीं, ते एकच दिवस आधीं गेले होते. त्या सर्वांची खुशाली ठीक आहेना?"

भय्यासाहेब म्हणाले "हो हो, अगदीं उत्तम आहेत सर्वजणें."

यापेक्षां जास्त ते उत्तर देत नाहींत, व पहिली गोष्ट वगळून टाकतात असें पाहून ताराबाई जरा वेळानें पुनः म्हणाली "मी कायसं ऐकलं आहे, कीं, भाऊसाहेबांचा परत आनंदभुवनांत रहायला यायचा फारसा विचार नाहीं म्हणून?"

भय्यासाहेब म्हणाले "तसें ते म्हणत नाहींत तोंडानें, पण ते आतां तिकडे कधीं फार राहतील असा संभव दिसत नाहीं. त्यांनां काय रगड स्नेही आहेत, अन् जास्तजास्त ओळखी रोज नव्या नव्या होतील, असें हल्लीं त्यांचें वय आहे."

ताराबाई म्हणाली "तें तर खरंच. पण त्यांचा जर यायचा विचार नसला तर त्यांनीं तें आनंदभुवन अजीबात सोडून दिलं, तर आमच्या-सारख्यांनां बरं नव्हे का? म्हणजे तिथें कोणी कायमचीं रहाणारीं माणसं तरी आम्हांला मिळतील. पण मी हें काय बोलतें आहें म्हणा. त्यांनीं आनंद-भुवन घेतलं, तेव्हां कांहीं इतरांच्या सोईसाठीं थोडंच घेतलं? अन् आतां सोडायचं झालं, तरी इतरांची सोय ते कशाला पाहातील?"

भय्यासाहेब म्हणाले "कोणी चांगलं भाडोत्री मिळालं तर ते एकदम देऊन टाकतील, असा माझा तर अंदाज आहे."

ताराबाई गप राहिली. भाऊसाहेबांविषयीं जास्त बोलणें धोक्याचें आहे. असें तिला वाटूं लागलें. म्हणून आपण गप राहून दुसरा विषय त्यांनां काढायला ठेवावा म्हणून तिनें विचार ठरवला. हें त्यांच्या लक्षांत आलें. म्हणून त्यांनीं नंतर सुरुवात केली. "हें घर बरें सोइस्कर दिसतें. मला वाटतें

नीलकंठराव इकडे प्रथम आले, तेव्हां माईसाहेबांनीं त्यांच्याकरतां बऱ्याच सोई करून त्यांत दिल्या."

ताराबाई म्हणाली "असं ऐकलं खरं मीं. अन् मला वाटतं, कीं, नीलकंठ-रावांसारखा दुसरा इतका कृतज्ञ गृहस्थ माईसाहेबांनां मिळणं फारसं शक्य नसेल."

भय्यासाहेब म्हणाले "नीलकंठरावांचें नशीब मोठें अनुकूल दिसतें आहे. त्यांनीं बायको पहा कशी नामी मिळवली आहे ती !"

ताराबाई म्हणाली "हो, खरंच. शहाण्यासुर्त्या, समजुतदार अशा थोड्याच मुली त्यांनां पतकरायला कबूल झाल्या असत्या. अथवा पतकरल्यावर सुखासमाधानानं राहिल्या असत्या. पण तसल्या एकीनं त्यांनां पतकरलं आहे, म्हणून त्यांच्या स्नेह्यांनां आनंद होणं साहजिकच आहे. आमच्या मालूची फार सुरेख बुद्धि आहे, पण नीलकंठरावांनां स्वीकारण्यांत तिनं आपल्या बुद्धीचा चांगला उपयोग केला, असं मला कांहीं वाटत नाहीं. पण एकंदरींत तिला समाधान आहेसं दिसतं, आणि निवळ व्यावहारिक दृष्टीनं जर पाहिलं, तर तिला स्थळ चांगलंच मिळालं असं म्हटलं पाहिजे."

भय्यासाहेब म्हणाले "शिवाय, आपल्या माहेरच्यांच्यापासून इतक्या जवळ आपलें घर आहे हेंहि तिला ठीकच वाटत असलें पाहिजे."

ताराबाई म्हणाली "याला तुम्हीं जवळ म्हणतां ? निदान तीनशें मैल तरी हें आहे !"

भय्यासाहेब म्हणाले "तीनशें मैल काय आगगाडीनें फार झाले ? फार तर अर्ध्या दिवसाची वाट. आज काशीला माणसें मुंबईहून एका दिवसांत पोंचतातना ! मी तर समजतों, तीनशें मैल म्हणजे सहज अंतर आहे."

ताराबाई म्हणाली "मला कधीं नाहीं वाटलं, कीं, जवळ असण्याची सोय या स्थळांत मालतीला मिळाली. शिवदुर्गाच्या आसपासच्याबाहेर म्हणजे एकंदरींत दूरच, असं आपलं मला वाटतं."

भय्यासाहेब म्हणाले "हें आपली आवड शिवदुर्गावर फार आहे याचें चिन्ह आहे, इतकेंच मला दिसतें आहे."

हें बोलतांना भय्यासाहेब थोडेसे हंसले, व त्याचा अर्थहि तिला समजलासा वाटला. आपल्या मनांत शांताक्का व आनंदभुवन यांचे विचार असतील असें त्यांनां वाटलें असावें, असें तिला दिसलें. म्हणून ती लगेच

म्हणाली ''माझं असं कांहीं ठाम मत नाहीं, कीं, माहेरापासून आपलं स्वतःचं घर फार दूर असूंच नये ! जवळ आणि दूर हे शब्द सापेक्ष असून त्यांचा अर्थ दुसऱ्या पुष्कळ गोष्टींवर अवलंबून राहतो. पैशाची समृद्धि असली म्हणजे नेहमीं जाण्यायेण्याच्या खर्चाची पर्वा वाटत नाहीं. अशा वेळीं कितीहि दूर असलं तर त्यांत कांहीं कमीपणा नाहीं. पण इथें तसं कुठं आहे? यांनां उत्पन्न जरी साधारण ठीक आहे, तरी नेहमीं जाण्यायेण्याचे खर्च चालण्याइतकं कांहीं तें मोठं नाहीं. मला नाहीं वाटत, मालूबाईला तरी आपण माहेराच्याजवळ आहों असं वाटत असेलसं. ''

भय्यासाहेबांनीं आपली खुर्ची एकदम तिच्याकडे सरकून घेतली व म्हटलें " तुम्हाला स्वतःला तर कांहीं शिवदुर्गावर इतकें प्रेम करण्याचें कारण नाहीं ! तुम्ही तर स्वतः जन्मापासून तिथलीं कांहीं राहिलेलीं नव्हेत !' '

ताराबाई थोडीशी चरकली. भय्यासाहेबहि थोडेसे वरमल्यासारखे झाले. त्यांनीं आपली खुर्ची झटकन् मागें ओढली, टेबलावरचें एक वर्तमानपत्र हातीं घेतलें, व तें पाहण्याचा आविर्भाव करीत, थंड स्वरानें म्हणाले " तुम्हाला नाशकाकडचा हा प्रांत कसा काय आवडतो ?''

त्याविषयीं ताराबाईनेंहि कांहीं उत्तर दिलें, त्यावर आणखी कांहीं बोलणें दोघांच्याहिकडून शांतपणानें चाललें होतें. इतक्यांत मालती व शेवंती आंत आल्या. त्यामुळें तें बोलणें संपलें. या दोघांनां एकटीं पाहून त्यांनांहि नवल झालें. सर्वजणी असतील अशा गैर समजुतीनें आपण येऊन ताराबाईशीं एकटे कसे बोलत राहिलों, तें भय्यासाहेबांनीं सांगितलें. व थोडा वेळ थांबून कोणाशीं कांहींच न बोलतां, ते निरोप घेऊन गेले.

ते गेल्यावर मालती ताराला म्हणाली " या येण्याचा काय अर्थ समजावा बाई ! मला तर दिसतं आहे, तारा, कीं, स्वारी आपल्यावर भुलली आहे ! नाहीं तर ते असे सहजासहजीं इकडे येते ना. '' पण झालेली हकीगत ताराबाईनें तिला सांगितल्यावर तीहि कल्पना, मालतीची इच्छा असूनसुद्धां, नीटशी जुळेना. दुसऱ्या कल्पना जुळवून पाहिल्या त्याहि जमेनात. अखेर त्यांनां असें वाटलें, कीं, नजरबागेंत करमेनासें झालें असल्यामुळें, कांहीं तरी बदल करायला म्हणून ते हिंडत हिंडत आले असावेत. घरांत नेहमीं पुस्तकें, बिलिअर्ड वगैरे करमणुकीचीं साधनें रगड होतीं; पण माईसाहेब त्यांनां मोकळे सोडतील तर ना ! आणि शिवाय अष्टौप्रहर पुस्तकें व बिलिअर्ड

यांच्यांत कशी मौज वाटणार ? म्हणून शेतेंभातें हिरवीं गार आहेत अशा प्रसन्न दिवसांत घरांत कोंडून घेण्यापेक्षां, नजरबागेंतली पुरुषमंडळी वारंवार बाहेर फिरायला जात असत. नीलकंठरावांचें घर ठीक अंतरावर होतें म्हणून, अथवा तिकडे जाण्याचा रस्ता चांगला होता म्हणून, अथवा त्यांत भेटणारी मंडळी मोहक वाटत म्हणून, कोणच्याना कोणच्यातरी कारणानें—बहुतेक दररोज, कधीं कधीं दोनदोनदां सुद्धां, नजरबागेचीं माणसें इकडे येत असत. कधीं माईसाहेब बरोबर येत, कधीं दोघे भाऊ येत, कधीं दोघेहि एकएकटेच येत. कॅप्टन बाळासाहेबांनां ताराबाईशीं बोलण्यांत फार मौज वाटे म्हणून ते येत, हें उघड दिसे. म्हणून ते आलेले सर्वांनांच आवडत. शिवाय, ताराबाईला पहिल्यानें पसंत पडलेले नागेशराव यांच्याविषयींहि त्यांचें मत बरें असल्याचें तिला दिसलें. नागेशरावांपेक्षां बाळासाहेब जरी तिला कमी उमदे दिसत होते, तरी त्यांच्यापेक्षां बाळासाहेबांचें मन जास्त सुसंस्कृत होतें, हें स्पष्ट दिसत होतें.

पण भय्यासाहेब इतके पुनः पुनः कां येतात, हें एक गूढच होतें ! मंडळींच्या सहवासाकरितां येतात म्हणावें, तर ते दहा दहा मिनिटें चकार शब्दहि न बोलतां उगाच बसून रहात. आणि कांहीं बोललेच तर मोठ्या मिनतवारीनें बोललेंच पाहिजे, म्हणून बोलतातसें दिसे. बोलण्यापासून त्यांनां सुख वाटत होतें, असें मुळींच दिसेना. बरें आल्यावर मौजेनें हुशारींतहि असलेसे दिसत नसत. मालतीला हें एक कोडेंच वाटूं लागलें. कॅप्टन बाळासाहेब त्यांची तोंड न उघडण्याबद्दल चेष्टासुद्धां करीत, त्यावरून ते नेहमीं असे मुखस्तंभ नसतात असें वाटे. हा सर्व प्रकार प्रेमाचा असावा, व त्या प्रेमाचें स्थान ताराबाई असावी, असें मानण्याची मालतीला फार इच्छा सहजच होई, व त्या हेतूनें ती त्यांच्याकडे बारकाईनें लक्षहि देई. नजरबागेंत अथवा आपल्या घरीं ते असतांना तिनें पुष्कळ विचार करून पहावें, पण प्रेमाचीं चिन्हें तिच्या नजरेस येईनात. ते तिच्याकडे नेहमीं टक लावून पहात खरे, पण त्या पाहण्यांत फारसें कौतुक तिला दिसून येत नसे. कधीं कधीं तर निवळ अर्थशून्य दृष्टीनें ते पहात असावेत, असेंहि तिला वाटे. "त्यांचें तुझ्यावर प्रेम तर नसेल ?" असें तिनें एकदोनदां ताराला सुचविलेंहि, पण ती त्या कल्पनेची नुसती टरच करी. आणि तसली कल्पना खरोखरच ताराच्या मनांत उत्पन्न झाली तरी, तिची अखेरीला निराशाच

होईल असा संभव फार असल्यामुळें, ती कल्पना ताराच्या डोक्यांत आपण तरी कशाला उगीच दृढ करा, अशा विचारानें मालतीहि त्याविषयीं गप राही. बाकी, आपल्या मुठींत भय्यासाहेब आले आहेत अशी ताराबाईची खात्री होईल, तर त्यांच्याबद्दलची तिची नावड ताबडतोब साफ मावळून जाईल, याची मालतीला मुळींच शंका वाटत नव्हती!

ताराबाईला उत्तम स्थळ मिळो या सदिच्छेनें, तिचें बाळासाहेबांशीं जुळावें, असें मालतीच्या मनांत येई. भय्यासाहेबांपेक्षां ते जास्त मनमिळाऊ होते यांत संशयच नव्हता, व त्यांनां ताराबाईशीं बोलण्यांत कौतुक वाटे हेंहि उघड होतें. त्यांची स्थितिहि वावगी नव्हती. हें सर्व ठीक होतें खरें; पण दुसरी बाजू मालतीच्या मनांत अशी होती, कीं, भय्यासाहेबांच्या हातांत दुसऱ्याला देण्यासारखी देवस्थानचीं उत्पन्नें रगड होतीं, पण बाळासाहेबांच्या हातांत तसलें कांहींच नव्हतें!

---

## प्रकरण तेहतिसावें.

### कॅप्टन बाळासाहेबांशीं संवाद.

आंबराईमधून ताराबाई हिंडत असतां अनेकवेळां तिची भय्यासाहेबांशीं अकस्मात् गांठ पडली. त्या बाजूला कोणी हिंडायला येत नसे म्हणून तिनें ती राई स्वच्छंदपणानें मन मोकळें करून फिरण्याकरितां पसंत केली होती. असें असतां तेथें भय्यासाहेब फिरत फिरत यावेत हें केवळ दुर्दैव होय, असें तिला वाटे. पहिल्यानें त्यांची गांठ पडली, तेव्हां तशी पुनः पडूं नये या हेतूनें तिनें त्यांनां बोलतां बोलतां कळवून टाकलें, कीं, या बाजूला मी नेहमीं येत असतें. असें असून तोच प्रकार दुसऱ्यानें घडला हें नवलच. इतकेंच नव्हे, तिसऱ्यानेंहि तोच मासला! हा प्रकार मुद्दाम जाणूनबुजून खोडी काढण्याचा असावा, असा तिचा तर्क झाला. अथवा असेंहि वाटूं लागलें, कीं, तसें करण्यांत मुद्दाम स्वतःला न आवडणारी गोष्ट करून ते घेत असावेत. कारण, नाइलाजानें भेट झालीच तर निदान दोन चार औपचारिक प्रश्नोत्तरें झाल्यावर आपापल्या वाटनें चालतें व्हावें, तसें न करितां ते मुद्दाम परत फिरून तिच्याबरोबर गांवाकडे येण्याला इच्छीत. परत येतांना घर येईपर्यंत विशेष कांहीं बोलतहि नसत! अथवा ताराबाईहि त्यांच्याशीं संभाषण काढण्यास, अथवा ते कांहीं बोलत असलेच तर लक्ष-

पूर्वक ऐकण्यास उत्सुकता दाखवीत नसे. पण तिसऱ्यानें गांठ पडली तेव्हां घरीं परत येत असतांना तिच्या लक्षांत येऊन चुकलें, कीं, हे गृहस्थ कांहीं चमत्कारिक व एकमेकांशीं विसंगत, असे नानाप्रकारचे प्रश्न विचारीत असतातः—सुवर्णपूर आवडतें का नाहीं, एकटें एकटें हिंडायला जाण्यांत तुम्हाला विशेष मौज वाटते का, नीलकंठराव आपल्या बायकोशीं सुखा-समाधानानें रहातात कीं नाहीं, वगैरे. एकदां तर नजरबागेंतल्या बंगल्याची गोष्ट निघाली असतां, ताराबाई सहज म्हणाली, कीं, "मला तो बंगला अजून सगळा माहीत नाहीं;" त्या वेळीं "तुम्ही पुनः इकडे याल तेव्हां त्या बंगल्याची पूर्ण माहिती सहज होईल. कारण, चारआठ दिवस बंगल्यांत राहिल्यावर माहिती व्हायला काय उशीर," असें कांहीं संदिग्धपणें ते बोलले होते. या बोलण्याचा अर्थ काय ? मी पुनः इकडे येतें कशाला, आणि आलें तरी नजरबागेंत कशी, याचा तिला उमज पडेना. कॅप्टन बाळा-साहेब माझ्याशीं जरा विशेष बोलतात त्याला अनुलक्षून तर हा टोमणा हे मारीत नसतील, असाहि विचार आला. जरा कोठें एकाद्या पुरुषानें एकाद्या स्त्रीशीं दोन शब्द मोकळया मनानें बोलले, कीं, लोकांनीं त्यांच्या लग्नाची कल्पना मनांत आणावी, हें तिला वाईट वाटलें. तितक्यांत घर आल्यामुळें ती आंत गेली व ते पुढें चालते झाले.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं टपाल आल्यावर दोनतीन पत्रें आलीं होतीं, तीं स्वस्थपणें वाचण्याकरितां ती आंबराईकडे गेली, व एका भव्य आम्र-वृक्षाखालीं दगडावर स्वस्थपणानें ती शांताचें पत्र वाचण्यांत गढून गेली होती. शांताच्या पत्रांतील कांहीं मजकुरावरून अजूनहि तिची चित्तवृत्ति पुरी शांत नसून ती हुशारींत नाहीं, अशी तिची खात्री होत होती. इत-क्यांत जवळ खजबजल्याचा भास झाला म्हणून मान वर करून पहातें तों तिला वाटल्याप्रमाणें भय्यासाहेब येत नसून, कॅप्टन बाळासाहेब आपणाकडे येत आहेत असें तिला दिसलें. तिनें झटकन् पत्र खिशांत कोंबलें, व जबरीनें हंसतमुख करून ती म्हणाली "आपण इकडे कधीं फिरत येतां हें मला ठाऊक नव्हतं."

बाळासाहेब म्हणाले "मी दरसाल एकदां गांवाच्या सभोंवार प्रदक्षिणा घालून, या राईतून परतत असतों. तसा आज पहांटे निघून प्रदक्षिणा घालून आलों आहें. आपण आणखी बसणार आहां काय इथें ?"

ताराबाई म्हणाली " छे, चला मीहि येतेंच." असें म्हणून तीं दोघें घराकडे परत निघालीं. ताराबाईनें वाटेंत विचारलें " शनवारीं तुमचं निघायचं नक्की ठरलं का ? "

बाळासाहेब म्हणाले " हो पण भय्यासाहेबांनीं पुनः लांबवलें नाहीं तर! इथें मी अगदीं त्यांच्या हातांत असतों, ते म्हणतील तसें करतों. कारण, सारी व्यवस्था त्यांच्या हातीं आहे."

ताराबाई म्हणाली " अस्सं ? अन् जरी कदाचित ते करतील त्या व्यवस्थेनं त्यांनां स्वतःला सुख झालं नाहीं, तरी सर्व व्यवस्था आपल्या हातीं आहे एवढ्या विचारानंच त्यांनां निदान सुख वाटत असेल! मनासारखं सारं करून टाकण्याची हौस भय्यासाहेबांइतकी दुसऱ्या कोणाला असलेली माझ्या तर आढळांत नाहीं."

बाळासाहेब म्हणाले "आपलें म्हणणें चाललेंच पाहिजे, असें त्यांनां अतिशय आवडतें, हें अगदीं खरें; पण तें कोणाला नाहीं आवडत सांगा पाहूं? साऱ्यांनांच आवडतें.अंतर एवढेंच,कीं,ते श्रीमंत आहेत म्हणून त्यांचें चालतें, इतर आमच्यासारख्या गरिबांचें चालत नाहीं, झालें. मी अगदीं माझ्या मनाला लागून असलेली गोष्ट बोलतों आहें. माझ्या सारख्याला, तुम्हाला माहीत आहेच, कीं, नेहमीं दुसऱ्यावर अवलंबून रहायची व मन आंवरायची संवय रगड होते !"

ताराबाई म्हणाली "या दोहोंपैकीं एकाचीहि तुम्हाला ओळख असेलसं मला नाहीं वाटत. खरंच विचारतें, सांगा बरं, काय तुम्हाला त्यांची माहिती आहे ती! असं कधी तुम्हाला झालं आहे, कीं, एकाद्या ठिकाणीं जावंसं वाटलं आहे, अथवा एकादी जिन्नस घ्यावीशी वाटली आहे, पण निवळ पैसा नसल्यामुळं तसं तुम्हाला करतां आलं नाहीं ? "

बाळासाहेब म्हणाले " हें पहा, या प्रश्नाचें उत्तर ज्याचें त्याला माहीत. अंदरकी बात राम जाने! दुरून बघणारांनां तें खरें सुद्धां वाटायचें नाहीं. आतां हें एक कबूल करतां येईल, कीं, निवळ कुठें जावेंसें वाटलें, अथवा कांहीं हवेंसें वाटलें, तर आमच्यासारख्यांला कधीं पैशाची अडचण नसते. पण यापेक्षां जास्त महत्त्वाच्या बाबी असतात, त्यांमध्यें पैशाची अडचण आम्हांला रगड भासते. हेंच पहाना, कीं, आमच्यासारख्यांनां केवळ मनास पसंत वाटेल त्या स्त्रीशीं लग्न करतां येत नाहीं ! "

ताराबाई हंसत म्हणाली "पण मनास आलेली स्त्री पैसेवाली असली म्हणजे तर येतं ना? अन् तुमच्यासारख्यांचं मनहि तसल्याच स्त्रियांवर लागतं!"

बाळासाहेब म्हणाले "त्याचें कारण आहे. आमच्या संवयी झाल्या आहेत भारी खर्चिक. त्यामुळें आम्हांला दुसऱ्यांवर अविवाहित असतांहि अवलंबून राहावें लागतें. अन् म्हणून, लग्न करण्याचा विचार केला, तर आमच्यासारख्यांनां तर त्या स्त्रीच्या पैशाकडे फारच पहावें लागतें. त्यावांचून लग्नच अशक्य होतें आम्हांला."

ताराबाईला वाटलें, कीं, ही आपल्याला तर सूचना नव्हे? ही कल्पना मनांत येतांच ती जराशी लज्जित झाली. पण लागलीच सांवरून ती चेष्टेनें हंसत म्हणाली "अस्सं? तर मग आपल्यासारख्याची किती किंमत होते? मला नाहीं वाटत, पंचवीस हजारांहून जास्त तुम्ही मागालसं."

बाळासाहेबानींहि तितक्याच चेष्टेनें उत्तर दिलें "अहो, आमचें काय? मिळतील तितके आम्ही मागणारच! जास्त मिळाले तर ते ठेवायला जागा का कमी आहे आमच्याजवळ?"

नंतर थोडा वेळ कोणीच कांहीं बोललें नाहीं. हें बोलणें आपणाला लागलें असें बाळासाहेबांनां वाटेल, तें वाटूं नये म्हणून, ताराबाई पुनः चेष्टेनें म्हणाली "मला वाटतं, तुमच्या भावानं तुम्हाला इथें आणलं तें केवळ एवढ्याचकरतां, कीं, आपणाला कोणा एकाद्यावर तरी हुकूम चालवतां यावा. पण तसली निरंतरची सोय करून घ्यायच्याकरितां, मी म्हणतें ते एकदां आपलं लग्न कां करून घेत नाहींत? म्हणजे नेहमीं हवं तसं वांकवायला एक हक्काचं माणूस तरी मिळेल त्यांनां! पण सध्यां कदाचित ती हौस त्यांच्या धाकट्या बहिणीवर भागत असेल त्यांची! हे एकटेच वडील भाऊ, तेव्हां हवे तसे तिच्यावर अधिकार चालवीत असतील!"

बाळासाहेब म्हणाले "तसें नाहीं कांहीं. त्या बाबतींत माझाहि हक्क त्यांच्या बरोबरीचा आहे. ते व मी असे दोघे मिळून तिचे कायदेशीर पालक आहोंत. भय्यासाहेबांच्या वडलांनींच तशी व्यवस्था केली आहे."

ताराबाई म्हणाली "अस्सं काय? मला नव्हतं तें ठाऊक. अस्सं अस्सं. अन् मग कसं काय तुमचं जमतं? सरलादेवी कांहीं त्रासबीस देते का? तिच्या वयाच्या मुलींनां नीट रीतीनं वाढवणं कधीं कधीं मोठं अडचणीचं

असतं ह्मणतात. त्यांतूनहि तिच्या अंगीं भय्यासाहेबांच्या घराण्याचा हट्टी स्वभाव जर असेल, तर मग तिला आपलंच ह्मणणं चालवावंसं वाटत असेल."

हें तिचें भाषण ऐकून, बाळासाहेब तिच्याकडे निरखून पाहूं लागले, व त्यांनीं लगेच तिला विचारलें "कां बरें? आह्मांला तिच्यापासून तसदी पडत असेल, असें तुह्माला कां वाटलें?"

या विचारण्याच्या झोंकावरून तर आपण बहुतेक खरी गोष्ट ताडली, असा तिचा ग्रह झाला. पण ती लगेच म्हणाली "छे छे, भिऊं नका कांहीं. तिच्याविरुद्ध मला कांहींच ठाऊक नाहीं हो! ती बिचारी अगदीं अत्यंत गरीब मुलगीहि असेल. माझ्या ओळखीच्या दोन स्त्रियांनां तर ती फारच आवडते–म्हणजे भाऊसाहेबांच्या दोघी बहिणींनां. तुमचीहि त्यांची ओळख आहे, नव्हे?"

बाळासाहेब म्हणाले "आहे थोडीशी. त्यांचा भाऊ मात्र मला चांगला सभ्य गृहस्थ दिसला. तो भय्यासाहेबांचा अत्यंत जीवश्चकंठश्च आहे."

ताराबाई म्हणाली "हो हो, वा! ते तर त्यांच्यावर भारी लोभ करतात, अन् त्यांची काळजीहि पण अत्यंत घेत असतात!"

बाळासाहेब म्हणाले "त्यांची काळजी घेतात? हो खरेंच. ज्या बाबतींत त्यांनां भारी जपलें पाहिजे त्या बाबतींत भय्यासाहेब त्यांनां फार जपत असतात खरे. परवां आम्ही इकडे येत होतों तेव्हां वाटेनें त्यांनीं तसलें कायसेंसें मला म्हटलें खरें. भाऊसाहेबांनां त्यांनीं कशांतसें आपलें फार ऋणी करून ठेवलें आहे, असें दिसतें. पण माझी पक्की खात्री नाहीं हो, कीं, ते जें ह्मणत होते तें भाऊसाहेबांबद्दलच होतें अशी. माझा तसा आपला तर्क आहे."

ताराबाई उत्कंठेनें म्हणाली "कसं कसं? काय म्हणतां आपण?"

बाळासाहेब म्हणाले "तें अर्थात् जगजाहीर व्हावें अशी भय्यासाहेबांची इच्छा नाहीं; कारण, त्यांतल्या स्त्रीच्या घरच्या माणसांच्या कानावर जर तें गेलें, तर तें कांहीं ठीक नाहीं होणार."

ताराबाई म्हणाली "त्याची नको आपणाला काळजी. मजकडून बाहेर नाहीं जाणार."

बाळासाहेब म्हणाले "अन् हेंहि लक्षांत असूं द्या, कीं, तें भाऊसाहेबां-विषयींच होतें, असेंहि म्हणण्याला मला फारसा आधार नाहीं. ते म्हणाले तें इतकेंच, कीं, आपल्या एका स्नेह्याला त्यांनीं नुकतेंच मोठ्या शिताफीनें

एका अत्यंत मूर्खपणाच्या लग्नाच्या नादांतून सोडवलें. त्यांनीं नांवेंबिवें कांहीं सांगितलीं नाहींत. भाऊसाहेब हे गृहस्थ तशा प्रकारच्या नादांत भोळेपणानें पडण्याजोगे आहेत, आणि दोनतीन महिने ते व भय्यासाहेब एका ठिकाणीं नुकतेच होते, यावरून माझा आपला केवळ तर्क आहे, कीं, तें बोलणें भाऊसाहेबांविषयींच असावें."

ताराबाई चिकित्सेनें म्हणाली "पण भय्यासाहेब मधें कां पडले, त्याचीं त्यांनीं कारणं सांगितलीं का कांहीं ?"

बाळासाहेब म्हणाले "ते असें कांहीं म्हणाले, कीं, त्या स्त्रीच्या बाजूला हरकत घेण्यासारख्या कांहीं विशेष गोष्टी होत्या."

ताराबाई म्हणाली "अन् त्यांनां एकमेकांपासून दूर करायला यांनीं कांय क्लृप्त्या योजल्या ?"

बाळासाहेब हंसत म्हणाले "त्यांनीं स्वतः काय क्लृप्त्या योजल्या, तें कांहीं ते बोलले नाहींत. मीं आतां सांगितलें इतकेंच ते म्हणाले."

ताराबाई कांहींच न बोलतां पुढें चालत होती. तिच्या अंतःकरणांत संतापाचा अतिरेक चालला होता. ती अशी विचारांत मग्न झालेली पाहून बाळासाहेबांनीं "एवढा कसला विचार करतां आहां ?" म्हणून विचारलें.

ताराबाई गंभीरपणानें म्हणाली "तुम्ही आतां सांगितलंत तेंच माझ्या मनांत घोळतं आहे. तुमच्या बंधूंचं वर्तन मला नाहीं पसंत पडत. त्यांनां मधें पडून निकाल ठरवावयाचा अधिकार काय होता ?"

बाळासाहेब म्हणाले "तर मग आपल्या दृष्टीनें, हें त्यांचें कृत्य विनाकारण मधें लुडबुड करण्याचें झालें वाटतें ?"

ताराबाई म्हणाली "मित्राच्या अंतःकरणाचा कल योग्य माणसाकडे आहे कीं नाहीं, हें ठरवायचा भय्यासाहेबांनां काय हक्क ? अथवा, केवळ यांनीं तसं अमुक ठरवलं, तर तेवढ्यावरून त्या मित्राच्या इतक्या नाजुक गोष्टीचा विध्वंस करून, या लग्नापासून तुला सुख लागायचंच नाहीं, असं यांनीं तरी काय अधिकारानं निश्चित करावं?"

तितक्यांत ती भानावर येऊन लगेच पुढें म्हणाली "तें असो ह्मणा. आपणाला जर सगळी कच्ची हकीगत ठाऊक नाहीं, तर आपण तरी त्यांनां दोष देणं बरोबर नाहीं. कदाचित् असंहि कां नसेल, कीं, त्या मित्राच्या अंतःकरणांतहि फारसें प्रेम उत्पन्न झालेलें नसेल ?"

बाळासाहेब म्हणाले " तसाहि संभव पुष्कळ आहे. पण तसें जर धरलें, तर मग आमच्या बंधूंनां एवढें धन्य मानण्याला तरी जागा कुठें रहाते ? "

बाळासाहेब हें चेष्टेनें म्हणाले. पण तें ताराबाईच्या दृष्टीनें भय्यासाहेबांनां इतकें लागू पडत होतें, कीं, आतां ज्यास्ती बोललें तर मी भलतेंचें कांहीं तरी बोलेन, अशी तिला भीति वाटूं लागली. म्हणून दुसऱ्याच साध्या गोष्टी काढून घर येईपर्यंत ती बोलत राहिली. बाळासाहेब निघून गेल्यावर आपल्या खोलींत जाऊन, ती आतां समजलेल्या सर्व हकीगतीचा खोल विचार करूं लागली. ही हकीगत आपल्या माणसांवांचून दुसऱ्या कोणाची असणें तर शक्यच नव्हतें. कारण, इतका भयंकर पगडा चालवून घेण्यासारखे दोन मित्र भय्यासाहेबांनां असतील, हें अगदीं अशक्य. शांताक्काची भाऊसाहेबां-पासून ताटातूट करण्याच्या खटपटींत त्यांचें अंग असावें, यांत तिला शंकाच नव्हती. पण मुख्य अंग कमलिनीचें, व तिनेंच हा सर्व विभू रचला, असा तिचा आजपर्यंत ग्रह होता. पण तिच्या दृष्टीनें आज तें सर्व बदललें. भय्यासाहेबांनीं आपल्या अहंपणाच्या डौलानें हें सर्व कृत्य केलें, या सर्वाला आदिकारण तेच, त्यांच्या गर्विष्ठ व बेपर्वा स्वभावानें ही सर्व रचना झाली, व त्यांच्याचमुळें गरीब बिचाऱ्या शांताक्काची इतकी पायमल्ली झाली, आणि अजूनहि चाललीच आहे. शांताक्कासारख्या या जगांतल्या एका अत्यंत प्रेमळ व उदार अंतःकरणाच्या स्त्रीचें सुखसर्वस्व आजघटकेला तरी भय्या-साहेबांनीं उध्वस्त करून टाकलें आहे, व या त्यांच्या अघोरी कृत्याचा परिणाम आणखी किती काळपर्यंत टिकणार हें तरी कोणीं सांगावें ?

"काय ? 'त्या स्त्रीच्या बाजूला हरकत घेण्यासारख्या कांहीं विशेष गोष्टी होत्या ' असे शब्द बाळासाहेब बोलले नव्हे ? अन् या विशेष गोष्टी म्हणजे बहुतकरून याच असणार, कीं, मावशीचा नवरा खेडेगावांत वकिली करतो व मामा मुंबईत व्यापारांत आहे ! " ती पुढें आपल्याशींच म्हणाली "शांताला स्वतःला तर खोड काढणं शक्यच नाहीं कोणाला ! उत्तम अप्सरे-सारखं रूप, अंतःकरणाचा थोरपणा, श्रेष्ठप्रतीची बुद्धिमत्ता, सुसंस्कृत मन व अत्यंत मोहक चालचलणूक हें सारं तिला भरपूर आहे. तसंच आमच्या बाबांच्यामधेंहि खोड काढण्याजोगं नाहींच कांहीं. त्यांच्यांत जराशी खांचखोंच कुठें असेल, पण बुद्धिमत्ता अशी आहे, कीं, भय्यासाहेबांनांहि तिचा अना-दर करतां येणार नाहीं, अन् संभावित वर्तन असं आहे, कीं, भय्यासाहे-

बांच्यानं जन्मांत कधीं त्यांची बरोबरी नाहीं होणार! आतां आईसंबंधानं पाह्यलं तर...तर...तर...तर तितकं कांहीं उत्तम नसेल. पण मला नाहीं वाटत, तिच्यामुळं भय्यासाहेबांनीं हें एवढं केलं असतं. छे छे, आमच्या माणसांनां थोडीशी कमी अक्कल असली तर भय्यासाहेबांनां सहज पत्करेल. पण आपल्या मित्रानें आपल्या तोलाच्या खानदानीच्या एकाद्या उच्च कुलांतल्या स्त्रीशीं लग्न करण्याचं सोडून, आमच्यासारख्या मध्यम प्रतीच्या कुळाशीं संबंध करण्याची इच्छा करावी, यानं त्यांच्या आढ्यतेवर केवढा भयंकर आघात झाला असेल!" अखेर पुष्कळ विचार करून तिनें आपल्या मनाशीं निष्कर्ष काढून ठेवला, कीं, या सगळ्या प्रकारांत मुख्य कारणें दोनः—पाहिलें हें, कीं, अत्यंत हलक्या प्रतीचा दुरभिमान, व दुसरें आपल्या बहिणीकरितां भाऊसाहेबांनां राखून ठेवण्याची आपस्वार्थी इच्छा!

इतका निष्कर्ष निघण्याला अर्धा पाऊण तास सहज लागला, व त्याला निघण्याला मदतहि अंतःकरणांतल्या आवेगाची व डोळ्यांतल्या अश्रूंची बरीच पडली. त्यामुळें डोकें भणभणून जाऊन दुखायला सुद्धां लागलें. सर्व मंडळीला सायंकाळीं चहाला नजरबागेंत आमंत्रण आलेलें होतें. भय्यासाहेब तर आतां दृष्टीसमोर नकोसे झाले. तें सर्व चुकविण्याला डोकें दुखण्याचा उपयोग करावा असा निश्चय झाला. मालतीनेंहि खरेंच डोकें तापलेलें आहे असें पाहतांच आग्रह सोडून दिला, व होतांहोईतोंवर नीलकंठरावांनींहि गळ घालूं नये अशी खटपट केली. पण माईसाहेबांच्या आमंत्रणाचा असा अपमान केला असतां त्यांची खास गैरमर्जी होईल, ही कल्पना नीलकंठरावांनीं कशी विसरून जावी?

---

## प्रकरण चौतिसावें.

### अत्यंत अनपेक्षित प्रकार !

सर्व मंडळी नजरबागेकडे निघून गेल्यावर ताराबाई एकटीच दिवाणखान्यांत राहिली. सकाळीं ऐकलेली हकीगत अजून तिच्या डोक्यांत घोळतच होती. भय्यासाहेबांच्या वर्तनाविषयींचा तिरस्कार होईल तेवढा जास्त वाढावा म्हणूनच जणूंकाय, सुवर्णपुरीं आल्यापासून शांताक्काचीं जेवढीं पत्रें आलीं होतीं तीं सारीं काढून, निवांतपणें ताराबाई तीं पुंनः वाचीत होती. एकाहि पत्रांत शांताक्कानें कोठेंहि प्रत्यक्ष तकरार लिहिलेली नव्हती, किंवा होऊन

गेलेल्या गोष्टींचा पुनः उच्चार केलेला नव्हता, अथवा आज आपणाला दुःख होत असल्याचें अवाक्षर कोठेंहि नव्हतें. परंतु त्या साऱ्या पत्रांत, किंबहुना प्रत्येक ओळींत, तिच्या लिहिण्यांत सदा दिसून येणाऱ्या आनंदीपणाचा मागमूसहि नव्हता. अंतःकरण नेहमीं शांत व उदार अशा विचारांनीं भरलेलें असल्यामुळें, व स्वतःची समाधानवृत्ति व इतरांचें कल्याण इच्छिण्याची वासना त्यांत नेहमीं ओतप्रोत असल्यामुळें, तिचें मन नेहमीं अत्यंत प्रसन्न असे, व त्याचें सुंदर प्रतिबिंब सदोदित शांताक्काच्या बोलण्यांत अथवा पत्रांतून स्पष्टपणें दृष्टीस पडायचें. तसें या हल्लींच्यापैकीं एकाहि पत्रांत दिसत नसून, उद्विग्नतेची अथवा विषण्णपणाची छटा प्रत्येक ओळींत ताराबाईला दिसली. जों जों पत्र लक्ष लावून वाचावें, तों तों प्रथम वाचनाच्या वेळीं लक्षांत न आलेले, अंधुक, अस्पष्ट, असे अस्वस्थतादर्शक उद्गार जागोजाग आढळूं लागले. "अरेरे, अत्यंत शुद्ध, अत्यंत प्रेमळ, अत्यंत सज्जन, अशा त्या नैसर्गिक कोमल अंतःकरणावर केवळ अहंपणानें व आपस्वार्थानें इतका क्रूर आघात करण्यास प्रवृत्त व्हावें, व तें घोरकर्म उरकून टाकल्यानंतर, त्याबद्दल स्नेह्यांजवळ प्रौढी सांगून धन्यता मानावी, यापेक्षां आणखी अधमपणा तो कोणचा? त्या कोमल हृदयाचे कसे तुकडे तुकडे पडले असतील, व जगापासून आपली स्थिति लपवून ठेवण्याचा दीर्घ प्रयत्न करावा लागत असल्यामुळें, त्या बिचारीला कोण यमयातना मनांतल्या मनांत भोगाव्या लागत असतील! आणि हें सारें घडवून आणणारा नरपशु खुशालचेंडूसारखा उजळ माथ्यानें चारचौघांत फिरत असावा ना! आणि तो भेटला असतां माझ्यासारखीनेंहि त्याच्याशीं औपचारिक वर्तन करीत असावें ना! बरी परवांच्याच दिवशीं ही ब्याद येथून एकदांची काळें करते आहे! म्हणजे माझ्या डोळ्यांपुढचा शूळ तरी नाहींसा होईल! मीहि दहाबारा दिवसांतच शांताक्काकडे जाईन व माझ्या हातून होईल ती खटपट करून शांताक्काशीं चार गोष्टी बोलून, त्यांच्या मनांतली उदासीनता घालविण्याचा प्रयत्न करीन."

भय्यासाहेबांबरोबर बाळासाहेबहि जायचे, हा विचार तिच्या मनांत आलाच; परंतु त्यांच्याविषयीं जास्त मनांत येणें कालच्या संभाषणापासून अशक्य झालें होतें. अर्थात् त्यांच्या जाण्यामुळें फक्त एक प्रेमळ गृहस्थ गेला यापेक्षां जास्त कांहीं मनाला लागून घेण्याचें कारण राहिलें नव्हतें.

असे विचार मनांत चालले आहेत, तों कोणी भेटायला आल्याची बाहेरच्या दारावरील घंटा वाजली. मनांत थोडीशी त्यामुळें चलबिचल सुरू झाली, कीं, कदाचित् बहुतकरून हे बाळासाहेब आपली प्रकृति बरोबर नसल्याचें समजून समाचाराला आले असावे. या कल्पनेनें थोडेंसें स्मित चेहऱ्यावर झळकूं लागलें. इतक्यांत दरवाजा उघडला आणि, कोण ही पीडा, भय्यासाहेब आंत येऊन उभे राहिले ! तिच्या चेहऱ्यावरील स्मित ताबडतोब मावळून मन अत्यंत खट्टू झालें. कपाळावर किंचित् आंठ्याहि पडूं लागल्या. हा प्रकार भय्यासाहेबांच्या मुळींच लक्षांत येण्यासारखा नव्हता. त्यांच्याहि मनाची चलबिचलच उडालेली दिसत होती. गडबडलेल्या स्वरानें त्यांनीं "कपाळ उतरलें का नाहीं अजून ?" म्हणून प्रश्न केला, व पुढें म्हणाले "जरा आपली तब्बेत नादुरुस्त असल्याचें समजल्यावरून म्हटलें, स्वतःच जाऊन पहावें; कशी काय आतां तरी जरा बरी आहे कीं नाहीं ?"

ताराबाईनें केवळ थंडपणानें "हो आतां जरा उतरलं आहे," असें उत्तर दिलें. भय्यासाहेब लगेच एका खुर्चीवर टेंकले, दोनतीन मिनिटें गप राहिले. पुनः उठले, व दिवाणखान्यांत गडबडीनें येरझारा घालूं लागले ! हा आज काय नवीन मासला आहे तो ताराबाईला मुळींच कळेना. पण तीहि अक्षर बोलेना. अशा स्थितींत चारपांच मिनिटें आणखी गेल्यावर ते झटकन् मनाची चलबिचल उघड दिसत असतां ताराबाईच्या पुढें येऊन उभे राहिले, व एकदम बोलण्यास त्यांनीं आरंभ केला. ते म्हणाले "व्यर्थ आहे माझी सारी धडपड ! अशानें तें कांहीं भागत नाहीं. या मनाचा ओढा माझ्यानें आवरवतच नाहीं. मला एकदांचें तुमच्यापाशीं स्पष्ट सांगून टाकूंद्या, कीं, किती निःसीमपणानें आपणावर मी लुब्ध झालों आहें !"

ताराबाई चकितच झाली ! इतकी कीं, तिच्या तोंडून शब्दहि निघेना. तिचे डोळे सताड उघडले, चर्या फिरली, आपण ऐकतों तें खरें का, असा तिला संशय पडला, व ती स्तब्ध राहिली. तिची स्तब्धता त्यांनां रगडशी उत्तेजनपर भासली, व एकदम आजपर्यंत, कितीक महिने त्यांच्या हृदयांत तिच्याविषयीं जें अपरंपार प्रेम सांठून राहिलें होतें त्याला वाचा फुटली. त्यांची भाषाशैली छानदार होती, पण अंतःकरणांतल्या विकारांबरोबर, कांहीं निराळ्या मनोवृत्तींविषयींहि त्यांनीं आपल्या भाषणांत उद्गार काढले. प्रेमाच्या मधुर गोष्टींप्रमाणें, स्वाभिमानाविषयींहि बोलतांना त्यांनां तितकेंच स्फुरण चढलें.

"आपली स्थिति मजपेक्षां कितीतरी कमी आहे, आपल्या कुळाशीं संबंध करणें माझ्यासारख्याला एकप्रकारें हलकेपणाच आहे, माझ्या घराण्याच्या दृष्टीनें पाहिलें असतां, माझी बुद्धी मला हा विचार सोडून द्यायला सांगते, पण अंतःकरणाचा ओढा त्या बुद्धिवादाला पार दूर वाहवून नेतो," वगैरे बाबतींवर त्यांनीं इतका जोर दिला, कीं, आजच्या मागणीमुळें ते आपलें स्वतःचें किती नुकसान करून घेण्यास तयार झाले होते, हें जरी स्पष्ट दिसत होतें, तरी ती मागणी स्वीकारली जाण्याच्या मार्गांत त्यामुळें मोठ्याच अडचणी उत्पन्न होत होत्या.

भय्यासाहेबांविषयींचा तिरस्कार ताराबाईच्या अंगांत जरी खोल मुळें धरून राहिला होता, तरी त्यांच्यासारख्या गृहस्थाच्या अंतःकरणांत इतकें प्रेम आपणाविषयीं उद्भवावें, हें आपणास किती भूषणास्पद आहे, तें तिच्या लक्षांत आल्यावांचून राहिलें नाहीं. आणि जरी त्यामुळें तिचा विचार क्षणभरहि डळमळीत झाला नाहीं, तरी यांनां आतां आपण दुखवणार हें पाहून तिला प्रथम थोडेंसें वाईटहि वाटलें. पण ते जों जों पुढें बोलत चालले, तों तों त्यांच्या भाषणाचा राग येत जाऊन, त्यांची कींव पार नाहींशी झाली. तरी पण त्यांचें भाषण जेव्हां संपेल, तेव्हां आपणास त्यांनां उत्तर शांतपणानें देतां यावें, म्हणून तिनें मन आवरून धरण्याचा प्रयत्न केला. अखेरीला त्यांनीं तिला असें म्हटलें, कीं, "ज्या प्रेमाविरुद्ध इतके भगीरथ प्रयत्न करूनहि माझ्या बुद्धिवादाचें कांहीं चाललें नाहीं, तें प्रेम किती अपरंपार व निःसीम असलें पाहिजे याची तुह्मी सहज कल्पना करूं शकाल; व अशा अलोट प्रेमाचें चीज आपण माझा स्वीकार करून अवश्य कराल, अशी मला आशा आहे." पण हें बोलतांना आपला स्वीकार होईल कीं नाहीं, ही शंका त्यांच्या मुखावर तिळमात्रहि दिसत नव्हती. तशी शंका व भीति ते उद्गारून दाखवीत होते खरे, पण त्यांची पक्की खात्री असल्याची साक्ष, मुद्रेवरून सहज पटत होती. अशा प्रकारामुळें तिला जास्तच चीड आली. त्यांचें बोलणें संपल्याबरोबर ओठ स्फुरण पावून व आवेशानें गाल लाल होऊन, ताराबाई म्हणाली "मी असं ऐकतें, कीं, आजच्यासारख्या प्रसंगीं प्रथमतः आभार मानण्याचा परिपाठ असतो, आणि नंतर काय असेल तें बरं बुरं उत्तर देतात. अशा वेळीं कृतज्ञता वाटणं साहजिक आहे. पण मला जरा कृतज्ञता वाटली असती, तरी मींहि आपले आभार मानले असते; परंतु मला आज तसें करतां

येत नाहीं ! माझ्याविषयीं आपला अनुकूल ग्रह व्हावा, अशी मीं कधींच इच्छा केली नाहीं, व आपणहि मोठ्या नाइलाजानं तो होऊं दिला आहे. कोणालाहि दुखावणं मला बरं वाटत नाहीं, पण हें आज केवळ नाइलाजानं मजकडून होत आहे, अन् म्हणून आपणहि तें लवकर विसरून जावं हें चांगलं. ज्या मनोविकारांमुळें आजपर्यंत आपल्या प्रेमाला वाचा फुटावयाची एवढी आडकाठी झाली, असं आपण आतां सांगितलंत, तेच मनोविकार, आतां माझं मन आपल्याला स्पष्ट कळल्यानंतर, तें प्रेम विसरवायला तुम्हाला सहज फारच उपयोगी पडल्यावांचून राहणार नाहींत."

भय्यासाहेब टेबलाशीं पाठ करून ताराबाईच्या तोंडाकडे टक लावून उभे होते. त्यांच्या कानीं हें भाषण पडतांच तेहि चकित झाले, व त्यांनां खूप रागहि आलासा दिसला. ते संतापानें अगदीं लाल होऊन गेले. त्यांचा राग नखशिखान्त गोचर होऊं लागला. आपलें मन ते मोठ्या कष्टानें आवरून शांत करण्याचा प्रयत्न करीत होते, व पूर्णपणें तें ताब्यांत आल्यावांचून तोंड न उघडण्याचा त्यांनीं विचार केला होता, असें दिसूं लागलें. दरम्यानचा काळ ताराबाईला फार भयंकर वाटूं लागला. अखेर जुलमानें आपला स्वर मृदु करून ते म्हणाले, " अन् हाच का सारा जबाब आपण मला देऊन आमची बोळवण करणार ? शिष्टाचाराप्रमाणें थोडेंसेंहि वर्तन करण्याचा प्रयत्न न करतां, आपण मला इतकें कां झिडकारून टाकतां आहां तें कळवाल तर मला हवें आहे. पण त्यांत तरी काय मोठेंसें आहे महत्त्व ?"

ताराबाई स्थिरस्वरानें म्हणाली " मलाहि पण तसंच हें कळेल तर हवं आहे, कीं, मला चिडवायचा अन् अपमान करायचा एवढा उघड बेत करून, आपण कां माझ्या प्रत्यक्ष तोंडावर येऊन सांगितलंत, कीं, आपलं जें मन माझ्यावर बसलं तें आपल्या मर्जीविरुद्ध, आपल्या बुद्धीविरुद्ध अन् आपल्या स्वभावाच्याहिविरुद्ध बसलं आहे म्हणून ? हें आपलं बोलणं मला शिष्टाचाराला फांटा द्यायला लावायला पुरेसं नाहीं कां होत, जरी कदाचित् मीं तसा फांटा दिला असला तरी ? पण तेवढ्यानंच काय झालं आहे ! मला दुसरींहि कितीक कारणं आहेत, अन् तीं आपल्याला ठाऊकहि आहेत ! माझ्या अंतःकरणानंच जर तुम्हाला नाकारलं नसतं, किंबहुना तें जरी तटस्थ व उदासीन असतं, इतकंच काय, त्याचा ओढाहि जरी आपल्याकडे असता, तरी सुद्धां, आपल्याला हें शक्य वाटतं का, कीं, ज्या माणसानं माझ्या अत्यंत

प्रिय अशा बहिणीच्या सुखांत कदाचित् कायमची माती कालवली आहेन्, त्या माणसाला मी स्वीकारायला कधीं तरी कबूल होईन ? ”

हे शब्द तारेच्या तोंडून बाहेर येतांच भय्यासाहेब खजील झाल्यासारखे दिसले. पण तो विकार फारच थोडा वेळ टिकला. तारा पुढें बोलूं लागली तेव्हां त्यांनीं तिला अडवण्याचा प्रयत्न केला नाहीं.

ताराबाई आवेशानें पुढें म्हणाली “ तुमच्याविषयीं वाईट ग्रह होण्याचीं मला किती तरी कारणं आहेत. त्या बाबतींमधें तुम्हीं जें अन्यायाचं व अनुदारपणाचं वर्तन केलंत त्याची संपादणी करायला तुमचा कांहींच सद्धेतु असणार नाहीं. तुमची छाती आहे का ?— असणं शक्यच नाहीं मुळीं— हें कृत्य नाकबूल जायची ? कीं, त्या दोघांची ताटातूट करायला तुम्हींच आपली पुण्याई खर्चीं घातलीत ?—कीं, ज्याच्या योगानं सारं जग त्यांच्यापैकीं एका माणसाला चंचल व अस्थिर म्हणून नांवं ठेवतं आहे, अन् दुसऱ्याला ‘ ही चकली रे ’ म्हणून चेष्टेनं हंसतं आहे, अन् दोघांनांहि विंचवानं नांगी मारल्यासारख्या मानसिक वेदना सोसाव्या लागत आहेत ? ”

इतकें बोलून ती थांबली. पण भय्यासाहेबांच्या मुद्रेवर पश्चात्तापाचें यत्किंचित्हि लक्षण न दिसतां, ते स्वस्थपणें तिचें भाषण ऐकून घेत होते. जणूं काय तिच्या बोलण्यावर त्यांचा विश्वास बसत नाहीं, असें दर्शविणारें किंचित् हास्य त्यांच्या चेहऱ्यावर दिसत होतें. असे ते आपणाकडे स्वस्थ पहात आहेत हें पाहून तारेचा राग दुणावला, व तिनें त्यांनां पुनः विचारलें “ हें तुम्हीं नाहीं केलं असं का म्हणतां ? ”

मुद्दाम शांतता आणून त्यांनीं उत्तर दिलें “ मी कुठें नाहीं म्हणतों आहें ? मला नाहीं म्हणायची इच्छाच नाहीं. माझ्या मित्राला तुमच्या बहिणीपासून दूर करायला माझ्या हातांत होते तेवढे उपाय मीं योजले. इतकेंच काय, ते उपाय सफळ झाले यांत मला फार आनंद वाटतो आहे. माझ्या स्वतःच्या हितापेक्षां त्यांच्या हिताला मी जास्त जपलों आहें. ”

त्या अखेरच्या वाक्यांतला गर्भितार्थ ताराबाईच्या लक्षांत येऊन चुकला; पण या वेळीं तिला तो आवडण्यासारखा मुळींच नव्हता; म्हणून तिकड दुर्लक्ष केल्यासारखें दाखवून ती पुढें म्हणाली “ पण माझ्या मनांतल्या अप्रीतीला हें एकटं थोडंच कारण आहे ! हें कारण घडून येण्याच्या किती तरी पूर्वींच, आपल्याविषयींचा माझा ग्रह ठाम होऊन गेला होता. नागेश-

रावांनीं चार महिन्यांपूर्वीं आपली सारी हकीगत मला सांगितली, तेव्हांच आपला स्वभाव मीं पुरा जाणला. त्यांच्याविषयीं काय आपण सांगतां, बोला! कोणत्या स्नेह्याच्या काल्पनिक हिताची सबब उभी करून तुम्ही आपली संपादणी करणार? इथें कोणच्या थापा मारून जगाला चकवणार, बोला पाहूं!"

भय्यासाहेब जास्त गरम होऊन, पण मुद्दाम शांत स्वर काढून, म्हणाले "त्या गृहस्थाच्या गोष्टींनीं आपलें मन कळवळतें अं?"

ताराबाई म्हणाली "ज्याला म्हणून त्यांची विपत्ति माहीत आहे, त्याला कळवळा वाटल्यावांचून राहील का?"

तिरस्कारपूर्वक भय्यासाहेब म्हणाले "त्याची विपत्ति? वा, खरेंच! काय हो बिचाऱ्याच्या हालअपेष्टा चालल्या आहेत!"

"अन् त्या तुम्हीं आणल्यात त्यांच्यावर!" ताराबाई जोरानें म्हणाली. "तुम्हींच त्याला हल्लींच्या निष्कांचन स्थितीला आंणून पोंचवलंत. जें इनामी उत्पन्न त्यांच्या नांवचं म्हणून होतं तें तुम्हीं बुडवलंत! त्यांच्या सध्यांच्या ऐन उमेदींत ते कसे स्वतंत्रपणें चैनींत राहिले असते, तें तुम्हीं त्यांच्यापासून हिरावून घेतलंत. हें सारं आपण करूनच्या करून, त्यांच्या हालअपेष्टांचं नांव काढून हंसतां काय?"

मनाची अत्यंत चलबिचल होऊन भय्यासाहेब दिवाणखान्यांत भराभर येरझारा घालूं लागले, व नंतर म्हणाले "असा का आपला मजविषयींचा अभिप्राय आहे? असें मी घोर कर्म करणारा माणूस आहें असें तुम्हाला वाटतें आहे तर! फार उपकार केलेत तुम्हीं, इतकें स्पष्टपणानें हें मला सांगितलेंत! या हिशेबानें पाहिलें, म्हणजे माझे अपराध घोर आहेत खरेच!"

तितक्यांत येरझारा थांबवून ते तिच्यासमोर एकदम उभे राहून म्हणाले "पण कदाचित् हे सारे माझे अपराध तुम्हीं पोटांत घातले असतेत, नाहीं बरें?—जर मीं माझें मन खुलें करून, आजपर्यंत प्रेमाची गोष्ट आपणाजवळ कां काढली नाहीं तीं सगळीं कारणें, जर उघड नसतीं बोलून दाखविलीं, तर हें सारें तुम्ही विसरलां असतां! मीं जर जास्ती धूर्तपणा करून, माझ्या मनांतली सगळी स्थिति उघडी करून दाखवली नसती, माझें मन कुठें कसें कचरत होतें तें जर तुम्हाला सांगितलें नसतें, तें जर मीं सारें लपवून ठेवलें असतें, अन् तुम्हांला असें भासवलें असतें, का, माझ्या बुद्धीनें, अंतःकरणानें, स्वभावानें, सर्व बाजूनें, बिलकुल कोणताहि किंतु मनांत न येतां

मी आपणावर मोहित झालों आहें, तर हे आतांचे सर्व आरोप माझ्या डोक्यावर लादले नसतेत, नाहीं ? पण, कोणच्याहि तऱ्हेचें लप्पंछप्पं माझ्या डोक्यांत तिडीकच आणतें ! मला कोणचीहि गोष्ट चोरून ठेवावयाचा भारी तिट्कारा आहे ! पण इथें लपवालपवीची आधीं जरूर काय ? मीं ज्या माझ्या मनांतल्या गोष्टी सांगितल्या, त्यांची मला बिलकुल शरम वाटत नाहीं आहे. त्या गोष्टी माझ्या मनांत उभ्या राहणें, अगदीं साहजिकच होतें. आपलें कुळशीळ मजपेक्षां हलकें आहे, त्याबद्दल मला हर्ष व्हावा, असें का आपलें म्हणणें आहे ? का नवीन संबंध जोडायचा तीं माणसें, आमच्या इभ्रतीच्या किती तरी खालीं आहेत, म्हणून मला धन्यता वाटावी असें का आपलें मन आपल्याला सांगतें ? ”

क्षणोक्षणीं ताराबाईचा राग अनावर होत चालला. तरी पण तो मोठ्या कष्टानें आवरण्याचा प्रयत्न करून ती म्हणाली “आपण फार चूक करतांहां भय्यासाहेब! आपण जर असं समजत असाल, कीं, आपल्या मागणी घालण्याच्या वेळच्या भाषणानं माझ्या जबाबांत मोठासा फेर झाला असं! माझं उत्तर ठरलेलंच होतं प्रथमपासून! फरक इतकाच झाला, कीं, जर आपण एकाद्या सभ्य माणसासारखं वर्तन ठेवलं असतंत, तर आपल्याला नाहीं म्हणून दुखवायला मला थोडंसं जें कठीण वाटलं असतं, तें आपल्या या असल्या वर्तनानं वाटण्याचं कारण राहिलं नाहीं, इतकंच काय तें ! ”

हें वाक्य ऐकून भय्यासाहेब दचकलेसे दिसले; पण ते कांहीं बोलले नाहींत. ताराबाईच पुढें म्हणाली “ आपण वाटेल त्या रीतीनं जरी माझ्याजवळ मागणी घातली असतीत, तरी मला ती स्वीकारायचा क्षणभरहि मोह पडला नसता ! ”

आतां तर त्यांनां विलक्षणच नवल वाटलें. त्यांच्या चर्येवर मानखंडणा व अविश्वास अतोनात उत्पन्न झाला, तरी ते नुस्ते तिच्याकडे बघत उभे होते. तेव्हां ती आणखी म्हणाली “ आपली ओळख झाल्यापासून—अगदीं पहिल्या घटकेपासून म्हणांना—आपण अत्यंत गर्विष्ठ, डौली, ताठ्याचे आहांत असं मला स्पष्ट दिसून आलं, व तेव्हांपासून माझ्या मनांत आपल्याविषयीं अप्रीति सुरू झाली. दुसऱ्याच्या मनाला काय वाटेल याची आपल्याला पुरी बेपर्वा, बिलकुल दिक्कत नाहीं, असं पाहून जो अप्रीतीचा पाया माझ्या मनांत सुरू झाला, त्या पायावर पुढं पुढं घडून आलेल्या अनेक गोष्टींनीं

तर, एक अप्रीतीची टोलेजंग इमारतच उभारून राहिली. एका महिन्याच्या अवधींत माझं मन आपल्याविषयीं इतकं विटून गेलं, कीं, मला असं वाटूं लागलं, कीं, जन्मभर अविवाहित राहायचा प्रसंग आला तरी बेहेत्तर. पण आपल्यासारख्यांशीं मी कध्धीं कध्धीं लग्न लावायला कबूल व्हायची नाहीं!"

"रगड, रगड बोललांत बाईसाहेब! आपलें मन अगदीं पुरें पुरें समजून आलें आम्हाला! इतकेंच मी म्हणायचें राह्यलें आहे, कीं, माझ्याच अंतःकरणांत हें वेड कुठून शिरलें, त्याची मला आतां शरम वाटूं लागली आहे! क्षमा करा, मीं आपला फार वेळ उगीच घेतला. शेवटीं इतकेंच म्हणतों, कीं, देव तुमचें कल्याण करो!"

इतके शब्द उच्चारून भय्यासाहेब झटकन् दिवाणखान्याच्या बाहेर पडले, व लगेच घराबाहेरहि निघून गेले. तें ताराबाईनें पाहिलें. आतां तिच्या मनांत जें भयंकर काहूर उठून राहिलें होतें, तें विलक्षणच! काय करावें तें सुचेना. एकाद्या मगरमिठींतून मोकळें झाल्याप्रमाणें होऊन, ती प्रथम अर्धी घटका पोटभर [illegible] राहिली. जों जों घडलेला प्रकार आठवावा, तों तों तिला विलक्षण नवल वाटूं लागलें. भय्यासाहेबांसारख्यानें आपणाला मागणी घालावी, इतके महिने त्यांचें प्रेम एकसारखें वाढत असावें, व ज्या कारणांकरितां त्यांनीं भाऊसाहेबांची शांताक्कापासून ताडातोड केली, तीं कारणें आपणाला किती-तरी पटीनें जास्त लागू पडत असतां, तीं सर्व बाजूला सारून त्यांनीं आपल्याशीं लग्न करण्यास तयार व्हावें—हें सारें खरें तरी कसें समजावें? खरें असेल, तर किती आपली धन्य आहे, कीं, आपण यत्किंचित्‌हि यत्न न करतां आपणाविषयीं इतकी प्रीति त्यांच्यासारख्यांच्या अंतःकरणांत उपजली? पण त्यांचा अभिमान, ताठा, भयंकर अहंकार, निर्लज्जपणानें शांताक्काची ताटातूट केल्याचें कबूल करणें, नागेशरावांबद्दलचेंहि सारें बेश्रमपणानें ऐकून घेणें,— आणि तसें वागण्याचें कांहीं एक समर्पक कारण दाखविण्याचा यत्नहि न करणें— या सर्व गोष्टी डोळ्यांपुढें आल्याबरोबर, त्यांजबद्दल उत्पन्न झालेला थोडासा कळवळा कुणीकडच्या कुणीकडे पळून गेला!

अशा विचारांचें तुमुल युद्ध ताराबाईच्या डोक्यांत चाललें असतां माईसाहेबांची गाडी वाजलेली ऐकूं आली. आतां मंडळी आली म्हणजे त्यांच्याशीं नीटपणें बोलण्यासारखी आपली स्थिति नाहीं, असें वाटून मालती आंत यायच्यापूर्वींच ताराबाई आपल्या स्वतःच्या खोलींत निघून गेली.

## प्रकरण पस्तिसावें.

### भय्यासाहेबांचें पत्र.

रात्रीं झोंप लागतांना जे विचार ताराबाईच्या डोक्यांत होते तेच सकाळीं जागी झाल्यावरहि पुनः तेथें घोळूं लागले. जो विलक्षण प्रकार काल घडून आला होता त्याचा अचंबा अजूनहि कमी झाला नव्हता. दुसरी कोणचीहि गोष्ट डोक्यांत येईना. इतर कांहीं रोजचा उद्योगधंदा हातून होणें केवळ अशक्य झालें. चहाला सर्व मंडळी जमली तरी तेव्हांहि तिच्या चर्येवर चमत्कारिक कळा दिसत होती. पण ती काल संध्याकाळच्या डोकें दुखण्यावर तिला सहज संपादून नेतां आली. चहा झाल्यावर दुसरें कांहीं न करतां एकांत कसा मिळेल या हेतूनें तिनें बाहेर हिंडायला जाण्याचा बेत केला होता, त्याप्रमाणें ती लगेच घराबाहेर पडली.

रोजच्या वहिवाटीप्रमाणें तिचीं पावलें पहिल्यानें आंबराईकडे वळलीं. तेथें पोंचल्यावर तिच्या लक्षांत आलें, कीं, येथेंहि कदाचित् भय्यासाहेबांची स्वारी आपणाला कधीं मधीं भेटते तशी आजहि गांठ पडेल, ह्मणून ती टाळायला ती पलीकडच्या बाजूला एक लहानशी टेंकडी होती तिच्याकडे जाऊं लागली. दसरा होऊन आतां जवळ जवळ दहाबारा दिवस झाले होते. बाजरीचीं ताठ कणसें शेतांतून आनंदानें डुलत होतीं. बांधाच्या पोटांतल्या साळी तर फारच सुंदर दिसत होत्या. ती मौज पहातां पहातां कसेंहि दुःखमय मन असलें तरी क्षणभर हर्षभरित झाल्यावांचून राहणें अशक्य आहे. तिला थोडासा जास्त उल्हास येऊन तिनें टेंकडीच्या माथ्यापर्यंत सहज मजल केव्हां मारली, तें तिच्या लक्षांतहि आलें नाहीं. डोंगरावरचा शीतल वायु अंगाला लागतांक्षणींच श्रम नाहींसे होऊन ती चोहोंकडे पाहूं लागली. जिकडे नजर फेंकावी तिकडे चित्रविचित्र रंगांचा एक उत्कृष्ट गालीचाच वनदेवीनें हंतरून ठेविला आहे कीं काय, असा भास होई. जवळच्या एका मोठ्या वृक्षावर शेंकडों पोपट हिरव्याचार रंगानें मोहून टाकणारे असे एकसारखे चिव चिव शब्द करीत भुर्रकन् उडून येत, व पुनः भुर्रकन् नवीन दाणे चोंचींतून आणण्याकरितां उडून जात होते. गुराख्यांच्या पोरांच्या बांसरीचाहि मधुर ध्वनि मधून मधून ऐकूं येई. नानाप्रकारच्या फुलांचा नुसता दरवळ सुटून राहिला होता. दूर अंतरावर सप्तशृंगीचाहि डोंगर अंधक अंधक

दिसत होता. तिकडे नजर जातांच तेथल्या महाप्रतापी देवीच्या हकीगतीची आठवण होऊन ताराबाईचें अंतःकरण परमेश्वराच्या अतर्क्य लीलेच्या कौतुकानें व त्यावरून मनांत येणाऱ्या भक्तिरसानें ओथंबून गेलें. पाव घटका आनंद-साम्राज्यांत दंग होऊन राहिल्यावर भगवान् सूर्यनारायणाच्या सहस्ररश्मींचा चटका हळुहळू तीव्रपणें ध्यानांत येऊं लागला, तसतसें तिचें अंतःकरणहि भानावर येऊन ती डोंगर उतरूं लागली.

खालीं आल्यावर आंबराईत न शिरतां तिच्या कडेनेंच पाऊलवाट जवळची होती, त्या वाटेनें ती चालली असतां राईमध्यें कोणी माणूस फिरत असल्याचें तिनें पाहिलें; पण तें कोण आहे हें पाहण्याच्या नादांत ती, तें भय्यासाहेबांच्या असण्याच्या भयानें, पडली नाहीं. ती तशीच पुढें झटकत असतां मागून कोणींशी तिच्या नांवानें हांक मारल्याचें ऐकून ती थबकून मागें पाहूं लागली. तों खरोखरच भय्यासाहेब अगदीं जवळ आलेले तिच्या दृष्टीस पडले! त्यांच्या हातांत एक भलें जाड पाकीट होतें, तें झटकन् तिच्यापुढें करून ते कांपऱ्या आवाजानें म्हणाले "मी केव्हांचा आपण भेटाल या आशेनें इथें हिंडतों आहे. मेहेरबानी करून हें एवढें मीं काय लिहून आणलें आहे तें वाचाल, तर फार उपकार होतील. मीं दुसरें कांहींएक मागत नाहीं आहें."

बरी थोडक्यांतच गोष्ट आहे असें पाहून तिनें तें पाकिट त्यांच्या हातांतून घेतलें. भय्यासाहेबांनीं "ठीक आहे, मी जातों," असें ह्मणून ते मागच्या मागें निघून गेले, व दोनचार मिनिटांत झाडें मध्यें येऊन दिसेनासेहि झाले.

ताराबाईनें पाकिट हातीं घेतलें खरें, पण तें वाचून पहाण्याचीहि तिला प्रथम इच्छा होईना. "असेल कांहीं तरी पुनः पुनः तेंच तेंच बोलणं!" असें समजून तें न वाचतां एकदम फाडूनहि टाकावें, असें तिला एकवेळ वाटलें; पण पुनः तिला वाटलें, कीं, "काय एवढं भारूड लिहिलं आहे तें एकदां पाहूं तर खरें." म्हणून तिनें पाकिट फोडून पाहिलें, तों तीनचार कागद पाठपोट लिहिलेले बाहेर पडले, ते ती वाचूं लागली. तें पत्र येणेंप्रमाणें:—

"श्री.

नजरबाग, सुवर्णपुर, ता. १५ आक्टोबर १९६१.

"विनंति विशेष. काल संध्याकाळीं जो प्रकार झाला त्यापैकींच कांहीं भाग या पत्रांत असेल, अशी मुळींच भीति वाटूं देऊं नका! तसलें बोलणें मी

या पत्रानें पुनः करणार असेन असें मनांत क्षणभर सुद्धां आणूं नका. तुमच्याप्रमाणें मलाहि त्या बाबतीचा आतां अगदीं वीट आला आहे, व मीं तसलें कधीं बोलणें केलें होतें ही गोष्ट जितक्या लवकर आपण दोघेंहि विसरून जाऊं, तितकें उत्तम. हें पत्र लिहिण्याची सुद्धां वास्तविक आज जरुरी नसायला पाहिजे होती. मला तें लिहितांना व आपणाला तें वाचतांना जी तसदी पडणार आहे ती चुकती तर ठीक होतें; पण माझ्याविषयीं जो आपला भयंकर ग्रह होऊन बसला आहे तसा राहूं देणें, आणि तो चुकीचा असल्यास बदलण्याचा प्रयत्न न करणें, हें मला प्रशस्त वाटत नाहीं. या माझ्या प्रयत्नानें म्हणजे तो खात्रीनें बदलेल हें तरी काय सांगावें? पण केवळ मजकरितां म्हणून ही आपणास तसदी देत आहें. व निव्वळ एकतर्फी मजकूर ऐकून जो आपला ग्रह झाला आहे तो कायम करण्यापूर्वी, दुसऱ्या बाजूचें म्हणणें पुढें आलें असतां तें आपण न ऐकून दूर ढकलण्याचें तरी साहस खास करणार नाहीं, अशी माझी खात्री आहे.

"काल तुमच्या बोलण्यांत दोन मोठाले आरोप मजवर लादण्यांत आले. एक असा, कीं, भाऊसाहेबांचें व तुमच्या बहिणीचें परस्परांवर प्रेम आहे हें माहीत असून मीं क्रूरपणानें त्या दोघांमध्यें बिब्बा घालून त्यांनां एकमेकांपासून दूर केलें. दुसरा असा, कीं, नागेशरावांचे माझ्यावर नानाप्रकारानें हक्क असूनहि, त्या सर्वांनां निर्लज्जपणानें विसरून जाऊन मी त्यांच्या तोंडाला पानें पुसलीं. जो लहानापासून माझ्याबरोबर मोठा झाला, ज्याच्यावर माझ्या वडिलांचा अत्यंत लोभ होता, व ज्याला आमच्या आश्रयावांचून इतर कोठेंहि थारा नव्हता, व तो आश्रय भरपूर मिळण्याची ज्याला सहज रगड खात्री होती, अशा माणसाला, त्याचा कांहींएक दोष नसतां, नाहक, आणि केवळ आमच्या तब्बेतीला खूष करण्याकरितां, आम्हीं तोडून काढावें, व त्याचा रास्त तो हक्क याच्या तोंडून आयत्या वेळीं विनाकारण हिरावून घ्यावा, हा इतका घोर अपराध आहे, कीं, त्याच्या मानानें, केवळ दोनचार महिनेपर्यंतच ज्यांचा एकमेकांशीं परिचय झाला होता, अशा भाऊसाहेबांनां तुमच्या बहिणीपासून फसवून दूर काढण्यांत विशेष अपराध आहे, असें कोणीहि म्हणणार नाहीं. परंतु हा दुसरा, आपणाशीं जास्त प्रत्यक्ष संबंधाचा असल्यामुळें, तितक्याच घोरपणाचा वाटत असणें साहजिक आहे. या दोन्ही बाबतींत तुम्हीं मला काल सडकून दोष दिलात. म्हणून त्या दोन्हीहिबद्दल

माझी हकीगत तुम्हाला सांगणें अत्यंत जरूर आहे. मला अशी दृढ उमेद आहे, कीं, जर तुम्हीं हें पत्र लक्षपूर्वक वाचलें, तर बहुतेक सगळा दोष तुम्हीं विनाकारण मजला लावलात, असें तुम्हाला सहज दिसून येईल. माझी बाजू स्पष्ट करण्याकरितां मला कांहीं नाजुक गोष्टी कळवाव्या लागतील, त्या तुम्हाला रुचणार नाहींत ही माझी खात्री आहे; पण आतां त्याला माझा केवळ नाइलाज आहे. मी एवढेंच म्हणेन, कीं, त्या गोष्टीची वाच्यता करण्यांत मला आनंद होत नसून उलट फार वाईट वाटतें आहे. यापेक्षां जास्त काय म्हणूं?

"पहिल्यानें भाऊसाहेबांविषयीं. शिवदुर्गांत येऊन फार दिवस झाले नाहींत तों इतरांप्रमाणें मलाहि दिसूं लागलें, कीं, त्यांनां तुमच्या बहिणीचें इतर स्त्रियांपेक्षां जास्त कौतुक वाटतें. पण तें साहजिकपणें असेल असा माझा समज बराच वेळ होता. आनंदभुवनांतल्या पार्टीच्या दिवसापर्यंत मला त्याचें विशेष वाटलें नव्हतें. पण नबीखांचें गाणें तुम्हीआम्ही बागेंतून ऐकत असतां रावबहादुर जें काय म्हणाले, त्यानें प्रथम माझें लक्ष विशेषपणें तिकडे वेधलें. त्यांचा अभिप्राय असा होता, कीं, लवकरच एकमेकांचें जुळून येणार अशी बहुतेक सर्वांची समजूत झाली आहे, व तें कधीं घडून येतें याकडे सर्वांचे डोळे लागले आहेत. त्या घटकेपासून मी जास्त बारकाईनें सर्व प्रकार पाहूं लागलों. मीं पूर्वीं कधीं पाहिलें नव्हतें अशा प्रकारचें भाऊसाहेबांचें लक्ष शांताबाईकडे मला दिसून आलें. तिच्याहिकडे मी सूक्ष्मपणें पाहूं लागलों, तों जरी मला ती अत्यंत मनमिळाऊ व मोकळ्या स्वभावाची व चालीरीतीला अत्यंत मोहक अशी दिसली, तरी पण भाऊसाहेबांवर तिचें विशेष प्रेम असलेलें मला दिसेना. त्यांच्या भाषणापासून अथवा सहवासापासून तिला आनंद जरी होतो असें दिसे, तरी त्यांच्यावर तिचें तितकें प्रेम असावें अशी माझी कल्पना होईना. अत्यंत प्रेमानें अंतःकरण ओथंबलेलें असलें म्हणजे माणसाची जी विलक्षण सतेज चर्या दिसते, व त्याच्या प्रत्येक चलनवलनांत, दृष्टिक्षेपांत, व त्याच्या प्रत्येक भाषणांत जें अनिर्वचनीय तादात्म्य व मनोहारित्व दृष्टोत्पत्तीस येत असतें, त्या सर्वांचा शांताबाईमध्यें केवळ अभाव असून, तिच्या मुद्रेंत इतकें स्वास्थ्य व शांतता भरलेली दिसे, कीं, कितीहि मार्मिक परीक्षक आणला असता, तरी तिच्या अंतःकरणास प्रेमविव्हलता म्हणजे काय पदार्थ आहे, याचा गंधहि मुळींच नाहीं असाच त्याचाहि ग्रह झाला असता!

ह्या आमचा ग्रह चुकीचा असूं शकेल. तुम्हाला शांताबाईच्या स्वभावाची जास्त ओळख असल्यामुळें तुम्ही जर आह्मीं चुकलों ह्मणाल, तर तें वाजवी आहे असें मीहि म्हणेन. तुह्माला तिच्या हृदयांतलें प्रेम स्पष्ट दिसत होतें असें तुम्ही आतां मला सांगतां आहां; तर मीहि आतां ह्मणेन, कीं, आमचा ग्रह चुकीचा होता. इतकें मी प्रांजलपणें कबूल करीन, कीं, तिच्या अंतःकरणामध्यें भाऊसाहेबांविषयीं प्रेमोद्भव होऊं नये, अशी माझी उत्कट इच्छा होती, हें खास आहे; परंतु माझ्या इच्छा व आशा जशा असतील त्याप्रमाणें मी वस्तुस्थितीचें निरीक्षण करतों व त्यांनां अनुसरून मी निष्कर्ष काढतों, असें कोणीहि मजविषयीं खास म्हणणार नाहीं. सबब केवळ माझ्या इच्छेला मान देऊन मी तशी समजूत करून घेतली असें नसून, सर्व गोष्टींच्या सूक्ष्म निरीक्षणानेंच केवळ माझी तशी समजूत होऊन गेली हें निर्विवाद आहे. आतां प्रेमोद्भव न व्हावा अशी माझी कां इच्छा होती, हाहि मी थोडक्यांत खुलासा करून टाकतों. काल संध्याकाळीं मीं माझ्या स्वतःच्या मनाला मागें ओढणारीं जीं कारणें आपणास सांगितलीं, तीं सर्व—तितक्या जोरानें जरी कदाचित् नसतील, तरी—बहुतांशीं भाऊसाहेबांनांहि लागू होतींच. पण तुमच्या कुटुंबाच्या स्थितीपेक्षांहि जास्त आक्षेपार्ह, जास्त गर्हणीय असें दुसरें कांहीं होतें. तुमच्या कुटुंबांतल्या बहुतेक सर्व मंडळींनीं—तुमच्या मातुश्री, धाकट्या तिघी बहिणी व—मला माफ करा—तुमच्या वडलांनींहि कधीं कधीं—इतका बेवकूबपणा व अचरटपणा आपल्या वर्तनांत व भाषणांत नेहमीं दाखवावा, कीं, या मंडळींच्या डोक्यांतच कांहीं तरी वैगुण्य आहे असा पुष्कळांचा समज होऊन गेला होता, व तो दृढ होण्याला तुमचे नवे आलेले आप्त नीलकंठराव यांनींहि यथाशक्ति हातभार लावला! येथें हेंहि अत्यंत आनंदानें मी सांगून टाकतों, कीं, या वैगुण्याचा अंशहि शांताबाई व आपणा स्वतःमध्यें दृग्गोचर होत नसे, अशी सर्वांची खात्री होती. इतकेंच नाहीं, तर आपल्या दोघींसारख्या बुद्धिमान् व समजुतदार मुली विरळा, असाच आह्मां सर्वांचा ग्रह झाला होता. व त्याचप्रमाणें तुह्मां दोघींचेहि स्वभाव फार मनमिळाऊ व श्लाघ्य आहेत, यांतहि संशय नव्हता. पण नवीन जोडण्यांत येणारा गोतावळा असा आचरट असावा, कीं, कोण केव्हां काय बोलेल व आपणाला चारचौघांत ओशाळें करील, या सदैव काळजींत माणसानें असावें हें ठीक नाहीं, हें कोणीहि कबूल करील. आणि मुख्य माणसांच्या मनांत खरीखुरी प्रेमासक्ति उत्पन्न

झालेली नाहीं अशी खात्री वाटत असतांना, हीं नसतीं घोंगडीं गळ्यांत भाऊसाहेबांनीं अडकवून घ्यावीं हें मला रास्त दिसलें नाहीं.

" हा माझा ग्रह त्यांच्या दोघी बहिणींच्याहि ग्रहाशीं तंतोतंत जुळला, म्हणून या गोष्टीपासून भाऊसाहेबांनां सोडविण्याला उपाय योजून ते आयतेच पुण्याला गेले होते त्यांच्या मागोमाग आम्हींहि साऱ्यांनीं जाण्याचा बेत केला. प्रथम त्यांचा एकदोन दिवसांतच तिकडे परत येण्याचा हेतु होता, पण तेथें गेल्यावर हळुहळू आम्हीं तो विचार फिरवला. आमच्या दृष्टीनें शांताबाईविषयीं ज्या हरकती होत्या त्या हळुहळू त्यांच्या नजरेस आणल्या. हें मी प्रांजलपणें कबूल करतों, कीं, एक शांताबाईचें अंतःकरण प्रेमशून्य आहे अशा आमच्या म्हणण्याखेरीज इतर हरकतींनां त्यांनीं जुमानलें नसतें. त्यांचा स्वतःचा ग्रह आमच्या अगदीं उलट असा होता, कीं, त्यांच्या स्वतःप्रमाणें तिच्याहि हृदयांत प्रेमपूर्णता आहे. पण स्वतःच्या अनुमानापेक्षां आम्हां लिवर्गांच्या मतावर त्यांचा जास्त विश्वास बसणें त्यांच्या नेहमींच्या स्वभावाला अनुरूपच होतें. त्यामुळें आमचा ग्रह खरा, असा त्यांचा लवकरच ग्रह झाला. एकदां तो ग्रह बनल्यावर परत शिवदुर्गाला जाऊं नये हें ओघालाच आलें. येथपर्यंत मला स्वतःला बिलकुल दोष येत नाहीं, असें मला अजूनहि वाटतें. त्यानंतरची एक लहानशी गोष्ट आहे, त्यांत माझें वर्तन तितकें निर्दोष झालेंसें मलाच वाटत नाहीं. शांताबाई आज दोन अडीच महिने पुण्यांत आहे ही गोष्ट कमलिनीकडून मला कळली असून मीं ती भाऊसाहेबांनां कळवली नाहीं, एवढेंच माझें मन मला खातें आहे. अजूनहि तें त्यांनां कळलें असेलसें वाटत नाहीं. त्यांची भेट झाली असती तर कांहीं विशेष झालें असतें, असें नाहीं. पण त्यांच्या एकंदर वर्तनावरून तिच्यावरचें प्रेम त्यांच्या अंतःकरणांतून साफ उडून गेलें नसावें, असें मानण्यास कधीं कधीं कारण होई. म्हणून त्याचा उगाच पुनरुद्धार न झालेला बरा, हाहि विचार माझ्या मनांत अस्पष्ट तरी असावा. उलटपक्षीं ती बातमी त्यांनां देण्याचें माझें कांहीं कर्तव्यकर्म नव्हे, त्यांनां मुद्दाम खोटें कांहीं आपण बोललों नाहीं म्हणजे आपण सुटलों, असाहि बुद्धिवाद माझ्या मनांत असावा. आणि सांगण्याचा कधीं प्रसंगहि उत्पन्न झाला नाहीं. पण एवंच काय, कीं, मीं ती आल्याचें माहीत असून त्यांनां कळवलें नाहीं. हें मला तितकें समाधानकारक वाटत नाहीं. हा लपंडाव

मला शोभत नाहीं असेंहि कदाचित् म्हणतां येईल. मीं सद्भावानें सदिच्छेनें व सद्धेतूनें तें केलें एवढेंच मी उत्तर देईन. यापेक्षां जास्त मी कोणचाहि लपंडाव केला नाहीं. मजकडून तुमच्या बहिणीचा फार अन्याय झाला असेल तर माझ्या हेतूकडे लक्ष देऊन, व तो अजाणपणानें, मला खरी वस्तुस्थिति न समजल्यानें झाला आहे, हें लक्षांत आणून कोणीहि तो क्षम्य ठरवील. आपणाला हें समर्थन लंगडें, कोतें, अपुरें आहेसें वाटेल, पण मला तें दोषार्ह तरी अजून दिसूं लागलें नाहीं.

"आतां नागोपंतांकडे वळूं. यासंबंधानें जो मजवर जास्त भयंकर आरोप आहे त्याचें पूर्णपणें खंडण करणें जास्त सोपें आहे. कारण, केवळ झाली तशी हकीगत आपणाला कळवली म्हणजे पुरे होईल, अशी मला फार खात्री वाटते. त्यांनीं मजवर काय काय आळ आणले आहेत ते मला अजून नक्की समजले नाहींत. पण मी जी हकीकत आज लिहिणार आहें, तिच्या खरेपणाविषयीं निःसंशयपणें विश्वसनीय असे गृहस्थहि आपली खात्री करण्याला मी आणूं शकेन.—नागोपंतांचा बाप फार सज्जन व उद्योगी माणूस होता. आमच्या वडिलांनां दिलबहार महाल व इतर तत्संबंधीं इष्टेट सुव्यवस्थित करण्यांत त्यांनीं अत्यंत इमानानें फार मदत केली, म्हणून त्यांच्या मुलाला नांवालौकिकास चढवावा असा आमच्या वडिलांचा फार मनोदय होता. त्याला लहानपणीं मजबरोबर तितक्याच खर्चानें हायस्कुलांत व कॉलेजांतहि घातलें होतें. त्याची आई दुर्दैवानें उधळ्या स्वभावाची असे व तिच्यापुढें नवऱ्याचें चालत नसे, म्हणून नागोपंतांच्या शिक्षणा-करितां असा पैसा खर्च करणें बापाच्या आवांक्याबाहेर होतें. पण नाग्या लहानपणापासून फार मोहक असल्यामुळें तो आमच्या वडिलांनां फार आवडे, व त्याला बी. ए. करून अखेर कोठेंतरी तहशीलदार बनवावें, अशी त्यांनां फार हौस होती. ही इच्छा सफळ होणें किती दुरापास्त होतें तें मी फार अगोदरपासून जाणून होतों. कारण, त्याचा लपंडावी व आळशी स्वभाव, आणि खऱ्याचें खोटें व खोट्याचें खरें करून दाखविण्याची त्याची अनुपम शैली आमच्या वडिलांच्या जरी नजरेस आली नव्हती, तरी त्याच्या-बरोबर रात्रंदिवस असणाऱ्या माझ्यासारख्याला तिचा घडोघडी प्रत्यय येई. त्याचप्रमाणें हळूहळू एक एक व्यसन त्याला जडत चाललें, तेंहि मज-पासून किती दिवस लपून राहाणार? या माझ्या लिहिण्यानें आपणास कदा-

चित् वाईट वाटेल हें मी समजतों—तें किती वाईट वाटेल तें आपणासच ठाऊक. पण त्यानें कोणच्याहि प्रकारचा पगडा आपल्या मनावर बसवलेला असो, त्यामुळें खरी हकीगत सांगणें टाळावें असें मला वाटत नाहीं. किंबहुना खरी खरी हकीगत आपल्या कानावर पडणेंच मला जास्त इष्ट दिसतें. असो.

"आमच्या वडिलांनां पांच वर्षें झालीं देवाज्ञा झाली. अखेरपर्यंत त्यांचा लोभ नागोपंतावर कायम होता. इतका कीं, त्यांनीं आपल्या वुइलांत मला आग्रहानें शिफारस करून ठेविली, कीं, बी. ए. होईपर्यंतचा त्याचा सर्व खर्च मीं अवश्य चालवावा, व माझ्या मर्जीप्रमाणें हजार रुपये उत्पन्नाचा एकादा गांवहि मीं त्याला इनामी करून द्यावा. याशिवाय दोन हजार रुपये रोख वडिलांनीं स्वतः मरते समयीं त्याच्याकरितां त्याच्या वडिलांजवळ दिले. यानंतर लवकरच त्याचेहि वडील वारले. सहा महिन्यांच्या आंत नागोपंतांनीं मला लिहून कळवलें, कीं, 'बी. ए. होऊन रेव्हिन्यू खात्यांत महारकी करीत बसण्याची आपली इच्छा नाहीं. सबब कॉलेजांत जास्त अभ्यास न करतां एकदोन स्नेही विलायतेला बॅरिस्टर होऊन येण्याकरितां जाणार आहेत, त्यांच्याबरोबर मींहि जावें अशी फार इच्छा आहे. पण दोन हजार रुपयांत काय होणार ?" सबब त्यांनीं फार आग्रहानें विनंति केली, कीं, हजार रुपयांचा गांव इनाम देण्याचा जो वडलांचा मानस होता, त्याच्या अनुरोधानें एकदम मजकडून नक्त रकम मिळाली तर फार उपकार होतील. ही सर्व हकीगत कितपत खरी समजावी ही मला शंका आलीच. पण एकदोघे खरेच विलायतेला जाणार होते व वकिलीच्या पेशाला स्वारी बरीच लायक आहे असें माझें मत असल्यामुळें, व थोडा झटून अभ्यास करतील तर बॅरिस्टरी त्याला सहज हस्तगत होईल, या आशेनें मीहि त्यांचें म्हणणें ऐकण्यास तयार झालों. त्यांनां दहा हजार रुपये रोख देऊन आतां इनामी उत्पन्नाबद्दल हक्क सांगणार नाहीं असा वकिलामार्फत कागदहि लिहून घेतला.

"त्यानंतर दोन वर्षें मला त्याची मुळींच बातमी आली नाहीं, व तो विलायतेस गेला असेल अशा भरंवशावर मींहि तपास केला नाहीं. तिगस्तां त्याच्याकडून अकस्मात् पत्र आलें, कीं, 'घरगुती अडचणींमुळें माझी अत्यंत तारांबळ झाली आहे. विलायतेलाहि जाणें झालें नाहीं. मुंबईत कोणाबरोबर

व्यापारांत रकम घातली होती तो सर्व धंदा अंगाशीं आला. मला आतां जगांतल्या सर्व व्यवहाराचा वीट आला आहे, ह्मणून एकाद्या शांत व निवांत स्थलीं आनंदानें काळ घालवायची फार इच्छा आहे. आपल्या वडलांचा अत्यंत हेतु मला इनामदार करून टाकण्याचा होता, त्याला मान देऊन, व इतर प्रकारें आमचे वडील आपल्या घराण्याच्या किती उपयोगी पडले आहेत तें ध्यानांत आणून, चणकापुरचा इनामदार नुकताच निर्वंश वारला आहे, ती इनामदारी मला आपण जरूर द्यावी. असें करण्यांत आपलें कांहींएक नुकसान नाहींच. कारण पूर्वींपासून तो गांव इनामच दिलेला आहे, वगैरे.' हें पत्र वाचून अर्थातूच मला फार राग आला व मीं योग्य तें उत्तर दिलें. पुढें तशाच अर्थाचीं तीनचार पत्रें आलीं, पण मीं मुळींच जबाब दिला नाहीं. कारण, मुंबईंत नागोपंतांनीं दहा हजार रुपये कसे उधळले, काय नाचतमाशे केले, तेंहि तितक्यांत माझ्या कानीं आले. अर्थातूच मीं तिकडे दुर्लक्ष केल्याबद्दल कोणीहि मला दोष लावणार नाहीं.

"प्रत्येक पत्रांत माझी जास्त जास्त विनवणी व त्याबरोबर कानउघाडणीहि भरलेली असे, व माझ्या कांहीं मित्रांनांहि मध्यस्ती करण्याची तो विनंति करी, तेव्हांहि माझी यथेच्छ निंदा करीत असे. मीं ओळखच सोडून दिली. त्यानंतर पुनः एकदीड वर्ष त्याची माझी गांठ नाहीं, ती अखेर शिवदुर्गांत कशी पडली, तें तुह्माला ठाऊकच आहे.

आतां आणखी एक अत्यंत नाजुक गोष्ट आहे. ती मी स्वतः विसरून जायची अतोनात इच्छा करीत असतों, व आजच्या अत्यंत नाइलाजाच्या प्रसंगामुळेंच मी तिची वाच्यता करीत आहें. आजपर्यंत ती मीं भाऊसाहेबांनां-सुद्धां सांगितली नाहीं. इतकें लिहिल्यावर ती तुमच्याकडूनहि तितकीच गुप्त राखली जाईल अशी माझी खात्री आहे. एवढी तुह्माला तरी सांगण्याचें कारण, नागोपंत काय किंमतीचा माणूस आहे व त्याला पाहिल्याबरोबर माझ्या तळव्याची आग मस्तकाला कां जाते, तें स्पष्ट समजून यावें.

माझी बहीण सरलादेवी हिचें पालन करण्यास वडलांनीं मला व कॅप्टन् बाळासाहेबांस नेमलें आहे. तिचें वय पंधराचें झाल्यावर आह्मांला वाटलें, कीं, आमच्या गांवीं घरीं अभ्यास होण्यापेक्षां मुंबईत चंदारामजीसारख्या उत्तम कन्याशाळेंत ठेवल्यानें फार फायदा होईल. ह्मणून तिच्याकरतां मुद्दाम मुंबईत आमच्या बंगल्यांत राहायची व्यवस्था करून तेथें ठेवून दिली. घरीं

तिच्यावर देखरेख करायला एक गव्हर्नेसहि ठेवली. तेथें हळुहळू नागोपंतांनीं जाण्याचा प्रघात सुरू केला. नागोपंत फार दिवसांचा ऋणानुबंधी असल्यामुळें गव्हर्नेसनेंहि हरकत घेतली नाहीं, किंवा मला कळविण्या इतकेंहि तिला त्यांच्या येण्याचें महत्त्व वाटलें नाहीं. लहानपणीं त्यांनीं सरलादेवीला खेळविली वगैरे असल्यामुळें, व अलीकडची त्यांची स्थिति तिला माहीत नसल्यामुळें, सरलादेवीहि त्यांच्याशीं घरोब्यानें वागूं लागली. तेथें त्या नीचानें हळुहळू तिच्याशीं गोडीगुलाबीचीं भाषणें करून आपलें प्रेम तिच्यावर जडलें आहे असा तिचा समज करून दिला, व त्याच्याबरोबर एकदम गिरीला जाऊन गुपचिप लग्न करण्याचा तिनें बेत करीपर्यंतहि मजल गांठली. परंतु कर्मधर्मसंयोगानें मी कामानिमित्त अकस्मात् मुंबईस गेलों. मजवर तिचें अत्यंत प्रेम होतें व दृढ विश्वासहि होता. माझ्यापासून चोरून असली गोष्ट करणें तिच्या अगदीं जिवावर आलें ह्मणून तिनें सर्व गोष्ट आपणच होऊन मला सांगून दिली. मला काय वाटलें असेल त्याची कल्पना आपणच करा! आपलेच दांत अन् आपलेच ओंठ. जास्त वाच्यताहि करायची सोय नाहीं. पण नाग्याला मीं सडकून पत्र लिहून निर्भर्त्सना केली, व कानाला खडा लावून घेतला, कीं, पुनश्च पोरीला असल्या सुसरींच्या आटोक्याबाहेर ठेवायची. त्याचा नीच बेत साधला असता, तर तिचे तीन लक्ष रुपये अचानक मिळून, मीं इनाम देण्याचें नाकारल्याबद्दल माझा सडकूनच सूड उगवल्याचा महदानंदहि त्याला झाला असता!

"अशी ही भयंकर हकीगत आहे. याऊपर नागोपंताच्या बाबतींत तरी निदान मीं नीचपणा केला असें तुम्ही ह्मणणार नाहीं, असें मला वाटतें. त्यानें तुम्हाला आणखी काय काय थापा मारल्या आहेत, त्या मला ठाऊक नाहींत. मीं लिहिलेली हकीगत खरी असल्याविषयीं पाहिजे तर बाळासाहेबांनां विचारून खात्री करून घ्या. परमेश्वरानें ज्याप्रमाणें नागाला सुंदर कांती व रत्न यांनीं भूषित केलें आहे, त्याचप्रमाणें या नागोपंताच्याहि अंगीं अत्यंत मोहकता ठेवली आहे, व जिव्हेमध्यें तर अशी मिठास घातली आहे, कीं, कोणीहि सहज प्रथमदर्शनीं फसेल. मग आपण फसलां असाल तर त्यांत नवल काय? त्यांतूनहि त्याची बोलण्याची सफाई अशी विलक्षण असते, कीं, त्या बोलण्यांत लबाडी असेल अशी शंका तर दूरच, पण तशी इच्छाहि पार नाहींशी होते.

"काल संध्याकाळीं मी हें सर्व कां बोललों नाहीं असें तुम्ही विचाराल. पण

काय बोलावें व काय बोलूं नये याचें भान राहण्याइतकी तेव्हां माझी स्थिति नव्हती. माझ्या लिहिण्यावर कदाचित् आपला विश्वास बसणार नाहीं. कारण, तुम्ही मला किती अधम समजतां आहां तें तुमचें तुम्हालाच ठाऊक. म्हणून जरूर वाटली तर बाळासाहेबांनां विचारून खाली करतां यावी ह्मणून आज पहांटे उठून मुद्दाम हें पत्र लिहिलें आहे, व सकाळीं कसें तरी करून तें आपल्या हातीं पडण्याची तजवीज करीन.

"संपलें. जास्त काय लिहूं? एवढेंच ह्मणतों, कीं, परमेश्वर तुम्हाला सदा सुखी राखो.

आपला

कृष्णराव बिनीवाले."

---

## प्रकरण छत्तिसावें.

### ताराबाईनें काय केलें !

हें पत्र ताराबाईच्या हातीं पडलें, त्यावेळीं त्यांत भय्यासाहेब पुनः लोचटपणा करून प्रेमाच्या शिळ्या गोष्टीच बोलणार असतील असें जरी तिला वाटलें नसलें, तरी त्यांतल्या खऱ्या मजकुराची तिला मुळींच कल्पना झाली नव्हती, हें उघड आहे. म्हणून एकदां तें वाचूं लागल्यावर अखेरपर्यंत मजकूर तिनें कसा उतावळीनें वाचून टाकला असेल, व किती परस्पर भिन्न प्रकारचे विचार त्यावेळीं तिच्या मनांत उत्पन्न झाले असतील, याची सहज कल्पना करतां येईल. जों जों ती वाचीत चालली, तों तों एकामागून एक तिच्या डोक्यानें किती विषयांवर भराऱ्या मारल्या, तें सविस्तर सांगणें अशक्य आहे. आपलें समर्थन करतां येण्यासारखी त्यांची कांहीं बाजू असेल हेंच तिला प्रथम ऐकून अचंबा वाटला. आणि कदाचित् त्यांनीं कांहीं संपादणी लिहिलीच असली, तर बहुतकरून ती अशी असेल, कीं, साधारण गृहस्थाला तशी संपादणी करण्याचा प्रयत्न करतांना शरमच वाटली पाहिजे. अशा प्रकारें त्या पत्राच्या इतका उलट ग्रह बनलेला असतां तिनें आनंद-भुवनांतल्या संबंधाची हकीगत वाचण्यास प्रारंभ केला. ती इतकी झरझर वाचीत चालली होती, कीं, वाचलेला मजकूर मनांत शिरण्यास अवसरच राहत नसे. पुढच्या वाक्यांत काय आहे तें समजण्याच्या अधाशीपणामुळें वाचून झालेल्या वाक्याच्या मतलबाकडे तिचें दुर्लक्ष होत असे. शांताबाईच्या हृदयांत प्रेमासक्ति दिसत नसल्याचा मजकूर निवळ झूट म्हणून तिनें

ताबडतोब ठरवून टाकला, व शांताबाईची अवहेलना करण्याचीं जीं मुख्य— व तिला तिडीक उत्पन्न करण्यासारखीं—कारणें पत्रांत लिहिलीं होतीं, तीं वाचून तर ताराबाईला इतका संताप आला, कीं, सारासार विचारानें निर्णय करण्याची तिची समदर्शक बुद्धि पार नाहींशी झाली. त्या पत्रांत आपणाला पाहिजे तशा प्रकारचा, घडलेल्या वर्तनाबद्दल पश्चात्ताप कोठेंहि दिसला नाहीं. भाषा-सरणीमध्येंहि बराच उद्दामपणा असून मनाला खेद झाला असल्याचें बिलकुल चिन्ह त्यांत नाहीं. शुद्ध अभिमान, अहंकार, बेपर्वा व उद्धटपणा मात्र ओतप्रोत भरून राहिला आहे, असें तिला वाटलें.

पण शांताक्काच्या हकीगतीनंतर पुढें नागेशरावांचा वृत्तांत आला. एका मागून एक ओळ नवीन मजकूर सांगूं लागली. तो जर खरा मानला, तर आपण मनांतल्या मनांत नागेशरावांच्या सज्जनपणाची जी गोड इमारत उठवली होती, तिला बराच मोठा धक्का बसून ती कलंडायला लागते कीं काय, असा तिला भास होऊं लागला. शिवाय, हा मजकूरहि नागेशरावांनीं स्वतः सांगितलेल्या गोष्टींपेक्षां फारसा भिन्न नाहीं, दोहोंमध्यें बरेंच साम्य आहे, असेंहि तिला वाटूं लागलें. "काय समजावं बाई माणसानं ? मोठं गूढच दिसतं आहे! हें सगळं खरं म्हणावं तर किती नवल तरी ? अन् भयंकर तर इतकं आहे, कीं, अंगावर शहारेच येतात ! पण, छे, असलं अमानुष कृत्य खरं असणं अगदीं अशक्य, केवळ अतर्क्य ! अगदीं सारं हें खोटं असलंच पाहिजे ! काय तरी पण खोटंनाटं खच्चून भरून निर्लज्जपणानं पत्र लिहिलं आहे !" असें म्हणत ती जेमतेस अखेरपर्यंत गेली. शेवटच्या दहाबारा ओळी तर न वाचतां नुसत्या पाहूनच सोडून दिल्या, व पुनः या पत्राकडे लक्ष देण्याचेंहि कारण नाहीं, मग वाचण्याचें तर दूरच, असें ठरवून तिनें तें पाकिटांत कोंबून खिशांत घातलें, व ती पुढें चालूं लागली.

पण दोन मिनिटेंहि झालीं नाहींत तोंच तें पत्र पुनः बाहेर निघालें, व एकदम तिची दृष्टि नागेशरावांसंबंधाच्या हकीगतीकडे धांवली. तो मजकूर तिला बराच खट्टू करण्यासारखा होता, म्हणून प्रत्येक वाक्य लक्ष लावून वाचून त्यांत लपंडाव अथवा हातचलाखी कोठें आहे ती हुडकून काढण्याचा ती प्रयत्न करूं लागली. दिल्बहारच्या घराण्याशीं त्यांच्या असलेल्या संबंधाची हकीगत नागेशरावांनीं सांगितल्याप्रमाणेंच या पत्रांतहि होती, व थोरल्या रावसाहेबांचा अत्यंत लोभ नागेशरावांवर असल्याचीहि हकीकत

बरोबर जुळली. येथपर्यंत दोन्हींमध्यें उत्तम मेळ होता; परंतु बुइलाच्या हकीगतीपासून अत्यंत गैरमेळ सुरू झाला. इनामासंबंधीं नागेशरावांनीं काय सांगितलें होतें त्याचा प्रत्येक शब्दसुद्धां तिच्या चांगला स्मरणांत होता. त्या मजकुराशीं पत्रांतला मजकूर ताडून पाहिला तर कोणच्या तरी एका पक्षाकडे अत्यंत लपंडाव असला पाहिजे, असें तिला दिसूं लागलें. अर्थात्, सर्व लपंडाव भय्यासाहेबांच्या माथीं मारण्याची सहज लालसा तिला स्पष्ट उत्पन्न झाली. परंतु जों जों तो मजकूर पुनःपुनः वाचावा—नागेशरावांनीं इनामावरचा हक्क सोडून देण्याबद्दलचा मजकूर, दहा हजार रुपयांची मोठी रकम दिल्याचें विधान वगैरेसंबंधीं विचार करावा-तों तों तिचें मन डळमळूं लागलें. पुन्हा तिनें तें पत्र खालीं ठेविलें, क्षणभर डोळे मिटून विचार केला, साधकबाधक गोष्टी पाहिल्या, पण निकाल म्हणून लागेना. दोन्ही बाजूंला निवळ कोरडीं विधानें, त्यांतून सत्यासत्याची निवड कशी करावी? पुनः पत्र वाचलें, पुनः विचार केला. अखेर, दहा हजार रुपये पोंचून इनामाचा हक्क सोडल्याचा कागद वकिला-मार्फत लिहून घेतल्याचा मजकूर वाचून मात्र ताराबाई दचकली. कोणी झालें तरी अशी खोटी गोष्ट कागदावर कशी नमूद करील? अर्थात्, येथें कांहीं तरी पाणी मुरत असलें पाहिजे, अशी तिची ठाम समजूत झाली. तिनें इनामाची जास्त हकीगत वाचली तों तों तिला स्पष्ट दिसूं लागलें, कीं, ज्या बाबतींत भय्यासाहेबांनीं कितीहि हुशारी लढविली तरी त्यांचें वर्तन निदान पाजीपणाचें न ठरणें आपल्याला अगदीं अशक्य वाटलें होतें, त्या बाबतीला अशी एक गिरकी मिळणेंहि शक्य आहे, कीं, त्यांचें वर्तन अत्यंत सरळ, किंबहुना उदारमनाचेंहि मानतां येईल.

भय्यासाहेबांनीं आपल्या पत्रांत नागेशरावांच्या अंगीं उधळेपणा व इतर व्यसनें बिनदिक्कत जोडून टाकलेलीं पाहून ताराबाईला अत्यंत आश्चर्य वाटलें. विशेषेंकरून तीं विधानें खोटीं पाडण्याचें आपणा स्वतःकडे बिलकूल साधन दिसेना, तेव्हां तर ती थक्कच झाली. रिसाल्यांत ते दाणींच्या शिफारशीनें शिरले एवढें खरें; पण त्याच्या पूर्वीं ते कोठें होते, काय करीत असत, त्यांची वर्तणूक कशी होती, याविषयीं ते स्वतः बोलत त्या व्यतिरिक्त कोणालाच स्वतंत्र अशी फारशी माहिती मुळींच नव्हती. प्रयत्न केला असता तर त्यांच्या कुळशीळाविषयीं अगर सभ्यपणाविषयीं माहिती हवी तितकी काढतां आली असती; पण तसा तपास करण्याची जरूर वाटायला आपल्याला कधीं शंका आली

असेल तर ना पुढें चौकशी ? त्यांची मुद्रा, बोलण्यासवरण्याची ढब, स्वर, अंगलट वगैरे इतकीं उमदीं होतीं, कीं, सर्व सद्गुणांचा समुच्चय त्यांच्या ठायीं एकवटून असल्याची कोणाचीहि दृढ भावना झालीच पाहिजे, असा ताराबाईचा समज होता. त्यांच्या हातून घडलेली एकादी तरी परोपकाराची, सज्जनपणाची, अथवा सत्यप्रियतेची लहानशीहि गोष्ट आपल्या स्मरणांत आहे कीं काय हें पहाण्याची तिनें अगदीं शिकस्त करून पाहिली, कीं, तसल्या एकाद्या गुणामुळें त्यांचे इतर कांहीं बारीकसारीक अवगुण असले तर ते लोपून जातील, अथवा तरुण वयांत अजाणपणें ते अवगुण असतील, पण आतां ते निघून गेले आहेत असें आपणाला समर्थन करून समाधान मानतां येईल. पण छे ! असलें स्मरण मुळींच या वेळीं तिच्या मदतीला धांवून येईना ! त्यांचा पाणीदार चेहरा, बोलण्याचा झोंक, वागण्याची ऐट, तिच्या पट्‌दिशीं डोळ्यांसमोर येऊन उभी राही; पण लोकें त्यांची सारी स्तुति करीत, व पलटणींतले लोक त्यांनां रंगेल अथवा दिलदार म्हणत, यावांचून त्यांनीं प्रत्यक्ष एकादें सत्कर्म केल्याचें तिच्या मुळींच स्मरणांत येईना. कितीक वेळ त्याबद्दल विचार करून ती पुढें वाचूं लागली. "पुढें— अरेरे ! सरलादेवीसंबंधानें लिहिलेल्या हकीगतीला, कालच सकाळीं आपलें बाळासाहेबांशीं भाषण झालें त्या वेळच्या त्यांच्या संशयित मुद्रेवरून थोडेंसें पाठबळ पोंचलें. आणि पत्रांत अखेरीला भय्यासाहेबांनीं तर त्याच बाळासाहेबांवर सर्व हवाला दिला आहे ! बाळासाहेबांनीं कालच आपण सरलेचे पालक असल्याबद्दल सांगितलें होतें, अन् बाळासाहेबांवर अविश्वास करण्याला तर मुळींच कारण नाहीं !" एक वेळ बाळासाहेबांकडे प्रत्यक्ष जाऊन याचा स्पष्ट खुलासा करून घ्यावा अशी एक कल्पना तिच्या मनांत उत्पन्न झाली; पण एकाएकीं जाऊन त्या गृहस्थाला इतकी नाजुक गोष्ट कशी विचारावी, असें वाटून तिचें मन कचरलें. शिवाय, भय्यासाहेबांची खात्री असल्यावांचून ते तरी असा हवाला कसा देतील, हा विचार मनांत उद्भवतांच तिचा तो बेत रहितच होऊन गेला.

पहिल्या भेटीच्या दिवशीं मावशीच्या घरीं त्यांचें व आपलें बोलणें झालें. त्या वेळचीं पुष्कळशीं वाक्यें आज तिच्या स्मरणांत स्पष्टपणें उभीं राहिलीं. पहिल्याच भेटीला, आपली त्यांची यत्किंचितहि सलगी नसतां, आपणाला त्यांनीं आपली इत्थंभूत कहाणी सांगावी, हें तिला आज थोडेंसें चमत्कारिक

वाटूं लागलें. पण त्या वेळीं तें तसें कसें आपणाला वाटलें नाहीं कोण जाणे! त्याचप्रमाणें बोलतांना ते जी ऐट मारीत, तिच्याशीं अगदीं विसंगत असें वर्तनहि लगेच त्यांनीं केलें, तेंहि आतां ताराबाईच्या लक्षांत आलें. "मी का भय्यासाहेबाला डरतों? मी नाहीं त्याला टाळायचा, त्याला पाहिजे तर तो जाईल!" अशी वल्गना केली खरी, पण चारच दिवसांनीं आनंदभुवनांतल्या पार्टीच्या प्रसंगीं सूबाल्या करून स्वारी आली नाहीं. त्याचप्रमाणें आनंदभुवनांत मंडळी होती तोंपर्यंत आपणाला एकटीलाच सर्व कहाणी गुप्तपणानें कळवली होती, व ते त्यावेळीं असेंहि म्हणाले होते, कीं, बापाच्या अब्रूकरितां तरी निदान मी त्याच्या मुलाची चारचौघांत नाचक्की करणार नाहीं. पण मंडळी गेल्याबरोबर चार दिवसांत ज्याच्या त्याच्या तोंडीं तोच विषय चालू झाला. नंतर बापाची अब्रूबिब्रू पार नाहींशी होऊन भय्यासाहेबांची जेथें तेथें भरपूर निंदा ते करूं लागले होते. कोण ही विसंगतता !

जी पहावी ती गोष्ट आतां कशी अगदींच निराळी दिसूं लागली बाई ! द्वारकाबाईकडे गोंडा घोळण्याचा हेतु तर मग निवळ पैशाचा लोभ अनावर असलेला, केवळ द्रव्यमूलक बाजारीच होता म्हणायचा ! अन् तिच्यापाशीं तर दहा हजारच रुपये होते म्हणून त्यांनां आपण जें मितसंतोषी समजून त्यांची वाखाणणी करीत होतों, तो मितसंतोष नसून तेवढे तरी हातीं लागून घेण्याचा नीच हावरेपणाच होय ! आपल्या स्वतःशीं तरी गुलगुल गोष्टी सांगण्याचें कारण, एक तर, आपल्या द्रव्याची प्रथम त्यांनां वास्तविक कल्पना नव्हती हें तरी असावें, अथवा 'बरी पोरगी भुलते आहे आपणावर, मग आपण तरी कशाला मागें घ्या !' असला अत्यंत निंद्य विचार तरी असावा ! त्यांच्या बाजूची मनाची धडपड हळुहळू थंड होत चालली. शिवाय, आतां मला हेंहि आठवतें, कीं, शांताक्कानें विचारलें असतां भाऊसाहेबांनीं स्पष्ट सांगितलें होतें, कीं, 'भय्यासाहेबांकडे मुळींच दोष नाहीं!' पण आपण त्या सांगण्याला महत्त्वच दिलें नाहीं. दुसऱ्यापक्षीं, आज चार महिने आपला भय्यासाहेबांशीं इतका दृढ परिचय चालला आहे, तरी आपल्या नजरेस कधीं एकहि अशी गोष्ट पडली नाहीं, कीं, त्यावरून त्यांनां लबाड, लुच्चे, अन्यायी, धर्मलंड अथवा दुर्व्यसनासक्त असें कांहीं तरी म्हणतां येईल ! फक्त स्वाभिमानी, हेकेखोर, आणि बेपर्वा इतकेंच काय तें लोकें म्हणतात व तें खरेंहि आहे. पण त्यांचे स्नेहीसोबती तर त्यांनां फार चाहतात. नागेशरावांनींसुद्धां सरलादेवीला

ते चांगले बंधु लाभले आहेत असें स्पष्ट म्हटलें होतें, व आपणहि तिच्या-विषयीं त्यांनां फार मायेनें बोलतांना कितीकदां तरी ऐकलें आहे. ते जर नादान, व्यसनी व जुलमी असते, तर इतक्या सर्व लोकांनां कांहीं तरी तसला प्रकार दिसून यायला पाहिजे होता; आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट ही कीं, तसे ते जर वास्तविक असते, तर परटाचें जसें कोळसेविक्याशीं घटकाभर जमणार नाहीं, तसें भाऊसाहेबांसारख्या सज्जन माणसाशीं त्यांचा इतका जिवश्च-कंठश्च स्नेह कसा संभवता ? ताराबाईला आपली स्वतःची आतां केवळ शरम वाटूं लागली ! भय्यासाहेब किंवा नागेशराव डोळ्यापुढें आले, कीं तिला वाटे "मी कितीतरी आंधळी, पक्षपाती, दुराग्रही व मूर्ख बनून गेलें !"

ती पुढें म्हणाली "किती निंद्यपणानें मी वागलें तरी ! मी जी आपणाला फार शहाणी म्हणून तोरा मिरवितें, जी मी आपल्या डोक्यांत अक्कल व दूरदृष्टि खचून भरली आहे म्हणून समजतें, शांताक्काच्या सहृदय उदार स्वभावाची चेष्टा करतें, जी विनाकारण लोकांवर आग पाखडून स्वतःला धन्य मानून घेतें, ती मी किती ही फसलें! कोण माझी छी थू होईल!मला किती मान खालीं घालावी लागेल ! अन् कां बरें तसें आतां होऊं नये ? मी जरी प्रेमविव्हल झालेली असतें, तरीसुद्धां इतकी अंध झालेली शोभलें नसतें! पण छे, माझा अपराध प्रेममूलक नव्हे, तो निवळ अभिमानमूलक आहे! एकाच्या स्तुतीनें मी इतकी पाहिल्याच प्रसंगीं भूलून गेलें, व दुसऱ्याच्या मानखंडनेनें पाहिल्याच प्रसंगीं त्याच्यावर इतकी नाखुष झालें, कीं, दोघांच्या विषयींचे प्रथमग्रह आंधळेपणानें मीं खुशाल वाढूं दिले, व दोघांच्याहि विषयीं विचार करतांना धूर्ततेला व अकलेला सोडचिठ्ठी दिली ! या घटकेपर्यंत मी इतकी बेअकली असेन, अशी माझी यत्किंचितहि कल्पना नव्हती !"

स्वतःवरून शांताक्का, शांताक्कावरून भाऊसाहेब अशी एकेक व्यक्ति आतां तिच्या डोळ्यासमोर उभी राहिली, व भानावर येऊन तिला स्मरण झालें, कीं, त्यांच्याविषयींच्या मजकुरानें आपलें मुळींच समाधान झालें नव्हतें, म्हणून तो मजकूर तिनें पुनः एकदोनदां लक्ष लावून वाचला. पण एकदां डोळ्यांत झणझणीत अंजन पडलें होतें, आतां अंधपणा कसा राहणार ? या वाचनाचा अगदींच भिन्न परिणाम झाला!एका बाबतींत जर भय्यासाहेबांचीं विधानें अक्षरशः खरीं ठरलीं, तर याहि बाबतींत तरी तीं असत्य कां असावींत? शांताक्काच्या हृदयांत प्रेमशून्यता असल्याची त्यांची समजूत असल्याचें

त्यांनीं लिहिलेलें मघाशीं आपण धुडकावलें खरें, पण मालतीचाहि तसाच ग्रह झाल्याचें तिनें आपल्याला बोलून दाखविलें होतें, त्याची वाट काय लावावी ? तसा तो झाला होता हें स्मरणांत आल्यावांचून आतां कसें राहणार? शांताबाईच्या शांत व गंभीरपणावरून कोणाचा तसा ग्रह झाला तर तो दोष कोणाचा ? तिच्या मनांतील प्रेमोद्भव तिच्या वर्तनांत जर दिसला नाहीं तर लोकांनीं त्याचा अभाव मानल्यास त्यांनां काय म्हणून बोल लावावा ?

घरांतल्या इतर मंडळीविषयीं लावलेला दोष जेव्हां ताराबाई पुनः वाचूं लागली, तेव्हां जरी तिचा मानभंग होऊं लागला, तरी तो दोष असत्य नव्हे, अशी तिची खात्री पटत जाऊन तिला शरम वाटूं लागली. दोष नाहीं म्हणून तरी कसें चालेल ? त्यांनीं पत्रीं मुद्दाम लिहिल्याप्रमाणें आनंदभुवनांतल्या पार्टीच्या दिवशीं तर, आज आपल्या साऱ्या मंडळींनीं आचरटपणाचें एक प्रदर्शनच दाखविलें असें आपणा स्वत:लाहि वाटलें होतें, हेंहि तिला आतां स्पष्ट स्मरलें.

स्वत:बद्दल व शांताबाईबद्दल केलेली स्तुति तिला पटल्यावांचून कशी राहील? त्यामुळें तिला अंमळ बरें वाटलें खरें, पण इतर सर्वांनीं आपल्या हातानें आपल्या अंगावर दोषारोप ओढून घेतले असल्याचें कडू लागणें गोड कशानें होणार? शांताक्काची जी हालअपेष्टा झाली त्याला मुख्य कारण इतर कोणी नसून तिचीच अगदीं जवळची आप्त मंडळी सर्वांशीं कारण झाली. आपल्या शांताक्काच्या अंगच्या गुणांत त्या आप्तेष्टांच्या वैगुण्यानें किती तरी उणेपणा सहजीं आला पाहिजे. या सर्व विचारांनीं आजपर्यंत जन्मांत कधीं आला नसेल असा विषण्णपणा ताराबाईच्या अंतःकरणांत उभा राहिला.

अशा प्रकारें जवळ जवळ दोन तास तिचें मन नानाप्रकारच्या बऱ्यावाईट मनोविकारांच्या झपाट्यांत धडपडून गेलें. त्यांत कितीकदां पुनःपुनः विचार झाले, शक्याशक्यता तोलून पाहिली, साधकबाधकप्रमाणें मोजलीं, तेव्हां अखेर मुळांतील प्रथम ग्रहांनां हांकून लावून त्यांची जागा त्याहून अत्यंत विसदृश अशा ग्रहांनीं मोठ्या कडाक्याची लढाई करून पटकावली ! मनाला व शरीरालाहि थकवा येऊं लागला, तेव्हां आपण किती तरी वेळ घराबाहेर आहों या गोष्टीचें तिला भान झालें, व पावलें हळुहळू घराकडे चाल करूं लागलीं. अखेर रोजच्याप्रमाणें हुशारींत दिसण्याचा, व इतरांशीं बोलतांना

मनांतली तळमळ उघडकीस न येण्याकरितां जास्त विचार करण्याचें बंद करण्याचा निश्चय करून ती घरांत शिरली.

घरीं पोंचतांच तिला वर्दी मिळाली, कीं, नजरबागेंतले दोघेहि गृहस्थ येऊन वाट पाहून गेले. भय्यासाहेब दोनचार मिनिटें नुसता निरोप घ्यायला आले होते; पण बाळासाहेब मात्र ताराबाई आतां येईल मग येईल असें करीत सबंध तासभर थांबले होते, व अखेर तर आंबराईकडेहि शोधीत जाणार होते. ताराबाईनें त्यांची चुकामुक झाल्याबद्दल नुसता खेद दर्शविला. वास्तविक तिला तें बरेंच वाटलें होतें. आतां मोहकपणा बाळासाहेबांत राहिला नसून तो भय्यासाहेबांचें पत्र व तत्संबंधीं विचार यांतच होता!

---

## प्रकरण सत्तावीसावें.

### माईसाहेबांच्या सूचना व निरोप.

दुसरे दिवशीं सकाळीं नजरबागेंतून दोघेहि पाहुणे गृहस्थ निघून गेले. नीलकंठराव तर दिवस उगवल्यापासून आपल्या घराच्या फाटकाशीं वाट पहात उभे होते, व त्यांची गाडी दिसतांच अनायासें गांठ पडल्यासारखें हास्य करून व त्यांनां वेदोक्त आशीर्वचन करून, ते गेल्याची वर्दी द्यायला स्वारी धांवत घरीं आली, व "मावशीपासून दूर जातांना त्यांनां सर्वांनांच अवघड वाटलें असेल, त्या मानानें पाहिलें असतां ते बरेच हुशारींत दिसले," अशीहि त्यांनीं बातमी दिली. नंतर श्रीमंतांचें सांत्वन करण्याकरितां ते लगेच नजरबागेकडे गेले, व तेथून परत येतांना त्यांनीं श्रीमंतांचा असा अत्यंत समाधानकारक निरोप आणला होता, कीं, "श्रीमंतांनां आज दुपारीं उदासवाणें वाटेल, सबब सर्वच मंडळींनीं तेथें दोनतीन वाजतांच यावें, व सायंकाळीं चहा फराळ करून जावें."

माईसाहेब ताराबाईच्या दृष्टीस पडल्याबरोबर तिच्या मनांत हें आल्यावांचून राहिलें नाहीं, कीं, "आपण जर मनांत आणलें असतें, तर आज मला सूनबाई म्हणून भय्यासाहेबांनीं माईसाहेबांपुढें नेली असती, अन् हे शब्द कानीं पडतांच माईसाहेबांचा कोण थयथयाट झाला असता! काय बरं त्या म्हणाल्या असत्या?" अशा कल्पना मनांत आणून हंसत ती आपल्या मनाची करमणूक करून घेत होती.

## आजपासून पन्नास वर्षांनीं !

पहिला विषय अर्थात्च आज दोन गृहस्थ गेल्याचा निघाला. माईसाहेब म्हणाल्या " खरंच सांगतें, कोण आज ही बाग मला ओंकी ओंकी दिसते आहे. माणसं आलीं म्हणजे बरं वाटतं खरं, पण तीं जाऊं लागलीं म्हणजे असं वाईट वाटूं लागतं, कीं, मग मी तर म्हणूं लागतें कीं, तीं नसतीं आलीं तरी बरं झालं असतं! त्यांतून हे दोघे म्हणजे अगदीं आम्हांला फारच चटका लावून सोडतात. त्यांनां तरी निघून जाणं कुठं आवडत होतं. बाळासाहेब कांहीं तरी अखेरीपर्यंत सांवरले होते, पण भय्यासाहेब आज दोन दिवस उदास दिसत होते—गतवर्षीपेक्षां देखील यंदां जास्तीच. त्यांचं नजरबागेवरचं प्रेम वाढत जातंसं स्पष्ट दिसलं—"

नीलकंठराव म्हणाले " हें काय विचारावें महाराज ! येथें तशीच कांहीं तरी त्यांनां आकर्षण करणारी वस्तु असेल. "

ही नीलकंठरावांची खुमारी ऐकून मायलेंकी खुष होऊन पसंती दाखविलेलें किंचित् स्मित नीलकंठरावांनां बक्षिस मिळालें.

जरा वेळानें माईसाहेबांच्या लक्षांत आलें, कीं, ताराबाई आज नेहमीं प्रमाणें हुशारींत नाहीं. त्याचें कारण त्यांनीं आपणच जुळवून टाकलें, कीं, आपल्या गांवीं परत जायचे दिवस जवळ येत चालले म्हणून तिला वाईट वाटत असावें. त्या विचारसरणीनें किंचित् प्रेमळ स्वरांत माईसाहेब तिला म्हणाल्या " पण तें जर तुला इतकं वाईट वाटतं आहे, तर आईला पत्र पाठीव, की, मी चार दिवस आणखी राहतें म्हणून! मालूबाईला तर अलबत तूं राह्यलेली फार पसंत पडशील ! "

ताराबाई म्हणाली " आपले फार उपकार मानतें मी, जास्त राह्यचा आग्रह केल्याबद्दल. पण आतां मला जास्त सवड नाहीं. येत्या शनवारीं मला मुंबईत असलंच पाहिजे. "

माईसाहेब म्हणाल्या " इतकी काय गर्दी आहे? अजून तीन वार तरी कुठं झाले आहेत? आम्हीं तर म्हटलं तूं दोन महिने तरी निदान राहाशील! मालूबाईला आम्ही आधींच तसं सांगितलं होतं. पण इतकं काय अडलं आहे घरीं? तुमची आई चार दिवस आणखी चालवून घेईल. "

ताराबाई म्हणाली " आईला चालेल. पण बाबांचं नाहीं चालणार. परवांच त्यांनीं लवकर ये म्हणून लिहिलं आहे. "

# माईसाहेबांच्या सूचना व निरोप.

माईसाहेब आश्चर्यानें म्हणाल्या " आईला चालेल, तर बापाचा काय संबंध ? लेकीशीं बापाला काय करायचं असतं ? आणखी सबंध दीड महिना रहाल तर एकीला मी मजबरोबर मुंबईपर्यंतसुद्धां नेईन. आमची दासी बसेल बाहेर कोचमनजवळ, अन् ती जागा तुला देऊं. अन् उकडत नसलं तर दोघींनांहि आंत घेऊं. कारण, तुम्हीं दोघीहि कांहीं जाड्याजुड्या नाहीं आहांत. "

ताराबाई मोठ्या कष्टानें शांतपणें म्हणाली " तें खरं, पण आमचा बेत बदलायची आतां सवड नाहीं. "

आतां माईसाहेबांचा नाइलाज झाला. त्या म्हणाल्या " बरं बाई, तुमचं तें खरं. मालूबाई, एक शिपाई द्या बरं का त्यांच्याबरोबर. आग-गाडींतून दोघी तरण्याताठ्या मुलींनीं एकटं जाणं मला अगदीं नापसंत आहे. गतवर्षी भय्यासाहेबांची बहीण सरलादेवी इथनं गेली तर मीं चार शिपाई-प्यादे अन दोन दासी बरोबर दिल्या होत्या. मोठ्या थोर माणसांनीं एकटं दुकटं काय धांवत सुटावं? सरलादेवी म्हणजे केवढी श्रीमंत अन् घराणं तर असं खानदानीचं! तिनं भिकारड्यासारखं कसं जावं ? मालूबाई, जरूर शिपाई पाठवा बरं. मला बरं आधींच हें सांगायचं सुचलं. नाहीं तर तुम्ही वेडगळा-सारखं केलं असतंत ! "

ताराबाई म्हणाली " आमचे मामा आपला शिपाई मुंबईहून इथें स्टेशना-पर्यंत आम्हांला न्यायला पाठवणार आहेत. "

माईसाहेब म्हणाल्या " तुझा मामा ! शिपाई ठेवण्याइतका कांहीं आहे का कोणी तुझा मामा ? बरं बरं, तें तर ठीकच ! बरं इथं स्टेशनवर थांबाल तेव्हां आमचं नांव सांगितलंत तर तुम्हांला कांहीं अडचण नाहीं पडणार!"

आणखीहि असलेच प्रश्न माईसाहेबांनीं केले. त्यांचीं उत्तरें द्यावीं लागत, कधीं कधीं माईसाहेब स्वतःच देत—म्हणून तिकडे लक्ष द्यावें लागे. हें एक प्रकारें बरेंच झालें. नाहीं तर डोकें इतकें भणभणून विचारमग्न असल्यामुळें ताराबाई कदाचित् आपण कोठें आहों तें विसरली असती.

पण एकटी असली, कीं, ताराबाईच्या डोक्यांत सदोदित एकच विषय चाले. पुनःपुनः तें पत्र वाचून मन खट्टू होई, तरी पण तें वाचावेंसेंच तिला वाटे. तें पत्र आतां बहुतेक तिला तोंडपाठ होऊन गेलें होतें. प्रत्येक वाक्य वाचतांना लिहिणाराविषयीं भिन्न भिन्न विचार डोक्यांत उभे रहात.भाषेचा

उद्दामपणा व बेपर्वा पाहून अजून सडकून संताप येई. पण आपण किती अन्यायानें त्यांची निर्भत्सना केली, किती अद्वातद्वा त्यांनां बोललों, विनाकारण किती नसते आरोप त्यांच्यावर लादले, तें सारें आठवलें, कीं, तिचा राग आपणा स्वतःवरच उलटे, व त्यांनां मनांत किती विषाद वाटला असेल, त्यांच्या आशापूर्ण मनाचा कसा बेसुमार हिरमोड झाला असेल, ही कल्पना त्यांच्याविषयीं एक प्रकारची कींवसुद्धां कधीं कधीं उत्पन्न करी. त्यांच्या सारख्यानें आपणावर प्रेम करावें याविषयीं कृतज्ञतापूर्वक अभिमानहि अस्पष्ट-पणें वाटे, व त्यांच्या एकंदर शांतपणाबद्दल- इतकें सतापण्याला कारण असतांहि इतकी शांति कशी धरली याबद्दल—त्यांचा थोडासा आदरहि वाटूं लागे. परंतु एकंदरींत तो माणुस तिला नापसंत वाटत असल्यामुळें त्याला नाकारल्या-बद्दल यत्किंचित्‌हि पश्चात्ताप वाटेना, अगर पुनः त्याची कोठें गांठ पडावी असेंहि तिच्या बिलकुल मनांत आलें नाहीं. स्वतः आपण मात्र फार अचरटपणानें वागलों, अगदीं कोती दृष्टी होऊं दिली, हा विचार नेहमीं तिच्या मनाला खाऊं लागला, व आपल्या घरांतल्या इतर मंडळीच्या वर्तनाची तर तिला थोडीशी लाजहि वाटूं लागली. त्यांतून हेंहि तिला स्पष्ट दिसूं लागलें, कीं, त्यांचे ते दोष सुधारण्याची आशा बिलकुल नाहींच. बाबासाहेब काय, नुसती चेष्टाच करीत बसावयाचे, पण कधीं पोरींनां चार शब्द बोलून रागें भरतील तर शपथ! अन् आई तर काय, तिची स्वतःच समजूत कमी, ती इतरांनां काय ओळ लावणार? कितीदां तरी शांताक्कानें आणि आपण धाकट्या दोघींचा मूर्खपणा सुधारण्याचा यत्न केला होता, पण त्यांनां आईची फूस असल्यावर त्या काय आह्मांला भीक घालतात? हिरीला स्वतःला फारसा हट्ट नसला नव्हता इतकेंच नव्हे, तिला दाबली तर ती दबेहि, पण सुंदरच्या नादानें तीहि कोणाचें ऐकनाशी झाली आहे. सुंदर तर इतकी आग्रही व शेफारली आहे कीं, तिच्याशीं बोलणेंच कोण अवघड होतें. अगदीं मूर्ख, डौली, व आळशी अशा त्या दोघी बनल्या आहेत. रिसाला आल्यापासून तर ऑफिसराशिवाय त्यांनां दुसरा विषयच नव्हता, व रोज शिव-दुर्गाला गेल्याशिवाय त्यांचें चालतच नसे.

शांताक्काचीहि काळजी तारेच्या डोक्यांत थारा देऊन राहिली होती. आतां सर्व गोष्टी स्पष्ट झाल्या असल्यामुळें भाऊसाहेबांची योग्यता पूर्ववत् चढली होती, व त्या मानानें शांताक्काच्या नुकसानीचीहि किंमत वाढून गेली. त्यांच्या अंतःकरणांत प्रेम ओतप्रोत आहे हें ठरलेंच, व मित्राच्या व बहि-

णींच्या सांगण्यावर फाजील विश्वास टाकला एवढाच फार तर दोष, या शिवाय दुसरा कोणताहि दोष त्यांच्या ठिकाणीं आढळत नाहीं, अशी तिची खात्री झाली. इतकें सर्व प्रकारें इष्ट स्थळ, इतकें प्रेमळ माणूस, इतकी सोन्यासारखी संधि, व सुखी होण्याची इतकी अचूक खात्री, हातून नाहींशी झाली—आणि तीहि आपल्याच माणसांच्या मूर्खपणामुळें—हा विचार ताराबाईच्या मनाला किती विषण्ण करीत असेल!

आणखी नागेशरावासारखा बाहेरून उत्तम दिसणारा प्राणी आंतून इतका नादान व कुचकामाचा असावा याहि विचारानें तिचें डोकें भणाणून जाई. आजपर्यंत कधींहि दुर्मुखलेली अथवा खट्टु स्थितींत फार वेळ असल्याचें माहीत नसलेली ताराबाई मनांत इतकी वरमून गेली, इतकी सर्व गोष्टींशीं नाखूष झाली, कीं, तिच्या मुद्रेवर पूर्वींप्रमाणें उल्हास व हुशारी क्वचितहि दिसेनाशी झाली.

नजरबागेंत आतां लागोपाठ आमंत्रणें येत होतीं. कारण, माईसाहेबांनां खरोखरच करमेनासें झालें होतें. शिवाय, मालूबाईची बहीण व मैत्रीण जाणार, त्यांनां बारीकसारीक बाबतींतहि सूचना करण्याची सुसंधि माई-साहेबांनी वायां कशी बरें दवडावी? लुगडीं चोळ्यांच्या घड्या कशा घालाव्यात, ट्रंक कशी भरावी, वगैरे गोष्टींवर माईसाहेबांनीं इतक्या आग्रहाच्या सूचना केल्या, कीं, घरीं आल्यावर आदल्या दिवशीं भरून ठेवलेली सगळी ट्रंक पुनः उपसून नव्या पद्धतीनें भरण्याची शेवंतीला जरूर वाटली!

जेव्हां माईसाहेबांचा अखेर निरोप घेतला तेव्हां त्यांनीं—कोण पण अत्यंत लोभ दाखवून—"वाटेनं जपून जा, अन् पुढच्या वर्षीं अशाच आमच्या गांवाला या अं!" असें अत्यंत आग्रहानें तीनतीनदां म्हटलें. पण एक बोटभर खणाची चिंधी हातांत दिली असेल तर—छे, रामाचें नांव! आक्कासाहेबांनीं तर नुसतें किंचित हास्य करून मानेनेंच निरोप दिला!

---

## प्रकरण अडतिसावें.

### सुवर्णपुराहून प्रयाण.

शनिवारीं सकाळीं चहाला इतर मंडळी जमण्याच्या अगोदर नीलकंठ-रावांची ताराबाईशीं एकटीच गांठ पडली, व मुद्दाम तिच्याकरितां अत्यंत जरूरीनें तयार केलेलें भाषण त्यांनीं तिच्याजवळ बोलून दाखविलें. ते म्हणाले

"तारावाई, आपण इकडे आमच्या घरीं येण्याची तसदी घेतल्याबद्दल या घरच्या मालकिणीनें तुमचे अजून आभार मानले आहेत की नाहीं, तें मला ठाऊक नाहीं. पण तसें केल्यावांचून त्या तुम्हाला येथून जाऊं देणार नाहींत, अशी माझी खात्री आहे. तुम्ही इथें आलांत त्याचें आम्हांला भारी कौतुक वाटलें आहे. या आमच्या पर्णकुटिकेंत करमणूक होण्यासारखें कांहीं नाहीं. आमची साधीभोळी रहाणी, लहानसें घर, थोडेच नोकर, अन् वस्ती जगाच्या कोनाकोपऱ्यांत, त्यामुळें तुमच्यासारख्या तरुण स्त्रीला कंटाळा येणें साहजिक आहे. म्हणून तुम्ही एवढ्या केवळ आमच्यासाठीं येऊन राह्यलां याचें मला कौतुक वाटलें, व आपला कंटाळा होईल तितका कमी करण्याचा आम्ही मनापासून प्रयत्न करीत होतों—"

ताराबाई म्हणाली "छे छे, माझा वेळ फार मौजेनं गेला, म्हणून मींच आपले आभार मानले पाहिजेत, असं मला वाटतं. मालुताईच्या सहवासांत तीन वार राह्यला मिळालं अन् तिनं इतकी उत्तम माझी बरदास्त ठेवली, कीं, मजवरच्च उपकारांचं तिनं ओझंच करून ठेवलं आहे—"

नीलकंठराव म्हणाले "हें आपलें उगाच म्हणायचें ! बाकी, आपला काळ अगदींच कंटाळवाणा झाला नाहीं हें ऐकून मला समाधान होतें आहे. आम्ही जरी गरीब आहोंत, तरी थोर लोकांशीं सहवास तुम्हाला घडवणें परमेश्वर कृपेनें आमच्या हातीं आहे, व त्यामुळें घरगुती साधेपणामध्यें तोंडपालट करतां येतो. हा आमचा लाभ असा आहे, कीं, फार थोड्यांच्या नशिबीं तसा पडत असेल. अन् आम्हांला नजरबागेंत कोण मानमरातब मिळतो, तो तुम्हीं प्रत्यक्षच पाह्यला आहे. एकंदरींत असें म्हणायला आम्हां. स्वतःला दिक्कत वाटत नाहीं, कीं, जोंपर्यंत नजरबागेंतला सन्मान आम्हाला लाभतो आहे, तोपर्यंत आमच्या घरीं राहणाऱ्या माणसाची कींव करण्याजोगी कांहीं स्थिति खास नाहीं !"

हे उद्गार काढतांना त्यांनां इतकें स्फुरण चढलें, कीं, एके जागीं त्यांच्या-च्यानें उभें राहून भागेना, म्हणून ते इकडे तिकडे फिरूं लागले. ताराबाईनें शिष्टाचार व सत्यता यांची थोडक्यांत सांगड घालण्याचा प्रयत्न केला. तिचे शब्द ऐकून नीलकंठराव पुनः बोलले "तर मग आपणाला आमच्या-बद्दल शिवदुर्गाकडे समाधानकारक हकीगत घेऊन जातां येईल, असा निदान माझा भरंवसा आहे. श्रीमंत मातुश्री राणी माईसाहेब आम्हांला

किती चढ्यातात, तें आपण रोज पाह्यलेंच आहे. त्या एकंदर हकीगती-वरून असें कांहीं म्हणावें लागायचें नाहीं, कीं, तुमच्या मैत्रिणीला टाकाऊ स्थळ—पण तें मीं न बोलणें बरें. मी अगदीं अंतःकरणापासून इतकीच आशा व इच्छा करायला देवाजवळ मागतों, कीं, तिच्याइतकें तरी आपणा स्वतःला सुखाचें स्थळ मिळो! आह्मां दोघांचे देह मात्र भिन्न पण मन एकच आहे. आम्हां उभयतांच्या स्वभावांत व विचारांत इतकें कांहीं विलक्षण साम्य दिसून येतें, कीं, परमेश्वरानें मुद्दाम आह्मां उभयतांनां तश्या हेतूनेंच घडवलें, असें वाटूं लागतें!"

ताराबाई मोकळ्या मनानें असें म्हणूं शकली, कीं, "हो हो, तसं जिथें असतें तिथें सुखाला काय तोटा! आपणा स्वतःला या गृहस्थितींत अत्यंत सौख्य लाभतं आहे हें पाहून मला फार आनंद वाटतो.—" पण तितक्यांत मालती तेथें आलेली पाहून " तें सौख्य यांनां हिच्यापासून लाभतं खरं, पण हिच्या सौख्याची वाट काय?" असें तिला वाटल्यावांचून राहिलें नाहीं. "अरेरे गरीब बिचारी मालु! अशा परिस्थितींत तिनं काय सौख्य समजावं? पण हें सारं तिनं उघड्या डोळ्यानंच पत्करलं आहे. अन् जरी आम्ही आज जाणार म्हणून तिला वाईट वाटतं आहे, तरी अजून तिची कींव लोकांनीं करावी अशी तिची भावना झालेली दिसत नाहीं. आपलं घरदार, संसार, गाई म्हशी, गाडी, टांगा वगैरे गोष्टींचं कौतुक अजून तिचं मन रिझवतें आहे, हेंहि ठकिच आहे."

अखेर गाडी येऊन दाराशीं उभी राहिली, सामान सुमान चढलें व निघण्याची अगदीं तयारी झाली. दोघी मैत्रिणींनीं मोठ्या सद्गदित अंतः-करणानें एकमेकींचा निरोप घेतला. नंतर गाडीकडे जात असतां नीलकंठ-रावांनीं सर्वांचीं नांवें घेऊन प्रत्येकाला अनुरूप असे नमस्कार व आशीर्वाद ताराबाईच्या हस्तें पाठविले, व शिवदुर्गांत आल्याच्या वेळीं पाहुणचार उत्तम केल्याबद्दल पुनः आभार, व वसंतरावमामा व शारदामामी यांची ओळख नव्हती तरी त्यांनांहि नमस्कार सविनयपणें पाठविण्यास ते विसरले नाहींत. नंतर दोघीजणी आंत बसून दार लावणार तों त्यांनीं त्यांनां एकदम घाबरून आठवण केली, कीं, " काय! मोठी घोड्याएवढी चूक तुम्ही करीत होतां! श्रीमंतांनां व आक्कासाहेबांनां फारफार पुसलें आहे म्हणून माझ्या हस्तें निरोप पाठवायला कशा विसरत होतांत? पण अलबत तुमचे विनयपूर्वक नमस्कार

व तुम्हांला केलेल्या पाहुणचाराबद्दल तुमचे आभार तिकडे पोंचवायला तुम्ही आम्हांला सांगालच ! "

अशाला ताराबाई काय हरकत घेणार ? अखेर दार लागून गाडी चालूं लागली. मंडळी दिसेनाशी झाल्यावर शेवंती उद्गारली " परवां कींग ताराबाई आपण आल्यासारखं वाटतं आहे—अन् कितीक तरी गोष्टी घडल्या एवढ्यांत ! "

" खरंच, किती तरी घडल्या ! " ताराबाई उसासा टाकून ह्मणाली.

"म्हणजे पहा, नऊदां आपण नजर बागेंत गेलों होतों चहाला; अन् नुस्तीं गेलों तें शिवाय. कितीतरी गोष्टी मला सांगायला आहेत."

ताराबाई स्वतःशीं म्हणाली "अन् मला कितीतरी लपवायच्या आहेत !"

पुढें फारसा संवाद झाला नाहीं. स्टेशनवर मामांचा शिपाई भेटला व विशेष दगदग किंवा अडचण न पडतां सुवर्णपुर सोडल्यापासून पांच तासांच्या आंत मंडळी मुंबईत वसंतरावांच्या घरीं सुखरूप पोंचली. तेथें तीन दिवस दिवाळीची मौज पाहून भाऊबीजेच्या दिवशीं शांताबाईसह शिवदुर्गाला निघायचा बेत ठरलेला होता.

शांताबाई चांगली हुशारींत दिसली. शिवाय, मुंबईत दिवाळीसारख्या वेळीं असतांना मौजेला काय तोटा ? व मनांत खोल विषाद असला तरी तो बाहेर कसा दिसणार ? शारदामामींनीं तीन दिवसांकरतां इतके बेत करून ठेवले होते, कीं, एकमेकींशीं हितगुज करायलाहि सवड नव्हती. मुलांबाळांची मौज, रात्रीं दिवेबत्तीची रोषनाई पहाण्यास जायची गडबड, आतसबाजी वगैरे दारुकाम उडवायची व पहायची गर्दी, व नानाप्रकारचे फराळ व फळफळावळी व मिष्टपक्वान्नें सेवन करण्याचा आनंद—इतके प्रकार एकत्र असतां कसे दिवस गेले तें काय वर्णन करून सांगितलें पाहिजे ?

पण इतक्या गडबडींत असूनहि शांताक्काला भय्यासाहेबांच्या मागणीची हकीगत सांगण्याचा मोह प्रतीकार करून जीभ आवरण्याची ताराबाईला कोण पंचाईत पडली ! तिला सांगितलें म्हणजे ती अत्यंत चकीत होईल, व आपणालाहि बरीच प्रौढी मिरवतां येईल, यामुळें लवकर सांगण्याला जीभ इतकी वळवळ करूं लागे, कीं, केवळ किती सांगावें व किती लपवावें तें ठरेना, व एकदां सांगूं लागलें तर कदाचित् ज्यास्त शब्द चुकीनें तोंडाबाहेर पडून,

शांताक्काला आनंद होण्याच्या ऐवजीं ज्यास्त वाईट वाटण्याला कदाचित् आपण कारण होऊन बसूं, या भितीनेंच तिला चिप् रहावें लागलें.

---

## प्रकरण एकोणचाळिसावें.
### परत घरीं.

भाऊबीजेच्या दिवशीं शारदामामींच्या मधुकराला ओंवाळून व त्याच्याकडून रगड ओंवाळणी घेऊन शांताक्का, ताराबाई व शेवंती गाडीनें निघाल्या, त्या सकाळीं पुण्यास पोंचून नऊ वाजायच्या आंत शिवदुर्गाच्या स्टेशनवर जाऊन पोंचल्या. तेथें आनंदरावांची गाडी त्यांनां घरीं न्यावयाला येणार होती. स्टेशनाच्या बाहेर एका पथिकाश्रमाशीं गाडी सुटलेली दिसली व सुंदर आणि हिरा वरच्या माडीवर खिडकींत उभ्या होत्या त्याहि दृष्टीस पडल्या. त्या पहांटे पांचाला घरून निघून बहिणींनां सामोऱ्या आल्या होत्या, व एक तासभर आधीं पोंचल्या असल्यामुळें, तेवढ्या अवधींत पथिकाश्रमाच्या शेजारीं असलेल्या 'सर्व वस्तु भांडारांत' खरेदी करून नुकत्याच तेथून निघून स्टेशनावर जाण्याच्या विचारांत होत्या, इतक्यांत आगगाडी येऊन पुढें चालतीसुद्धां झाली, व वडील बहिणी खालीं रस्त्यांतहि दृष्टीस पडल्या.

सुंदरहिरींनीं माडीवर सर्वांनां गरम गरम चहा व फराळाचें देण्याचीहि सर्व तयारी केली होती. टेबलावर बशी पेले मोठ्या थाटानें मांडून ठेवले होते. त्या दोघी म्हणाल्या "पहा बरं, कशी मौज केली आहे कीं नाहीं ! म्हटलं, कीं तुम्हांला अगदीं चकीतच करून टाकावं !"

सुंदर आणखी म्हणाली "तुम्हांला तिघींनांहि अगदीं तृप्त करून टाकूं आम्ही ! पण पैसे मात्र तुम्ही आतां द्या अं ! आम्हीं आणले होते ते शेजारच्या दुकानांत सगळे उडून गेले ! हीं पहा मीं नवीं दोन पातळं घेतलीं. मला तीं कांहीं मोठींशीं चांगलीं वाटलीं, असं नव्हे; पण म्हटलं, कीं, न घेण्यापेक्षां घ्यावीं तेंच बरं. घरीं गेल्यावर त्यांचे कांठ पदर काढीन अन् रंगहि निराळा देईन, अन् पाहीन कांहीं बरीं होतात का !"

दोघींनीं तीं पाहून "काय पण आहेत पातळं ! कशाला असलीं घेतलीस?" असें म्हटल्यावर, त्याचेंहि कांहीं न वाटून ती म्हणाली "अग, दुसरीं दोन होतीं तीं तर यांच्याहूनहि वाईट होतीं. मी आतां नवी छानदार किनार आणवून यांनां लावीन, म्हणजे जेमतेम बरीं दिसतील. शिवाय, आतां कांहींहि

नेसलं तरी काय मोठंसं महत्त्व नाहीं ! कारण, रिसाला मुळीं पंधरा दिवसांनीं इथनं हालतोच आहे ! ”

“ हलतो का रिसाला एकदांचा ! ” ताराबाई समाधानानें उद्गारली.

सुंदर म्हणाली “ हो, पंधरा दिवसांनीं जाऊन नगरास थंडीचे चार महिने राहणार. मी तर बाबांनां म्हणतें आहें, कीं, आपण सारींच नगराला जाऊं चार महिनें. आपला तिथें जुना वाडाहि आहे, त्यामुळं आपणांला खर्चहि कांहीं फार यायचा नाहीं. आईहि माझ्या सारखंच म्हणते आहे. नाहीं तर चार महिने आपण शिवदुर्गांत कसे काढणार ? ”

ताराबाई स्वतःशीं म्हणाली “ वा, बेत तर उत्तम काढला आहे. एक रिसाला आला होता तर कोण आमची फजिती झाली, अन् नगराला तर मोठी छावणीच आहे. मग ऑफिसर्सनां काय कमी ! ”

चहाला सुरुवात झाल्यावर सुंदर म्हणाली “ आतां एक छानदार बातमी सांगायची आहे तुह्मांला. करा पाहूं तर्क ! फार पसंत, फार उत्तम बातमी आहे, अन् ती सगळ्यांच्या ओळखीच्या माणसाची आहे ! ”

दोघी थोरल्या बहिणी एकमेकींकडे पाहून आश्चर्य करूं लागल्या, कीं, ही काय सांगणार आहे कोण जाणे ! म्हणून त्यांनीं पथिकाश्रमांतल्या वाढप्याला “ तुझी आतां जरूर लागली म्हणजे हांक मारूं, ” असें सांगितलें, व तो गेला.

सुंदर मोठ्यानें हंसत म्हणाली “ कोण ही सावधगिरी तुमची ! जसं काय त्याला त्यांत कांहीं कळणार आहे ! कितीक तरी दुसऱ्या चमत्कारिक बातम्या त्याच्या हमेश कानीं पडत असतील.बाकी,त्याला घालवलात तें एकाअर्थी ठीकच झालं. काय पण बावळी मुद्रा—अन् दाढी तर बोट बोट वाढली होती मेल्याची ! तें असो म्हणा. —पण माझी बातमी, आपल्या प्रिय नागेशरावांबद्दल आहे! पहा बरं, त्या वाढप्याच्या योग्य आहे का असल्या छानदार गृहस्थाची बातमी ? नागेशरावांचं लग्न द्वारकाशीं जुळण्याचा आतां मुळींच संभव नाहीं ! आहे कीं नाहीं छान बातमी ताराबाईच्या लायख ? द्वारका मुळींच आपल्या चुलत्याकडे नागपुराला गेली, अन् दोनचार महिने तिकडेच राह्यची आहे ! आतां नागेशराव सुरक्षित आहेत ! ”

ताराबाई एकदम उद्गारली “ अन् द्वारकाहि सुरक्षित झाली ! म्हणजे तिच्या द्रव्याच्या दृष्टीनं सुरक्षितच म्हणायची ! ”

यावर सुंदर म्हणाली "पण तिला जर ते आवडत होते, तर ती गेली कशी वेडगळासारखी!"

शांताबाई म्हणाली "दोघांच्याहि मनांत प्रीति नसली उत्पन्न झाली म्हणजे बरं!"

सुंदर म्हणाली "त्यांच्या बाजूची मी खात्री देईन! द्वारकाबद्दल यत्किंचितहि प्रेम त्यांच्या मनांत खास नव्हतं! तिच्या त्या वांग असलेल्या चेहऱ्यावर कसं कुणाचं प्रेम बसणार, अन् बांधाहि काय पण, बूटबैंगण–"

ताराबाईचें मन आतां तिला खाऊं लागलें, कीं, इतकी अनुदार भाषा जरी आपण कधीं वापरली नसती, तरी तीच अनुदार कल्पना कांहीं महिन्यांपूर्वीं आपल्याहि डोक्यांत आली होती, पण त्यावेळीं आपणाला ती मुळींच अनुदार वाटली नव्हती!

फराळ आटोपले. थोरल्या बहिणींनीं सगळे पैसे चुकते केले, व गाडीहि झुंपून आली. जेमतेम प्रयास करून पांचीजणी, त्यांच्या ट्रंका, पार्सलें, करंड्या, अंथरूणें व त्यांतच आणखी सुंद्री हिरीनीं नवीन घेतलेल्या सामानाचीं भलीं मोठालीं पुडकीं, अशांनीं गाडी अगदीं भरून गेली, व चालू झाली. सुंदरचीहि तोंडाची गाडी सुरू झाली! ती मोठमोठ्यानें हंसत म्हणाली "कशा आपण खच्चून भरलों आहोंत! अन् आंतून पोटहि सडकून भरलं आहे! बरं झालं, मीं हीं पातळं घेतलीं–दुसरं कांहीं नसलं तरी आणखी एक पुडकं तर झालं आपणांला अडचण करायला! तेवढीच त्याची मौज! बरं असो, पण आतां एकदां नीट बसलों आहोंत, आतां साऱ्या वाटभर घरीं जास्तोंवर हंशा पिकवूं या! सांगा पाहूं कशी काय तुमची दोघींची हकीगत झाली ती! कोणी उमदे तरुण गृहस्थ मिळाले होते का तुम्हांला करणूक करायला? मला तर फार आशा होती, कीं, परत यायच्या वेळीं तुम्ही नवरा पटकावून याल, एकादीनं तरी! शांताक्कांचा तर आतां बेगम राह्यचा रंग दिसतो म्हणायचा. झालं, आतां विशीएकवीशीच्या पुढं वय झालं! मला कोण शरम वाटेल जर मी विशीपर्यंत लग्नाची राह्यलें तर! मावशीचा किती हेतु आहे तुमचीं एकदांचीं लग्नं होऊन जावींत म्हणून! ती तर रोज म्हणते कीं, तारानं नीलकंठरावांला पत्करायला हवं होतं–पण मला नाहीं त्यांत कांहीं मौज वाटली. माझं जर तुमच्या दोघींच्या अगोदर लग्न होईल तर देवा, अशी मौज होईल पण! मग मीच तुम्हां दोघींना

बरोबर घेऊन पार्टीबिर्टीला जात जाईन, अन् तुमच्यावर चांगली नजर ठेवीन !—हो, काय म्हणतां परवां गंमत झाली—बाई बाई—मला तर हंसतां हंसतां पोट फुटेलसंच वाटूं लागलं ! कर्नल फडक्यांच्या बायकोनं दिवाळीची मौज म्हणून घरीं एक नाटकांतला अंक करून दाखवायचा बेत केला होता. आम्ही दोघी गेलों होतों—माझी अन् तिची आहेच तशी गट्टी ! ऑफिसरनींहि पार्ट घेतले होते कांहींनीं—बाकीचे मौज पहायला यायचे होते. पण स्त्रिया लागत होत्या पुष्कळ. आयत्या वेळीं, ती बगी नाहीं का धडफळ्यांची ? ती झाली आजारी—अन् तेवढी लागली कमी पडायला. आतां आयत्या वेळीं काय करावं ! मला युक्ति सुचली. पूर्वीं म्हणे पुरुषच बायकांचे पार्ट करीत असत. मीं म्हटलं, आज तरी तसं कां करूं नये ? मग फडकीणबाईंचा तो गोरटेला शिपाई नाहीं का बाळा, त्याला नेसवलं लुगडं अन् डोक्यावरून पदर दिला. कितीपण मेला चांगला दिसत होता सांगूं ! कुंकूं लावल्यावर तर असा खुलूं लागला ! अन् जो मेला पुनः पुनः पदर सांवरी, कीं, आम्ही साऱ्याजणी हंसतां हंसतां मेलोंच अगदीं ! तेव्हां लोकांनां संशय आला, कीं, या इतक्या हंसतात कां ? तेव्हां मग सगळं बेंड बाहेर फुटलं ! अन् मग जो हंशा पिकला आहे म्हणतां ! ”

अशा प्रकारें एकसारखी सुंदरची बडबड चालू होती. मध्यें मध्यें हिरी चुकलेलें सुधारी, किंवा जास्त भर घाली. दुसऱ्या कोणाला त्यांनीं एक अक्षर सुद्धां बोलूं दिलेंच नाहीं ! अखेर एकदांच्या सर्वजणी घरीं पोंचल्या. सर्वांनां फार आनंद झाला. शांता सुधारलेली व हुशारींत पाहून सीताबाईंनां बरें वाटलें, व ताराला पाहून आनंदराव दोनतीनदां म्हणालेसुद्धां कीं “ तारे तूं आलीस परत घरीं, तें किती तरी छान झालें !”

दिवाणखान्यांत खूप गर्दी चालली होती. शेवंतीला भेटायला रावबहादुरांची बहुतेक सर्व मंडळी धांवत आली. रावबहादुरीणबाई लेंकीला हजारों प्रश्न मोठमोठ्यानें विचारीत होत्या. मालुताईच्या घरीं गाईम्हशी किती आहेत, घर कसें कसें आहे, हें कसें आहे, तें कसें आहे, असें एकसारखें चाललें होतें. सीताबाईंनां तें कसें गोड लागणार? त्याहि मुंबईत काय काय मौज केलीत तें एकीकडे लेंकींनां विचारीतच होत्या, व नंतर मथुरीला समजून सांगत होत्या. आणि सगळ्यांच्या पेक्षां जास्त मोठ्या आवाजानें—कोणी लक्ष देवो वा न देवो—सुंदर आपली सकाळपासूनची हकीगत सांगत होती. ती म्हणते

"काय मथुताई सकाळची गंमत सांगूं तुला ! तूं आली असतीस तर जास्तच मौज झाली असती ! जातांना आम्हीं सगळे झडपे लावून घेतले गाडीचे, जसं कांहीं गाडींत कुणीच नाहीं ! अन् तशींच पुढें गेलों असतों, पण या हिरीचं लागलं डोकं फिरायला. स्टेशनवर तर अशी फराळाची तयारी ठेवली होती, कीं, जन्मांत कधीं त्यांनीं तसा उत्तम फराळ केला नसेल ! तूं असतीस तर तुलाहि मौज वाटली असती फराळाची ! परत येतांना तर इतकी गर्दी झाली, कीं, आतां का गाडी मोडते कीं काय, असं क्षणोक्षणीं वाटत होतं ! मला तर हंसतां हंसतां मेल्यासारखं होईलसं वाटलं. अन् सगळ्या वाटभर अशा बोकळत, ओरडत धिंगाणा घालीत आलों, कीं, दहा मैलांवरून गाडींत माणसं चालली आहेत हें कुणींहि ओळखलं असतं ! तूं कां नाहीं आलीस ?"

मथुरीनें गंभीरपणें उत्तर दिलें "असल्या प्रकारच्या मौजेची चेष्टा करण्याची देव मला कधीं बुद्धि न देवो ! साधारणतः सर्व स्त्रियांनां कोत्या बुद्धिमुळं, असल्या गोष्टी विशेषेंकरून ग्राह्य वाटत असतात, हें खरं आहे; पण माझ्यासारख्या सुसंस्कृत मनाला त्यांत अभिरुची उत्पन्न होत नाहीं. ग्रंथवाचनाच्या परमानंदापुढं या मौजेची काय कथा ?"

पण या उत्तरांतलें सुंदरनें अवाक्षरहि ऐकलें नाहीं. ती कधीं अर्ध्या मिनिटापेक्षां जास्त वेळ दुसऱ्याच्या बोलण्याकडे लक्षच देत नसे, व मथुरीचें भाषण तर ती कधींच ऐकत नसे !

चार वाजतां सुंदर इतरांनां आग्रह करूं लागली, कीं, "चला आपण गांवांत जाऊं, अन् कोण काय करतं आहे तें पाहूं." पण ताराबाई तें मुळींच कबूल करीना. अर्धा दिवस येऊन झाला नाही तों धांवल्या गांवांत, असें लोकांनां नांव ठेवण्याला जागा देऊं नये, असा तिचा निश्चय होता. नागेशराव भेटले नाहींत तितकें बरेंच, असाहि विचार डोक्यांत होताच. पंधरा दिवसांनीं पलटण जातेच आहे, ती एकदां गेली म्हणजे पीडा चुकेल, असें तिला अतिशय वाटत होतें.

घरीं येऊन दोनचार तास झाले नाहींत, तोंच सर्वांनींच नगराला जाण्याची गोष्ट आईबापांमध्यें घाटत आहे, असें ताराबाईला दिसून आलें. आनंदरावांच्या मनांत बिलकूल जाण्याचें नाहीं, हें तिनें चटकन् ओळखलें; पण सीताबाईच्या प्रश्नांनां ते अशीं दुटप्पी, उडवाउडवीचीं व संदिग्धपणाचीं उत्तरें देत, कीं,

डला तरी भागेल ! आणखी जास्त वेळ जर तुम्ही त्यांच्याविषयीं आपल्या मनाला विषाद मानून घ्याल, तर मी ते सारं विसरून जाऊन अगदीं फुलासारखं हलकं माझं अंतःकरण होऊन जाईल."

शांताबाई म्हणाली "गरीब बिचारे नागेशराव ! त्यांच्या चेहऱ्यावर सालसपणा व भलेपणा किती तरी स्पष्ट दिसतो !"

ताराबाई म्हणाली "या दोघांहि गृहस्थांच्या शिक्षणक्रमांत कांहीं तरी मोठी चूक झाली आहे. एकाच्या अंगीं भलाई सर्व भरली आहे, पण मुद्रेवर ती दिसत नाहीं. दुसऱ्याच्या मुद्रेवर सडकून दिसते, पण अंगीं मुळींच नाहीं !"

शांताबाई म्हणते "मला नाहीं कधीं तुझ्यासारखं वाटलं, कीं, भय्यासाहेबांच्या मुद्रेवर भलाई दिसत नाहीं असं !"

ताराबाई म्हणाली "अन् मौज ही, कीं, मुळींच कारण नसतां त्यांच्या विरुद्ध इतकी जहाल जाण्यांत मी आपणाला भारी धूर्त समजत होतें ! असं एकदां मन बनलं, कीं, काय काय कोट्या सुचतात, अन् कसं डोकं चालूं लागतं म्हणतां ? एकदां नजर तशी झाली म्हणजे खऱ्याखोट्याची छानी करायची बुद्धिच रहात नाहीं, अन् कांहींना कांहीं तरी चेष्टेचं बोलून लोकांनां हंसवण्यांत मोठी मौज वाटूं लागते !"

शांताबाई म्हणाली "पण जेव्हां तूं प्रथम तें पत्र वाचलंस, तेव्हां कांहीं तुला आतां म्हणतेस तसं वाटलं नसेल."

ताराबाई म्हणाली "अलबत् नाहींच ! पण हळुहळू डोळे उघडूं लागले, तेव्हां वाईट वाटूं लागलं. बरं जवळ बोलायलाहि कोणी नव्हतं. तुम्ही असतां तर माझ्या मनाचं कांहीं तरी सांत्वन केलं असतंत."

शांताबाई म्हणाली "तूं इतकी कडक बोललीस तें फारच वाईट झालं. कारण, तें सारं कडु बोलणं अगदीं चुकीचं होतं असं आतां दिसून येतं."

ताराबाई म्हणाली "अहो, मीं जर माझं मनच एका बाजूला आंधळं केलं होतं, तर तोंडांतून कडू शब्द आले हें, उघडच झालं. तें असो म्हणा, पण एक गोष्ट सांगा मला आतां. मला प्रश्न असा येऊन पडला आहे, कीं, नागेशरावांचा हा असला नीच स्वभाव आपल्या मंडळींनां कळवावा कीं नाहीं ?"

शांताबाईनें थोडा विचार केला, व नंतर ती म्हणाली "मला नाहीं दिसत इतकी जिथें तिथें त्यांची नाचक्की करण्याचं कारण आहेसं. तुला कसं वाटतं बरं ?"

ताराबाई म्हणाली "मी तसंच म्हणतें. एक तर सर्वांनां हें सांगण्याचा मला भय्यासाहेबांनीं अधिकार दिला नाहीं; इतकंच काय, तर मुख्य गोष्ट गुप्तच ठेवली पाहिजे. मग नुसत्या आपल्या म्हणण्याला कोण खरं मानील? भय्यासाहेबांच्या उलट इतका सर्वत्र ग्रह पसरलेला आहे, कीं, ते चांगले आहेत असं मानायला कोणीहि तयार होणार नाहीं. नागेशराव लवकरच जाणार आहेत, मग ते बरे असोत वा बुरे असोत, इथल्या लोकांनां काय पर्वा ! तेव्हां आज कांहीं एक बोलूं नये. कधीं काळीं तें सारं उघडकीला येईलच ! मग तेव्हां आपण सर्वांची चेष्टा करून इतकीं हंसूं कीं, तुम्ही सारीं कशीं फसलांत म्हणून ?"

शांताबाई म्हणाली "छे, आज इतकी फटफजिती करणं ठीक नाहीं ! कदाचित् आजच त्यांनां पश्चात्ताप वाटत असून सुधारण्याचा जर ते प्रयत्न करणार असले, तर आपल्या फटफजिती केल्यानं ते उगाच आणखी भडकायचे!"

या संवादानें ताराबाईच्या मनांतली चलबिचल पुष्कळशी शमली. आज पंधरा दिवस मनाला दडपून टाकणारीं दोन कारणें आज हलकीं झालीं व आतां केव्हांहि त्यांच्याविषयीं बोलणें काढायला शांताबाई मिळाली. पण अजूनहि एक गोष्ट लपून होतीच, ती सांगणें अशक्यच होतें. पत्राच्या पहिल्या भागांतला मजकूर शांताला कसा सांगावा? भय्यासाहेबांच्या स्नेह्याला शांता किती प्रिय होती हें तिला कसें सांगावें ? एकमेकांचें जर कधीं काळीं जुळून आलें, तरच तें आपणाला सांगतां येणार, पण तेव्हां आपण कशाला तें सांगायला पाहिजे, भाऊसाहेबच प्रत्यक्ष सांगतील. सांगण्यांतलें स्वारस्य नष्ट झाल्याशिवाय मला तें तिला सांगण्याचा हक्कच नाहीं !

आतां घरांत स्वस्थता असल्यामुळें शांताबाईच्या मनाची खरी स्थिति ताराबाईला न्याहाळून पहातां येऊं लागली. अजून तिचें मन प्रेमयुक्त होतें, हें तर उघडच दिसत होतें. प्रथमतः उत्पन्न झालेल्या इतर तरुण स्त्रियांच्या प्रेमाप्रमाणें शांताबाईचें प्रेम क्षणिक नव्हतें. कारण, तिचा स्वभावच असा हलका नव्हता. त्या प्रेमानें तिला विशेषच विव्हल केलें होतें. मात्र तिच्या समजूतदारपणामुळें ती होतां होईतोंवर जगतापासून आपली मनःस्थिति

लपविण्याचा प्रयत्न करीत असे. परंतु मनांतल्या मनांत ती रोज झुरत असे, ही गोष्ट निर्विवाद होती. तथापि तसें दिसलें तर इतरांनां विनाकारण वाईट वाटेल म्हणूनच बाह्यतः ती हुशारी दाखवी. पण सीताबाईनां त्याचें काय महत्त्व वाटणार होतें? त्या एके दिवशीं ताराला ह्मणाल्या " काय ग तारा, या शांताच्या घोटाळ्याचं तुला कसं वाटतं ? मी तर अगदीं ठरवलं आहे, कीं, पुनः म्हणून कुणाहिजवळ त्याबद्दल अवाक्षर काढायचं नाहीं ! मीं परवां रमालासुद्धां असंच सांगितलं. पण पुण्यामुंबईत कधीं शांताला ते भेटले कीं नाहीं तें मला अजून समजत नाहीं. मी तर म्हणतें, भाऊसाहेब भारी नालायक माणूस आहेत, अन् आतां ते तिला लाभण्याचा यत्किंचित्‌हि संभव नाहीं. आनंदभुवनांत त्यांची येण्याचीहि कांहीं बोलवा नाहीं. शक्य तेवढ्या साऱ्यांनां मीं पुसून पाह्यलं ! "

ताराबाई म्हणाली " मला नाहीं वाटत ते आतां इकडे येऊन कधीं राहतीलसं !"

सीताबाई म्हणाल्या " मर्जी त्यांची. बाकी इथें कुणाची इच्छा आहे ह्मणा त्यांनीं रहावं अशी ! मी इतकं मात्र नेहमीं ह्मणेन कीं, माझ्या मुलीशीं ते भारी वाईट रीतीनं वागले. मीं असतें तर असलं नसतं कधीं सहन केलं ! माझी इच्छा आहे, कीं, शांता झुरून झुरून जावी ह्मणजे तरी आपल्या कृत-कर्माचा त्यांनां पश्चात्ताप होईल ! "

पण असली इच्छा ताराबाईची असणें अशक्य असल्यामुळें ती गप राहिली. जरा वेळानें सीताबाई पुढें म्हणाल्या "कायग तारा, ती मालती नू तिचा नवरा आनंदांत असतात म्हणतेस ! हा आनंद टिको ह्मणजे झालं. अन् घरीं जेवणाचा बेतबीत कसा काय असतो ? मालती मोठी काटकसरी असेल बहुतकरून. आपल्या आईच्या निम्मी जरी हुशार असली तरी अर्ध्या उत्पन्नापेक्षां जास्ती मागं टाकीत असेल. उधळमाधळ कधीं स्वप्नांतसुद्धां त्यांच्या येत नसेल, नाहीं का ? "

ताराबाई म्हणाली " छे, बिलकूल नाहीं. "

सीताबाई म्हणाल्या "नसायचीच अगदीं ! भारी जिथें तिथें जपत असेल ती लबाड ! हो हो, त्यांनां कधीं पैशाची अडचण ठाऊक व्हायची नाहीं. न होईना बापडी. त्यांतच त्यांनां सुख लागो म्हणजे झालं ! अन् या आपल्या

इष्टेटीविषयीं तर रोज बोलत असतील. ती त्यांनां अगदीं आपल्या मालकीचीच वाटत असेल !"

ताराबाई म्हणाल्या "माझ्या देखत कसं असलं तीं कधीं बोलतील ?"

सीताबाई म्हणाली "नाहीं. बोलली तुझ्यासमोर तरच विलक्षण ! पण आपसांत दररोज अगदीं बोलत असतील खास. अशी दुसऱ्याची इष्टेट घेणं त्यांनां जर आवडत असलं तर ठीकच आहे. खुशाल कां घेईनात ! मला तर अशा तऱ्हेनं एकाद्याची इष्टेट घशांत उतरावयाची शरमच वाटली असती !"

आईचे हे शब्द ऐकून ताराला हंसूं येऊं लागलें. ज्या बुइलावरून इष्टेट मालतीकडे जाणार म्हणून आई संतापत होती, त्याच बुइलामुळें ती सीताबाईच्या आज प्रत्यक्ष वीस वर्षे हातांत होती हें आई कसें विसरते कोण जाणे !

---

## प्रकरण एकेचाळिसावें.

### रिसाला हालला.

शिवदुर्गाला परत येऊन आठ दिवस झाले. आणखी आठ दिवसांनीं रिसाला नगराला जाणार, म्हणून गांवांतल्या बहुतेक तरुण स्त्रियांचीं मनें किती तरी खिन्न होत चाललीं होतीं. शांताबाई, ताराबाई व गांवांतल्या आणखी एकदोघी त्यांच्याचसारख्या समजूतदार मुली, याच काय त्या रिसाला जाणार असल्यामुळें अस्वस्थ न होतां रोजचे आपआपले उद्योगधंदे सुरळीत चालवीत होत्या. "असं कसं तुम्हांला कांहींच वाईट वाटत नाहीं?" असें म्हणून सुंदर व हिरी त्यांची निर्भर्त्सना करीत असत. सुंदरच्या जिवाची कोण अगदीं दुर्दशा उडाली होती ! आपल्या प्रत्यक्ष बहिणींचें इतकें निष्ठुर अंतःकरण कसें असावें, तें तिला बिचारीला कळत नसे. "अरे देवारे! आतां आमची काय स्थिति होणार ? आमचा वेळ तरी कसा जायचा आतां ?" असें त्या करुणस्वरानें पुनःपुनः उद्गार काढीत, व ते ऐकून ताराबाई हंसूं लागली म्हणजे त्यांनां राग येई, व "कशी ही कठोर हृदयाची आहे!" असें सुंदर हळूच म्हणे. सीताबाईनां लेंकींची स्थिति पाहून भारी कींव येई, व पुनःपुनः आपण साऱ्यांनींच नगराला जावें असें त्या म्हणत, व त्याला सुंदर व हिरी मनापासून दुजोरा देत. "पण बाबा कुठें मनावर घेताहेत ?

इथल्या थंडींतल्यापेक्षां नगरची कोरडी हवा आपल्याला फार मानवेल," अशा दोघीहि रोज म्हणत.

हा मासला रोज घरांत चारदां तरी दृष्टीस पडे. प्रत्येक वेळीं त्यापासून आपली करमणूक करून घ्यावीशी ताराबाईला वाटे; पण मौज वाटण्याऐवजीं तिला त्याची लाजच जास्त जास्त वाटत चालली. भय्यासाहेबांनीं आपल्या बहिणीवर व आईबापांवर केलेली कठोर टीका तिला आतां जास्त खरी वाटूं लागली, व त्यामुळें असेंहि मनांत येऊं लागलें, कीं, भय्यासाहेबांनीं भाऊसाहेबांचें मन फिरवण्याचा प्रयत्न केला, तर त्यांत विशेष वावगें तरी काय होतें ?

पण सुंदरची दुःखमय अवस्था अकल्पित तऱ्हेनें एकदम नाहींशी झाली. कर्नल फडक्यांच्या पत्नीनें तिला आपणाबरोबर नगराला येऊन महिनाभर राहण्याला आमंत्रण दिलें. कर्नल फडक्यांचें नुकतेंच दोनतीन वर्षांपूर्वीं लग्न झालें होतें, व शिवदुर्गास आल्यापासून आज चार महिन्यांत त्यांच्या पत्नीची व सुंदरची तीन सबंध महिने गट्टी जमली होती. दोघींचे स्वभाव एकमेकींला आवडण्यासारखे होते, हें उघड आहे.

हें आमंत्रण आल्यामुळें सुंदर अगदीं नाचूं लागली, व आपल्या मैत्रीण फडकीचे मनांतून किती तरी आभार मानूं लागली. सीताबाईंनां किती आनंद झाला व हिरी किती खट्टू झाली, त्याचें वर्णन करणें अशक्य आहे ! हिरीला किती वाईट वाटेल त्याची बिलकूल पर्वा न करितां सुंदर घरांत एकसारखी थयथय नाचत सुटली, गडीमाणसांनांसुद्धां ती आनंदाची बातमी मोठ्यामोठ्यानें सांगूं लागली, आणि अत्यंत उल्हासानें खोखो हंसत आईशीं भावी सुखाच्या गोष्टी बोलूं लागली. दुर्दैवी हिरी बिचारी आपल्या नशिबाला शिव्या देत चंबूसारखें तोंड करून बसली. ती म्हणाली "फडकिणीनं मलाहि तसंच कां नाहीं बोलावलंन् ? काय अगदीं माझं ओझं का झालं असतं ? खरं ह्मटलं तर मी दोन वर्षांनीं धाकटी म्हणून मलाच मौज पाह्यला बोलवायची ! तिचीन् माझी इतकी गट्टी नसली म्हणून काय झालं ?"

हिरीला ताराबाई बुद्धिवाद शिकवूं लागली, व शांताक्का समाधानवृत्ति ठेवण्याला शिकवूं लागली; पण अल्लड हिरीची कांहीं केल्या समजूत म्हणून होईना. आधीं सुंदरला हें आमंत्रण आल्याचें पाहूनच ताराबाईला आईप्रमाणें अगर सुंदर प्रमाणें बरें वाटण्याच्या ऐवजीं उलट असें वाटलें, कीं, पलटण

ावदुर्गाहून गेल्यामुळें सुंदरमध्यें जी सुधारणा होण्याचा संभव असता, या आमंत्रणामुळें समूळ नष्ट झाला. म्हणून सुंदरच्या नगरला जाण्याच्या र्गांत आपण अडथळा आणूं इच्छित आहों, ही गोष्ट सुंदरच्या अथवा ातुश्रींच्या कानीं गेली असतां त्या दोघीहि आपणाला अगदीं केवळ खायला धार होतील, हें जरी ताराबाई पूर्णपणें जाणून होती, तरी तिला जाऊं ऊं नये अशी वडिलांनां गुप्तपणें सल्ला देण्याचा तिनें निश्चय केला. ताराबाईनें ानंदरावांनां लायब्ररींत एकांतांत गांठून हल्लींची सुंदरची फुशारलेली स्थिति गरला कोणी दडपणारें वडीलधारें माणूस जवळ नसल्यानें किती वाढ- ाचा संभव आहे, व नगरासारख्या ठिकाणीं रगड रिसाले असल्यामुळें ा किती मूर्खासारखी वागण्याचा संभव आहे, वगैरे गोष्टी त्यांच्या काना- र घातल्या. आनंदरावांनीं शांतपणें हें बोलणं ऐकून घेऊन उत्तर दिलें. कुठें तरी चांगली फट्फजिती होऊन हिरमुसली झाल्याशिवाय सुंद्री मला ाहीं वाटत ताळ्यावर येईलशी! नगरला बरी आयती बिन खर्चानें जाते आहे, ाथें तेवढें तरी होऊं द्या, असें मी म्हणतों!"

ताराबाई म्हणाली "पण बाबा, सुंदरच्या या अशा बेफाम वागण्यानं ापल्या सर्वांनां मान खालीं घालण्याचा जो प्रसंग येईल, इतकंच काय, ामुळं जी तशी पाळी कितीकदां तरी आजवर आली आहे ती जर तुमच्या क्षांत असली तर तुम्ही असं खास म्हणणार नाहीं!"

आनंदराव म्हणाले "काय पाळी आली आहेग? का, तुमच्यावर मन सण्यासारखे कोणी गृहस्थ सुंदरमुळें बिचकून पळाले कीं काय? अरेरे! ोण हें तारीचें नुकसान! पण हें पहा तारे, असले सहजासहजीं बिचकणारे हस्थ कुच्कामाचे नव्हत का? सांग पाहूं, काढ तुझी यादी–कोण कोण ासे बिचकून पळाले त्यांची!"

ताराबाई ह्मणाली "तसं नाहीं मी म्हणत बाबा! अमूक एक दुष्परिणाम ाला म्हणून माझा राग आहे, असं थोडंच आहे. मी आपलं एकंदरीचं ांगतें आहें. अशी जर ही हवी तिकडे भटक्या मारीत फिरूं लागली, ुणाचाहि जर तिच्यावर दाब तिनं चालूं दिला नाहीं, तर आपल्या ौकिकाला तें वाईट नव्हे का? मी जरा स्पष्ट बोलतें आहें, माफ करा; ण आपण स्वतः जर तिला जरा कह्यांत राखली नाहींत, व कांहीं तरी ादुद्योगांत काळ घालवण्या ऐवजीं असं टिवल्या बावल्या करीत हिंडणं

तुम्हाला खपायचं नाहीं असं तुम्हीं जर तिला दाखवलं नाहींत, तर हल्लींचं तिचं वय निघून गेलं म्हणजे पुढं का कधीं तिच्यांत सुधारणा होणार आहे? एकदां स्वभाव ठाम होऊन जाईल, अन् जगांत निवळ फक्कड पोषाख करून छानछोकी करीत हिंडण्यापेक्षां दुसऱ्या कशाच्याच ती उपयोगी राह्यची नाहीं. अन् असं किती दिवस चालेल? डोक्यांत अक्कल अथवा अंगांत इतर कोणताहि गुण नसल्यामुळें, एकदां अल्लडपणा निघून गेल्यावर मग कोण तिला पुसतो? मग हिरमुसली होऊन राहील झालं. बरं, आणखी आपल्या बरोबर त्या हिरीलाहि तशीच नादीं लावते. बेअक्कली, आळशी, अहंमन्य, अन् दुसऱ्याचं बिलकूल ऐकायचं नाहीं! अशानं लवकरच जग त्या दोघींनां तुच्छ मानूं लागेल असं आपणाला नाहीं कां वाटत? अन् नुसतं त्यांनांच हंसून तरी जग कसं थांबेल?"

तारी हें फार मनापासून बोलत आहे हें पाहून आनंदरावांनीं तिचा हात धरून पाठ थोपटली, व ते म्हणाले "तारे, तूं इतकी कशाला काळजी करतेस? तुझी न् शांतेची ज्यांनां म्हणून यत्किंचित् ओळख आहे त्यांनां तुमची किंमत कळलीच पाहिजे, अन् त्यांच्या दृष्टीनें तुम्हांला दोन गाढव बहिणी आहेत—दोन कां, तीनहि म्हटलें तरी चालेल—म्हणून तुमची योग्यता कधीं कमी व्हावयाची नाहीं. तूंच बघ, त्या सुंद्रीला जर नगराला मीं नाहीं जाऊं दिली, तर घरांत एक क्षणभर तरी कोणाला स्वस्थता मिळेल का? मग जाईना पिडा एकदांची! तो कर्नल फडक्या हुशार माणूस आहे, अन् अगदीं भलतेंच तिला कांहीं वागूं देणार नाहीं. शिवाय, असल्या निष्कांचन मुलीला नगरांत पुसतो कोण? तो एक लाभ आपणांला देवाच्या कृपेनें आहे म्हणायचा! तिथें ऑफिसर मंडळींनां जास्त लायख मुली भेटल्या म्हणजे इच्याकडे कोण पहातो? अन् तसें झालें म्हणजे आपण कःपदार्थ आहों हें तरी तिला नीट समजेल! शिवाय, हल्लीं आहे यापेक्षां जास्त वेडेपणा करणें तिला शक्य तरी कुठें आहे? तसें कांहीं करील तर वेडी म्हणून कोंडूनच ठेवावी लागेल!"

असल्या बोलण्यापुढें ताराबाई काय म्हणणार? पण तिचें त्यानें समाधान झालें नाहीं. जें होतें आहे तें पाहून तिच्या मनाला हुरहुर लागून वाईट वाटूं लागलें. पण फार वेळ असमाधानींत राहण्यासारखा तिचा स्वभावच नव्हता. आपलें कर्तव्य आपण करून टाकलें, आतां कांहींहि होवो,

आपण काय करणार, असा विचार मनांत लवकरच येऊन, जास्त काळ जा करीत बसण्यांत तात्पर्य नाहीं, असें तिनें ठरविलें.

लायब्ररीमध्यें बाबांचें ताराशीं काय बोलणें झालें त्याचा सुगावा जर सुंदरला किंवा सीताबाईंनां लागला असता, तर दोघीहि अत्यंत संतापल्या असत्या. कारण, आजकाल सुंदरला नगराला जाणें म्हणजे जणुं काय इंद्राच्या नंदनवनांत विहार करण्यास सांपडण्यासारखें होतें; व अशी सोन्यासारखी संधि आली असतां आपलीच बहीण त्यामध्यें खो आणण्याचा प्रयत्न करते हें तर तिला अत्यंत दुःसह झालें असतें. तिनें आपल्या कल्पनेनें नगराविषयींची इतकीं सुखमय चित्रें मनांत रंगवून ठेविलीं होतीं, कीं, त्यांची यथार्थ किंमत एक सीताबाईशिवाय दुसऱ्या कोणालाच समजणें केवळ अशक्य होतें! नगरच्या छावणीचे रस्ते, तंबू, पताका, वारंवार वाजणारीं बिगुलें, झोंकदार पोशाख घालून इकडे तिकडे हिंडणारे नानाप्रकारचे ऑफिसर्स, सकाळीं होणाऱ्या परेडी, या सर्वांची तिनें एक निराळी सृष्टिच निर्माण करून ठेवली होती; व या सृष्टीच्या केंद्रस्थानीं आपण स्वतः परीसारखी नटूनथटून एका भव्य आम्रवृक्षाखालीं ईझिचेअरवर पडलों आहों, व सभोंवतीं निदान अर्धा डझन तरी सुंदर सुंदर, तरुण, शूर आफिसर्स आपल्या दृष्टिक्षेपाची अपेक्षा करीत आपला यत्किंचित् हुकूम ऐकण्याला परस्परांशीं स्पर्धा करीत एका पायावर तयार असे उभे आहेत, असें कल्पनातीत सुरुचिर सुखस्वप्न तिला कितीदां तरी पडत असे! या सुखस्वप्नांतून ताराबाई आपणास हिसडा मारून शिवदुर्गाच्या नीरस रानांत आणून सोडण्याची खटपट करीत आहे, हें सुंदरला कसें बरें साहवलें असतें? सीताबाई तरी काय, सगळ्यांनांच तिकडे जातां येत नाहीं याचा विषाद, निदान आपली लाडकी लेंक सुंदर तरी तेथें जाते आहे एवढ्यावरच अंशतः सोसून त्या मनाची कशीबशी समजूत करून घेत होत्या!

आतां नागेशरावांची अखेरची गांठ पडण्याची ताराबाईची वेळ जवळ येत चालली. शिवदुर्गास परत आल्यापासून ते तिला बरेच वेळ भेटले होते, म्हणून आतां त्यांनां पाहून मनांत काहूर उत्पन्न होणें बहुतेक थांबल्यासारखें झालें होतें. पूर्वीं त्यांच्याविषयीं जी प्रेमभावामुळें चलबिचल मनांत सुरू होत असे, ती तर आतां निखालस नाहींशी झाली होती. इतकेंच नव्हे, तर त्यांच्या ज्या लाघवी भाषणशैलीनें प्रथम तिचें मन मोहित झालें होतें, तींत बराच भाग नाटकी आहे, अशीहि तिची अलीकडे समजूत होत चालली होती.

शिवाय, द्वारकाबाई नागपुराला गेल्यापासून नागेशरावांनीं पुनश्च आपला मोर्चा ताराबाईकडे वळविण्याचा घाट सुरू केला होता; पण द्वारकाबाईचा नाद होता त्यावेळीं आपणाकडे ते ढुंकूनहि पहातनासे झाले होते, या दोन्ही विसदृश गोष्टी लक्षांत येऊन तिचें मन जास्तच संतापत चाललें होतें. "मला हे काय निवळ खेळण्याची वस्तु समजतात अं ! किती दिवस तरी मध्यें दुर्लक्ष केलें असतां पुनः यत्किंचित् लक्ष देण्याचें सुरू करण्याबरोबर मी भाळून जाईन इतकी का हे मला वेडगळ समजतात ?" अशी कल्पना मनांत येऊन तारा त्यांच्यावर जास्तच चिडत चालली होती.

रिसाला हालण्याच्या आदले दिवशीं कर्नल फडके व इतर कांहीं ऑफिसर यांनां सीताबाईनीं आपल्या घरीं चहाला बोलावलें होतें. त्यांत नागेशरावांनांहि आमंत्रण होतें. त्या वेळीं नागेशरावांनीं सहज ताराबाईला सुवर्णपुरची कांहीं गोष्ट विचारली. पण तिच्या मनांत त्यांचा इतका झणकारा आला होता, कीं, प्रश्नाचें साधारण उत्तर देऊन ती मुद्दामच पुढें म्हणाली "सुवर्णपुरास भय्यासाहेबांबरोबर कॅप्टन बाळासाहेबहि आठ दिवस आले होते, तें मीं तुम्हाला सांगितलं का ? आपली आहे का बाळासाहेबांशीं ओळख?"

हा प्रश्न ऐकून नागेशराव चरकलेसे दिसले. पण क्षणभरानें हुशारींत येऊन ते म्हणतात " हो, मीं मागें त्यांनां बरेच वेळां पाहिलें आहे. बरे गृहस्थ आहेत ते. आपणाला कसे वाटले ते ? "

" वा, चांगला भला माणूस दिसला तो मला ! "

" किती दिवस नजरबागेंत ते होते म्हणालांत ?"

" होते आठदहा दिवस. "

" अन् आपली कधीं त्यांच्याशीं गांठ होत असे का ? "

" हो, बहुतकरून दररोज. "

" भय्यासाहेबापेक्षां ते रीतीभातीला निराळे आहेत. "

" हो, फारच निराळे. पण भय्यासाहेबांचीहि रीतभात जास्त परिचयानं सुधारत जाते ! "

" अस्सें ? वा, मग कधीं विचार—"

पण तितक्यांत झटकन् जीभ आवरून ते पुढें म्हणाले "कशांत सुधारणा झाली आहे म्हणतां ? नेहमींच्या उन्मत्तपणामध्यें आतां त्यांनीं थोडासा

शिष्टाचार शिरकवला आहे वाटतें ! कारण, मूळच्या जन्माच्या अस्सल गुणावगुणांत आतां बदल होण्याची मला तर आशा नाहीं ! ”

ताराबाई म्हणाली “ छे छे ! मूळच्या गुणावगुणांत तफावत कांहीं झाला नाहीं. ते पहिल्यापासून होते तस्सेच अगदीं आहेत ! ”

या दुटप्पी शब्दांचा काय अर्थ करावा, तें नागेशरावांनां समजेना. ते मोठ्या बुचकळ्यांत पडले. ताराबाईच्या या शब्दांपासून हर्ष मानावा कीं शंका घ्यावी, तें त्यांच्या नक्की लक्षांत येईना. ही पुढें काय बोलणार त्याची त्यांनां धास्ती वाटलीशी दिसली. ताराबाई पुढें म्हणाली “ जों जों परिचय होतो तों तों त्यांच्यांत सुधारणा झालेली दिसते असं मी म्हणालें, याचा अर्थ असा नाहीं, कीं, अलीकडे त्यांनीं आपल्या आचारविचारांत कांहीं सुधारणा घडवून आणली आहे ! माझ्या बोलण्याचा हेतु असा आहे, कीं, जों जों त्यांच्याशीं जास्त दळणवळण होत जातं, तों तों त्यांच्या स्वभावाची जास्त खरी पारख होत जाते. ”

आतां तर नागेशरावांची तिरपीटच उडालीशी दिसली. कित्येक मिनिटें ते गप राहिले; पण अखेर उसनें धैर्य आणून म्हणाले “ ताराबाई, माझा अभिप्राय भय्यासाहेबांविषयीं काय आहे, तो तुम्हाला पूर्णपणें माहीतच आहे. शिष्टाचारसंपन्नतेचें नुसतें उसनें पांघरूण घ्यावें इतकी जरी त्यांनां सद्बुद्धि उत्पन्न झाली असली, तरी मला त्यांत बरेंच वाटेल, हेंहि तुम्हाला ठाऊकच आहे. आपल्या खुनशी हट्टीपणामुळें माझ्या बाबतींत त्यांनीं जसा नीचपणा केला, तसा नीचपणा दुसऱ्यांदां कोणाशीं करूं नये इतकें त्यांनां निवळ स्वाभिमाना ळें तरी शिकण्यासारखें आहे. पण हें शिष्टाचाराचें पांघरूण बहुतकरून मामींनां खुषी करण्याकरितां चढवलेलें असावेंसें दिसतें आहे. आपल्याविषयीं मामींचा अनुकूल अभिप्राय व्हावा अशी भय्यासाहेबांची सदोदित इच्छा असे. कारण त्यांच्या लेंकीचें डबोलें हातीं लागावें हा एक मोठा हेतु राजश्रींच्या मनांत वस्ती करून आहेना ! ”

या भाषणाला यथायोग्य असं खरपूस उत्तर ताराबाईच्या अगदीं जिभेवर आलें होतें. पण आपल्या घरीं चार मंडळी जमली आहे, त्यांत उगाच भांडणतंडण कशाला, अनायासें ही ब्याद निघून जाते आहे, असा पोक्त विचार करून तिनें महत्प्रयासानें जीभ आवरून धरली, व नुसतं स्मित करून वेळ मारून नेली. त्यांनींहि पुनः तिच्याशीं कांहीं बोलण्याचा प्रयत्न

केला नाहीं. त्यामुळें वरकरणीं सुखास्नेहानें ती भेट शेवटास गेली. पण पुनः कधीं एकमेकांची भेट व्हावी अशी दोघांनांहि बिलकूल इच्छा राहिली नाहीं.

मंडळी घरोघर जाण्यास निघाली, तेव्हां त्यांच्याबरोबर सुंदरहि कर्नल फडक्यांच्या घरीं गेली. कारण, दुसऱ्या दिवशीं मोठ्या पहांटेस रिसाला कूच करणार होता. सुंदरनें घरांतल्या मंडळीचा निरोप प्रेमपूर्वक म्हणण्यापेक्षां रगडशी गडबड उडवून घेतला. हिरीच्याच फक्त डोळ्यांतून गंगायमुना वाहूं लागल्या; पण त्या वियोगदुःखामुळें नसून मत्सर व चिडखोरपणा यामुळेंच उत्पन्न झाल्या होत्या. सीताबाईनीं पुनः पुनः लेंकीला आर्जवून सांगितलें, कीं, "सुंदरबाळ, मोठ्या गमतीनं वेळ घालवायला अगदीं मागं पाहूं नको. अन् मनाला सडकून करमणूक होऊं देत जा बरं!" हा उपदेश मात्र सुंदरच्या मनांत पूर्णपणें बिंबण्यासारखा होता; व निरोप घेण्याच्या गडबडींत थोरल्या दोघी बहिणींनीं जे काय उपदेशाचे चार शब्द सांगितले ते तिच्या कानावरहि पडले असतील कीं नाहीं याची शंकाच आहे !

---

## प्रकरण बेचाळिसावें.

### मामामामींबरोबर प्रवास.

दांपत्यसुखाची अथवा गृहसौख्याची ताराबाईची कल्पना जर निवळ घरांत तिच्या नजरेस दररोज पडणाऱ्या मासल्यांवरूनच फक्त असती, तर ती मोठीशी उज्ज्वल अथवा सुखमय झाली असती, असें नाहीं. आनंदरावांचा विवाह होऊन पंचवीसांवर वर्षें आतां होऊन गेलीं होतीं. अर्थात्च त्यांच्या विवाहकालीं प्रौढविवाह फारसे प्रचारांत आले नव्हते. त्यांच्या वडिलांनीं चिरंजीव वीस वर्षांचे झाल्याबरोबर त्या वेळच्या साधारण पद्धतीप्रमाणें एक चांगलीशी मुलगी पाहून व तिचें घराणें ठीक आहे वगैरे गोष्टींचा विचार करून त्यांचें तिच्याशीं लग्न लावून दिलें होतें. वडिलांनीं आपणाकडून पुष्कळ खबरदारी घेऊन शक्य तेवढी सावधगिरी ठेवली होती. मुलगी उत्तम गौरवर्ण असून हजारपांचशें मुलींत देखणी म्हणतां येईल अशी होती. त्या वेळच्या सामान्य रीतिप्रमाणें सीताबाईचें मराठी शिक्षण साधारण बरें झालें होतें; अर्थात् नेहमींच्या मोजक्या व ठराविक प्रश्नांचीं उत्तरें तिनें खडाखड दिलीं. आणि यापेक्षां आनंदरावांच्या वडिलांनां मुलीसंबंधीं जास्त कसोशी करीत बसण्याचें प्रयोजनच नव्हतें ! व्याहीहि चांगला

नांवलौकिकवान्, कुटुंबवत्सल असा असून, वधूवरांची पत्रिका वगैरेहि उत्तम जुळली होती. अशा तऱ्हेनें शक्य तितकी चिकित्सा करून आनंदरावांचें लग्न झालें, व आपण आपल्या मुलाला दांपत्यसुखाचा लाभ होण्याची उत्तम तरतूद करून ठेवीत आहों, असें म्हाताऱ्याला साहजिकच वाटलें असावें; परंतु जोशीबुवांनीं तयार केलेल्या वधूवरांच्या कुंडलींत खडाष्टक दृष्टीस पडलें नव्हतें, तें पुढें वधूवरांचा संगम होऊन एकत्र संसार थाटण्याची सुरुवात केल्यापासून दोनतीन वर्षांतच पूर्णपणें दृग्गोचर होऊं लागलें. आनंदराव कसला महा छट! त्याला दुसऱ्याचा जेव्हां तेव्हां उणेपणा ओळखून त्याची चेष्टा करून पोटभर हंसण्याची कोण अनिवार हौस, व मर्मभेदी विनोद करण्याची त्याची कोण अजब शैली! असल्या मार्मिक व हुशार पुरुषाला जर जबाबाला सवाई जबाब देणारी स्त्री प्राप्त झाली नाहीं, तर त्याचें कसें समाधान होणार? जों जों सीताबाईशीं आनंदरावांचा सहवास होऊं लागला, तों तों त्यांच्या अंगचा अचरटपणा व बुद्धीचा जडपणा त्यांन्या जास्त जास्त अनुभवास येऊं लागला; व विवाहबाजारांतून आपण भुसकालड्डु मिळवून आणला कीं काय, अशी त्यांनां शंका येऊं लागली. प्रथम प्रथम स्त्रीजातीच्या नैसर्गिक भिडस्त स्वभावावर अगर अल्लडपणावर अथवा भित्रेपणावर वेळ मारून कशी तरी साजरी होऊन गेली, पण अशानें किती दिवस भागणार! दिवसेंदिवस आनंदरावांची खात्री होत चालली, कीं, निव्वळ बाह्य स्वरूपाला भुलून आपल्या वडिलांनीं स्वतः फसून जाऊन आपल्याकरितां एक मठ्ठ डोक्याची, कोत्या समजुतीची, डामडौलाची हांव असणारी, व आळसांत काळ घालवण्यांत सुख मानणारी अशी सहधर्मचारिणी पसंत केली, व आतां आपणाला सगळा जन्म असल्या आपल्या आवडीनिवडीशीं अगदीं विसंगत अशा आवडीनिवडीच्या स्त्रीशीं घालवावा लागणार! ही जाणीव मनांत उत्पन्न होतांच आनंदरावांला फार विषाद वाटला, हें उघड आहे. पण ते उद्योगवादी असल्यामुळें त्यांनीं वस्तुस्थिति सुधारण्याचा निश्चय करून अतोनात खटपटहि चालविली. आपल्या बायकोला चांगलीं चांगलीं पुस्तकें वाचण्याकरितां आणून देऊन तीं तिनें वाचून आपली बुद्धि सुसंस्कृत करावी अशा हेतूनें त्यांनीं महत्प्रयास केले. इंग्रजी वाङ्मय वाचून त्यांच्या स्वतःच्या मनाला जी सहृदयता आली होती तिचा रसास्वाद आपल्या पत्नीलाहि मिळावा म्हणून, त्याचप्रमाणें शांतिसदनाची इष्टेट हातीं आल्यामुळें घरांत

सर्व तऱ्हेची सुस्थिति प्राप्त झाली असल्यावरून, आपल्या पत्नीला इंग्रजी शिकविण्याचीहि घरच्याघरीं त्यांनीं उत्तम तजवीज करून दिली होती. पण जन्मतः आळशीपणांत काळ घालविण्याची लालसा असणाऱ्या सीताबाईंनां या सर्व गोष्टांमध्यें मनाला आल्हादकारक असें कांहींच न दिसतां केवळ जुलमाचा रामराम याप्रमाणें त्या त्यांनां लेखूं लागल्या; व जों जों आनंदराव आग्रह करूं लागले, तों तों सीताबाईची भावना या सर्व गोष्टींच्या उलट होत चालली. आनंदरावांनां अखेर चारसहा महिन्यांतच अशी खात्री वाटून चुकली, कीं, जास्त आग्रह करण्यापासून इष्टफलप्राप्तीची किंचित्‌हि आशा नसून त्यापासून एकमेकांमध्यें वैषम्य मात्र वाढण्याचा संभव आहे. तेव्हां त्यांनीं केवळ नाइलाजानें आपला नाद सोडून दिला.

आनंदरावांनीं तो नाद सोडून दिला खरा, पण त्या घटकेपासून बायकोवरचें त्यांचें मनहि उडून गेलें. सीताबाईविषयीं त्यांचा आदर, अभिमान अथवा विश्वास हीं सारीं एकदम नाहींशी झालीं. कोणच्या वेळीं ही काय बोलेल, अथवा काय अचरटपणाची कल्पना डोक्यांत घेऊन वेडगळ वर्तन करील, याचा त्यांनां भरंवसा राहिला नाहीं. अर्थात्, असल्या माणसाविषयीं आदर अथवा अभिमान बाळगणें केवळ अशक्य होऊन गेलें. दांपत्यसुखाची जी त्यांची अत्यंत उज्ज्वल महत्त्वाकांक्षा होती ती पार नष्ट झाली, व केवळ पशूंप्रमाणें एकमेकांच्या संगतींत राहून संसार करावयाचा, यापलीकडे त्या संसारांत जास्त कांहीं राम आहे असें त्यांनां वाटेनासें झालें. या समजुतीमुळें त्यांचें मन अत्यंत खट्टू होऊन गेलें. सीताबाईचें नशीब उत्तम, म्हणूनच केवळ या विषण्णपणाच्या भरांत आनंदरावांनां इतर अश्लाघ्य गोष्टींपासून आपल्या असंतुष्ट जीवाची शांति करून घेण्याची इच्छा होण्यासारखा दुःस्वभाव परमेश्वरानें दिला नव्हता. आपल्या प्रत्यक्ष संसारांत जें सुख मिळणें दुरापास्त झालें, त्याची भरती होण्यासाठीं सरस्वतीच्या साम्राज्यांत स्वच्छंदपणें विहार करून विद्यानंदासारख्या ब्रह्मानंदाच्या रसास्वादांत आपली काळक्रमणा करण्याचा त्यांनीं निश्चय केला; व आज पंधरावीस वर्षें एक उत्तम ग्रंथ लिहिण्याच्या खटपटींत ते सदैव गढून गेलेले असत. आपल्या पत्नीपासून इतर सौख्याची अपेक्षा करण्याचें सोडून देऊन, केवळ तिच्या अज्ञानाची अगर अचरटपणाची मनसोक्त चेष्टा करून आपल्या विनोदी स्वभावाचें रंजन करून घ्यावयाची संधि मात्र ते कधींहि वायां दवडीत नसत. व एकदां त्यांत आनंद

मानण्याची संवय झाल्यामुळें, आतां सीताबाईच्या पांची मुली ह्या वडिलांचा मर्मभेदी विनोद समजण्याइतक्या मोठ्या झाल्या होत्या तरी, ती संवय सोडणें त्यांनां अशक्य झालें होतें.

अशा तऱ्हेनें वडिलांनीं आपणां सर्वांच्या देखत आपल्या आईची चेष्टा करणें गर्हणीय होय, हें ताराबाई पूर्णपणें ओळखून होती, व त्यामुळें तिला नेहमीं वाईटहि वाटत असे. पण वडिलांनां आपण अक्कल शिकविण्याचा प्रयत्न करणें हेंहि तिच्या दृष्टीनें तितकेंच गर्हणीय होतें. शिवाय, आपले सर्व गुण तंतोतंत उतरलेली अशी ही एकटीच आपली लेंक आहे, अशी खात्री वाटल्यावरून ताराबाईवर आनंदरावांची अत्यंत प्रीति होती त्यामुळें, व त्यांच्या डोक्यांतल्या हुशारीची व त्यांच्या मनाच्या सुसंस्कृतपणाची तिला पुरी किंमत कळत असल्यामुळें त्यांच्या या दोषाकडे ती काणाडोळा करण्यास तयार होई. आपल्या स्वतःची प्रतिमा ज्याप्रमाणें तारी, त्याचप्रमाणें आपल्या बायकोची जर कोणी प्रतिमा असेल तर ती सुंदरी होय अशा दृढ समजुतीवरून, मातुश्रींची सुधारणा करण्याच्या प्रयत्नांस जें अपयश आलें त्याचीच द्विरुक्ति सुंदरीच्या बाबतींत खास होणार या खात्रीनें, त्यांनीं ताराबाईच्या इतक्या आग्रहाच्या विनंतीलाहि मान देण्याचें मनांतसुद्धां आणलें नव्हतें. पण हें इंगित ताराबाईच्या जन्माच्यापूर्वीचें असल्यामुळें तिला तें कसें समजणार ! तिला नेहमीं वाटे, कीं, लेंकींचा उच्छृंखळपणा दुरुस्त करण्याचा आपले वडील करावा तितका प्रयत्न करीत नाहींत. तसा ते प्रयत्न करतील तर त्यांनां पुष्कळ यशःप्राप्ति होईल असेंहि तिला नेहमीं वाटत असे. परंतु विशेष उच्छृंखळ काय ती सुंद्री, आणि ती तर आपल्या मातुश्रींचा केवल जीव कीं प्राण ! तिच्यामागें जर आपण एकादी अभ्यासाची वगैरे जाचणी सुरु केली, तर मातुश्रींची फूस असल्यामुळें सुंद्रीला तादृश लाभ न होतां, विनाकारण आपल्या प्रियपत्नीच्या रोषास मात्र आपण कारण होऊन बसूं, या पोक्त समजुतीवर आनंदराव कांहींएक प्रयत्न न करतां स्वस्थ लायब्ररींत पडून रहात असत !

शिवदुर्गांतून रिसाला निघून गेला त्यांत नागेशरावहि चालते झाले, यापेक्षां जास्त समाधान मानण्याचें कारण ताराबाईला सांपडलें नाहीं. आतां पूर्वीप्रमाणें मंडळी फारशी जमेनाशी झाली. क्लबालाहि रिसाला असे-पर्यंत जास्त भरभराट आली होती तीहि नाहींशी झाली. पूर्वीप्रमाणें

गप्पागोष्टी करण्याला मालतीसारखी समजूतदार मैत्रीणहि अंतरली. घरांत शांताक्कांशीं बोलायचें तर पदोपदीं जपून बोलावें लागे. कारण, एकादवेळीं चुकून एकाद दुसरा शब्द तोंडांतून गेला, तर तिला भय्यासाहेबांच्या पत्रांतल्या इतर गोष्टी सांगाव्या लागतील ही भीति असे. घरांत हिरीची एकसारखी धुसफूस व मातोश्रींची सदोदित इतकी पिरपिर चाले, कीं, त्या घरांत पूर्वीप्रमाणें उल्हास कोणालाच राहिला नव्हता. शांताक्काहि पूर्वीप्रमाणें आनंदी वृत्तींत असणें अशक्य झालें होतें. आनंदभुवनाची कोणींहि कोणच्याहि कारणानें गोष्ट काढली, कीं, ताराबाईच्या तीक्ष्ण नजरेला तिची मुद्रा कावरीबावरी झालेली दिसून येई. सुंद्रीच्या कक्षेंतून हिरी निघाली असल्या-मुळें कांहीं दिवस गेल्यावर ती सुधारण्याच्या मार्गांत येईल ही जरी सुखदायक आशा होती, तरी सुंदर ही अगदीं एकटीच परक्या ठिकाणीं—आणि तेंहि नगरासारख्या मोठ्या शहरीं—वडीलधारें कोणीच जवळ नसल्या-मुळें जास्त उच्छृंखल होईल, ही खाती मनाला जास्तच त्रास देत असे. एकंदरींत ताराबाईच्या पूर्णपणें अनुभवास येऊन चुकलें, कीं, जोंपर्यंत एकादी अत्यंत इष्ट वाटत असलेली गोष्ट प्रत्यक्ष घडून आली नाहीं, तोंपर्यंत ती जितकी मोहक व सुखदायक वाटत असते, त्या मानानें ती गोष्ट प्रत्यक्ष घडून आल्यावर प्राप्त होणारें सौख्य विशेष महत्त्वाचें वाटेनासें होतें. हा अनुभव ताराबाईला नवीनच आला, पण तो सार्वत्रिक आहे अशी तिची अजून समजूत झाली नव्हती. म्हणून आतां दुसऱ्या एकाद्या कोणच्या तरी इष्ट गोष्टीची कल्पना करून, व ती घडली असतां मात्र आपणास अनिर्वचनीय सुख खास होईल अशी मनाची पूर्ण श्रद्धा बनवून ठेवणें तिला अत्यंत इष्ट वाटूं लागलें. म्हणजे ती गोष्ट प्रत्यक्ष घडून येईपर्यंत तिच्या-विषयीं आशापूर्ण मनानें रोज सुंदरशा कल्पना करणें, व ती कधीं घडून येते याची अत्यंत उतावळीनें रोज मार्गप्रतीक्षा करणें, या उद्योगांत हल्लींचा तरी कंटाळवाणा वेळ मनोराज्यसुखामुळें आनंदानें जाणें शक्य होईल. ती गोष्ट घडून आल्यावर तरी पुनः फसवणूक होऊन मृगजळाप्रमाणें एकाद्या तिसऱ्याच गोष्टीच्या मागें धावावें लागेल कीं काय, हें अजून निश्चित नव्हतें. पण तो विचार करीत बसण्यापेक्षां आज कल्पनासुखाला रगड अवसर सांपडेल, अशी गोष्ट म्हणजे मामामामींच्याबरोबर डिसेंबरांत पंजाबकाश्मीर-पर्यंत देश पाहण्यास जाण्याची होती. म्हणून घरांत कंटाळा आला म्हणजे

ती आतांशा तिकडच्या प्रांताकडील वर्णनाचीं पुस्तकें वगैरे आणवून काय काय स्थळें पाहायचीं त्यांविषयीं टांचणें करण्यांत अत्यंत आनंदानें वेळ खर्च करीत असे.

ताराबाई एकेदिवशीं मनांत म्हणाली "या प्रवासामधें शांताक्काला जर बरोबर घेतां येईल, तर ही योजना अगदीं सर्वांगसुंदर अशी बनून जाईल! पण छे! कांहीं भाग कमी आहे हेंहि एक प्रकारें ठीकच आहे. ज्याप्रमाणें गालबोट लावल्याशिवाय सुंदर चेहराहि तितका खुलत नाहीं, त्याप्रमाणें शांताक्का बरोबर येत नाहीं ही उणीव या योजनेंत आहे तेंच चांगलें आहे! खरोखरीच जर सर्वांगांनीं परिपूर्ण अशी एकादी सृष्टि कल्पनेनें निर्माण केली, तर कोणचा ना कोणचा भाग तरी तिचा ढांसळून सगळ्याचाच रसभंग होण्याची अतिशय भीति असणार. कारण, या जगांत सर्वांगसुंदर असें कांहींच नाहीं! म्हणून प्रथमपासूनच एक मोठ्या उणेपणाचें गालबोट या योजनेला मीं आपल्या मनांत लावून ठेवलेलें असल्यामुळें, आतां कोणाचीहि तिला दृष्ट लागण्याची भीति राहिली नाहीं, व त्यामुळें तरी अपेक्षित अशी सुखप्राप्ति खात्रीनें लाभेल!"

सुंदरनें जातेवेळीं सर्वांना वारंवार विस्तृतपणानें पत्रें पाठविण्याचें पुष्कळदां कबूल केलें होतें; परंतु तिचीं पत्रें फार उशीरां उशीरानें येत व तींहि अगदीं त्रोटक अशीं असत. सीताबाईच्या पत्रांत तर केवळ "आतांच आम्ही अमक्या पार्टीहून आलों, तेथें असे असे ऑफिसर मजशीं कौतुकानें बोलले; व असलीं नवीन पातळें आज दृष्टीस पडलीं, तसलीं जरूर घेतलीं पाहिजेत; त्यांना इतकी रकम लागेल, व जास्त वर्णन करणार होतें पण इतक्यांत नलिनीबाईनीं हांक मारली म्हणून पुढच्या पत्रावर तें तहकूब ठेवतें," वगैरेच मजकूर असे. नलिनीबाई म्हणजे सुंदरची जीवश्चकंठश्च मैत्रीण, कर्नल फड्क्यांची बायको. तिची तर दर पत्रांत इतकी वाखाणणी असे; कीं, ती वाचून ताराबाईला तिच्या समजूतदारपणाबद्दल जास्तच शंका येत चालली. हिरीला जीं पत्रें येत, त्यांत तर फक्त दोघींनांच कळणारे असेच किती शब्द असत, व एकंदर भाषा इतकी सांकेतिक असे, कीं, हिरीला तरी पूर्णपणें लक्षांत येत असे कीं नाहीं, हीच ताराबाईला शंका होती!

असे आणखी कांहीं दिवस गेले. शांतिसदनांत जराशी जास्त उल्हासवृत्ति दृष्टीस पडूं लागली. हिरी मावशीबाईकडे गांवांत गेली, तरी आतां

पूर्वीप्रमाणें सुंदर एकटी गेल्याबद्दल तिला रडें कोसळेनासें होण्याइतकी सुधारणा तिच्यांत झाली. सीताबाईंहि नगराला सर्वांनीं न गेल्याबद्दल फुगल्या होत्या त्या बऱ्याच निवळल्या; व पुनः दोनचार महिन्यांत जर सरकार एकादा रिसाला शिवदुर्गाच्या हवेचा उपभोग घेण्याकरितां पाठविण्याची अवकृपा करणार नाहीं, तर हिरी ऑफिसरची आठवण दिवसांतून एकादुसऱ्या वेळेपेक्षां जास्त न काढण्याइतकी सहज विसरून जाईल, अशी आशा वाटूं लागली होती.

आतां ताराबाईची मामाबरोबर प्रवासाला निघण्याची वेळ हळुहळू जवळ जवळ येत चालली, व आतां तर फक्त आठच दिवस उरले असें ती घोकीत होती, तों मामांचें पत्र आलें, कीं, "कामाच्या आकस्मिक अडचणींमुळें निघण्याची तारीख पंधरा दिवस पुढें ढकलावी लागली आहे, व पूर्वीप्रमाणें दोन महिने हिंडत राहण्याची सोय नसून फक्त एकच महिन्यांत परत यावें लागणार आहे; आणि इतक्या थोड्या मुदतींत काश्मीरापर्यंत प्रदेश स्वस्थपणानें पहाणें शक्य नसल्यामुळें फक्त आग्र्याच्या ताजमहाला-वरून हरिद्वारापर्यंत जाऊन तेथें हिमाचलाचें दर्शन घेऊनच परत येण्याचा बेत केला आहे. जातांना मात्र गुजराथेकडून न जातां माळव्यांतून झांशी-ग्वाल्हेरीवरून जाण्याचा विचार आहे." कारण, शारदामामींनीं आपलें बालपण ज्या गांवांत घालविलें होतें, तेथें पूर्वीच्या कांहीं स्नेह्यांनां भेटण्याची त्यांनां फार इच्छा होती. ही बातमी आल्यामुळें ताराबाई बरीच खट्ट झाली. कारण, पंजाब, काश्मीर केव्हां पाहीन असें तिला होऊन गेलें होतें; पण मामांच्या व्यापाराच्या वगैरे अडचणींपुढें त्यांचा तरी इलाज काय ? अर्थात्च तारा-बाईला आपलंहि समाधान करून घ्यावें लागलें. नुसतें शिवदुर्गांत विहिरीं-तल्या बेडकाप्रमाणें कोंडून राहण्यापेक्षां ताजमहाल दृष्टीस पडून हिमाचलाची अवर्णनीय शोभा पहाण्यास मिळणार, हें काय थोडें होतें ?

पण आतां हे नवे पंधरा दिवस जाणें कोण जड गेलें म्हणतां ! पण तेहि अखेर गेले ! ठरलेल्या दिवशीं मामामामी आपल्या मुलांसह शिवदुर्गाला आलीं. तेथें शांताक्काच्या देखरेखीखालीं आपलीं मुलें ठेवून तीं दोघें सर्दी प्रवासाला निघण्याचा बेत होता. मामामामी येऊन फक्त एकच दिवस तेथें राहून दुसऱ्या दिवशीं त्रिवर्ग प्रवासास निघालीं. नानाप्रकारचे देखावे पाहण्यास मिळतील, व त्यांपासून अत्यंत आनंद होईल, या खात्रीबरोबर दुसरी हीहि

आशा होती, कीं, आचारविचारांनीं आपणापेक्षांहि सरस अशा बहुश्रुत व प्रेमळ मंडळींशीं मनसोक्त गप्पागोष्टी करण्यांत सर्व वेळ गेल्यामुळें मन अत्यंत प्रसन्न होऊन जाईल.

वसंतरावांनीं प्रवासाचा कार्यक्रम कुशलतेनें आंखून टाकला होता, व व्यापारधंद्यामुळें त्यांचे ठिकठिकाणीं स्नेही ओळखी असत, त्यामुळें प्रवासांत हाल होण्याची भीति नव्हती. त्यांच्या प्रवासाचें साद्यंत वर्णन करीत बसून वाचकांनां तादृश फायदा होण्याचा संभव नाहीं. थोडक्यांत एवढें सांगितलें म्हणजे पुरे, कीं, जी. आय. पी. रेलवेनें पुणें, कल्याण, नाशिक, मनमाड-पर्यंत जाऊन, तेथून औरंगाबाद व तेथील सुप्रसिद्ध मुकबरा नांवाची ताज-महालाची हुबेहूब असलेली नक्कल, दौलताबादचा अत्यत प्राचीन व अत्यंत बळकट असा किल्ला, वेरूळचीं शेंकडों लेणीं पाहून, नंतर अजिंठ्यास जाऊन तेथलीं लेणीं व पुरातनकाळचीं रंगित चित्रें पाहून, पुनः रेलवेनें बऱ्हाणपुर, खांडवा, इंदुर, उज्जयिनी, भोपाळ, सांची, भिल्सा वगैरे पाहून ललितपुरावर मंडळी उतरली. येथून सहा मैलांवर शारदाबाईची बाळपणची मंडळी चटणीस होती, त्यांनां भेटण्याकरितां जाऊन तेथें दोन दिवस मुक्कामहि ठरलेला होता; व पलीकडे सुप्रसिद्ध चंदेरीहि पहाण्यास जावें न जावें असा विचार चाललेला होता. शारदामामींच्या चटणीपासून कांचनगड फक्त चार मैल होता. कांचन-गड म्हणजे बिनीवाल्यांचें मुख्य गांव होय. येथेंच आजपर्यंत शेंकडों वेळां ऐकण्यांत आलेला भय्यासाहेबांचा दिलबहार नांवाचा महाल बांधलेला होता. चटणी गांवीं गेल्यावर तेथील लोकांनीं "दिलबहार अवश्य पाहिल्यावांचून राहूं नका! तुम्हीं शेंकडों महाल व इमारती पाहिल्या असतील व अजूनहि पहाल, पण दिलबहारची खुमारी क्वचित्च इतर कोठें दृष्टीस पडेल!" असा अतिशय आग्रह केला. शारदाबाईनांहि तो विचार रुचूं लागला व त्या ताराला म्हणाल्या "आपण उद्यां सकाळीं जाऊंया दिलबहार पाहयला. आज-पर्यंत कितीकदां तरी तूं त्याचं नांव ऐकते आहेस. इतकं जवळ आल्या-सारखं पाहून गेलेलं काय वाईट ? नागेशरावांचं बाळपण तिथेंच गेलं आहे हें तुझ्या लक्षांत असेलच!"

ताराबाईला फार वाईट वाटूं लागलें. नागेशरावांबद्दल तिच्या मनांत घडून आलेली क्रांति शारदाबाईनां कशी माहीत असणार? शिवाय, दिलबहारच्या मालकाशीं जो तिचा खटका उडाला होता तोहि तिला बिलकूल ठाऊक

नव्हता. आपण दिलबहारला जाणें अत्यंत गैर आहे, असें ताराबाईचें मन तिला सांगूं लागलें; परंतु खरें कारण सांगण्याची सोय नसल्यामुळें उडवाउडवी करण्याखेरीज दुसरा मार्ग नव्हता. " काय इमारती पुष्कळ पाह्यल्या, ताजमहालापुढें साऱ्या यःकश्चितूच. मग उगाच वांकडं जाण्यांत मला नाहीं तात्पर्य दिसत !" असें ती म्हणाली. पण शारदाबाईनीं तिला झटकन् मोडून काढलें त्या ह्मणाल्या " वेडीच आहेस ! महालापेक्षां तेथली आसपासची शोभा खरोखरीच अवर्णनीय आहे असं मलासुद्धां आठवतं आहे. म्हणून मला तरी जावंसं वाटतं. "

ताराबाई यापुढें काय बोलणार ? भय्यासाहेब जर तेथें असले तर आपणाला पश्चात्ताप होऊन त्यांच्या मार्गांत मुद्दाम आपण होऊन पडलों, असें त्यांनां खास वाटेल, व तसें वाटणें ताराबाईला अर्थातूच अत्यंत तिरस्करणीय होतें. तसा प्रसंग आपणावर येण्यापेक्षां खरें कारण शारदामामींच्या कानांत एकदां सांगून आपली मोकळीक करून घ्यावी लागली तरी बेहेत्तर, असा तिनें निश्चय ठरविला. पण होतां होईल तोंवर आपली गुह्य गोष्ट उघडकीस न आणतां भागेल तर फारच उत्तम; म्हणून तिनें आग्रह करणाऱ्या गृहस्थास सहज एकीकडे विचारलें " दिलबहारचे मालक हल्लीं कुठें आहेत ? ते जर असले तर उगाच त्यांनां अडचणींत कशाला घाला ? " पण त्या गृहस्थानें चटकन् म्हटलें " ती नको काळजी ! मंडळी सारी पुण्यास आहेत. फक्त शिपाईप्यादे व कारकून मंडळी तेवढी आहे, व ती फार संतोषानें सारा महाल नेहमीं आल्यागेल्याला दाखवते ! " या माहितीनें ताराबाईच्या उरावरचें मोठें दडपण उचललें, व रात्रीं जेवणानंतर पुनः गोष्ट निघतांच, आपली हरकत नसल्याचें तिनें खुषीनें मामींनां सांगितलें. म्हणून पहांटे उठून दिलबहारला जाऊन येण्याकरितां टांग्याची व्यवस्था करण्यास वसंतरावांनीं आपल्या चाकरास हुकूम दिला.

---

## प्रकरण त्रेचाळिसावें.

### दिलबहार.

पहांटे उठून चहापाणी लवकर उरकल्यावर वसंतराव पुढें टांगेवाल्याजवळ व दोघीजणी मागें, अशी मंडळी दिलबहारकडे जाण्याला निघाली. टांगेवाल्याला पुरी माहिती होती, ती तो रस्त्यानें सांगत होता. दोन मैल गेल्यानंतर

कांचनगडची शीव लागली. तेथून भय्यासाहेबांच्या टापूंत आपण आलों, असें समजून ताराबाईच्या मनाची थोडीशी चलबिचल सुरू झाली. खुद्द दिलबहार अजून दिसूं लागला नव्हता. रस्त्याच्या दोन्ही बाजूंला हिरवींगार झाडें हारीनें लावलीं होतीं. अर्धा मैल चढ चढून टांगा जात होता. ताराबाई मागें वळून पुढचा देखावा मधून मधून पाही, व मागच्या मागच्या बाजूचा देखावा तर एकसारखा तिच्या डोळ्यांसमोर होता. चढाच्या माथ्यावर पोंचतांच तेथून पुढें इतका मोहक देखावा दिसला, कीं, वसंतरावांच्या तोंडून आश्चर्याचे उद्गार एकदम बाहेर पडले, व दोघीजणी पुढें पाहूं लागल्या. आतां थोडासा उतार असून पलीकडच्या चढणीच्या माथ्याजवळ दिलबहारची भव्य इमारत दिसूं लागली. दगडांनीं बांधून काढलेलीं घुमटें चारी बाजूंला उंच उभीं असलेलीं प्रथम दिसलीं, व त्यांच्या मागेंच जणूं काय एक लतापल्लवांनीं आच्छादलेली टेंकडी महालाच्या संरक्षणाकरितां जय्यत तयार आहे, असा भास होई; पण ती टेंकडी सहा मैलांवर आहे, असें टांगेवाल्यानें सांगितलें. दिलबहारच्या उजव्या बाजूनें एक लहानशी नदी वाहत होती, तिला पुढें बंधारा घातलेला असल्यामुळें तिचें पात्र बरेंच विस्तीर्ण झालें होतें, व नदीच्या कांठापर्यंत विस्तीर्ण बगीचा होता. ही सर्व शोभा दुरून इतकी आल्हादकारक दिसूं लागली, कीं, सर्वांच्याच तोंडीं प्रशंसापर उद्गार येऊं लागले. अशा वेळीं ताराबाईला क्षणभर वाटलें, कीं, असल्या प्रदेशाची स्वामिनी होणें ही केवळ यःकश्चित् गोष्ट खास नव्हे!

उतार संपतांच पूल लागला. तो ओलांडून पुनः चढ चढून अखेर टांगा बगीच्याच्या थोरल्या फाटकाशीं आला. येथें मोठा लोखंडी नक्षीचा दरवाज़ा असून तो आतां बंद होता. पायीं जाणारांनां दोन्ही बाजूंला लहान लहान दिंड्या होत्या. दरवाजावर एक लहानशी टुमदार देवडी होती, तेथला शिपाई टांग्याचा आवाज ऐकल्याबरोबर नीटनेटका पोषाख करून पुढें आला, व अत्यंत लवून सलाम करून पाव्हण्यांची इच्छा कळून येतांच त्यानें झटकन् दरवाजा उघडला व टांगा आंत सोडला. आतां तर आंतमध्यें सुंदर बगीचाच लागून राहिलेला दिसूं लागला. ठिकठिकाणीं लोखंडी बांकें मांडलेलीं होतीं, मधूनमधून लहानलहान तळीं असून त्यांत सोनेरी व तांबडे मासे सोडलेले होते, ते टांगेवाला ठिकठिकाणीं टांगा उभा करून दाखवूं

लागला. अशा तऱ्हेनें दहापंधरा मिनिटें टांगा चालल्यावर खुद्द दिलबहारच्या थोरल्या भव्य पायऱ्यांशीं टांगा उभा राहिला.

आंतून कारकून पुढें येऊन त्यानें यांचें नम्रतापूर्वक स्वागत केलें. मालक मंडळी खरोखरच हल्लीं येथें नाहींतना ? हा भीतिदायक प्रश्न आतां ताराबाईच्या जिभेवर किती वेळ तरी उभा होता; पण विचारण्याचा तिचा धीर होईना. दहा पायऱ्या चढून जाण्याइतका चबुत्रा उंच होता. त्या पायऱ्या चढून गेल्यावर आंत प्रथम एक मोठें दालन लागलें. तेथें कारकुनाची म्हातारी आई, बाया आलेल्या पाहून त्यांजकडे येऊन "चला मी तुम्हांला सगळं नीट दाखवतें," असें म्हणाली, व कारकून बाहेरच्या आपल्या लहानशा ऑफिसांत वहीची तपासणी करीत बसला. म्हाताऱ्या माणसांनां भारी बोलायला आवडतें असें म्हणतात, त्याची उत्तम साक्ष पटवणारी ती आजीबाई होती. ती मराठी उत्तम बोले, व पुण्याकडची मंडळी आली आहेत असें कळतांच तर तिला आनंद होऊन तिच्या तोंडाची अशी गाडी सुरू झाली, कीं, या त्रिवर्गांनां प्रश्न विचारण्याला तिनें जरूरच पडूं दिली नाहीं. आंतील नानाप्रकारचीं उंच व प्रशस्त दालनें दाखवून प्रत्येकाचे उपयोग सांगत ती चालली होती. बहुतकरून प्रत्येक दालन पाहून झाल्यावर खिडक्यांतून बाहेरचा देखावा किती मजेदार दिसतो तो दाखविल्यावांचून ती रहात नसे. बहुतेक दालनांतून फार आल्हादकारक शोभा दिसत असे. दालनांतील सामानसुमान सुव्यवस्थित रीतीनें मांडलेलें असून तें दालनाला साजेल असें होतें. ठिकठिकाणीं सुंदर चित्रें भिंतीवर टांगलेलीं होतीं. दर दालनांत बहुतकरून दोन तीन तरी माणसाच्या उंचीचे बिलोरी आरसे अशा तऱ्हेनें लावलेले असत, कीं, त्यांच्या योगानें दालन जास्तच भव्य दिसे. सुवर्णपुरच्या नजरबागेतल्यापेक्षां येथें सामानसुमानाची मांडणी जास्त चतुराईनें केली आहे असें ताराबाईला स्पष्ट वाटलें. लायब्ररीच्या भव्य दालनांत चारहि बाजूंनां उंच उंच कपाटें लावून त्यांत उत्तम प्रकारचीं बाइंडिंग केलेलीं हजारों पुस्तकें नीट व्यवस्थेनें ठेविलीं होतीं. मध्यें ठिकठिकाणीं आरामखुर्च्या व इतर नानातऱ्हेच्या खुर्च्या ठेविल्या होत्या. दोनतीन ठिकाणीं लिहिण्याच्या सामानाची जय्यत तयारी होती. एका टेबलावर मराठी व हिंदी भाषेंतलीं मुख्य वर्तमानपत्रें व मासिक पुस्तकें ठेविलेलीं होतीं. दुसऱ्या एका टेबलावर इंग्रजी साप्ताहिक व इतर सचित्र वृत्तपत्रें होतीं. तें सर्व पाहून या लायब्ररीची

कीर्ति आपण कमलिनीच्या तोंडून आनंभुवनांत ऐकल्याची ताराबाईला आठवण झाली. ती गालांतल्या गालांत हंसत आपणाशीं म्हणाली "या सगळ्यांची मी आज मालकीण असूं शकलें असतें! आज तिऱ्हाइताप्रमाणें न पाहातां मी कधींच येथली यजमानीण बनून जाऊन या आजीबाईवर हुकूम चालविला असता, व आज माझ्या मामामामींचें अत्यंत आनंदपूर्वक स्वागत केलें असतें–पण छे, कोण मी चूक करतें आहें! मामामामींचें या महालांत स्वागत? त्यांचा तर विटाळहि भय्यासाहेबांनां खपला नसता! मग मी त्यांचें आदरातिथ्य कसें करणार?"

ही कल्पना डोक्यांत येतांच तिला अमळ बरें वाटूं लागलें. मामामामी येथें येऊं शकणार नाहींत मग तेथील वैभवाचा लाभ होण्यांत आपल्याला सुख तरी कसलें होणार होतें? तितक्यांत तिच्या डोक्यांत पुनः प्रश्न आला, कीं, मालक खरोखरच येथें नाहींना? पण आपण तो प्रश्न करणें तिला भीतीचें वाटूं लागलें. कांहीं वेळानें मामांनीं इंग्रजी वृत्तपत्राचे ताजे अंक टेबलावर पाहून ताराबाईला पाहिजे होता तोच प्रश्न केला. "हे ताजे अंक टेबलावर कां मांडून ठेवले आहेत? मालक तर पुण्यास आहेत ना?"

आजीबाई म्हणाली "हो, पण हीं रोजचीच पद्धत आहे. नवा अंक आला, कीं, जुना फैलीला लावून नवा टेबलावर मांडायचा. मालक इथें असोत वा नसोत, हा रोजचा क्रम चाललाच पाहिजे. शिवाय मालक व त्यांची स्नेही मंडळी उद्यां सकाळींच इथें येणार आहेत."

तें ऐकतांच ताराबाई मनांत हर्ष पावून म्हणाली "बरं बाई परमेश्वरानं एक दिवस आधींच आम्हांला इथें आणलंन्!"

दुसऱ्या एका मध्यमशा दालनांत चालत असतां शारदामामींनीं भिंतीवरील एका चित्राकडे पहाण्याला ताराला सांगितलें. इतर चारसहा फोटोंमध्यें नागेशरावांचा लहानसा फोटो होता, व तो तुला कसा पसंत आहे म्हणून तिनें ताराला विचारलें. आजीबाई लगेच सांगूं लागल्या "हा कनई मागें येथले दिवाणजी गडबोले होते त्यांचा मुलगा नागेशराव! भय्यासाहेबांच्या वडलांचा त्याच्यावर भारी लोभ असे. अलीकडे हे नागेशराव पलटणींत ऑफिसर बनले आहेत. पण भारी बिघडले आहेत म्हणून सारीं सांगतात–"

मामींनीं चोरून हंसत ताराकडे पाहिलें–पण ती कशाला तें समजते आहे! तेथल्याच जवळच्या दुसऱ्या फोटोकडे बोट दाखवून आजीबाई म्हणाली

" अन् हे आमचे मालक भय्यासाहेब बरं ! पण फोटो घेतल्याला आतां सातआठ वर्सं झालीं असतील. "

शारदाबाई म्हणाली "हो, मी पुष्कळ तुमच्या मालकांची कीर्ति ऐकली आहे. पण ही आमची ताराबाई सांगेल, कीं, फोटो हुबेहूब आहे कीं नाहीं तें!"

आजीबाई म्हणाली " या मुलीला आहे का त्यांची ओळख ? "

ताराबाई किंचित् लाजली व म्हणाली " आहे थोडीशी. "

आजीबाई म्हणाली "मग तुम्हाला ते अत्यंत देखणे नाहींत का वाटत ?"

ताराबाई घोटाळून म्हणाली "हो, फारच देखणे—"

आजीबाई फारच फुशारून म्हणाली " मी तर कधीं त्यांच्यापेक्षां कोणी देखणं पाह्यलं नाहीं! पण वरतीं आरसे महालांत त्यांची तुम्हाला मोठी थोरली रंगीत तसबीर दिसेल. ही खोली त्यांच्या वडिलांची आवडती होती. म्हणून त्यांच्या वेळचं सामानसुमान न हलवतां जसंच्या तसंच ठेवलेलं आहे. "

ताराबाई मनांत म्हणाली " तरीच नागेशरावांची तजबीर अजून इथें आहे ! "

नंतर वरच्या मजल्यावर पिक्चरगॅलरींत गेल्याबरोबर समोरच सरला-देवीची म्हणून आजीबाईंनीं थोरली तजबीर दाखविली व त्या म्हणाल्या " ही तजबीर काढली तेव्हां त्या आठनऊ वर्सांच्या होत्या. "

वसंतरावांनीं विचारलें " याहि भावासारख्या खुपसुरत आहेत का ? "

आजीबाई म्हणाली " हें काय विचारावं! अत्यंत खुपसुरत ! अन् अशा उमद्या स्वभावाच्या आहेत म्हणतां, दिवसभर हंसतखेळत गाणीं म्हणत असतात. शेजारच्या त्यांच्या खोलींत परवांच त्यांच्याकरितां भावानं मुंबई-हून केवढा थोरला बाजा पाठवून दिला आहे. त्या उद्यां येणार आहेतच."

वसंतरावांनीं पाहिलें, कीं, भावाबहिणींची सडकून स्तुति केलेली या आजी-बाईला आवडते. त्यावरून ते म्हणाले " तुमचे मालक इथें बरेच दिवस राहतात का पण ? "

आजीबाई म्हणाली "आम्हांला हवे तितके कुठं राहतात? सध्यां अजून ते सडे आहेत, तोंवर हिंडून घेताहेत. एकदां चतुर्भुज झाले, कीं, पायांत बेडी पडलीच! मग कसे जातील ? पण इतक्या वैभवाला शोभेल अशी देवानं कोण अन् कुठें निर्माण करून ठेवली आहे ती सांपडेल तेव्हां ना साऱ्या गोष्टी! अन् किती चांगली मिळाली तरी या दोघांची नाहीं सर यायची तिला !"

वसंतराव हंसत कौतुकानें म्हणाले "हें आजीबाई आज तुम्ही म्हणतांहां. उद्यां ती आल्यावर तिच्यादेखत असें म्हणाल का ? "

आजीबाई आवेशानें म्हणाली " मी काय खोटं म्हणतें आहे तर भिईन म्हणायला ? आमच्या भय्यासाहेबांचा भारी मायाळू स्वभाव! मी पहा त्यांच्या चौथ्या वर्सापासून त्यांनां पहातें आहें ना ? पण एक दिवस कधीं कुणाला अपशब्द बोललेले मीं नाहीं ऐकलं ! "

ही वाखाणणी मात्र ताराबाईच्या कल्पनेच्या अगदींच उलट होती. त्यांचा उर्मट व चिडखोर स्वभाव आहे व त्यामुळें ते पदोपदीं गडी माणसांनां टाकून बोलत असतील, अशी तिची पक्की समजूत होती. पण आजीबाईचे शब्द ऐकून तिला अत्यंत आश्चर्य वाटलें. ह्याच विषय जास्त चालावा अशी तिची इच्छा झाली. इतक्यांत वसंतरावहि पुढें म्हणाले " वा, हें तर फारच उत्तम! तुमच्या धन्याइतके सज्जन मालक क्वचित्‌च सांपडतात. "

आजीबाई आनंदानें म्हणाली " अलबत्, आहेतच ते तसे. असला धनी त्रिभुवनांत नाहीं मिळणार. पण हें नेहमींचंच आहे. मुलाचे पाय पाळण्यांत दिसतात म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं. लहानपणींसुद्धां जर भय्यासाहेब अत्यंत सज्जन होते, तर पुढेंहि ते तसे निघायचेच. भारी समाधानी व दयाळु."

ताराबाई चकित झाली "काय ? असे का ते आहेत?" ती मनांत उद्गारली.

शारदाबाई म्हणाली " त्यांचे वडीलहि तसेच होते म्हणतात. "

आजीबाई म्हणाली " अन् बापसे बेटा सवाई असेच भय्यासाहेब आहेत! गोरगरीबाला तर अत्यंत प्रेमळ ! "

ताराबाईला कानावर पडत असलेले शब्द खरे कसे वाटणार? आजी-बाईच्या स्तुतीचा तर एकसारखा ओघ चालूच होता. आपल्या स्वामीचें गौरव करण्यांत तिला अमृताप्रमाणें गोडी वाटत होती, हें उघड दिसत होतें.

नंतर थोरल्या भव्य जिन्यावरून दुसऱ्या मजल्यावर जातांना वसंतराव ताराबाईकडे वळून सहज हळूच म्हणाले "हें पहा, नोकरींत असेपर्यंत धन्याची वाखाणणी नोकरानें केलीच पाहिजे ! "

पण तें बोलणें आजीबाईच्या तीक्ष्ण कानांत चटकन् शिरलें व ती एकदम म्हणाली " माझं तुम्ही सोडून द्या बोलणं. पण आसपास त्यांचीं हजारों कुळं आहेत ना, वाटेल त्याला पुसून पहा, अन् माझ्यापेक्षां त्यांनीं जास्त वाखाणणी नाहीं केलीन् तर काय सांगाल तें ऐकेन ! कोणी कोणी

तिऱ्हाईत त्यांनां गर्विष्ठ समजतात; पण मला तर तसं कधींच दिसत नाहीं. इतर लोकांप्रमाणं त्यांच्या तोंडाची एकसारखी टकळी चाललेली नसते, म्हणून लोकांनां तसं वाटतं इतकंच. ”

शारदाबाई हळूच ताराबाईला म्हणाल्या “ हें वर्णन आपल्या शांताच्या बाबतींतल्या त्यांच्या वर्तनाशीं मुळींच जुळत नाहीं, नव्हे ! ”

ताराबाई गडबडून म्हणाली “ पण आपली गैरसमजूत झाली नसेल कशावरून ! ”

इतक्यांत दुसऱ्या मजल्यावरल्या एका टुमदार खोलींत सर्व गेलीं. तेथें सामान फारच नाजुक प्रकारचें व झोंकदार असें होतें. आजीबाई हंसत म्हणाल्या “ ही सर्व जुळवाजुळव नुकतीच पूर्ण झाली. सरलाताईनीं जातांना ही खोली फार पसंत असल्याचें एकदां म्हटलेलें भावाने ऐकले, तों लगच त्यांनं पहा कशी सुंदर सजवून ही खोली तयार केली आहेन्. ‘ असे बंधू नाहींत कोठें, पृथ्वीवरी ’ म्हणून सगळ्या बहिणी ओंवी म्हणतात, पण इथं मात्र ती ओंवी अगदीं अत्यंत खरी आहे. बहिणीचा प्रत्येक शब्द जसे अगदीं ते झेलीत असतात. ”

आतां फक्त पिक्चरगॅलरी व दोनचार निजण्याच्या खोल्या मात्र पहाण्याच्या राहिल्या. पिक्चरगॅलरींत नानाप्रकारचीं उत्तम व मोलवान अशीं शेंकडों चित्रें प्रदर्शनांतल्याप्रमाणें लाविलेलीं होतीं. त्यांत भय्यासाहेब व त्यांचे वडील व दुसरे चुलते, मामे वगैरे कुटुंबांतल्याहि मंडळींच्या मोठमोठ्या तेल्या रंगांत काढलेल्या तजबिरी होत्या. भय्यासाहेबांच्या तजबिरीसमोर मंडळीं कांहीं वेळ उभी होती. बाकीच्या नातेवाइकांकडे लक्ष कोण देणार ! भय्यासाहेबांची मुद्रा ताराबाईनें पुष्कळदां पाहिलेली अशीच चित्रांत होती.

त्या चित्रांतल्या माणसाविषयीं आजपर्यंत कधीं शक्य वाटले नव्हते अशा भिन्न भिन्न विचारांचें काहूर ताराबाईच्य डोक्यांत त्यावेळीं चाललें होतें. “ लहानपणापासून खडान्खडा माहित असलेल्या हुशार नोकरानें अशी वाखाणणी करावी, हें अजब आहे. बंधु, मालक, जमीनदार अशा निरनिराळ्या नात्यानं कितीक तरी भिन्न भिन्न व्यक्तींनां सुख देण्याचं अगर छळण्याचं भय्यासाहेबांच्या हातांत आहे, व इतक्या साऱ्यांनां जर त प्रिय झाले असतील, तर खरोखरीच तसे सद्गुण त्यांच्या अगा असल्यावांचून तें कसं शक्य असेल? आजीबाई केवळ खोटी इतका स्तुति कशाला करतील?

आणि असल्या सद्गृहस्थाचं आपणासारख्यावर इतकं निःसीम प्रेम बसावं यांत आपणाला किती बरं धन्यता वाटली पाहिजे ? ”

पहाण्यासारखें सर्व पाहिल्यावर मंडळी इमारतीबाहेर पडली. आजी-बाईची वसंतरावांनीं समजूत हळूच केल्यावर, मंडळीला बगीच्यावरल्या मुख्य माळ्याची भेट झाली, व “ चला आपणांला सर्व रम्य स्थळें दाखवतों ” असें ह्मणून तो पुढें चालला. दहावीस हात गेल्यावर वसंतराव मागें वळून दिलबहारची बाहेरील शोभा पाहून व तो कोणत्या काळीं बांधला असावा याविषयीं तर्क करीत महालासमोर जरासे उभे होते. ताराबाई शारदामामींशीं हळुहळू बोलत होती. इतक्यांत माळी व इतर नोकरांची चलबिचल झालेली स्पष्ट दिसूं लागली. “ काय गडबड आहे ?” ह्मणून कोणी प्रश्न विचारणार तों माळी जवळच्या गड्याला म्हणाला, “ आं, अन् सरकार कसे आत्तांच आले ? ” तितक्यांत खुद्द भय्यासाहेब घोड्यावरून येतांना दिसले, तों नोकरलोकांनीं लवून मुजरे केले. ताराबाई अगदीं थक्क होऊन गेली ! मामामामींनांहि चमत्कारिक वाटलें. दुरून त्यांनीं यांनां पाहिलेंसुद्धां. आतां त्यांनां चुकविणेंहि शक्य राहिलें नाहीं, असें ताराबाईला वाटून ती अगदीं शरमून गेली. भय्यासाहेबांनांहि अत्यंत आश्चर्य वाटलेंसें स्पष्ट दिसलें, व काय करावें तें त्यांनां मुळींच क्षणभर सुचेना. पण लगेच शुद्धीवर येऊन ते झटकन् घोड्यावरून उतरून या मंडळीकडे आले, व त्यांनीं ताराबाईचें अत्यंत शांत चित्तानें जरी नव्हे—तरी विशेष आदरपूर्वक स्वागत केलें.

ताराबाईनेंहि तितक्यांत सांवरून औपचारिक दोन शब्द उच्चारले. वसंतराव व शारदाबाई जरा मागें उभीं होतीं. शांतिसदनांतल्या सर्व मंडळींची खुशाली वगैरे विचारून झाल्यावर तिनें काय बोलावें तें तिलाहि सुचेना. या ठिकाणीं येण्यांत किती आपण मूर्खपणा केला ! हे खास समजतील, कीं, आपल्या पायांशीं लोळण घेण्याकरितां मी येथें आलें आहें. आपण इतकी घोड्याएवढी चूक कशी केली, व ती आतां निस्तरणें किती तरी अशक्य आहे, वगैरे कल्पना एकसारख्या तिच्या डोक्यांत धिंगाणा घालून विषाद उत्पन्न करीत होत्या. क्षणोक्षणीं तिला स्वतःच्या वर्तनाची जास्त लाज वाटत चालली होती. ते क्षण आपल्या आयुष्यांतले अत्यंत कष्टतम, असें तिला वाटत होतें. भय्यासाहेबांनांहि त्याचप्रमाणें पुढें काय करावें, काय

बोलावें,तें बिलकूल लक्षांत येईना. तशाच किंकर्तव्यतामूढ स्थितींत दोन मिनिटें उभे राहून कांहीं न बोलतां ते एकदम बंगल्याकडे निघून गेले !

वसंतराव व मामी ताराबाईजवळ आल्या, व किती ढबदार व उमदे गृहस्थ ते दिसतात, म्हणून म्हणाल्या; पण ताराबाई इतकी विषण्ण झाली होती, कीं, तिला तें कांहीं ऐकूंच आलें नाहीं. त्यांच्यासारखा स्वाभिमानी माणूस आपणाला मनांत काय म्हणेल, कमलिनीइंदिराबाईंनां हें समजलें म्हणजे कोण आपला टिचरा त्या करतील, एक दिवस हे आधीं कशाला आले, अथवा दहापंधरा मिनिटें आम्हीच आधीं आलों असतों म्हणजे एकदां बगीचांत गेल्यावर आमचीन् त्यांची भेट तरी नसती झाली, अशा हजारों विचारांचें तुमुल युद्ध तिच्या डोक्यांत चाललें होतें. इतकें दुर्दैव स्वचित कोणाचें नसेल! अन् त्यांनीं माझ्याशीं आपण होऊन बोलावें, इतकेंच नव्हे, घरच्या सर्व माणसांची अगत्यानें विचारपूस करावी हें तरी किती अजब! जिनें त्यांचे एवढे भयंकर वाभाडे काढले, जिनें त्यांची यत्किंचित् पर्वा न ठेवतां स्पष्टपणें तोंडावर बेअब्रू केली, तिच्याशींच इतक्या मुर्वतीनें शिष्टाईचें बर्तन करणें भय्यासाहेबांनां शक्य असेल, असें तिला कालत्रयींहि खरें वाटलें नसतें. या शिष्टाचाराचें कारण तरी काय ? इतका फरक कशानें झाला ? सुवर्णपुरच्या आंबराईंत अखेर गांठ पडली व त्यांनीं पत्र हातीं दिलें, त्या वेळचें उद्दाम वर्तन व बेपर्वाईचा स्वर कोणीकडे, व त्यानंतर आजचें, इतकी अकस्मात् इतकी अकल्पित तऱ्हेनें गांठ पडली असतां आजचें, सभ्यपणाचें औपचारिक वर्तन कोणीकडे, व तें कां ?

ताराबाईचें शरीर मात्र, तिचीं पावलें, मंडळीबरोबर बगीचाकडे ओढून नेत होतीं; पण मन तेथें मुळींच नसून नाना ठिकाणीं भटकत होतें. मंडळी आतां नदीकांठीं आली होती व भोंवतालचा सुंदर देखावा पाहून वाहवा करीत होती. मामामामींनीं प्रश्न विचारला तर ती केवळ आपोआप कांहीं-तरी उत्तरें देत होती. तिचें सर्व लक्ष, सर्व मन, दिलबहारांत भय्यासाहेब काय करीत असतील, कोठें उभे असतील व त्यांच्या डोक्यांत यावेळीं काय काय कल्पना चालू असतील, हे तर्क करण्यांत गढून गेलें होतें. अजूनहि त्यांच्या मनांत आपणाविषयीं प्रेम किंवा निदान आदर तरी रहाणें शक्य आहे काय ? का इतका सगळा ग्रंथ होऊनहि आपणावरचें त्यांचें प्रेम कायमच आहे ? पण छे; प्रेमबुद्धि नष्ट झाली, समूळ उडून गेली, म्हणूनच

केवळ तटस्थपणाच्या वृत्तीला अनुरूप असे दोनचार निवळ औपचारिक प्रश्न त्यांनीं आपणाला केले. पण मग ते एवढे गोंधळलेले कां दिसत होते? पुनःपुनः तोच प्रश्न दोनतीनदां कां झाला? आपणाला येथें पाहून बरें वाटलें असो वा बुरें वाटलें असो, पण तटस्थ वृत्तीनें त्यांनीं आपणाला पाहिलें नाहीं, हें अगदीं खास!

अखेर ताराबाईच्या मनाची स्थिति मामांच्या लक्षांत येऊं लागली; म्हणून तिनें महाप्रयास करून मन आवरून धरिलें, व मनःसृष्टि सोडून ती बाह्यसृष्टीकडे वळली. आणि खरोखरच आतां दृष्टीस पडणारी सृष्टि अशी उत्कृष्ट होती, कीं, कितीहि दुःखानें गांजलेला अथवा काळजीनें त्रस्त झालेला प्राणी तेथें गेला, तर कितीक वेळ तरी त्याच्या दुःखाचें विस्मरण होऊन त्याचें मन तेथें रममाण झाल्याखेरीज राहिलें नसतें. मंडळी आतां नदीकांठ सोडून पायऱ्या चढून उंचावर आली होती. तेथून पूर्वपश्चिम-वाहिनी नदी वळणांवळणांनीं चाललेली मधून मधून दिसत होती. आपल्या पायांशीं मनुष्यकृत उत्तम बगीचा, तर पलीकडल्या बाजूला ईश्वरनिर्मित एकामागें एक दिसणाऱ्या लहानमोठ्या टेंकड्या, त्यांवरील नानाप्रकारच्या वृक्षवेली व मधूनमधून हरणांचे कळपांचे कळप स्वच्छंदपणें इकडे तिकडे खुशाल विहार करीत असलेले अस्पष्ट दिसत होते. सर्व बगीचा बघून येऊं म्हणून ताराबाई म्हणाली, तों माळ्यानें अभिमानपूर्वक सांगितलें, कीं, चार मैलांपेक्षां जास्त चालावें लागेल. त्यामुळें तो विचार सोडून देणें भागच झालें. नंतर त्यानें नेहमींचीं ठरीव स्थळें दाखवीत दाखवीत चालविलें असतां, मुंबईसारख्या शहरांत राहिल्यामुळें चालण्याची संवय मोडून सुखावलेल्या शरीराच्या शारदामामींनां दम लागल्यासारखा झाला, व आतां लवकरच जवळच्या वाटेनें टांग्याकडे चलावें असें त्यांनीं सुचाविलें. म्हणून नाइलाजानें मंडळी परत जाण्यास मागें वळली.

अशा तऱ्हेनें सावकाश सावकाश सृष्टिशोभा पहात मंडळी चालली होती. एकादें विशेष झाड असलें, तर वसंतरावांनां वनस्पतिशास्त्राचा कॉलेजांत असतांना फार नाद असल्यामुळें, त्यांनीं त्याकडे कौतुकानें पहावें, व त्याच जातींतलें दुसरें अमुक झाड आहे का म्हणून चौकशी करावी; व तेंहि आहे असें समजतांच स्त्रियांनां एकट्याच सोडून माळ्याबरोबर झटकन् जाऊन तें पाहून यावें, असा प्रकार चालला होता. असें एक झाड पाहण्यास

ते गेले असतां तेच समोरून येताहेत असें वाटलें ह्मणून दोघीहि त्यांना उद्देशून कांहीं बोलणार, तों ते वसंतराव नसून खुद्द भय्यासाहेबच पुनः आले आहेत, असें त्यांनीं ओळखलें. त्या दोघींनां पुनः अत्यंत नवल वाटूं लागलें. कदाचित् ते आपणांकडे येत नसून दुसरीकडे जातांना पुनः ही अकस्मात् गांठ पडत आहे, व यावेळीं ते आपणांशीं जास्त न बोलतां आपल्या वाटेनें निघून जातील, असाहि ताराबाईचा तर्क झाला; पण तो अर्धक्षणहि टिकला नाहीं. कारण, ते हंसत मुख करीत या दोघी होत्या तेथें येऊन उभे राहिलेच. एका निमिषांत तिनें ताडलें, कीं, मघाशीं दाखविलेला शिष्टपणा अजूनहि त्यांच्या चर्येवर पूर्णपणें आहे, व आपणहि तसाच शिष्टपणा धरून औपचारिक भाषण करावें या हेतूनें तिनें बगीचाची वाहवा करण्यास सुरुवात केली, व " फारच प्रेक्षणीय " " अत्यंत सुंदर " असें एकदां म्हटलें; पण तितक्यांत तिला स्मरण होऊन आपलें हें बोलणें कमलिनीच्या नेहमींच्या बोलण्याच्या पद्धतीचें, सहेतुक स्तुतिकर असें, कदाचित् त्यांनां भासेल, असा विचार मनांत उभा राहून तिनें जीभ आवरली, व वरमून जाऊन पुढें आत काय बोलावें, तें तिला सुचेना.

इतक्यांत वसंतरावहि झाड पाहून माळ्याबरोबर परत आले. त्यांनांहि पुनः तसेंच नवल वाटलें. तितक्यांत भय्यासाहेबांनीं "या आपल्या मंडळीचा कृपा करून मला परिचय करून द्याल का ? " असें ताराबाईला म्हटलें. ज्या लोकांविरुद्ध त्यांचा इतका तीव्र कटाक्ष होता, तीच ही कांहीं मंडळी आहेत हें जेव्हां त्यांनां समजेल, तेव्हां कोठून आपण असल्या हलक्या लोकांशीं परिचय होण्याची इच्छा केली असें वाटून ते त्याच पावलीं पळन जातील, असें ताराबाईला खास वाटलें; पण आतां इलाज काय ? त्यांच्या विनंतीप्रमाणें तिनें मामामामींचा त्यांच्याशीं परिचय करून दिला, व काय मौजेचा प्रकार घडून येतो त्याची ती वाट पहात उभी राहिली. हे गृहस्थ ताराबाईचे मामा आहेत हें ऐकून त्यांनां आश्चर्य वाटलेंसें दिसलें खरें; पण पळून जाण्याचें चिन्ह मुळींच न दिसतां, ते परत फिरून त्यांजबरोबर संभाषण करीत महालाकडे चालले. त्यांच्या संभाषणामधील प्रत्येक वाक्य, वसंतरावांसारखा बहुश्रुत गृहस्थ जें भारदस्तपणानें बोले तें ऐकून, आपणाला शरम वाटायला नको असा एक तरी आपला आप्तजन आहे अशी खात्री वाटून तारबाईला हर्ष होऊं लागला. वनस्पतिशास्त्राचा वसंतरावांनां नाद

आहे असें कळल्यावरून भय्यासाहेबांनीं म्हटलें " या आमच्या बागेंत कांहीं कांहीं अत्यंत दुर्मिळ अशीं परदेशांतून आणून लावलेलीं झाडें वनस्पति वेली वगैरे आहेत, आपण पुनः याल तर मी जरूर तुम्हाला दाखवीन. " हें आमंत्रण वसंतरावांनींहि आनंदानें कबूल केलें.

पण आतां शारदामामी फारच रेंगाळूं लागल्या, म्हणून त्यांनां मदत करण्याकरितां वसंतराव उभे राहिले, व मागून त्यांचा हात धरून चालूं लागले. अर्थात् ताराबाई व भय्यासाहेब एकमेकांशीं बोलत पुढें चालत राहिलीं. आपण आज येथें कशीं आलों याविषयीं त्यांच्या मनांत गैरसमज उत्पन्न होऊन राहूं नये ह्मणून ताराबाईनें प्रथम तोच विषय काढला.

" आपण पुण्याकडे आहांत असं आम्हांला चटणींतल्या मंडळींनीं सांगितलं, अन् इथें आल्यावर कारकुनानं सांगितलं, कीं, आपण उद्यां सकाळीं येणार, ह्मणून टप्प्याचे व बसावयाचे घोडे काल रात्रींच रवाना केले- "

भय्यासाहेब म्हणाले " तें अंगदीं खरें. आमचा पाहिला तर बेत मद्रास-कडे जायचा होता; पण एकाएकीं तो सारा फिरला. आणि आम्हीं इकडे यायचें ठरविलें. सगळी मंडळी उद्यां पहांटेसच यावयाची आहे. मी मात्र एकटा आधीं जरा तयारी करावी म्हणून, तीं मध्यें खांडव्यास एक दिवस राहिलीं असतां, एकटाच पुढें आलों. आमच्या इथल्या लोकांनां तें मुळींच ठाऊक नव्हतें. बाकीची मंडळी उद्यां येतील, त्यांत तुमच्याहि परिचयाचीं तिघें आहेत-भाऊसाहेब व त्यांच्या बहिणी. "

ताराबाईला पुनः आश्चर्य वाटलें. भाऊसाहेबांचें नांव शेवटीं कोणच्या प्रसंगीं आपणां दोघांत निघालें होतें त्यांची दोघांनांहि एकदम आठवण झाली. अंमळशानें तेच पुढें म्हणाले " आणखीहि एक माणूस उद्यां येणार आहे, त्याच्या मनांत आपला परिचय व्हायची फार इच्छा आहे,—म्हणजे माझी बहीण सरलादेवी. आपण चटणींत आहांत तोंपर्यंत तसा योग आणावा अशी फार इच्छा आहे. आपली कांहीं हरकत नाहीं ना ? "

ताराबाई म्हणाली " छे, हरकत कसली ! "

हें म्हणतांना ताराबाई मनांत पक्कें समजून चुकली, कीं, सरलादेवीला जर खरोखरच आपल्या परिचयाची इच्छा असेल, तर ती बंधूंनीं आपणा-विषयीं विशेष कांहीं सांगितल्याशिवाय असणें शक्य नाहीं. आपल्या वर्तना-मुळें आपणाविषयीं त्यांनीं निदान अतिशय अढी बसवून घेतली नाहीं,

असें तिला स्पष्ट दिसूं लागलें, व तितकें तरी तिला समाधान होऊं लागल. इतक्यांत तीं दोघें महालाच्या पायऱ्यांशीं पोंचलीं; पण अजून शारदामामींचा मुळींच मागमूसहि नव्हता, इतक्या त्या मागें राहिल्या होत्या. म्हणून भय्यासाहेबांनीं आंत चलण्याची विनंति केली; पण तें ताराबाईला पसंत न पडून ती बाहेरच त्यांच्याशीं बोलत उभी राहिली, व म्हणाली "कशाला, मी कांहीं थकलें नाहीं."

पण आतां बोलावें काय ? जो विषय सुचे त्यांत कांहींना कांहीं तरी अडचण अथवा नाजुकपणा दिसून येई. पण अखेर ताराबाईला स्मरण झालें, कीं, आपण नुकतींच रगड शहरें व इतर स्थळें पाहून आलों आहोंत. मग ती इंदुर, उज्जयिनी, दौलताबाद व अजिंठा यांविषयीं रगड बोलूं लागली, व हे विषय मात्र, अखेर किती तरी वेळानें मामी हळुहळू येऊन पोंचल्या तोंपर्यंत, सहज पुरले.

वसंतराव व शारदाबाई आलीं तों शारदाबाई घामाघूम झालेल्या होत्या. त्यांनां पाहून भय्यासाहेब म्हणाले "यांनां जरा सावलींत विसावा पाहिजेसा दिसतो. ऊन्हहि झालें आहे, अन् अजून आपल्याला चार मैल जायचें आहे. थोडासा चहा तयार आहे, तो घेऊन पांच मिनिटें दम टाकून निघालें तर बरें, नव्हे का ?"

कोणीहि उत्तर देईना. फक्त एकमेकांकडे पाहूं लागलीं. शारदाबाईंनां खरोखरच शोष पडला होता, त्यामुळें चहाचें नांव ऐकतांच त्यांनां हुशारी आली. भय्यासाहेबांनीं पुनः आग्रह केला, तेव्हां नाइलाजानें आंत जाऊन सारींजणें चहा व त्याबरोबर चार चार बिस्किटें खाऊन ताजींतवानीं होऊन परत टांग्यांतून घरीं जाण्यास निरोप घेऊन निघालीं.

टांगा थोरल्या दरवाजांतून बाहेर पडल्यावर मंडळीचीं तोंडें सुरू झालीं. वसंतराव म्हणाले "मला तर फार नामी गृहस्थ दिसला हा !"

शारदाबाईहि म्हणाल्या "हो हो, चहाबीइ दिलान् तें तर फारच नामी केलंन्, नाहीं ग तारा ! कोण बेटे त्याला गर्विष्ठ म्हणत असतील ते खुशाल म्हणोत–मी तर आजच्या वर्तनावरून कधीं तसं म्हणणार नाहीं !"

वसंतराव म्हणाले "आजचें वर्तन तर फारच आदरातिथ्याचें होतें. मला भारीच नवल वाटूं लागलें. इतक्या अगत्याचें कांहीं कारण खरोखर नव्हतें; कारण, ताराची न् त्यांची बेताबाताचीच ओळख होती !"

शारदाबाई ह्मणाल्या " काय ग तारा, मग तूं कशी आह्मांला इतकं त्याच्या उलट सांगत होतीस, कीं, उन्मत्त आहे न् उर्मट आहे! आतां, नागेश-रावाइतका देखणा नाहीं खरा; अथवा त्यांच्या तऱ्हेचा देखणेपणा नाहीं एवढंच; नाहींतर हाहि चेहरा चांगला उमदा आहे—"

ताराबाईनें कांहीं तरी उत्तर दिलें, कीं, " आमच्या शिवदुर्गापेक्षां ते सुवर्णपुरीं मला बरे वाटले, व आजच्यासारखे तर सभ्य ते कधींच दिसले नव्हते. "

वसंतराव म्हणाले " असें का ? अहो तें कदाचित् या श्रीमंत लोकांचें सूर लागण्यावर तंत्र असेल सारें ! आज सूर असा लागला, उद्यांचा तसाच लागेल हा काय नेम ? तर मग झाडें बघायला या म्हणाले आहेत त्यावर विश्वास ठेवून उपयोग नाहीं. कदाचित् उद्यांचा रंग सगळा फिरून मला बाहेरच्या बाहेरच शिपायाकडून सांगवतील, कीं, चले जाव यहांसे एकदम !"

ही कल्पना अगदीं व्यर्थ आहे हें ताराबाईला वाटलें; पण ती गप राहिली. नंतर अंमळशानें शारदाबाई ह्मणाल्या "अशा गृहस्थानं नागेशरावाचं इतकं नुकसान केलं असेलसं वाटत नाहीं. चेहऱ्यावरून तर तो इतका दीर्घद्वेषी असेल, असं कोणीहि ह्मणणार नाहीं. उलट चेहऱ्यांत उदारपणाची पुष्कळ झांक दिसते. ती बाई तर इतकी वाखाणणी करीत होती, कीं, मला मधें मधें हंसूंच येऊं लागलं; पण तें बहुतकरून तिच्या लेंकाला हे चांगलासा पगार देत असतील त्याचं फळ दिसतं आहे. धन्याचा हात सैल असला, कीं, नोकराच्या दृष्टींत तो भरून गेलाच, असं समजावं. "

ताराबाईला वाटलें, कीं, नागेशरावांविषयींच्या हकीगतीला दुसरी बाजू आहे, व ती आपणाला नुकती सुवर्णपुरांत कळली, हें मंडळींनां सांगितलें पाहिजे. ह्मणून तिनें थोडक्यांत हकीगत सांगून आपली मूळची माहिती कशी चुकली होती, व एकंदरींत एकजण वाटला तितका काळा नाहीं, व दुसरा वाटला होता तसा गोरा नाहीं, वगैरे सर्व सांगितलें. ती हकीगत ऐकून शारदामामींनां फार नवल वाटलें, व ही इतकी कच्ची हकीगत हिला कशी कळली, तेंहि त्यांनां समजेना. पण हळुहळू ऊन होत चाललें व मंडळीहि सकाळपासून थकून गेली असल्यामुळें कोणालाच फारसें बोलायला नको होतें.

घरीं पोंचल्यावर शारदामामी आपल्या फारा दिवसांच्या स्नेह्यांत गढून गेल्या, व ताराबाई आपल्या आजच्या घडलेल्या विलक्षण हकीगतीवर—

आनंदकारक व इतर असे—विचार करण्यांत दिवसभर गुंतली होती. सरला-देवीला आपली ओळख करण्याची एवढी उत्कट इच्छा कां व्हावी, हेंच तिला समजेना !

---

## प्रकरण चव्वेचाळिसावें.

### सरलादेवीची भेट.

ताराबाईनें अशी कल्पना करून ठेवली होती, कीं, दिलबहारांत मंडळी येऊन दाखल झाल्यावर दुसऱ्याच दिवशीं भय्यासाहेब बहिणीला आपणाकडे आणतील. म्हणून त्या दिवशीं आपण घरींच रहावें, असें ती मनांत म्हणत होती. आज तिनें मामांनां त्याविषयीं कांहींच सांगितलें नाहीं. काल दिल्बहाराहून परत आल्यापासून मामींशीं मुळींच बोलणें झालें नव्हतें. आज मामींनां तेथल्या घरच्या माणसांनीं मेजवानी केली होती, त्यांत बराच वेळ गेला. चार वाजतां चहा झाल्यानंतर आतां काय करावें या विचारांत मंडळी होती, तों एकाएकीं रस्त्यावर घोड्यांचीं टप्टप् पावलें वाजूं लागलीं. ताराबाई खिडकींतून बाहेर पहाते, तों सरदारी कोचमनचे पोषाख घातलेले कोचमन पाहून ती तरकली, कीं, आपण ज्यांची उद्यां वाट पहाणार होतों ती मंडळी आजच आली ! तिनें थोडक्यांत मामामामींनां सूचना दिली, तों त्यांनां बिलकूल कल्पना नसल्यामुळें अतिशय आश्चर्य वाटलें. हा सर्व प्रकार पाहून, व ताराबाईचीहि मुद्रा चलबिचल झालेली पाहून, त्यांत कांहींतरी निराळेंच इंगित दिसतें आहे, असा त्यांचा तर्क झाला. इतकें अगत्य एरवीं व्हायचें नाहीं, आपल्या भाचीवर विशेष मर्जी दिसते आहे, अशी कल्पना केल्याशिवाय या सर्व वर्तनाची नीटशी संगति लागणें शक्य नाहीं, ही कल्पना दोघां नवराबायकोंच्या मनांत एकदमच आली. इकडे ताराबाईची अस्थिरता क्षणोक्षणीं वाढत चालली होती, व दुसरीकडे ही अशी चलबिचल आपली कां व्हावी याचें तिला आश्चर्य वाटत होतें. आपण सरलादेवीच्या नजरेंत भरावें अशी इच्छा असूनहि आजच्या या गोंधळानें आपण बावळ्यासारखें कांहीं तरी बोलूं कीं काय, असें तिला होऊन गेलें. ती झटकन् आंत सरकली आणि गाडी यांच्याच दाराशीं उभी राहून भय्यासाहेब व सरला-देवी खालीं उतरलीं. मामामामींच्या मुद्रेवर एवढें थोरलें प्रश्नचिन्ह दिसूं

लागलें, कीं, त्यामुळें ताराबाईचा जास्तच घोंटाळा होऊं लागला. पण कशी-बशी धीर करून ती बसून राहिली.

इतक्यांत सरलादेवी व भय्यासाहेब आंत आलीं व त्यांनीं बहिणीचा ताराबाईशीं व नंतर वसंतराव व शारदाबाईशीं परिचय करून दिला. आपणाप्रमाणेंच सरलादेवीच्याहि मनाची चलबिचल उडालेली आहे हें ताराबाईच्या लक्षांत आलें, तेव्हां तर तिला फारच अचंबा वाटला. चटणीसहि तिनें ऐकलें होतें, कीं, सरलादेवीला मुळीं बोलायला नको इतकी ती गर्विष्ठ आहे. पण आतां ताराबाईच्या लक्षांत आलें, कीं, तें गर्विष्ठपणामुळें नसून निवळ भिडस्तपणामुळें तें असलें पाहिजे.

सरलादेवी उंच होती व ताराबाईपेक्षांहि जास्त प्रमाणावर होती. नुकतें तिचें सोळावें वर्ष संपलें होतें, तरी तिचा बांधा भरदार झालेला असून ती डौलदार व पर्णांत आल्यासारखी दिसे. भावापेक्षां ती जास्त सुरेख व नाजूक दिसे, आणि तिच्या मुद्रेंत हुशारी व मोहकपणा दिसत असे. तिची रीतभात उर्मट अगर बेपर्वा असेल अशी ताराबाईची कल्पना होती. त्याच्या अगदीं उलट ती केवळ लाजाळू व भिडस्त अशी दिसली, त्यामुळें ताराबाईचीहि चलबिचल हळुहळू कमी होत चालली.

थोडा वेळ इकडचें तिकडचें बोलणें झाल्यावर भय्यासाहेबांनीं सांगितलें, कीं, आपणाला भेटायला मागून भाऊसाहेबहि येत आहेत. ही बातमी ऐकून तिला समाधान वाटतें न वाटतें, तोंच रस्त्यावर पुनः गाडी वाजली, व लगेच जिन्यावर झप्‌झप् पावलें वाजूं लागलीं, तीं ताराबाईनें भाऊसाहेबांचीं ह्मणून सहज ओळखलीं. दार उघडून भाऊसाहेब हंसतमुख तिच्यापुढें उभे राहिले; त्यांच्यावरचा तिचा राग सुवर्णपुरच्या पत्रापासून कधींच नाहींसा झाला होता, व जर किंचित् शिल्लक असता तर तोहि त्यांनीं मोकळ्या मनानें बोलण्यास सुरुवात केलेली पाहून साफ उडून गेला असता. "तुह्मी येथें भेटाल अशी यत्किंचित् कल्पना नसतांहि या गांवांत अत्यंत इष्ट अशी अचानक भेट झाली त्यामुळें मला किती तरी आनंद झाला आहे ह्मणून सांगूं ? आपण व आपल्या शांतिसदनांतली मंडळी खुशाल आहेतना ?" अशा तऱ्हेनें ते नेहमींप्रमाणें हंसत बोलूं लागले.

वसंतराव व शारदाबाईनांहि भाऊसाहेबांनां एकदां पहाण्याची फार इच्छा होती. त्यांच्या नजरेनें भाऊसाहेब कमी महत्त्वाचे होते, असें नव्हतें.

एकंदरींत त्यांच्यापुढें जीं चौघें माणसें होतीं, त्यांच्याकडे वसंतराव व शारदाबाई अत्यंत तीक्ष्ण दृष्टीनें पहात होतीं. विशेषेंकरून ताराबाई व भय्यासाहेब यांच्यासंबंधानें जी नवीन कल्पना नुकतीच त्यांनां सुचली होती, तिच्यामुळें त्यांची जास्त बारीक नजर त्यांजकडे होती, व त्यांनां खात्रीनें वाटूं लागलें, कीं, निदान त्यांपैकीं एकाच्यातरी हृदयांत विशेष प्रकारचें प्रेम उद्भवलेलें आहे. ताराबाईंचें मन मात्र त्यांनां अजून स्पष्टपणें कळत नसे; पण भय्यासाहेब प्रेमासक्त आहेत याबद्दल त्यांनां शंका वाटत नव्हती.

ताराबाईला या भेटीच्या वेळीं किती तरी कामें करावयाचीं होतीं. नवीन आलेल्या प्रत्येक पाव्हण्याचें हृद्गत समजून घेण्याचा प्रयत्न करण्याचा होता, आपलें स्वतःचें चलबिचल झालेलें मन शांत करून पाव्हण्यांच्या मनावर आपली छाप पडेल असें वर्तन ठेवण्याचें होतें, हें कसें साधणार अशा विवंचनेंत ती होती. पण मंडळी तिच्यावर खूष होण्याच्याच तयारीनें आलेली होती, ती नाखुष कशी होणार ? भाऊसाहेब खूष होण्याला सदा तत्पर होते, सरलादेवी भारी उत्सुक होती, व भय्यासाहेब तर केवळ तसा निश्चयच करून जणूं काय आलेले होते !

भाऊसाहेबांनां पाहून ताराबाईंचे विचार सहजच शांताक्काकडे धांवले. आणि आपल्याप्रमाणें त्यांचेहि तिकडेच आहेत कीं नाहीं हें आत्तां समजेल, तर किती तरी सोन्यासारखी गोष्ट होईल ? कितीक वेळां तिच्याकडे ते पहात असतांना तिला वाटे, कीं, आपल्या चर्येवरून शांताक्काच्या चर्येची ते मनांतल्या मनांत कल्पना करीत असावेत. ही कल्पना खरी असो वा नसो, एवढें मात्र निःसंशय खास दिसून आलें, कीं, तिची प्रतिस्पर्धी म्हणून इंदिराकमालिनींनीं उभी केलेली जी सरलादेवी, तिच्याशीं त्यांची जी वागणूक दिसत होती, तिच्यांत प्रेमासक्तीचा बिलकुल लेशहि तिला दिसत नव्हता. या बाबतींत तरी बहिणींची अपेक्षा अगदीं व्यर्थ होणार, यांत बिलकूल संदेह नव्हता. इतकेंच काय, पण एकदोन गोष्टी अशा विशेष घडलेल्या ताराबाईच्या लक्षांत आल्या, कीं, त्यांवरून त्यांचें मन शिवदुर्गांत शांताबाईकडेच असावें, असें मानण्याला तिला सबळ कारण वाटूं लागलें. जणूं काय कसें तरी करून गोष्टीचा ओघ शिवदुर्गाकडे वळवावा, व नंतर त्यासंबंधानें आपणाशीं कोणीं तरी बोलावें, व आपण त्याचसंबंधाचें उत्तर द्यावें, असा त्यांचा हेतु असावा, असा ताराबाईंचा ग्रह झाला. दुसरी मंडळी

निराळ्या भाषणांत गढली असतां ते एकीकडे विशेष आस्थापूर्वक ताराबाईला म्हणाले " तुमची भेट होऊन किती तरी काळ लोटला पण ! आठ महिन्यांच्यां वर दोनचार दिवस झाले. आमच्या घरीं ईव्हिनिंगपार्टी पांच जूनला झाली त्या दिवशीं तुम्हां सर्वांची गांठ शेवटीं झाली होती." त्याचप्रमाणें पुनः एकदां त्यांनीं विचारलें, कीं, " तुमच्या सगळ्या बहिणी बऱ्या खुशाल आहेत ना ?" ईव्हिनिंगपार्टीची अगदीं नक्की तारीख त्यांच्या कां बरें एवढी पक्की लक्षांत रहावी ? शिवाय, बोलतांना जी त्यांची अर्थपूर्ण मुद्रा झाली होती, त्यावरूनहि पुष्कळ बोध होण्यासारखा वाटला.

या उद्योगाबरोबर आणखी स्वतःचाहि उद्योग ताराबाईच्या डोक्यांत चालू होताच. वसंतराव व शारदामामींशीं भय्यासाहेब बोलत होते, तेव्हां त्यांच्या स्वरांत अथवा मजकुरांत नेहमींप्रमाणें बेपर्वा, अगर तुच्छपणा, अगर उन्मत्तपणा आज मुळींच दिसत नसून, इतकें मार्दव व इतकी आतुरता दिसून येत होती, कीं, कालपासून त्यांच्या वर्तनांत दिसून येणारा शिष्टपणा किती दिवस आणखी टिकेल याविषयीं जरी शाश्वती नसली, तरी तो निदान एक सबंध दिवस तरी टिकून राहिला आहे, यांत संदेह नाहीं. ज्या माणसांचीं नांवें काढून पूर्वी ते हंसत असत, व ज्यांची त्यांनीं पूर्वी स्पष्टपणें तिच्या तोंडावर अवहेलना केली होती, त्याच माणसांशीं इतकें लक्ष देऊन संभाषण करण्याची त्यांनीं तसदी घ्यावी, व आपणापेक्षांहि जास्त शिष्टाचारानें तसल्या हलकट व्यापारी पेशाच्या माणसांशींहि त्यांनीं वागावें, व त्यांच्या डोळ्यांत आपण सज्जन गृहस्थ आहों ही जाणीव उत्पन्न करण्याकरितां एवढे श्रम घ्यावेत, हें ताराला इतकें अजब दिसूं लागलें, कीं, तिला वाटत असलेलें आश्चर्य आपल्या चर्येवर दिसण्याचें कसें टाळावें, हेंच तिला समजेना. इतका मनमिळाऊपणा, इतका इतरांविषयीं आदर, त्यांनीं आनंदभुवनांत असतांना अगर नजरबागेंत असतांनासुद्धां त्यांच्या अत्यंत स्नेहाच्या माणसांविषयींहि कधीं दाखविलेला ताराबाईनें पाहिला नव्हता; त्यांच्याशींहि ते नेहमीं कुऱ्यांतच असत. दुसऱ्याच्या मताविषयीं कधींहि त्यांनीं सहिष्णुता विनाकारण दाखविलेली ताराबाईनें पाहिली नव्हती. असें असून, आज वसंतरावांशीं इतक्या सलगीनें वागण्यापासून बिलकूल लाभाची आशा नव्हती असें असतां—इतकेंच नव्हे, असल्या व्यापारी घेला-शेटांशीं सलोख्यानें वागल्याचें कळून आलें तर इंदिराकमलिनी व श्रीमंत

माईसाहेब व इंदुमतीदेवी आपली छी थु करतील अशी साधारणपणें खात्री असतांनाहि, त्यांनीं इतकें मृदुपणानें कां वागावें, तें सांगणें किती तरी कठिण होतें.

मंडळी अर्धा तास राहून जायला उठली, तेव्हां भय्यासाहेबांनीं व सरलादेवीनें अतिशय आग्रहानें आपण तिवर्ग परवां आमच्या घरीं जेवायला जरूर आलें पाहिजे, असें वसंतरावांनां आमंत्रण केलें. हें आमंत्रण ताराला कसें पसंत पडतें तें कळण्याकरितां त्यांनीं आपल्या भाचीकडे पाहिलें; परंतु ताराबाई कांहीं न बोलतां दुसरीकडेच पहात राहिली. त्याचा अर्थ तिची नाखुषी नाहीं, व शारदाबाईनां तर सदोदितच लोकांकडे मेजवानीला जाण्याची हौस असते हें माहीत असल्यामुळें, वसंतरावांनीं तें आमंत्रण कबूल केलें मात्र असें ठरविलें, कीं, परगांवीं चार मैलांवर जाणें असल्यामुळें दुपारचा बेत न करितां संध्याकाळीं चार वाजतां जाऊन रात्रीं आठ वाजतां जेवण होऊन नऊ दहाला परत यावें. ही कल्पना भय्यासाहेबांनींच काढली, व ती सर्वांनां पसंत पडली. भाऊसाहेबहि पुनः ताराबाईची भेट होणार हें समजून फार आनंदल्याचें त्यांनीं स्पष्ट बोलून दाखविलें. "कारण, मला अजून किती तरी गोष्टी शिवदुर्गांतल्या आपल्या परिचित मंडळीविषयीं विचारायच्या आहेत," असें ते म्हणाले. याचा अर्थ ताराबाईनें अर्थात् असा केला, कीं, शांताक्काविषयीं जास्त बोलण्याची त्यांची इच्छा आहे. नंतर मंडळी निरोप घेऊन गेली. एकंदरींत ताराबाईला आशा होती त्यापेक्षां किती तरी जास्त सुखदायक आजची सर्वांची भेट झाली, असें तिला वाटलें. मंडळी गेल्यावर भाऊसाहेबांविषयीं मामामामींचा चांगला ग्रह झाला असल्याचें ऐकून आणखी कांहीं कमी जास्त प्रश्न मामी विचारतील ते चुकविण्याकरितां ती तेथून निघून गेली. पण ही तिची भीति अनाठायीं होती. मुद्दाम तिला प्रश्न विचारून बोलायला लावण्याची त्यांची तरी इच्छा कोठें होती ? आपणाला कल्पना होती त्यापेक्षां ताराशीं भय्यासाहेबांची व भाऊसाहेबांची जास्त सलगी आहे, व भय्यासाहेबांचें तर तिच्यावर प्रेम बरेंच आहे. हें त्यांनां स्पष्ट दिसूं लागलें होतें. पण आज त्याविषयीं तिला प्रश्न विचारून विनाकारण ओशाळी करावी यांत अर्थ नाहीं, अशी त्यांची समजूत होती.

भय्यासाहेबांविषयीं विचार करून पहातां मामामामींनां त्यांच्यांत दोष काढण्यासारखें कांहींच दिसेना. आपणाशीं ते इतक्या शिष्टाचारानें वागत

आहेत. व इतकें विलक्षण अगत्य दाखवीत आहेत, त्यावरून त्यांनां उत्तम गृहस्थ म्हणण्याकडे त्यांची साहजिकच प्रवृत्ति झाली. आजीबाईच्या सांगण्यावरून व त्यांच्या स्वतःच्या आजकालच्या प्रत्यक्ष आलेल्या अनुभवावरून जर त्यांनीं भय्यासाहेबांचें एकादें शब्दचित्र काढलें असतें, तर तें शिवदुर्गात एकालाहि कधीं खरें वाटलें नसतें. त्यांतून आज ताराबाईवरची त्यांची आसक्ति दृष्टीला पडल्यावर तर आपलें चित्र खरें ठरावें, ही इच्छा जास्तच बळावत चालली. लहानपणापासून पाहिलेल्या आजीबाईची हकीगत खोटी तरी कां मानावी ? त्याचप्रमाणें चटणींतल्या मंडळींच्याहि बोलण्यांत भय्यासाहेबांची कांहीं कागाळी ऐकूं आली नाहीं. ते फार उदार आहेत, व गोरगरीबांवर सदोदित कृपा करतात, असेंच सर्वतोमुखीं ऐकूं येई. जें तें दोष काढी तो इतकाच, कीं, त्यांनां अभिमान मनस्वी आहे, व हा दोष केवळ खोटा म्हणण्याचीहि वसंतरावांची इच्छा नव्हती. अभिमान बाळगण्यासारखा एकहि गुण अंगीं नसतांना जर हजारों प्राणी स्वाभिमानानें बेडकासारखे फुगलेले पदोपदीं दृष्टीस पडतात, तर भय्यासाहेबांसारख्या श्रीमंत, उदार व हुशार गृहस्थाला स्वाभिमान असला तर त्यांत नवल काय ?

चटणी गांवीं अर्थातूच भय्यासाहेबांबरोबर नागेशरावांच्याहि गोष्टी मंडळींत सहजीं निघत; परंतु कोणीहि फारसा अनुकूल अभिप्राय त्यांजविषयीं देत नसे. भय्यासाहेबांचें व त्यांचें एवढें फाटायला काय कारण झालें तें कोणालाच ठाऊक नव्हतें. पण एवढें मात्र पुष्कळ लोक सांगत, कीं, नागेशराव या प्रांतांतून निघून गेले त्यावेळीं मागें कैक लोकांचीं देणीं तशींच न फेडतां गेले, व पुढें ते लोक पैसे बुडाले म्हणून ओरडताहेत ही बातमी जेव्हां भय्यासाहेबांच्या कानावर गेली, तेव्हां त्यांनीं आपण होऊन तीं देणीं सगळीं फेडून टाकलीं.

त्या सगळ्या दिवसभर ताराबाईच्या डोक्यांत एकच प्रश्न घोळत होता. दिलवहारमध्यें असलेल्या एका व्यक्तीविषयीं आपल्या मनाची वास्तविक स्थिति काय आहे याची मीमांसा सबंध दोनतीन तास ती स्वतःशीं करण्याचा प्रयत्न करीत होती. एवढें खास, कीं, त्या व्यक्तीसंबंधीं आतां तिरस्कार मनांत राहिला नव्हता, त्यानें कधींच यःपलायतें केलें होतें. इतकेंच नव्हे, त्या गृहस्थाविषयीं एके काळीं आपल्या मनांत इतकी तीव्र नावड

तरी कशी उत्पन्न झाली, हेंच तिला चमत्कारिक वाटूं लागलें होतें ! त्याच्या अंगीं कांहीं तरी सद्गुण खास आहेत ही जाणीव, व त्यापासून उत्पन्न होणारा पूज्यभाव जरी प्रथम प्रथम केवळ नाखुषीनें तिनें कबूल केला, तरी तो आतां मनाला कडू लागेनासा होऊन गेला होता; व आजकाल सर्वतोमुखीं असलेल्या त्या व्यक्तीच्या वाखाणणीनें तर तो मनाला थोडा थोडा गोडहि वाटण्यास सुरुवात झाली होती. पण या पूज्यभावापेक्षांहि दुसरा एक आत्मविषयक भाव मनांत जोरानें डोकावूं लागला होता. तो असा, कीं, आपणावर अशा माणसाचें अनिर्वचनीय प्रेम बसावें, आणि आपण त्या प्रेमाचा मोबदला अत्यंत कठोर व अयोग्य अशा वाक्ताडनानें केला असूनहि त्या प्रेमाचा समूळ नायनाट न होतां, त्या आपल्या अक्षम्य अपराधाची पूर्णपणें क्षमा करून, पुनः आपणाशीं शिष्टाचारानें वागणूक करण्याइतकी मनाची समता राखण्याइतकी सज्जनता त्याच्या अंगीं असावी, या सर्वांबद्दल कृतज्ञताहि अंतःकरणांत उत्पन्न झाली. ही स्त्री आपणावर नसतें तुफान घेणारी आहे, असें पाहून आपणासंबंधानें द्वेषभाव त्यांनीं मनांत वागविणें साहजिक असतां, ती बाजू सर्व सोडून देऊन, आपली स्त्री व तिची अकस्मात् गांठ पडली असतां तिचा परिचय कायम ठेवण्याची अशी इच्छा ठेवावी, तिच्याबरोबरच्या माणसांशीं नवीन परिचय करून घेण्याचीहि तसदी घ्यावी, व तिच्याशीं परिचय करून घेण्याकरितां आपल्या प्रत्यक्ष बहिणीला चार मैल दूर तिच्या बिऱ्हाडीं घेऊन यावें, असें वर्तन—असलें अत्यंत थोरपणाचें क्षमाशील वर्तन—करणाऱ्या माणसाविषयीं तिच्या अंतःकरणांत कृतज्ञता बुद्धि उत्पन्न झाली, यांत नवल काय ? व हा जो विलक्षण फरक त्यांच्यांत झाला—एके काळीं दुसऱ्याविषयीं बेपर्वा असणारा माणूस दुसऱ्याविषयीं इतका अतिरिक्त आदरशील झाला—त्या फरकाच्या मुळाशीं आपणा स्वतःवरील त्याचें निःसीम प्रेमच कारणीभूत असलें पाहिजे, असें तिची मनोदेवता तिला सांगूं लागली. हें मनोदेवतेचें सांगणें तिच्या मनाला मधुर लागल्यावांचून कसें राहणार ? त्यांच्याविषयीं तिरस्कार जाऊन आदरबुद्धि आली, त्याज्यपणा जाऊन पूज्यभाव उत्पन्न झाला, कृतज्ञतेनें आपलें पक्कें ठाणें मनांत बसवलें, व परमेश्वर त्यांनां सुखी ठेवो, ही वासना पूर्णपणें उदय पावली. आज प्रश्न एवढाच उरला होता, कीं, या सुखी ठेवण्यामध्यें आपल्या स्वतःवर कितपत भाग अवलंबून राहणार

आहे, व आपणावर अवलंबून रहाण्यासारखा कांहीं भाग असेल तर आपण कसें वर्तन करावें? व तसें कांहीं आपण नाहीं होय म्हणणें त्यांच्या सुखी होण्याला जरूर असेल, तर आपल्या स्वतःला सुख लाभण्याच्या दृष्टीनें पाहिलें तर आपण कसा मार्ग आंखून ठेवला पाहिजे? आपणाकडे पुनः त्यांची प्रवृत्ति होऊं देणें न देणें बरेंचसें आपल्या हातीं आहे, असें तिचें मन तिला सांगूं लागलें.

सरलादेवीनें दिलबहारला आल्याच्या दिवशीं ताबडतोब आपल्या भेटीला येण्यांत जें अगत्य दाखविलें, त्याला अनुरूप आपणहि तसाच विशेष शिष्टाचार दाखविणें जरूर आहे, असें लिवर्गीनांहि वाटलें. म्हणून सर्वांनीं असें ठरविलें, कीं, उद्यां सकाळीं आपण स्त्रियांनीं मुद्दाम परत भेटीला गेलेंच पाहिजे. हा निश्चय झाल्यामुळें ताराबाईला आनंद झाला; पण कां आनंद व्हावा याची ती मीमांसा करूं लागली, तों तिला कारण सांगतां येईना! ठरल्याप्रमाणें सकाळीं झाडेंझुडपें पहाण्याला वसंतरावहि जायचेच होते.

---

## प्रकरण पंचेचाळिसावें.

### परत भेट.

कमलिनीचें आपणाशीं बरें नसण्याचें कारण निवळ मत्सर, ही कदाचित् आपल्याशीं बरोबरी करील ही भीति, यापेक्षां दुसरें बिलकूल कारण नाहीं, अशी ताराबाईची पुरी खात्री होती. त्यामुळें खुद्द दिलबहारमध्यें तिच्या मर्जीविरुद्ध आपण गेलों म्हणजे कमलिनी आपणाला कशी पाण्यांत पाहील, याची कल्पना तिला सहज आली. म्हणून अशा प्रसंगीं स्वतःला अत्यंत शिष्ट समजणाऱ्या इंदिराकमलिनी आपल्याशीं कशा तऱ्हेचें वर्तन करतात, तें पाहण्याची ताराबाईला उत्सुकता झाली होती.

सकाळीं नऊ वाजण्याच्या सुमारास शारदाबाई व ताराबाई दिलबहार-मध्यें पोंचल्या. वसंतराव सकाळीं सात वाजतांच घोड्यावरून झाडेंझुडपें पहाण्यास पुढें एकटेच गेले होते. या दोघीजणी भेटायला आल्याचें पाहून शिपायांनीं आंत वर्दी पोंचविली व ताबडतोब त्यांनां आंत नेऊन पूर्वेकडच्या बाजूच्या एका दालनांत नेलें. तेथें पूर्वेकडच्या मोठाल्या खिडक्या उघड्या असल्यामुळें हल्लींच्या थंडीच्या दिवसांत सकाळीं आलेलें ऊन्ह फार गोड लागत असे, व त्या खिडक्यांमधून बाहेरची शोभाहि फार आल्हादकारक दिसत असे. या दालनांत सरलादेवी, इंदिराबाई व कमलिनी बसल्या होत्या.

शिवाय, सरलादेवीबरोबर मुंबईंत वगैरे नेहमीं असणाऱ्या सुलोचनाबाईहि तेथेंच होत्या. सरलादेवीनें जाग्यावरून उठून या दोघींचें स्वागत केलें. इंदिराकमलिनी नुसत्या बसल्या बसल्याच या बसा म्हणाल्या. त्या उठल्या नाहींत हें पाहून आपण चूक तर करीत नाहीं असें वाटून सरलादेवीहि गोंधळून गेली, व तिच्या तोंडांतून कितीक वेळ शब्दहि निघेना. या तिच्या वर्तनावरून कोणाला कदाचित् ती अभिमानानें फुगली आहे असें वाटण्याचा संभव होता; पण या दोघींनीं तिच्या स्थितीची खरी मीमांसा सहज केली, व चारचौघांत वागण्याचे प्रसंग येत नसल्यामुळें अशी तिची त्रेधा उडाल्याबद्दल उलटी त्यांनां तिची कींवच वाटूं लागली.

सरलादेवीला बोलतां येईना. इंदिराकमलिनी बोलूं इच्छीनात. पाव्हण्यांनीं तरी काय बोलावें ? यामुळें कोणीच कांहीं न बोलतां मुक्यासारखें एकमेकींच्या तोंडाकडे अगर खालच्या सतरंजीकडे पहात बसण्याची वेळ येते कीं काय, असें या दोघींनां चमत्कारिक झालें. परंतु सुलोचनाबाईंनीं तें ओळखून संभाषणाचे साधे विषय शिताफीनें सुरु केले, त्यावरून इंदिराकमलिनीपेक्षां सुलोचनाबाई द्रव्यानें किती तरी गरीब असूनहि शिष्टाचारानें त्या दोघींपेक्षां किती तरी संपन्न आहेत, हें स्पष्टपणें दिसून आलें. शारदाबाई व सुलोचनाबाई यांचा औपचारिक संवाद चालला होता. मधून मधून ताराबाईहि यथाशक्ति त्याला हातभार लावीत होती. सरलादेवीच्या मुद्रेवरून आपणहि दोन शब्द बोलावेत अशी तिची उत्कंठा दिसत होती, व मधूनमधून एकादें वाक्य दोनतीन शब्दांचें हळूच बोलण्याचा ती प्रयत्नहि करी. पण इंदिराकमलिनी मुळींच अक्षर बोलेनात, यामुळें तिचाहि निरुत्साह होऊन जातोसा वाटे.

आपणाकडे कमलिनीची बारीक नजर एकसारखी आहे, व सरलादेवीला आपण कांहीं बोललों तर कमलिनी मुद्दाम लक्ष देते, या गोष्टी ताराबाईच्या चटकन् लक्षांत आल्या. पण तेवढ्यानें ती सरलादेवीशीं जास्त बोलायला बिचकली नसती. सरलादेवीपासून ती स्वतः फार अंतरावर बसली होती, म्हणून इतक्यांच्या डोक्यांवरून तिच्याशीं मुद्दाम बोलणें बरें दिसण्यासारखें नव्हतें, म्हणूनच तिनें जास्त प्रयत्न केला नाहीं. एकापरी झाली हीहि गोष्ट ठीकच होत होती. कारण, ताराबाईच्या डोक्याला इतकें काम होतें, कीं, त्यांत आणखी बोलायला तिला फुरसत कोठें होती ? पदोपदीं घरचा मुख्य

मालक येतो कीं काय, ही शंका मनांत उभी रहात असे. भय्यासाहेब यावेत अशी तिची इच्छा होती, का, ते येण्याची तिला भीति वाटत होती, तें तिचें तिलाच मुळीं स्पष्ट समजेनासें झालें होतें! सुमारें पाव तास असा गेल्यानंतर कमलिनीनें मोठ्या मिनतवारीनें, जणूं काय केवळ नाइलाजानें, ताराबाईला "घरचीं सारीं खुशाल आहेत ना?" असा निवळ औपचारिक स्वरानें प्रश्न केला, व ताराबाईनेंहि तशाच स्वरानें थोडक्यांत त्याचें उत्तर दिलें. इंदिराबाई तर अक्षरहि बोलली नाहीं.

नंतर हुजऱ्यांनीं चहा, कॉफी, बिस्किटें व नानातऱ्हेचीं ताजीं फळें, पेरू, पंजाबचीं द्राक्षें वगैरे पदार्थ आणून मांडले, व सुलोचनाबाईनीं सरला-देवीला दोनचारदां डोळ्यानें खुणाविल्यावर तिनें पाव्हण्यांनां त्यांचा स्वीकार करण्याची विनंति केली. आतां मात्र सर्वांनां करतां येईल असा उद्योग पुढें आला. कारण, सर्वांनां जरी बोलण्याची सोय नव्हती, तरी पुढें आलेल्या पदार्थांचा यथेच्छ समाचार घेतां येत होता; व टेबलावर पदार्थ कुशलतेनें मांडून ठेवले होते त्यांच्याभोंवतीं सारीं जमून, त्यांनां आपल्या पोटांत जागा देण्याच्या उद्योगांत गुंतून गेलीं. शारदामामींनां चहा म्हणजे एक अत्यंत प्रिय वस्तु! त्याच्यापुढें ऑस्ट्रेलिअन् द्राक्षांखेरीज सर्व रद्द वाटे! आणि येथें आतां तर त्या दोन्ही जिनसा यथास्थित दिसल्या. मग संकोच करण्याइतक्या त्या भिडस्त नव्हत्या. एकाद्यानें चांगली सुरुवात केली म्हणजे दुसऱ्या भिडस्त माणसांचीहि हळुहळू भीड चेपते, तसा प्रकार येथेंहि झाला.

फलाहार चालला असतांहि भय्यासाहेबांच्या येण्याची आपणाला इच्छा आहे, कीं भीति वाटते आहे, या प्रश्नाची नीटशी वासलात ताराबाईला लागत नव्हती; पण तितक्यांत खुद्द भय्यासाहेबच आंत आलेले पाहिल्या-बरोबर मनाला जो अनुभव आला, त्यामुळें तो प्रश्न खाडदिशीं आपोआप सुटला. कारण, ते येईतोंपर्यंत आपल्या इच्छेचा जोर जास्त प्रबळ आहे असें वाटण्यास सुरुवात करणाऱ्या ताराबाईला, ते प्रत्यक्ष आल्यावर, त्यांच्यांतला एकदोन दिवस दृष्टीस पडणारा शिष्टपणा कदाचित् मावळला तर नसेल, अशी भीति वाटून आपलें सुखस्वप्न नाहींसें होणार म्हणून वाईटहि वाटूं लागलें.

भय्यासाहेब सकाळीं वसंतराव आल्याबरोबर त्यांनां घेऊन व बरोबर एकदोन जाणते माळी व दुसरे एकदोघे पाव्हणे अशांसह बगीच्यांत नाना

प्रकारचीं झाडें पहाण्यांत गुंतले होते. मध्येंच गोष्टींवरून गोष्ट निघून वसंतराव सहज बोलले, कीं, आमचें कुटुंब व तारा आपल्या बहिणींनां भेटायला आतांच येणार आहेत. तें कळल्याबरोबर वसंतरावांनां माळ्यांशीं गुंतवून भय्यासाहेब इकडे निसटले. त्यांनां आंत आलेले पाहतांच आपलें मन अगदीं शांत ठेवण्याचा ताराबाईनें पुष्कळसा निश्चय केला. तो करणें सोपें होतें, पण तो पाळणें फार कठिण होऊन गेलें ! कारण, भय्यासाहेब आलेले पाहून सर्वांच्या मनांत एकच संशय अगदीं आपोआप उभा राहिला. ते तेथें आल्याबरोबर पहिल्यानें कोणाशीं बोलतात अगर काय करतात, याकडे एकूणएक माणसांचें लक्ष लागून राहिलेलें ताराबाईनें ताडलें. इतरांपेक्षां कमलिनीच्या डोक्यांत तर इतकी उत्कंठा उत्पन्न झाली होती, कीं, जरी भय्यासाहेब आल्याबरोबर ती त्यांच्याकडे पाहून स्मित करूं लागली, तरी तिच्या तोंडावरचें प्रश्नचिन्ह कोणाच्याहि सहज ध्यानांत येण्यासारखें होतें. तिच्या मनांत जरी मत्सराग्नि उत्पन्न झाला होता, तरी अजून त्यानें पुरता पेट घेतला नव्हता; म्हणून भय्यासाहेब आल्यावर तिनें नेहमींप्रमाणें त्यांची मर्जी संपादण्याचा यत्न अजून सोडून दिला नव्हता. बंधु आलेले पाहून सरलादेवी ताराबाईशीं बोलण्याचा जास्त प्रयत्न करूं लागली, व त्यांनीं स्वतः दोघींची जास्त ओळख घालून देण्याकरितां संभाषणाचा ओघ त्या बाजूकडे वळविण्याची खटपट केली. भय्यासाहेब आपणाकडे दुर्लक्ष करून ताराबाईकडे जास्त लक्ष देताहेत हें पाहून तर कमलिनीचा मत्सराग्नि जास्त पेट घेऊं लागला, व त्याच्या झटक्यांत तिचा कांहीं तरी उणेपणा काढून हंसू करावें या हेतूनें मोठा शिष्टाचाराचा आव आणून ती ताराबाईला म्हणाली "काहो ताराबाई, शिवदुर्गाहून तो तुमचा रिसाला हालला म्हणतात ! खरं का तें ? तर मग तुमच्या मंडळींनां आतां करमेनासं झालं असेल अगदीं !"

भय्यासाहेबांसमोर कमलिनीला नागेशरावांचें नांव घेऊन तिला टोंचतां येईना, म्हणूच तिनें तें नांव प्रत्यक्ष काढलें नव्हतें, इतकेंच; पण तिचा तसला रोंख ताराबाईनें झटकन् ओळखला, व त्यामुळें कमलिनीच्या स्वप्नांतहि येणें शक्य नाहींत असल्या कितीतरी गोष्टी एकदम ताराबाईच्या डोळ्यापुढें येऊन उभ्या राहून तिला चमत्कारिक वाटूं लागलें; पण लवकरच सांवरून तिनें कमलिनीला साधेंसें उत्तर देऊन तिनें वेळ मारून नेली. तें बोलतांबोलतां

तिची नजर आपोआप नाइलाजानें भय्यासाहेबांकडे गेली, तों त्यांच्या चेहऱ्यावर राग, व सरलादेवीच्या चेहऱ्यावर अतोनात शरम दिसूं लागली-इतकी कीं, तिच्यानें खालीं घातलेली मान वरती उचलवेनाच ! हा असला परिणाम झालेला कमलिनीच्या लक्षांत येणें शक्यच नव्हतें. तिचा दुष्ट हेतु इतकाच होता, कीं, नागेशरावांची ताराबाईला आठवण देऊन तिचा गोंधळ करून सोडावा, व तिच्या बहिणी ऑफिसर्सकरितां कशा वेड्या झाल्या होत्या त्याचें स्मरण भय्यासाहेबांनां पुनः एकदां देऊन तिच्या घराण्याविषयीं त्यांच्या मनांतला दुर्ग्रह दृढ करावा. त्या रिसाल्याच्या आठवणीमुळें दुसऱ्या कितीक नाजुक गोष्टींचें स्मरण भय्यासाहेबांनां अथवा सरला-देवीला होऊन किती शरम वाटेल, त्याची कमलिनीला यत्किंचित् कल्पना असती, तर तें नांव काढण्यापूर्वीं तिनें आपली जीभहि कापण्याची तयारी केली असती. पण त्या भयंकर गोष्टींचा कमलिनीला गंधहि नव्हता. तारा-बाईशिवाय अगदीं जरूर तितक्याच माणसांनां त्या गोष्टी माहीत होत्या. विशेषेंकरून भाऊसाहेब व त्यांच्या बहिणी यांच्यापासून तर त्या गोष्टी फारच काळजीनें चोरून ठेवल्या होत्या. कारण, पूर्वीं एकदां ताराबाईनें कल्पना केल्याप्रमाणें भाऊसाहेबांचा आपणाशीं असलेला स्नेह रूपांतर पावून त्यांचें आपलें नातें व्हावें,—म्हणजे त्यांचें सरलादेवीशीं जुळल्यास लग्न व्हावें—असा हेतु भय्यासाहेबांच्या मनांत कधीं कधीं येत असे. ही ताराबाईची कल्पना केवळच खोटी नव्हती, व त्या हेतूमुळें त्यांनीं शांताबाईच्या बाबतींत विना-कारण ढवळाढवळ केली असें जरी म्हणतां येणार नाहीं, तरी भाऊसाहेबांच्या सौख्याबद्दलची त्यांनां जी विशेष काळजी घ्यावीशी वाटत असे त्याच्या मुळाशीं हा हेतु अंशतः तरी असेल, यांत संशय नव्हता.

पण ताराबाईनें साधें उत्तर दिल्यामुळें कमलिनीला पुनः तीच गोष्ट बोलण्याला कारण उरलें नाहीं, व हळुहळू सरलादेवीचीहि उडालेली गाळण शांत होत चालली. मात्र मध्यं ती जे चार शब्द भावाच्या छत्राखालीं तारा-बाईशीं बोलूं लागली होती, ते बंद झाले. कमलिनीला मात्र फायदा इतकाच झाला, कीं, ताराबाईवरून भय्यासाहेबांचें मन उडावें या हेतूनें ती जें बोलून गेली, त्यामुळें त्यांचं लक्ष ताराबाईलाच फक्त ती गुह्य गोष्ट ठाऊक असल्या-मुळें तिच्याकडे पूर्वींपेक्षांहि जास्त वेधलें !

# आजपासून पन्नास वर्षांनीं !

वर सांगितलेल्या प्रश्नोत्तरांनंतर फार वेळ भेट लांबलीच नाहीं. शारदा-ताराबाई जाण्यास निघाल्या, त्यांनां गाडीपर्यंत पोंचविण्याला भय्यासाहेब गेले. इकडे ताराबाईच्या स्वरूपावर, पोषाखावर व बोलण्यासंवरण्यावर कमलिनीचा भडिमार सुरू झाला; पण सरलादेवीला तो भडिमार बिलकूल पटेना. ताराबाई भय्यासाहेबांनां पसंत आहे यांत सर्व कांहीं आलें, त्यांची नजर कधीं चुकणार नाहीं, अशी तिची पुरी समजूत असे, व त्यांनीं तर तिची इतकी भरपूर वाखाणणी केली होती, कीं, तिच्यांत दोष सांपडणें सरलादेवीला केवळ अशक्य होऊन गेलें होतें ! नंतर भय्यासाहेब आल्यावर त्यांनांहि कमलिनीनें आपल्या टीकेचा थोडासा मासला अर्पण केला. ती म्हणाली:—

" आज ताराबाई किती खराब झालेली दिसली म्हणतां भय्यासाहेब ! चार महिन्यांत इतका भयंकर फरक मीं तर कधीं कोणांत नव्हता झालेला पाह्यला ! किती तरी काळी अन् निब्रट दिसूं लागली आहे बाई ! इंदिरा-ताईन् मी तर म्हणत होतों, कीं, रस्त्यांत नुसती पाहिली असती तर आम्ही तिला ओळखली दिखील नसती ! "

हें बोलणें अर्थात् भय्यासाहेबांनां रुचणें शक्य नव्हतें. पण त्यांनीं फक्त शांतपणानें एवढाच जबाब दिला, कीं, "मला तर फक्त थंडीच्या दिवसांत प्रवास केल्यानें तिचें अंग फुटलेलें दिसतें आहे, व प्रवासामुळें जरा अंगावरचें तेज कमी झालेलें दिसतें, यापेक्षां विशेष कांहीं दिसलें नाहीं."

कमलिनी म्हणाली "मला तर आधीं कधींच तिच्यांत सुस्वरूप दिसलं नाहीं म्हणा. चेहरा काय बारीक लांबचलांब, गोरेंपणाहि मळकटच आहे, अन् नाकडोळे तर मुळींच सुंदर नाहींत ! नाक तर थोडंसं नकटंच आहे, आम्ही म्हणतात नाहीं तसं आहे. दांत बरे आहेत पण त्यांत कांहीं विशेष नाहीं. तिच्या डोळ्यांची एकदां फार वाखाणणी ऐकली होती, पण मला तर कधीं ते पाणीदार दिसलेच नाहींत. एकाद्या भामट्याचे जसे चहूंकडे गरगर फिरत असतात, तसे दिसतात तिचे डोळे. त्यांत कांहीं शांतपणा, का कांहीं ? अन् चालायबोलायची ढब तर काय, जसा काय एकादा पठाण बोलतो आहे !"

ताराबाई भय्यासाहेबांनां पसंत पडत चालली आहे असा जर कमलिनीला संशय आला होता, तर तिच्यावर असल्या बाष्कळ टीका करण्यानें ते खूष होण्याऐवजीं उलट नाखुष होतील, इतकें का कमलिनीच्या लक्षांत येऊं नये ?

पण मत्सरानें वेडावलेल्या माणसाला अक्कल राहते कोठें ? आपली टीका त्यांनां रुचली नाहीं हें पाहून तिला वाटलें, कीं, आपला हेतु तडीस गेला. भय्यासाहेब कांहींच उत्तर देईनात, व म्हणून आपला हेतु जास्त साधण्याच्या इराद्यानें, व त्यांच्या तोंडांतून कांहीं तरी तसलेंच बाहेर पडेल या आशेनें, ती पुनः तसलेंच बोलूं लागली. "मला चांगली आठवण आहे. आपण प्रथम शिवदुर्गांत गेलें तेव्हां तिकडचीं सारीं माणसं ताराबाईला मोठी शूर्पणखा समजतात, हें ऐकून तुम्हाला किती तरी आश्चर्य वाटलं. एक दिवशीं तर भय्यासाहेब आनंदभुवनांत स्पष्टच म्हणाले, कीं, 'काय ? ताराबाई सुस्वरूप ? तर मग तिच्या मातोश्रीलाहि मार्मिक कां म्हणूं नये ?' पण मागून आपला अभिप्राय थोडासा बदलला, नाहीं बरं भय्यासाहेब ? मधें मधें तर आपण तिला देखणी दिखील कांहीं दिवस म्हणत होतां ! "

आतां भय्यासाहेबांच्यानें उत्तर दिल्यावांचून राहवेना. म्हणून ते म्हणाले "होय. मीं तसें म्हटलें खरें, पण तेव्हां मीं तिला अवघी एक वेळच पाहिली होती. कारण, अलीकडे कितीक महिने मी तर असें समजतों आहे, कीं, माझ्या पाहाण्यांतल्या अत्यंत सुस्वरूप स्त्रियांमध्यें गणना होण्याइतकी ताराबाई देखणी आहे. "

इतकें बोलून ते पुरुषांकडे निघून गेले, व विनाकारण आपणालाच फक्त वाईट वाटण्यासारखें आपण त्यांनां बोलायला लावलें म्हणून कमलिनी हिरमुसली झाली.

परत चटणीला जातांना मामीभाचींच्या रगड गोष्टी झाल्या. दिलबहारांत घडलेल्या सर्व प्रकरांविषयीं व पाहिलेल्या सर्व माणसांविषयीं रगड संवाद झाला. भय्यासाहेबांशिवाय त्यांची बहीण, त्यांचा महाल, त्यांची उत्तम फळफळावळ असे सर्व विषय झाले; पण खुद्द भय्यासाहेबांविषयीं मामींनां काय वाटलें तें ऐकण्याची ताराबाईला अत्यंत उत्कट इच्छा झाली होती. आणि शारदाबाईनीं तर असें ठरविलें होतें, कीं, भाचीनें मुद्दाम गोष्ट काढल्यावांचून आपण उगीच असल्या नाजूक गोष्टीमध्यें कशाला तोंड घाला ! भाचीनें सुरुवात करावी असे त्यांनां किती तरी मनापासून वाटत होतें. पण एकंदर परिणाम काय ? दोघींनींहि त्याविषयीं अवाक्षर काढलें नाहीं !

---

## प्रकरण सेचाळिसावें.

### भयंकर बातमी.

चटणीला आल्यापासून आज चारपांच दिवसांत शिवदुर्गाहून ताराबाईला मुळींच पत्र आलें नव्हतें, म्हणून ती अलीकडे थोडीशी काळजींतच होती. चटणीस मुक्काम व्हायचें ठरलेलें होतें तें शांताक्काला कळविलेंहि होतें, पण येथें आल्यापासून रोज ताराबाईनें वाट पहावी, व रोज तिची निराशा व्हावी. आज सकाळीं मामामामींच्याबरोबर हिंडायला निघत असतां टपाल आलें. त्यांत एकदम दोन पत्रें शिवदुर्गाहून शांताबाईनें पत्ता लिहिलेलीं हातीं. त्यांतलें एक एक दिवस आधीं टपालांत टाकल्याचा छाप होता, पण 'टू लेट' म्हणूनहि त्यावर छाप होता. दुसरें मात्र रास्त वेळीं टपालांत पडल्यामुळें आज दोन्हीहि एका वेळीं हातीं आलीं होतीं. पहिलें पत्र अर्थात्च ताराबाईनें आधीं उघडलें व प्रथमच्या दोनचार ओळींवरून सर्व खुशाल असल्याचें तिनें मामामामींनां सांगितलें. "बरं आहे, तर तूं आतां स्वस्थपणानं दोन्ही पत्रं वाचीत बैस, आम्ही फिरायला जरा जाऊन येतों," असें मामी म्हणाल्या, व ताराबाईचीहि तशी इच्छा पाहून मामाहि कबूल होऊन तीं दोघें गेलीं.

ताराबाई पत्र वाचूं लागली. पहिल्यानें तिकडली रोजची साधारण हकीगत व गांवांतली साधी बातमी नेहमींप्रमाणें लिहून पत्र संपविलें होतें; पण त्याखालीं घाबऱ्या घाबऱ्या अक्षरानें ताजा कलम लिहिला होता, त्यानेंच बहुतेक कागद भरला होता. त्यांतला मजकूर खरोखरच घाबरवणारा होता; तो येणेंप्रमाणें:—

"ता. क.—येथपर्यंत पत्र लिहून झाल्यावर एक अगदीं अनपेक्षित व भयंकर प्रकार येथें घडून आल्याचें लिहिणें माझ्या नशिबीं आलें आहे. भिऊं नको तारा! आम्ही सारीं प्रकृतीनें खुशाल आहोंत. मी जें लिहिणार आहें तें सुंदरविषयीं आहे. आम्ही दुपारीं जरा स्वस्थ पडलों असतां एकाएकीं कर्नल फडक्यांकडून नगराहून एक्सप्रेस तार आली, कीं, सुंदर पलटणींतल्या एका ऑफिसराबरोबर गेली—स्पष्ट बोलायचें तर नागेशरावांबरोबर ती गिरीला पळून गेली. आमची काय स्थिति झाली असेल त्याची कल्पना तूंच कर! हिरीला मात्र ही बातमी अगदीं केवळ आमच्याइतकी अकाल्पित आहेशी दिसत नाहीं. अरेरे, किती तरी मला वाईट वाटतें आहे! दोघांच्याहि दृष्टीनें पाहिलें तरी हें लग्न

अगदीं अविचाराचेंच केवळ समजलें पाहिजे. तें सुखाचें ठरो एवढीच आतां माझी देवाजवळ प्रार्थना आहे. मला वाटतें, कीं, नागेशरावाचा स्वभाव आपण वास्तविक ओळखलाच नाहीं. विचार न करितां सहज हुरळून जाणारा असा तो आहे, हें मी कबूल करीन; पण त्याच्या आजच्या या वर्तनावरून त्याचें अंतःकरण शुद्ध आहे असें स्पष्ट दिसून येतें आहे. सुंदरशीं लग्न करण्याला तयार होण्यांत द्रव्यलोभाच्या पापाचा तरी अंश नाहीं, हें कोणीहि कबूल करील. कारण, बाबांच्यापाशीं सुंदरला द्यायला हुंडा मुळींच नाहीं, हें त्याला पक्कें माहित आहे. आपल्या आईला कोण वाईट वाटतें आहे म्हणतेस! बाबांनां तें तितकें कांहीं असह्य झालेंसें दिसत नाहीं. आतां मला किती तरी धन्य वाटत आहे कीं, आपणाला नागेशरावांविरुद्ध जें मध्यें समजलें होतें, तें बरें आपण त्या दोघांनां नव्हतें कळवलें. आपण सुद्धां तें सारें आतां अगदीं विसरून गेलें पाहिजे. तीं दोघें शनवारीं रात्रीं बारा वाजतां निघून गेलीं. पण आज सकाळीं म्हणजे आदितवारीं सकाळीं सात वाजेपर्यंत कोणाला शंकाच आली नव्हती. नक्की कळलें त्याबरोबर ताबडतोब तार केली. काय सांगावें तारा, आपल्या शिवदुर्गाच्या स्टेशन-वरून कींग पुढें तशीं चालतीं झालीं म्हणायचीं! कर्नल फडके इकडे यायला निघाले आहेत असेंहि तारेंत आहे. त्यांच्या बायकोला सुंदरनें जातांना एक लहानसें पत्र लिहून ठेवलें होतें म्हणे. त्यांत सारा बेत लिहिला होता तिनें. आतां मी पुरे करतें. आईची अगदीं गाळण उडाली आहे, तिच्याकडे गेलें पाहिजे, आणि शिवाय टपाल निघायची अगदीं वेळ झाली आहे. पत्र घाईनें लिहिलें आहे, तें प्रयत्न करूनच सगळें लागेल. मीं काय लिहिलें आहे तें मला तरी कुठें पुनः वाचायला वेळ आहे!"

हें पहिलें पत्र संपल्याबरोबर विचार करण्यास फुरसत न घेतां ताराबाईनें एकदम दुसरें फोडलें. त्याची तारीख सोमवारची म्हणजे दुसऱ्या दिवशींची होती. तें ती अत्यंत उतावळीनें वाचूं लागली. तें पत्र येणेंप्रमाणें होतें:—

"अनेक आशीर्वाद, वि. वि.—काल टाकलेलें घाईघाईनें लिहिलेलें पत्र याच्या आधीं पोंचलें असेलच. हें ल्याहायला जरी वेळ रगड आहे, तरी माझें डोकें इतकें गडबडून गेलेलें आहे, कीं, मी बरोबर बोध होण्यासारखें कसें लिहीन कोण जाणे! आज मला कालच्या गोष्टीविषयीं वाईट वर्तमान लिहिलें पाहिजे. काल मीं म्हटलें, कीं, हें दोघांचें लग्न अगदीं अविचाराचें

म्हटलें पाहिजे. पण आज आम्हांला असें झालें आहे, कीं, तें लग्न खरोखर लागलें, हीं चार अक्षरें कशीं आमच्या कानावर पडतील ? इतकी आज आम्हांला शंका येते आहे. कारण, तीं मुळींच गिरीला गेलीं नाहींत, असें आतां दिसतें. कर्नल फडके तार केल्यानंतर लगेच दोन तासांनीं नगराहून निघाले. सुंदरनें नलिनीबाईला लिहिलेल्या पत्रांत जरी गिरीला जायचा बेत ठरल्याचें लिहिलें होतें, तरी दाणींच्या बोलण्यांत स्नेह्याजवळ असे उद्गार निघाले, कीं, 'नागेशराव गिरीला कसचा जातो, आणि लग्न तरी कसचा करतो !' हे उद्गार कर्नल फडक्यांच्या कानीं गेले, व ते लगेच फारच घाबरले, व तपास करीत करीत इकडे आले. दौंडापर्यंत त्यांनां त्यांचा तलास लागला; पण पुढें सर्व गोंधळ. कोणी म्हणाले, कीं, तीं दोघें मुंबईला जायच्या गाडींत सेकंड क्लासांत बसलीं होतीं. तेंहि बरोबर असेल. कारण, पुण्याहून बेळगांव-वरून गिरीला जाणें अशक्य नाहीं. पुण्यास कसा तलास लागायचा ? म्हणून कर्नल फडके शिवदुर्गांच्या स्टेशनवर उतरून तलास करीत करीत इथें आले. पण कुठें पत्ता नाहीं. कोण बिचाऱ्याची त्रेधा झाली आहे. बिचाऱ्यानें एकाद्या महान् अपराधी माणसाप्रमाणें केविलवाणें तोंड करून आम्हांला सारें सांगितलें. कोण त्या नवराबायकोच्या मागें पिडा उत्पन्न झाली पहा ! त्यांनीं काय बरें पातक केलें, तिला नगराला चार दिवस राह्यला बोलावली त्यांत ?

" आमची अगदीं हवेलंडी उडून गेली आहे. आईलान् बाबांनां तर सगळें अगदीं वाईट चिन्ह दिसतें आहे. पण मला अजून तसें नाहीं दिसत. एवढ्या लांब गिरीला जाण्यापेक्षां मुंबईतल्या मुंबईत झटकन् लग्न लागत नाहीं असें थोडेंच आहे ! अन् जरी यदाकदाचित् त्याचा विचार लग्न लावण्याचा नसला,—पण सुंदरसारख्या इष्टमित्र चौकशी करण्याला असणाऱ्या मुलीविषयीं इतका अविचार कसा तो करील ?—पण मी म्हणतें, त्याचा एक तसला अविचार असला, तरी ती कशी तशा गोष्टीला बेश्रमपणानें कबूल होईल ? मी तर म्हणतें अगदीं अशक्य ! पण कर्नल फडक्यांनां तें लग्न लागेल असें मुळींच वाटत नाहींसें दिसतें. मी बोललें, कीं, लग्न खास लागेल, तेव्हां ते नाहीं अशी मान हालवीत होते, व म्हणाले, कीं, नागेशरावाचा कोणचाच कांहीं विश्वास धरतां येत नाहीं !

" आई खरोखरच आजारी झाली आहे, खोलींतून बाहेरसुद्धां ती येत नाहीं. ती थोडा धीर धरून विवेक करील तर बरें होईल; पण तें तिला

शक्यच नाहीं. बाबांनां इतकें वाईट वाटलेलें मीं तर कधीं पाहिलें नव्हतें! हिरीवर सडकून संतापले आहेत, कीं, तिनें कसें हें असलें गुप्त ठेवलें. पण बोलूनचालून गुपित म्हणूनच जर तिला कळलें होतें, तर तिनें तरी तें कसें बरें बाहेर फोडावें ? या असल्या भयंकर काळज्यांच्या वेळीं तूं आणखी नाहींस हें किती तरी बरें आहे. पण खरें सांगूं का, आतां मला तूं इथें असावेंसें वाटतें आहे. पण तुमची जर फारच गैरसोय होणार असली तर मग आग्रह मी नाहीं करीत. कळावें, हे आशीर्वाद."

"ता. क.–मी आग्रह नाहीं करीत म्हणालें खरी, पण आतां नाइलाज आहे. तुम्ही सर्वचजण असाल तशीं ताबडतोब इकडे निघून या, असें लिहिणें आतां अत्यंत जरूर झालें आहे. आमच्या मामांचा आम्हांवर इतका लोभ आहे, कीं, त्यांनां तसें ल्याहायला मला संकोच वाटत नाहीं. दुसरेंहि एक त्याला कारण आहे. कर्नल फडक्यांबरोबर बाबा आतां मुंबईला जायला निघताहेत. तेथें तपास करून त्यांचा सुगावा लावायचा आहे. कर्नल फडक्यांनां काय वास असेल तो मला माहीत नाहीं; पण त्यांनां रजा दोनच दिवस मिळाली आहे म्हणून त्यांनां मुंबईहून ताबडतोब नगराला गेलेंच पाहिजे. बाबा इतके गोंधळून गेले आहेत, कीं, अफाट मुंबईत ते एकटे काय करतील बरें ? अशा वेळीं मामा मुंबईत असणें अत्यंत जरूर आहे. जास्त काय लिहूं ? मामा योग्य तें ताबडतोब करतील अशा खात्रीवर हें लिहिलें आहे. कळावें, हे विनंतिपूर्वक आशीर्वाद."

पत्र संपल्याबरोबर " अहो, मामा कुठें आहेत, कुठें हो आहेत ? " असें दुःखाच्या वेगानें ओरडत ताराबाई खोलींतून बाहेर पडूं लागली. अगदीं एकाहि क्षण वायां घालविणें म्हणजे हजारो रुपये किंमतीचा क्षण गेला असें होईल, या भीतीनें ती झटझट दाराशीं जाऊन तें उघडणार, इतक्यांत बाहेरूनच कोणीसें तें उघडलें, व भय्यासाहेब एकदम आंत आले. अगदीं तिचा फिक्कट पडलेला चेहरा व तिची उडालेली भयंकर गाळण दृष्टीस पडतांच भय्यासाहेब एकदम दचकून गेले. ते कांहीं प्रश्न विचारण्याइतके सांवरण्याच्या पूर्वींच, सुंदरच्या दुःस्थितीनें इतर सर्व विचार विसरून गेलेली ताराबाई एकदम मोठ्यानें त्यांनां म्हणाली " मला माफ करा, भय्यासाहेब, मला आधीं गेलेंच पाहिजे; पहिले काम मामांनां असतील तिथून सोधून

आणलं पाहिजे; काम असं उतावळीचं आहे, कीं, एक क्षणहि घालवणं शक्य नाहीं. ”

भय्यासाहेबहि घाबरून जाऊन एकदम म्हणाले “अरे बापरे ! असें झालें आहे तरी काय ? ”

पण असें दुसऱ्याचें काम विचारणें शिष्टपणाच्या विरुद्ध आहे हें लक्षांत येऊन ते लगेच म्हणाले “मी उशीर करा म्हणत नाहीं, पण मामासाहेबांनां शोधायला नोकर पाठवावा, अथवा मीच स्वतः जातों. तुमची स्थिति नीट दिसत नाहीं, इतक्या तुम्ही अत्यंत भेदरल्या आहांत. ”

ताराबाई विचारांत पडली; पण पाय लटलट कांपूं लागले होते. अशा स्थितींत आपण जाऊन काय उपयोग हें तिच्या लक्षांत आलें, म्हणून तिनें गड्याला हांक मारली व “ मालकाला घेऊन ये—अगदीं पळ—जा—एकदम त्यांनां आण!” असें त्याला इतक्या घाबऱ्या घाबऱ्या सांगितलें, कीं, त्याला कांहीं चांगलेंसें ऐकूंसुद्धां आलें नाहीं. पण तो चाणाक्ष असल्यामुळें ताबड-तोब चालता झाला. तो गेला आणि पाय थरथर कांपत असल्यामुळें तारा-बाई मटकन् एका खुर्चीवर बसली. अजून अत्यंत पांढराफटक तिचा चेहरा होता. एकसारखी छाती थडथड उडत होती. अशा स्थितींत तिला एकटीला सोडून जाणें अशक्य होऊन गेलें. हिला आतां का एकादी फिट्बीट् येते कीं काय, अशी भीति भय्यासाहेबांनां पडली, व ते फार सौम्य स्वरानें म्हणाले “ घरांतल्या कोणा बायकोमनुष्याला हांक मारूं का ? तुम्हाला कांहीं तरी होतें आहे. वेळींच थोडीशी मात्राबित्रा कोणीं दिली तर ठीक होईल. निदान लवेंडर तरी हुंगून पहा. ”

“छे छे, नको !” ताराबाई शांत होण्याचा प्रयत्न करून म्हणाली. “मी कांहीं आजारी नाहीं. आमच्या घरची कांहीं फार भयंकर बातमी आतां टपालानं आली आहे, त्यानं मी घाबरून गेलें आहे; कसं ग बाई होईल आतां ? अरे देवारे ! ”

हे शब्द बोलतांना ती एकदम हातांनीं डोळे झांकून रडूं लागली. भय्यासाहेबांची अत्यंत विलक्षण स्थिति झाली. काय बातमी आहे तें कळेना, त्यामुळें तेहि भयंकर दुग्ध्यांत पडून राहिले. काय बोलावें, काय सांत्वन करावें, हें बिलकूल त्यांनां कळेना. “काय एवढें भयंकर झालें आहे ?” असें या स्थितींत विचारावें तरी कसें ? ते अत्यंत सहानुभूतीनें तिच्याकडे नुसते

पहात उभे होते. अखेर ताराबाईच पुनः बोलूं लागली " हें आत्तांच शांताक्काचें पत्र आलं, त्यांत अत्यंत वाईट मजकूर आहे. ही बातमी आतां चोरून कशी राहणार ? आमची सुंद्री सगळ्यांनां सोडून निघून गेली. भलत्याचा हात धरून चालती झाली ! नागेशरावाबरोबर नगराहून निघून गेली! आतां तिची अब्रू त्यांच्या हातांत आहे–तिचीच कां, आम्हां सगळ्यांचीच आहे ! पुढं काय होणार तें आतां दिसतंच आहे. तिच्यापाशीं पैसा अथवा इष्टेट थोडीच आहे तर तिच्याशीं ते...... ! बुडाली हो, बिचारी पोर अगदीं पार बुडाली ! "

भय्यासाहेब अगदीं चकित होऊन गेले. ताराबाई पुनः आपणाशींच बोलूं लागली "अरेरे, माझ्या हातांत असून मी कशी गप्प राहिलें ? तो कसा माणूस आहे हें मला जर कळलं होतं, तर मीं घरांत आईला कां नाहीं कळवलं–म्हणजे ही आजची भयंकर गोष्ट नसती झाली. पण आतां काय उपयोग ? झालेली गोष्ट आतां का परत येते ? "

भय्यासाहेब हळुहळू म्हणाले "मला किती वाईट वाटतें आहे, किती माझ्या मनाला धक्का बसला आहे हा ! पण बातमी तरी अगदीं पक्की, अगदीं खास आहे का ? "

ताराबाई म्हणाली " हो खास, तीं दोघं शनवारीं रात्रीं गेलीं–गिरीकडे कांहीं खास गेलीं नाहींत. तिथें जायचा विचार होता, पण मुंबईकडे बहुत-करून गेलीं आहेत. "

भय्यासाहेबांनीं विचारलें " अन् त्यांनां शोधायला काय काय केलं ? कोणच्या कोणच्या बाजूनें तपास केला ? "

ताराबाई म्हणाली " तपास काय ? बाबा मुंबईला गेले आहेत, अन् आज शांताक्कानं मामांनां जरूर बोलावलं आहेन्. एका अर्ध्या तासाच्या आंत आम्ही निघून जाऊं.बाकी मला नाहीं उपयोग होईलसा वाटत. असल्या पाजी माणसाला जरब तरी आम्ही कशाची बसवणार ? आधीं मुंबईत तीं सांपडावीं कशीं ? अशक्य, मला तर बिलकूल आशा नाहीं. अगदीं सर्व बाजूनं धिंडवडे होणार आतां आमचे ! "

भय्यासाहेब काय बोलणार ? त्यांनांहि तिचें म्हणणें खरें वाटत होतें. ताराबाई पुनः आपल्याशीं म्हणाली " त्याचा नीचपणा मला पुरता ठाऊक होता–माझे डोळे उघडलेले असून कीं हो मीं पांघरूण घातलेलं उघडं केलं

नाहीं. हें असं होईल असं जर कळलं असतं तर!—पण केवढी मीं घोड्याएवढी चूक केली ही ! ”

भय्यासाहेब अवाक्षरहि बोलले नाहींत. अत्यंत गूढ विचारांत पडलेल्याप्रमाणें त्यांची चर्या होऊन ते कपाळाला आंठ्या पडून खोलींत इकडे तिकडे चलबिचलच्या येरझारा करूं लागले. या प्रकाराचा अर्थ तिनें ताबडतोब जाणला ती मनांतल्या मनांत अत्यंत खजील होऊन ओशाळली. असली बेअब्रूची गोष्ट ज्याच्या ज्याच्या कानीं पडेल, त्याच्या मनांतून आपलें घराणें उतरून गेलेंच पाहिजे. असला नामुष्कीचा प्रकार ज्या घराण्यांत झाला त्या घराण्याचा दुर्लौकिक निरंतरचा झालाच पाहिजे. भय्यासाहेबांनां तसें वाटलें तर त्यांत त्यांचा काय दोष ? ते उघड बोलून दाखवीत नाहींत, एवढा तरी बरा तेच म्हणून मनोनिग्रह करीत आहेत. दुसऱ्यांनीं तर तोंडावर हंसून छी:थू: केली असती. इतकी भय्यासाहेबांची उदात्त बुद्धि पाहून तिला त्यांचें कौतुक वाटलें, व त्यांच्याविषयीं आपल्या मनांत काय भाव उत्पन्न झालेला आहे तो यावेळीं तिच्या लक्षांत अत्यंत स्पष्टपणें आला. असल्या गृहस्थावर आपलें निःसीम प्रेम खास बसलें असतें, अशी तिची खाती झाली. पण आतां त्याचा काय उपयोग ?

पण यावेळीं स्वतःविषयीं विचार मनांत जरी मधून मधून येत, तरी ते फार वेळ कसे टिकणार ? सुंद्रीची शोचनीय स्थिति, तिनें आपल्या वर्तनानें घराण्याच्या अब्रूवर फांसलेलें काळेंकुट्ट डांबर कुळकुळीतपणें डोळ्यांसमोर येऊन उभें राहून, इतर सगळे विचार दिसेनासे होत. अखेर हातरुमालानें तोंड झांकून ती खुर्चीच्या पाठीवर डोकें टेकून राहिली, व बाह्यजग जणूं काय सर्व विसरून गेली. दोनचार मिनिटें तशीं गेल्यावर भय्यासाहेबांचे शब्द ऐकून ती जणूं काय शुद्धीवर आली. ते अत्यंत दयार्द्रस्वरानें पण फार जपत जपत बोलूं लागले. “मी इथून चालतें व्हावें असें तुम्ही कितीक वेळ मनांत म्हणत असाल. अन् मला अत्यंत वाईट वाटतें आहे, याशिवाय माझेंहि इथें थांबण्याचें, मलासुद्धां कारण दिसत नाहीं. असल्या दुर्धर प्रसंगीं माझ्याच्यानें जर कांहीं समाधान करण्यासारखें खरोखरी कांहीं म्हणतां अगर करतां येत असतें, तर परमेश्वराचे मजवर किती तरी उपकार झाले असते ! पण व्यर्थ बडबडून मी आपणाला विनाकारण तसदी कशाला देऊं ?

तसा मी बोलत बसलों, तर जणूं काय आपण माझे आभार मानावे, एवढयाच हेतूनें मी बोलतों आहेसें दिसेल. या प्रसंगामुळें आतां आज आपलें आमच्या घरीं यायचें रहितच झालें म्हणायचें ! भाऊसाहेबांनां अन् आम्हां सर्वांनां कितीतरी निराशा वाटेल ! ”

तारांबाई म्हणाली “हो हो, त्यांच्यापाशीं, अन् आपल्या बहिणीपाशीं, आमच्यातर्फे आपण क्षमा मागा. जरुरीच्या कामाकरितां आम्ही एकदम चालतीं झालों, असं कांहीं तरी सांगा. होईल तेवढा वेळ आमची बेअब्रू लपवून ठेवा, बाकी, ती आतां किती वेळ लपणार तें दिसतंच आहे !”

भय्यासाहेबांनीं तें कबूल केलें, पुनः एकदां तिच्याबद्दल सहानुभूतिपर उद्गार काढले, आज आशा आहे त्यापेक्षां जास्त चांगल्या प्रकारानें या संकटाचें निवारण होवो असे म्हणाले, व एकवार अत्यंत अर्थपूर्ण व प्रेमळ नजरेनें ताराबाईकडे पाहून ते निघून गेले.

ते गेल्याबरोबर ताराबाईला असें वाटलें, कीं, आज दोनचार दिवस ज्या अत्यंत मनोहर अशा परिस्थितींत आपण व भय्यासाहेब एकमेकांशीं मोकळ्या मनानें हिंडत फिरत होतों, व जी त्यापासून सुखमय कल्पना आपल्या मनांत संचार करूं लागली होती, त्या सर्वांचा आज एकाएकीं अशा अचानकपणें विध्वंस होऊन गेला. तिनें आजपर्यंतच्या आपल्या भय्यासाहेबांशीं होऊन गेलेल्या निरनिराळ्या तऱ्हेच्या भेटीगांठींचें थोडक्यांत सिंहावलोकन केलें. अव्वलपासून आजपर्यंत त्यांच्यासंबंधाच्या आपल्या मनांत येऊन गेलेल्या अनेक भावनांचें पर्यालोचन केलें. कितीतरी एकमेकांपासून भिन्न आणि विसंगत असे मनोविकार आपल्या मनांत भिन्न भिन्न प्रसंगीं वस्ती करून राहिले होते, त्या सर्वांची आठवण करून पाहिली. जो परिचय आज दृढ व्हावा असें मनापासून वाटूं लागलें आहे, पण आज जो पुढें चालू राहाणेंसुद्धां अशक्य झालें आहे, तो परिचय दृढ करून त्याला अत्यंत मधुर असें प्रेमाचें स्वरूप येऊं देणें आपल्या केवळ हातीं होतें. त्यावेळीं त्याची किंमत न ओळखून त्याची यथेच्छ पायमल्ली करण्यांत धन्यता मानली, व नसत्या शंका कुशंका घेऊन भय्यासाहेबांचा परिचय ताडकन् तुटावा अशी उत्कट इच्छा धरली, आणि आज तो परिचय आपोआप तुटत आहे तर त्याबद्दल अतोनात वाईट वाटत आहे, या दैवदुर्विपाकाला काय नांव द्यावें ? तिनें एक दीर्घ निःश्वास सोडला व ते गेले त्यांच्या वाटेकडे डोळे लावून निराशापूर्ण स्थितींत ती बसून राहिली.

आदरबुद्धि व कृतज्ञता या दोन भावना जर प्रेमाला मूळभूत असतील, तर, ताराबाईच्या हृदयांत स्थित्यंतर झालें, अप्रीति जाऊन प्रथम तटस्थ वृत्ति आली, व तिचें हळुहळू प्रीतीमध्यें रूपांतर झालें, ही गोष्ट कोणालाहि अशक्य अगर अस्वाभाविक दिसणार नाहीं. पण उलटपक्षीं, प्रेमाच्या उद्भवाला आदरबुद्धि व कृतज्ञता या दोहोंचा बिलकूल संबंध नाहीं असें जर कोणाचें म्हणणें असेल, अथवा दोन माणसांचें यदृच्छया प्रथम-दर्शन झाल्याबरोबर एकमेकांविषयीं अनिवार्य आकर्षण उत्पन्न होऊन जें एकमेकांवर अलोट प्रेम जडतें तेंच काय तें शुद्ध व सात्विक प्रेम, असें जे कोणी म्हणत असतील, त्यांनां ताराबाईच्या प्रेमोद्भवाच्या समर्थनाकरितां आम्ही एवढेंच म्हणूं शकतों, कीं, तुम्ही म्हणतां तें जास्त उंची प्रतीचें प्रेम कदाचित् असेल; पण ताराबाईनें तुम्ही म्हणतां त्या उच्च प्रतीच्या प्रेमाचा पूर्वीं नागेशरावांच्या संबंधानें अनुभव घेऊन पाहिला होता, व प्रेम जडण्याची ही पद्धत तिच्या मुळींच पसंतीस उतरली नव्हती. प्रथम भेटीपासूनच नागेशरावांसंबंधानें तिच्या मनांत अत्यंत अनुकूल अभिप्राय उत्पन्न होऊन, दोनचारदां गांठ पडल्यावर तर अगदीं अनिर्वचनीय असें प्रेम तिच्या हृदयांत त्यांच्याविषयीं सांठून राहिलें होतें; पण जों जों जास्त परिचय होत गेला, तों तों आपण सोनें समजून हातीं धरलेला पदार्थ शुद्ध बेगड आहे अशी तिची खात्री झाली होती, व त्यामुळें आपल्या मनाचा आत्मप्रत्यय सपशेल चुकला, व निव्वळ आंधळ्या प्रेमाची मनःप्रवृत्ति भलतीच व्यक्ति कधीं कधीं गांठून देते, अशीहि तिची खात्री झाली होती. अशा तऱ्हेनें एकदां सपशेल फसल्यामुळें, त्या प्रकारच्या मार्गानें प्रेम करण्यास लायख असें स्थान शोधून काढण्यापेक्षां, जरा गौण पद्धतीनें कां होईना, पण निःसंशयपणें पूर्ण लायख माणूस शोधून काढण्याची, तिची साहाजिकच प्रवृत्ति झाली; व म्हणूनच आदरबुद्धि व कृतज्ञता या दोहोंपासून हळुहळू प्रेमांकुर उत्पन्न करणाऱ्या भय्यासाहेबांवर तिचें निःसीम प्रेम बसूं लागलें. ही मीमांसा बरोबर असो वा नसो; हें निर्विवाद आहे, कीं, भय्यासाहेबांनां आपण मुकलों हा विचार तिला फार दुःसह झाला, व सुंद्रीच्या भयंकर अपराधाचीं कडू फळें भोगण्यास इतक्यांतच सुरुवातसुद्धां झाली, असें तिला वाटलें.

नागेशरावांचा विचार सुंद्रीशीं लग्न लावण्याचा असेल, ही आशा तिनें शांताक्काचें दुसरें पत्र वाचल्याबरोबरच सोडून दिली होती. तसली आशा

शांताकाशिवाय दुसरें कोणीच आतां करणार नाहीं, असें तिला सहज वाटलें. दुसऱ्या पत्रांतला लग्न न करण्याचा मजकूर वाचून तिला यत्किंचित्‌हि आश्चर्य वाटलें नव्हतें. खरें म्हटलें, तर पाहिलें एकच पत्र वाचून तिला आश्चर्य वाटूं लागलें होतें, व तें हें कीं, सुंद्रीसारख्या निष्कांचन मुलीशीं लग्न करण्याचा विचार त्यांच्या मनांत आला तरी कसा ? आधीं सुंद्रीसारख्या दरिद्री मुलीकडे त्यांचें प्रेम कसें ओढावें, हेंच तिला कितीक वेळ कळेना. पण दुसरें पत्र वाचल्यावर ती सर्व भ्रांति दूर झाली, व तिच्या डोक्यांत लख्कन् उजेड पडला. लग्नाव्यतिरिक्त प्रेमाचा आस्वाद घेण्यास सांपडेल तर त्यांची तयारीच असणार ! लग्नाच्या आमिषाशिवाय सुंद्री त्यांच्याबरोबर पळून जाण्यास तयार झाली असेल, असें तिचें मन खरें मानीना; परंतु लग्नाच्या गोडगोड लोणकढ्या थापांवर भुलून जाऊन, त्यांच्या स्वाधीन आपली अब्रू करण्यास तयार होण्याइतकी ती बेअकली आहे, व त्यामुळें ती खास फशीं पडेल, अशी ताराबाईला पक्की भीति वाटूं लागली होती.

शिवदुर्गांत रिसाला असेपर्यंत नागेशरावांवर सुंद्रीचें कधीं विशेष मन असल्याचें कोणाला दिसलें नव्हतें; परंतु कोणींहि जरा उत्तेजन दिलें, कीं, आपलें प्रेम त्यावर बसवण्यास तयार होण्यासारखी सुंद्री असे. तिच्या मनाला आज हा ऑफिसर तर उद्यां दुसरा, असा प्रसंगविशेषानें प्रिय वाटत असे. जो जास्त खुशामत करीत असेल तो त्यावेळीं प्रिय, अशी तिची समजूत असेशी दिसे. कोणाना कोणावर तरी तिचें प्रेम सदा जडलेलें वाटे. असल्या फुलपांखरांसारख्या मनाच्या मुलीला आईबापांनीं कह्यांत न ठेवतां, हवे तसे तिचे फाजील लाड केले—तसल्या वेड्या वागवणुकीला असें दुष्ट फळ आलें त्यांत नवल काय ?

"पण ही मी आतां स्वस्थ विचार कसलें करीत बसलें आहें ? कधीं एकदां धांवून घरीं जाईन, व अशा संकटाच्या प्रसंगीं आपला योग्य दुःखाचा भार सोसण्यास शांताकाला मदत करीन, असं मला झालं आहे. घरांत काय दुर्दशा उडाली असेल ! बाबा मुंबईला गेले आहेत, आई विवेक न करितां आणखी आपलीच नोकरी करून घेते आहे, हिरी मथुरी तर काय, आपल्याच नादांत असतील ! बिचाऱ्या एकट्या शांताकानं काय करावं ? सुंदरला आतां कोणाचाच कितीसा उपयोग होणार आहे, तें तर दिसतंच

आहे म्हणा. पण मामांचा यावेळीं अत्यंत उपयोग इतरांनां होईल. ते कधीं येतात कोण जाणे !"

अशी ती दरएक क्षण मोजीत असतां, वसंतराव व शारदाबाई अत्यंत घाबऱ्या घाबऱ्यापणानें आंत आलीं. गणूच्या सांगण्यावरून त्यांची समजूत अशी झाली होती, कीं, आपली तारा अकस्मात् आजारी झाली म्हणून ते पळतच आले होते. ताराबाईनें त्याविषयीं त्यांची समजूत घातली, व बोलावणें पाठवण्याचें कारण तोंडीं सांगून, दोन्ही पत्रेंहि मोठ्यानें वाचून दाखविलीं, व दुसऱ्यांतला ताजाकलमहि पुनः वाचला. सुंद्री कधीं वसंतरावांची अगर शारदाबाईची आवडती नव्हती, म्हणून ते काय म्हणतात अशी ताराला भीति होती; पण एकट्या सुंद्रीपेक्षां सर्वांच्याच अब्रूचा प्रश्न आज आहे असें समजून, वसंतरावांनीं शक्य ते सर्व प्रयत्न अत्यंत खुषीनें करण्याची आपली तयारी दर्शविली. त्यांची ही सहानुभूति पाहून ताराबाईच्या डोळ्यांत कृतज्ञतेचे अश्रु उभे राहिले, व सर्वांनीं झट्पट् करून एकदम शिवदुर्गास जाण्याला निघण्याची तयारी केली.

"दिलबहारला जायचं कबूल केलं आहे. त्याची निरवानिरव केली पाहिजे. गणू म्हणाला भय्यासाहेब इथें आले होते, खरं का ?" शारदाबाईनें विचारलें.

ताराबाई म्हणाली "हो हो, अन् मीं त्यांनां सांगूनसुद्धां टाकलं आहे, कीं, आम्हांला कांहीं आतां येतां यायचं नाहीं. तें सगळं नक्की करून टाकलं मीं."

शारदाबाई आपल्या स्वतःशींच म्हणाल्या " काय नक्की केलंन् ! खरी हकीगत त्यांनां स्पष्ट सांगण्याइतकी का हिचीन् त्यांची सलगी आहे ! किती आहे न् कशी आहे हें कळलं तर किती मौज होईल ! "

पण आतां असले विचार करावयाला वेळ कोठें होता ? अशा प्रसंगीं माणसाच्या हातून एकहि कामधंदा उचलवायचा नाहीं, असें इतर वेळीं ताराबाईनें आपल्या कल्पनेनें प्रतिपादन केलें असतें; पण आतां नुसती फिकीर करीत बसावयाला फुरसत असेल तर ना ! झटपट निघायचं म्हणजे किती तरी निरवानिरव केली पाहिजे, बांधाबांधी केली पाहिजे, स्नेह्यांनां खोटींच कारणें लिहून एकाएकीं गेल्याबद्दल चिठ्ठ्या पाठविल्या पाहिजेत, असे कितीक धंदे होते; पण एका अवघ्या तासांत ते सारे उरकले, व आतां निघण्याची सर्व तयारी झाली. ताराबाईला वाटलें होतें त्यापेक्षांहि थोड्या

वेळांत तीं टांग्यांतून ललितपुरास दाखल झालीं, व पहिल्या गाडीनें मनमाड-वरून पुण्यास व तेथून शिवदुर्गाकडे वाट चालूं लागलीं.

---

## प्रकरण सत्तेचाळिसावें.

### एकदम शिवदुर्ग.

पुण्याहून शिवदुर्गास जाण्याकरितां आगगाडी चालू झाल्यावर वसंतराव ताराबाईला म्हणाले " मीं एकंदर सगळ्या गोष्टींचा सर्व बाजूंनीं विचार करून पाहिला, अन् मला तर सरतेशेवटीं शांताबाई म्हणते तेंच जास्त खरें असें वाटूं लागलें आहे. प्रत्यक्ष आपल्या रिसाल्याच्या मुख्य कमांडिंग ऑफिसरच्या नजरेखालीं, खुद्द त्याच्याच घरीं राहिलेली मुलगी, आणि तीहि रगड काळजी घेणारीं तिचीं आप्तइष्ट असलेली अशी—सुंद्री असून तिला अशो केवळ फूस लावण्यासारखा प्रकार त्याच रिसाल्यांत नोकरी करणारा कोणी ऑफिसर कसा करील ? तिचे इष्टमित्र पुढें येऊन त्याबद्दल खटपट करणार नाहींत, अन् आपलें नीच कृत्य सहज पचून जाईल असें त्याला कसें वाटावें ? कर्नल फडक्यांच्या घरीं असें वर्तन नागेशराव करील तर रिसाल्यांत पुनः तोंड कसें कोणाला दाखवील ? त्यांतूनहि मुलीच्याबरोबर डबोलें हातीं लागण्यासारखें असतें तर एक असो. इथें तेंहि नाहीं. एकंदरींत फायद्यापेक्षां तोटाच फार होईल त्याचा. म्हणून मला वाटतें, कीं, अखेर हें लग्नच लागेलच. "

ताराबाई उल्हासानें म्हणाली " खरंच का आपणाला असं वाटतं ?"

शारादाबाई म्हणाल्या " मला दिखील तसंच वाटतं आहे. असली गोष्ट करणं म्हणजे लोकाचाराच्या दृष्टीनं वाईट तें तर राहोच, पण त्याच्या स्वार्थाच्या दृष्टीनंहि वाईटच. इतका तो स्वार्थाला आंधळा असेलसं मला नाहीं वाटत. तुला वाटतं तारा, कीं, तो इतका स्वार्थाच्या उलट वागेलसं ? "

ताराबाई म्हणाली "एक स्वार्थाच्याच विरुद्ध तेवढा नाहीं जाणार इतकंच; बाकी कश्शाचीहि तो पर्वा करणार नाहीं ! पण तुम्ही म्हणतां तसं लग्न खरंच का होणार असेल ? छे ! मला नाहीं तशी आशा धग्वत. तसं लग्नच करणं होतं, तर एकदम गिरीलाच कां नाहीं गेले ?"

वसंतराव म्हणाले " पण गेले नाहींत हें तरी अजून नक्की कशावरून ?"

ताराबाई म्हणाली "पण दौंडाहून सरळ खालीं जायचं, तें सोडून पुण्या-मुंबईकडच्या गाडींत कां बसले ? शिवदुर्गास घरीं बाबांकडे जाण्याकरितां असं म्हणावं, तर तिथें कांहीं मुळींच गेले नाहींत !"

वसंराव म्हणाले " बरें, पण जरी मुंबईस गेले असें धरलें, तरी काय ? केवळ गुप्तपणा रहावा यापेक्षां ज्यास्त हलका हेतु असेल असें कशावरून समजावें ? दोघांच्याहिजवळ द्रव्याची चंगळ थोडीच असायची आहे ! तेव्हां असाहि विचार मनांत येणें शक्य आहे, कीं, इतक्या लांब गिरीपर्यंत लग्नाकरितां जावें, त्यापेक्षां मुंबईतहि तेवढयाच थोड्या खर्चानें लग्न लावणारा भिक्षुक सहज मिळेल. अन् कदाचित् रजिस्ट्रारपुढें जाऊन लग्न करायचें मनांत आणलें असलें, तर मग तें मुंबईत फारच सोपें ! "

ताराबाई म्हणाली "पण मग एवढं गुप्त, एवढी चोरी कां ? इतकी लप्पं छप्पं कशाला ? छे छे, तें तसं सोपं नाहीं. दाणी हे त्यांचे मित्र ना ? त्यांनां कां वाटावं, कीं, तो लग्न कसचा करतो ह्मणून ? अहो, जिला द्रव्य नाहीं अशीशीं नागेशराव कधींहि लग्न करायचा नाहीं ! अन् असं सुंद्रीमधें विशेष मोह पाडण्यासारखं त्याला काय दिसलं, कीं, तेवढयाकरतां पैसा मिळवायची संधि त्यानं आपण होऊन सोडून द्यावी ? रिसाल्यांत छीथू होईल अन् कर्नलच्या घरांत असं कसं करील म्हणून तुम्ही म्हणतां, तें मात्र मला कांहीं समजत नाहीं. कर्नलच्या हातीं किती अधिकार असतो, व त्यामुळं तसल्या माणसाचं त्याला किती नुकसान करतां येतं, तें कांहीं मला ठाऊक नाहीं. पण बाकी तुम्ही जें म्हणतां, त्यांत मला नाहीं मोठासा अर्थ दिसत. इष्टमित्र खटपट करतील ही भीति त्यानं केव्हांच जोखून ठेवली असेल. तिला भाऊ नाहींच, वडीलच काय ते आहेत. पण त्याला माहीत आहे, कीं, ते लायब्ररीच्या बाहेर कोणीं हांकलून लावल्याशिवाय कांहीं निघायचे नाहींत !"

वसंतराव म्हणाले "पण लग्नावांचून सुंदर तरी त्याच्यापाशीं राह्यला कबूल होईल, इतकें का तुझें तिच्याविषयीं वाईट मत आहे ? "

ताराबाई म्हणाली "नाहीं ! कबूल ! किती झालं तरी सुंदर ही अब्रूदार, बाळबोध घराण्यांतली मुलगी आहे. ती जाणूनबुजून वांकडं पाऊल टाकील, असा संभव कमी खरा. पण लुच्चा माणसानं भुरळ घालून फसवायचंच धोरण ठेवलं, म्हणजे बिचारी फसायला उशीर का लागणार आहे ? नगराहून निघतांनां तिची समजूत अशीच असेल, कीं, आपण गिरीला गेल्याबरोबर

आधीं लग्न ! पण एकदां घराचा उंबरा उतरला म्हणजे किती कठीण जातं, तें कुठें तिला माहीत आहे ? त्यांतून आमची स्त्रियांची अब्रू तर कांचेपेक्षां ठिसूळ, असं जग समजतं. पहा बरं. एकाद्या बिचाऱ्या साध्वीला जर रस्त्यांत चार टोळभैरवांनीं गांठून तिची यत्किंचित्हि थोडीशी विटंबना केली, कीं, गेली तिची अब्रू ! तिचा स्वतःचा दोष होता का नाहीं हें पहातं कोण ? असं जर आहे, तर जी एकदां तिऱ्हाइताचा हात धरून घराबाहेर पडली, ती लग्नाच्या हेतूनं का पडली असेना—जग तिला हंसणारच ! अन् जर का त्या नराधमानं लग्न करायचं चुकवलं, कीं, मग तर काय, समाजाच्या दृष्टीनं ती अगदीं भ्रष्ट ठरलीच म्हणून समजावं ! म्हणजे माझं असं म्हणणं, कीं, एकपरी समाजच मग त्यांनां कुमार्गांत डांबून टाकतो. तुम्हांला असं वाटतं का, कीं,उद्यां जर सुंदर लग्न झाल्यावांचून परत आली, अन् म्हणूं लागली, कीं, मी अगदीं धुतल्या तांदुळासारखी शुद्ध आहें; तर कोणी तरी तिचं म्हणणं खरं समजेल का ? आपण कदाचित् प्रेमामुळें अन् आपणाला तिची पुरी माहिती आहे म्हणून तसं समजूं. पण आपण तसं मानण्याचा उपयोग काय ? उलट आपणालाहि लोक तिच्याच पंगतीला बसवतील. ”

वसंतराव म्हणाले “तारा, तूं म्हणतेस तें अगदीं खरें. म्हणून आपण आतां देवाजवळ एवढेंच मागायचें, कीं, देवा तूं नागेशरावाला सुबुद्धि दे ! शांताला कांहीं तो इतका नीच वाटत नाहीं आहे. ”

ताराबाई म्हणाली “शांताक्काला कोण कधीं तरी नीच वाटत असतो का ? आपल्या ओळखींच्यांपैकीं कोणाच्या अंगांत इतका पाजीपणा असेल, हें अगदीं शाबीत झाल्याशिवाय ती कद्धीं खरं मानायची नाहीं. पण नागेश कसा आहे तें का तिला माहीत नाहीं ? आम्हांला दोघींनांहि पुरं माहीत आहे, कीं, तो पदोपदीं लबाडी बोलतो, अब्रू, लज्जा यांची तर त्याला चाड नाहीं, जितका वरून उज्ज्वल दिसतो तितका तो आंतून काळा आहे. ”

शारबाईंनीं आश्चर्यानें विचारलें “इतका का अगदीं हलकट तो आहे ? अन् हें सारं तुम्हांला कसं कळलं ? ”

ताराबाई गोंधळून म्हणाली “कसं का समजेना आम्हांला ! परवां मीं नाहीं का तुम्हांला सांगितलं त्यानं भय्यासाहेबाशीं कसं नीचपणाचं कृत्य केलं तें.? अन् चटणीस तर तुम्हीं त्याचा लौकिक स्वतःच ऐकलात. भय्यासाहेब इतके त्याच्याशीं चांगले वागले असून, त्यानं किती त्यांच्या व्यर्थ नालस्त्या शिवदुर्गांत

केल्या, तेंहि तुम्हांला ठाऊक आहेच. मला त्याचीं आणखीहि अघोर कर्मं ठाऊक आहेत, पण तीं मला सांगण्याची मुभा नाहीं. पदोपदीं लपंडाव, गुळचट थापा, धडधडीत खोटं बोलणं—हें सारं नखशिखांत त्याच्यांत भरलेलं आहे जसं—"

वसंतराव म्हणाले "अन् हें सारें सुंद्रीला ठाऊक कसें नसेल ? तुम्हां दोघींनां जर तें इतकें बालंबाल माहीत आहे, तर तिला यांतलें कांहीं माहीत नाहीं, असें कसें होईल ? "

ताराबाई उद्वेगानें म्हणाली "हो, इथेंच तर सगळं घोडं पेंड खातं आहे! सुवर्णपुराला मी गेलें व तिथें भय्यासाहेब व बाळासाहेब यांनीं मला सांगेपर्यंत मला तरी कुठें हें माहीत होतं? तिथून मी परत घरीं गेलें, तों रिसाला चारआठ दिवसांत हालणार म्हणून समजलं. म्हणून मीन् शांताक्कानं ठरवलं, कीं, उगीच मुद्दाम नागेशराव पाजी आहे पाजी आहे असं आपण ज्याला त्याला कशाला सांगत सुटा ! कारण,सर्वजणं त्याला नामी समजत होतीं,तर इतक्या साऱ्यांचे डोळे उघडण्याचा प्रयत्न करण्यांत फायदा कोणचा ? अन् तसं प्रयोजनहि राह्यलं नव्हतं. पुढें अगदीं आयत्या वेळीं सुंदरचा नगराला जायचा बेत झाला, तेव्हांहि तिला हें सारं सांगायला फुरसतहि नव्हती, अन् मला तसं कारणहि दिसलं नाहीं. नागेशरावासारखा माणूस असल्या दरिद्री पोरीकडे ढुंकून दिखील पाहीलसं मला वाटलं नाहीं. अन् आजच्यासारखा निवळ फुसलावण्याचा बेत माझ्या स्वप्नांतहि कधीं आला नाहीं ! "

शारदाबाई म्हणाल्या " तर मग रिसाला नगराला गेला तेव्हां त्या दोघांत कांहीं प्रेमबीम असेल असं तुला नव्हतं वाटलं ? "

ताराबाई म्हणाली " छे हो, बिलकूल नाहीं ! तसं जर कांहीं कोणाला दिसलं असतं, तर आमच्या आईसाहेब कधीं तरी स्वस्थ राह्यल्या असत्या का ? पहिल्यानं तो रिसाल्यांत आला तेव्हां तिला तो आवडला; पण तसा तो कोणाला नाहीं आवडला ? दोन महिने तर सारं शिवदुर्ग त्याच्यावर अगदीं झुलत होतें. पण पुढें त्याचं लक्ष तिच्यावर नव्हतं, म्हणून तिचंहि थंड होत गेलं."

अशा तऱ्हेनें तोच तोच काथ्याकूट सगळ्या वाटभर चालला होता. घरीं पोंचेपर्यंत नवीन बातमी कळणें शक्य नव्हतें. त्यामुळें कधीं हुरूप तर कधीं

निराशा, कधीं भीति तर कधीं संशय, असें एकसारखें त्यांचें चाललें होतें. ताराबाईला तर ती गोष्ट अतिशय मनाला लागून राहिली होती. कारण, तिचें मन तिला खाऊं लागलें होतें, कीं, आपण जर नागेशरावांची एवढी कींव केली नसती, तर आज हें संकट सुंदरवर आलें नसतें. अशा स्थितींत तिला अगदीं विंचू लागले होते, यांत नवल काय ? वाटेंत कोठेंहि मुक्काम करण्याचें मनांत न आणतां, टपालांत कार्ड टाकलें म्हणजे तें जसें एकसारखें धांवत सुटतें, त्याप्रमाणें ही मंडळी ललितपुराहून थेट शिवदुर्गाच्या स्टेशनपर्यंत गेली. तेथें भाड्याची गाडी करून घरीं गेली.

शारदाबाईचीं मुलें बाहेरच्या अंगणांत खेळत होतीं, त्यांनीं गाडीचा आवाज ऐकून रस्त्याकडे पाहिलें, तों गाडींत पुढेंच बाबा दिसले. मग त्यांचा आनंद काय विचारतां ? गाडी येऊन पायऱ्यांशीं उभी राहिल्याबरोबर मंडळी उतरतांच त्यांनीं आईबापांच्या पायांला विळखा घातला, व आनंदानें टाळ्या पिटण्यास सुरुवात केली. त्या बिचाऱ्यांनां घरांत कोण काळजी भरून राहिली होती त्याची कोठून कल्पना असणार ? जणूं काय सर्व आनंदी आनंद आहे, अशा उल्हासानें त्यांनीं त्यांचें स्वागत केलें. ताराबाईनें एकेकाला उचलून मुका घेऊन खालीं ठेवलें, व ती आंत शिरली, तों माजघरांतून शांताक्का येतांना तिला भेटली. दोघींनांहि दुःखाचें भरतें आलें. नंतर " कांहीं नवी बातमी आली का ? " म्हणून ताराबाईनें विचारलें.

शांताबाई म्हणाली " नाहीं. अजून नवीन कांहीं नाहीं. पण आतां मामा आले आहेत, आतां ते सारं नीट करतील. "

ताराबाईनें विचारलें " पण बाबा मुंबईस गेले आहेत ना ? "

शांताबाई म्हणाली "हो, ते मंगळवारीं पहांटे गेले ते रात्रीं मुंबईस पोंचले. बुधवारचं त्यांचं पत्र आलं, त्यांत त्यांनीं मीं सांगितल्याप्रमाणें त्यांचा पत्ता लिहिला आहे. बाकी त्यांनीं असं लिहिलं आहे, कीं, कांहीं महत्त्वाचं सांगण्यासारखं असलं तरच पत्र लिहीन ! "

ताराबाई म्हणाली "अन् आई कशी आहे—तुम्ही सारींच कशीं आहांत? "

शांताबाई म्हणाली "आईची प्रकृति बरी आहे असं वाटतं. पण ती भारी घाबरली आहे. वरती खोलींत अगदीं पडून आहे. आतां तुम्हांला पाहून येईल तिला कांहीं हुशारी. मथुरीन् हिरी काय नेहमींसारख्या आहेत. ती तरी देवाची

कृपाच म्हटली पाहिजे एक प्रकारची. सगळ्यांनींच काळजी करीत बसण्यांत अर्थ कोणचा ? ”

ताराबाई दुःखानें म्हणाली “ अन् आपलं कसं काय शांताक्का ? आपण किती सुकलेल्या दिसतां ! कोण तुम्हाला एकटीला त्रास झाला असेल ! ”

शांताबाई कोरडें हंसून म्हणाली “मी चांगली आहें अगदीं. मला कसला विशेष त्रास ? ”

इतक्यांत मुलांची समजूत करून वसंतराव व शारदाबाई आंत आलीं. शांताक्कानें मामामामींनां हास्यमुख करून, पण तितक्यांत डोळ्यांत आंसवें येऊन, मामा इतक्या तांतडीनें धांवून आल्याबद्दल आभार मानिले. त्यांनींहि ताराबाईप्रमाणें नवी बातमी विचारली; पण ती कोठें होती ? शांताबाईनें मात्र आपल्या नेहमींच्या सज्जनपणाला अनुरूप अशी, सारें अखेर गोड होईल ही उमेद सोडली नव्हती. लवकरच सुंदरचें नाहीं तर बाबांचें पत्र येऊन सर्व ठीक असल्याचें, किंबहुना लग्न लागल्याचेंहि कळून येईल, असें तिला वाटत होतें. थोडा वेळ तसलेंच बोलणें झाल्यावर सगळींजणें सीताबाईच्या खोलींत गेलीं. मंडळीला पाहून त्या जशा वागतील अशी साऱ्यांची कल्पना होती, तसेंच त्यांचें वर्तन झालें. रडणें, शिव्याशाप, आपले स्वतःचे हाल, व आपल्या वांचून इतर सर्वांनां दोष लावणें, हें सारें भरपूर झालें. सीताबाई म्हणाल्या “ तरी मी चांगली म्हणत होतें, कीं, आपण सारींच नगराला जाऊं ! तशीं जर सगळीं गेलों असतों तर हें असं कध्धीं घडलं नसतं ! पण गरीब बिचारी सुंदर अगदीं एकटी तिथें पडली, तिला पोरीला काय बरं समजेल? त्या कर्नल फडक्यानं अन् त्याच्या बायकोनं तिला आधीं आपल्या नजरे-पासून दूर कसं जाऊं दिलंन् ? कांहीं तरी खास त्यांचीच चुकी असली पाहिजे. सुंदरवर त्यांचं नीट लक्ष असतं तर अशी वांकडी जाणारी खास माझी लाडकी सुंदर नव्हे ! मला सदा वाटेच, कीं, तीं फडकीं कांहीं पोक्त माणसं नव्हत. पण माझं कोणीं मानलंच नाहीं ! आधीं या घरांत माझं कशांत तरी कधीं चालतं कुठें ? अरेरे ! काय माझ्या बाळाचं झालं असेल ! अन् आतां हे गेले आहेत मुंबईला त्याच्याशीं भांडायला. तो काय पलटणींतला हिरवट शिपाई. गोळीबिळी रागाच्या झपाट्यांत नाहीं घातलीन् म्हणजे पुरे ! तसं झालं तर सगळंच कर्म ओढवलं म्हणायचं ! पोरींनां खायलासुद्धां भाकरी नाहीं राह्यची ! तो एक निळ्या अन् माली अगदीं हातांत तिळांजळी

घेऊन वाटच पहाताहेत ! तूं जर भाऊ नाहीं कांहीं केलंस, तर पोरींनां दारोदार भीकच मागावी लागेल ! अगबाईग, कसंरे देवा केलंस !"

सारीं एकदम त्यांनां म्हणूं लागलीं "हें काय हें ! अशा भयंकर कुकल्पना काढीत कशाला रहावं ?"

वसंतरावांनींहि निरनिराळ्या प्रकारें त्यांचें समाधान करण्याचा प्रयत्न केला. सीताबाई जरा शांत झाल्यावर ते म्हणाले " हें पहा, मी उद्यां पहांटे मुंबईस पोंचेन, अन् होईल तितकें करून त्यांनां शोधून काढीन. तूं अशी धीर सोडूं नकोस. मन चिंती तें वैरी न चिंती हें खरें. पण आपण मनाला जर ताब्यांत नाहीं ठेवलें तर काय उपयोग ? अजून नगराहून निघाल्याला त्यांनां पांचसहा दिवससुद्धां झाले नाहींत. लग्न झालें नाहीं अन् तें होत नाहीं असें ठरल्याखेरीज उगाच शोक करण्याचें कारण काय ? पहा तर खरें आम्ही सगळें नीट करतों कीं नाहीं तें. मी गेल्याबरोबर आनंदरावांनां सरदारगृहांतून आपल्या घरीं घेऊन जातों, अन् काय काय जमेल तें पहातों. सर्व नीट जमेल !"

सीताबाई म्हणाल्या "आम्ही तरी आज चार दिवस तेंच अगदीं म्हणतों आहोंत, भाऊ ! जिथ्थें असतील तिथनं एकदम शोधून काढ त्यांनां, अन् लग्न नसलं लागलं तर जबरीनंसुद्धां लावून टाक ! सुंदरला माझा निरोप सांग, कीं, पैठणीबिठणीकरतां नडून कांहीं बसूं नकोस, ती मागून हवी तशी घेतां येईल. आज माझं मन स्थिर नाहीं, तर तिला कसं नीटपणीं कापड घेतां येईल बरं ! अन् कसंहि करून नागेशरावांशीं त्यांचं भांडण होईल अशी त्यांची गांठच पडूं नको देऊंस. कोण माझी भीतीनं गठडी वळली आहे. घटकेंत वाटतं डोकं दुखतं, पुनः वाटतं छाती धडधडते, पुन्हां वाटतं, कीं, आपणाला कळमळतं. जें काय होतं तें कांहीं पुसूंच नकोस. झोंप तर बिलकूल रात्रंदिवस लागतच नाहीं ! अन् सुंदरला म्हणावं तुला पैठणींत कांहीं कळत नाहीं. इथें आलीस, म्हणजे मग आपण घेऊं. त्या अलीकडे चाकोलेट रंगाच्या नव्या पोफळ्या निघाल्या आहेत, तसली घ्यायचा माझा बेत आहे. किती भाऊ तूं जलदी हें सारं करून टाकशील म्हणतोस—अगदीं झटपट !"

वसंतरावांनीं त्यांनां पुनः धीर दिला. होईल तितकें करतों म्हणून आश्वासन दिलें व ते म्हणाले "पण तूं जरा मन स्वस्थ ठेव. अगदीं असें वाहवेल तसें वाहवूं देऊं नकोस. कोणच्याहि टोंकाला माणसानें एकदम जाणें चांगलें नाहीं."

वरीलप्रमाणेंच एकसारखें सीताबाईचें बोलणें चाललें होतें, व वसंतराव त्यांची समजूत घालीत होते. अखेर जेवणाची तयारी झाली तेव्हां मंडळी उठली. सीताबाईचें ताट रोजच्याप्रमाणें त्यांच्या खोलींत वाढप्यानें नेऊन दिलें. इतका तालेवार करण्याचें प्रयोजन वसंतरावांनांहि दिसेना; पण एक प्रकारें तेंहि ठीकच आहे, असें सर्वांनीं ठरविलें. कारण, सगळ्या नोकरचाकरांदेखत जर सीताबाई वरच्याप्रमाणें वहावत जातील, तर तें चांगलें नव्हे; त्यापेक्षां फार दिवस निढावलेल्या दाजीबानें तें ऐकलें तर पतकरेल, असें त्यांना वाटलें.

जेवणाच्या वेळीं कायत्या मथुरीहिरी मंडळींत आल्या. त्या एवढा वेळ आपापल्या उद्योगांत अगदीं इतक्या गढलेल्या होत्या, कीं, त्यांनां मामामामींनां भेटायला यायलासुद्धां फुरसत नव्हती. मथुरी ग्रंथवाचनांत व हिरी साड्या-चोळ्यांच्या घड्या घालण्यांत आणि वेणीफणी करण्यांत गुंतली होती. दोघींच्याहि चर्येवर अस्वस्थता बिलकूल दिसत नव्हती. हिरीला आनंदराव रागें भरून गेले होते म्हणून ती उलटी जराशी फुगलेलीच होती! मथुरी मात्र जेवतांना ताराबाईच्या शेजारीं बसली असतां हळूच तिला म्हणाली "सुंदरनं केलेला हा प्रकार अत्यंत दुर्दैवाचाच समजला पाहिजे, अन् त्याची जगांत वाच्यताहि अलबत् अतिशय होणारच. पण लोकं आपली निंदा करीत सुटतील त्याला आपण कांहीं तरी करून अडचणींचा बांध घातला पाहिजे, व एकमेकींच्या हृदयाला जे लोकनिंदेचे घरे पडतील त्याला भागिनीप्रेमाचं स्निग्ध असं मलम चोळलं पाहिजे—"

ताराबाई कांहींच उत्तर देत नाहीं असें पाहून मथुरी पुढें म्हणाली "या दुर्वर्तनापासून सुंदरला तर नुकसान होईलच. तरी पण तिच्या दुर्वर्तना-पासून आपणाला कांहीं उत्तम बोध घेण्यासारखा आहे. तो असा, कीं, एकदां स्त्रीची अब्रू गेली कीं अगदीं वज्रलेप गेली; दुसरं, एकच पाऊल जरी तिनं वांकडं टाकलंन्, तरी शंकराच्या जटेंतून एकदां खालीं उडी घेतलेल्या गंगेप्रमाणं ती अगदीं दुःखसागरापर्यंत लोटत लोटत गेलीच पाहिजे; तिसरं हें घेण्यासारखं आहे, कीं, स्त्रीची अब्रू अगदीं कांचेसारखी असते. जशी दिसण्याला सुंदर तशी यत्किंचित् धक्का लागला तरी फुटूनच जायची. तस्मात् हें अगदीं पक्कं शिकण्यासारखं आहे, कीं, पुरुषांशीं बोलणंचालणं तिनं अत्यंत जपून अत्यंत भिऊन असं सदैव केलं पाहिजे. त्याशिवाय गत्यंतरच नाहीं !"

हे मथुरीनें तोडलेले तारे पाहून ताराबाईलासुद्धां फार आश्चर्य वाटलें, व तिला काय उत्तर द्यावें तेंच तिला कळेना. तरी मथुरी सर्व जेवणभर आणखी तसलेच घेण्यासारखे बोध ताराबाईच्या कानावर सोडीत होती.

जेवणानंतर थोरल्या दोघी बहिणी शांताक्काच्या खोलींत जाऊन बसल्या, तेव्हां त्यांनां निवांत एकमेकींशीं बोलण्याला पोटभर मिळालें. या भयंकर प्रकाराचा परिणाम काय होणार त्याबद्दल ताराबाईला मुळींच संशय वाटत नव्हता, व तारा म्हणते तसा तो होणें अगदीं केवळ अशक्यच आहे असें मात्र शांताक्काला वाटत नव्हतें. पुढें ताराबाई म्हणाली "पण मला आतां सगळी कच्ची हकीगत सांगा. पत्रांत तुम्ही किती लिहिणार ? कर्नल फडके काय काय म्हणाले, अगदीं अखेरपर्यंत त्यांनां कधीं शंका आली होती का, निदान कधीं असा कांहीं संभव तरी वाटला होता का त्यांनां ?"

शांताबाई ह्मणाली "ते एवढं म्हणाले, कीं, कांहीं तरी एकमेकांचं थोडसं प्रेम असावं, इतकं कधींकधीं वाटत असे; पण त्यापासून असं कांहीं होईल ही त्यांनां कल्पनाहि कधीं नव्हती. ते मुळीं इकडे निघाले तेव्हां त्यांची कल्पना अशी, कीं, तीं दोघं इकडे शिवदुर्गालाच आलीं. ते आधीं येणारहि नव्हते. फक्त तार करून तिथनं तीं निघालीं एवढं कळवून स्वस्थ रहाणार होते. पण पुढें दाणी बडबडायला लागल्याचं त्यांच्या कानीं गेलं, तेव्हां मात्र ते ताबडतोब इकडे निघून आले. काय बिचाऱ्यांच्या तोंडचं पाणी पळालं होतं ह्मणतेस !"

ताराबाई म्हणाली "दाणींची तरी खात्री आहे का, कीं, तो लग्न नाहींच लावणार अशी ? ते असे जाणार असा त्याला वासहि होता का ? कर्नल फडक्यांनीं दाणींनां आणून विचारपूस केलीच असेल ?"

शांताबाई म्हणाली " हो तर. त्यांनीं ताबडतोब आणून विचारलें, तों ते आपणाला कांहीं माहीत नाहीं ह्मणाले, व लग्न नाहींच करणार असेंहि ते बोलेनात. अन् त्यावरून तर माझी समजूत आहे, कीं, पहिल्यानं ते तसं म्हणाले होते हेंच खरं नसेल. अन् त्यावर तर माझी सारी भिस्त !"

ताराबाई म्हणाली "तर मग कर्नल फडके येईपर्यंत त्यांचा लग्नाचा विचार नसेल ही तुम्हांला कोणाला शंकाच नसेल आली !"

शांताबाई म्हणाली " अर्थात् नाहींच ! कशी आम्हांला यावी ? आम्ही इतकंच म्हणत होतों, कीं, हें लग्न फार अविचारानं होतं आहे, व इतकी

तांतडी करण्यापासून अखेर सुख व्हायचं लक्षण दिसत नाहीं. शिवाय, तो कसला नीच माणूस आहे हें आपणाला ठाऊकच होतं; पण तेंहि आईलान् बाबांनां माहीत नव्हतं. पण मग हिरी तोऱ्यानं सांगूं लागली, कीं, मला हें सारं आज कितीक दिवस ठाऊक आहे, अन् असं कांहीं तरी जगाला चकित करण्यासारखं मी करणार आहें असं सुंदरच्या शेवटच्या पत्रांत गर्भितसुद्धां होतं. तिला त्यांची ही चलबिचल अन् प्रेम बरेच दिवस माहीत असावंसं दिसतं."

ताराबाईनें आश्चर्यानें विचारलें "म्हणजे ? नगराला जाण्याच्या अगोदरपासून कीं काय ?"

शांताबाई ह्मणाली " नाहीं, मला नाहीं तसं वाटत."

ताराबाईनें पुनः विचारलें "अन् कर्नल फडके काय अंदाज करीत होते ? त्यांचा नागेशरावाविषयीं काय अभिप्राय पडला ?"

शांताबाई ह्मणाली " तो मात्र कांहीं बरासा नाहीं पडला. मागें इथें असतांना जें त्यांचं अनुकूल मत होतं, तें कांहीं आतां राह्यलं नव्हतं. त्यांच्या बोलण्यांत असं आलं, कीं, ते फार उधळे अन् बेताल वागणारे आहेत. अन् आतां इथंहि लोकं बोलायला लागलीं आहेत, कीं, इथंसुद्धां त्यांनीं बरंचसं कर्ज काढलेलं न फेडतां ते निघून गेले; पण तें खरं नसेल !"

ताराबाई उद्गारली " अरेरे ! आपण जर अक्का जास्त माहिती लोकांनां सांगून टाकली असती, आपण जर हे पाजी आहेत हें जरी कोणाकोणाला कळवून ठेवलं असतं, तर आजला हें असं कांहीं झालं नसतं !"

शांताबाई म्हणाली "हो, तसं खरं, असं मलाहि आतां वाटूं लागलं आहे."

ताराबाई म्हणाली "पण आपण कां तसं नाहीं केलं, कीं, आज जर ते नीट वागण्याचा प्रयत्न करीत असतील, तर उगीच त्यांचीं मागचीं दुर्वर्तनं डांगोरा पिटून सांगत सुटणं बरं नव्हे, अन् रास्तहि नव्हे."

शांताबाई म्हणाली " आपला हेतु ठीक होता हें कांही खोटं नव्हे."

ताराबाई म्हणाली " सुंदरनं नलिनीबाईंनां चिठी तरी काय लिहिली होतीन् ?"

शांताबाई म्हणाली " ती मुळीं ते कर्नल फडके घेऊनच आले होते. ही पहा माझ्याचपाशीं ते देऊन गेले आहेत."

ताराबाई वाचूं लागली:—

" अत्यंत प्रिय श्रीमती सौ. नलिनीबाई फडके, यांस—

सा० न० वि० वि०—मी निघून गेलें हें तुम्हाला कळलें, म्हणजे तुम्ही अशा हंसाल, कीं, त्याची कल्पना झाली म्हणजे माझें मलाच हंसूं आवरत नाहीं. मी नाहीं हें पाहून कोण तुमची उद्यां सकाळीं तिरपीट उडेल ! मी जातें आहें गिरीला ! कोणाबरोबर असेल, तें सांगा बरें ? तें जर तुह्मीं ओळखलें नाहीं, तर तुमच्यासारख्या भोळ्या तुम्हीच ! कारण, मी इतकी हूरळून जाईन असा उमदा प्राणी या त्रिभुवनांत एकच आहे ! त्याच्यावांचून सर्व जग मला तुच्छ आहे ! म्हणून मी हें करतें आहें तें अगदीं रास्त आहे. शिवाय, मी स्वतः वाटेनें जातां जातां शिवदुर्गास उतरून, घरीं सगळें सांगूनच पुढें जाणार आहे. मग कसली चोरी, आणि वावगें तरी काय ? एकदां तर असें वाटलें, कीं. आधीं त्यांनां मुळींच भेटूं नये, आणि एकदम सगळें झालें ह्मणजे पत्रानें सारें कळवावें, आणि खालीं सही " सौ. सुंदराबाई गोडबोली " अशी करून त्यांनां अगदीं चकित करून टाकावें ! काय पण मौज होईल म्हणतां तेव्हां ! पण पुनः ह्मटलें, तें कांहीं ठीक नव्हे आईबापांनां कळवूनच काय तें करावें, तेंहि कांहीं वावगें नाहीं ! ह्मणून उद्यां सकाळीं हें पत्र तुमच्या हातीं पडेल तेव्हां आह्मी शिवदुर्गांत, आणि परवां सकाळीं नऊ वाजतां "शुभमंगलस्सावधाऽऽन !"

माझें सामान शिवदुर्गास रवाना करून द्या. पण नव्या रेशमी पिलावाला पदराजवळ मोटा वाभाडा गेला आहे, तो हरणीला ह्मणावें बेमालुम रफू करून घे आणि मग पाठीव, नाहीं तर आईनें तो पाह्यला तर लागेल रागें भरायला ! बरें तर, आतां पुरें करतें. लवकरच आह्मी जोड्यानें आपल्या पायां पडून आशीर्वाद घ्यायला येऊं, तेव्हां भेट होईलच ह्मणा !

आपली अत्यंत प्रिय मैत्रीण,

सुंदराबाई नगरकर.

ता. क.—ही अशी सही शेवटचीच ह्मणायची ! पुनः पत्र लिहीन तेव्हां सौ. सुंदराबाई गोडबोली, असें अत्यंत गोड नांव लिहीन !! "

पत्र संपल्यावर ताराबाई म्हणाली "अरेरे ! किती बेवकुब, किती अविचारी सुंद्री ही ! काय मूर्खासारखं पत्र अशा वेळीं लिहिलं आहेन् पहा ! पण निदान त्यावरून इतकं तरी स्पष्ट होतं, कीं, तिची पूर्ण समजूत अशी आहे, कीं, आपण

लग्ना करितां जातों आहोंत. पुढं काय त्यानं फसवाफसवी केली असेल अन् कसं तिचं मन बदललं असेल तें असो. पण मूळचा विचार तरी नीट होता! अरेरे, काय बाबांनां झालं असेल ! ”

शांताबाई ह्मणाली “तें काय पुसूं नको ! इतके ते गर्भगळित झालेले मीं कधींच पाह्यले नव्हते. पुरीं दहा मिनिटें अक्षर उमटेना त्यांच्या तोंडून. आई तर एकदम आजारीच झाली. सगळाच गोंधळ झाला एकदम घरांत सुरू—”

ताराबाई म्हणाली “अन् बहुतकरून एका घटकाभऱ्यांत अगदीं नोकर-चाकरांनांसुद्धां इत्थंभूत कळून गेलं असेल ? ”

शांताबाई म्हणाली “असेल ! अशा वेळीं गुपित ठेवणं बहुतेक अशक्य. आईला जर मुळीं वायु झाल्यासारखा झटका आला, तर काय करतां ? मला, वाटतं मीं करावं तितकं केलं नाहीं. पण पुढें काय होतं या भीतीनं मीहि अगदीं गांगरूनच गेलं ! ”

ताराबाई म्हणाली “असं कसं ? तुम्ही तर अगदीं काळजीनं न् दगदगीनं चोपून निघाल्यासारख्या दिसतांहां. मीहि जवळ नव्हतें, नाहीं तर मीं किती तरी तुम्हाला मदत केली असती. त्या मथुरीहिरीनं कां बरं अगदीं अंगाबाहेर टाकावं ? ”

शांताबाई म्हणाली “त्यांनींहि केलं असतं, पण त्यांनां त्रास देणं मला नाहीं नीट वाटलं. हिरी स्वतःच अशक्त आहे, अन् मथुरी इतकी अभ्यास करीत असते, कीं, तिच्या विश्रांतीच्या आड येणं मला नाहीं आवडलं. बाबा गेल्यावर रमामावशी एकदोन दिवस येऊन राह्यली होती, तिची फार मदत झाली. झालं आणखी रावबहादुरीणबाई मोठ्या अगत्यानं येऊन चार समाधानाच्या गोष्टी सांगून गेल्या, अन् हवी असली तर शेवंतीला पाठवतें म्हणाल्या ”

ताराबाई म्हणाली “त्या उगाच कशाला आल्या ? घरीं जाऊन आम्हांला हंसायला माहिती काढण्याकरितां आल्या असतील झालं ! अशा वेळीं समाधान कसलं करणार, अन् गोड कसं लागायचं ? बरं तें असो. बाबा मुंबईत कसं काय काय करणार आहेत ? ”

शांताबाई म्हणाली “ ते पहिल्यानं पुण्याच्या स्टेशनावर चौकशी करीन म्हणाले होते. तिथले पोर्टर आहेत त्यांच्या बरेचसे ओळखीचे; तिथं नाहीं कांहीं तपास लागला म्हणजे मग मुंबईत जाईन म्हणाले. गिरीला तार करून

तपास करायचा तर तिथें कोण आपल्या ओळखीचं असणार ? म्हणून मग मीं सुचवलं, कीं, ते पुण्यांतले व्यंकटरामय्या येत असतात दरसाल कानगी गोळा करायला, त्यांच्याजवळ पहावं कांहीं जमत का ? पण बाबांच्यापुढें जास्त बोलावं कुणीं, अन् अशा वेळीं तर अगदीं अशक्य ! ते बोलतील तेवढं ऐकायचं अन् स्वस्थ राह्यचं झालं !"

---

## प्रकरण अठ्ठेचाळिसावें.

### आनंदराव परत आले.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं मुंबईहून आनंदरावांचें कांहीं पत्र येईल अशी सर्वांनां फार आशा होती; पण टपालांतून त्यांची एकसुद्धां ओळ आली नाहीं. नेहमींच्या पद्धतीप्रमाणें म्हटलें तर आनंदरावांनां पत्र लिहिण्याचा भारी कंटाळा असे, ह्मणून त्यांचीं पत्रें नेहमीं उशीरां जात असत; पण सध्यांच्या आणीबाणीच्या समयीं तरी ते आपला थिल्लरपणा सोडतील असें वाटलें होतें. पण मुळींच कार्ड देखील नाहीं, हें पाहून लिहिण्यालायख असें कांहींच नसेल ह्मणूनच टपालांत कांहीं आलें नाहीं, असें समाधान करून घ्यावें लागलें. आतां मामा गेले म्हणजे रोज निदान पत्र तरी येईल, अशी खात्री होती. मामांनीं जातांना हेंहि कबूल केलें होतें, कीं, होतां होईल तेवढ्या लवकर मी आनंदरावांनां परत इकडे पाठवून देतों. कारण, ते प्रत्यक्ष आल्याशिवाय त्यांनां नागेशरावाच्या हातून कांहीं अपघात घडणार नाहीं, अशी सीताबाईची खात्री पटेना.

वसंतरावांनीं आपल्या बायकोमुलांनां तूर्त शिवदुर्गांतच ठेवून दिलें. कारण, आपल्या भाचांनां शारदामामींचा उपयोग होईल, असें त्यांनां वाटलें. आणि शारदामामी यावेळीं खरोखरच फार खटपट करून घरांतली उदासीनता थोडीशी तरी कमी करण्याची तजवीज ठेवीत. आधीं त्यांचीं लहान लहान मुलें शांतिसदनांत राहिलीं हाच केवढा तरी विरंगुळा साऱ्यांनां झाला. रमामावशीहि नेहमीं येत, पण त्या रोज नागेशरावांच्या नव्या नव्या कागाळ्या सांगत येत. त्यामुळें त्यांच्या येण्यापासून फायदा होण्याच्या ऐवजीं उलट नागेशराव खरोखरच फार वाईट माणूस आहे अशी खात्री होई, व त्यामुळें त्याच्यासारख्याच्या मगरमिठींतून आपण सगळीं धडपणीं कशीं बाहेर पडतों, ही शंका दृढ होऊन मन जास्तच उदास होऊन जाई.

आज आतां शिवदुर्गाच्या तोंडीं जेथें तेथें एकच विषय. तीनचार महिन्यांपूर्वी जो तो नागेशरावावर अगदीं फिदा होऊन तुटून पडत असे. तें आतां सारें मन्वंतर बदलून जो तो त्याच्यावर उलटपणानें तुटून पडूं लागला होता. आतां जो तो दुकानदार आपली बाकी त्यांच्याकडे फिरते म्हणून ओरड करूं लागला. कितीक लोक "त्याची नजरच वाईट, आम्हांला तसें तेव्हांच पक्कें समजून चुकलें होतें, पण आम्हां गरीबांचें ऐकतों कोण, ह्मणून आह्मी गप्प बसलों," असें ह्मणूं लागले. हें सारेंच केवळ अगदीं सत्य जरी नसलें, तरी एकंदरींत आपल्या कुटुंबाची गांठ खरोखरीच मोठ्या हलकट माणसाशीं नशिबानें पाडली आहे, व त्यांतून निभावून नेणार परमेश्वराशिवाय कोणी नाहीं, अशी रोज ताराबाईची दृढ समजूत होत चालली. शांताबाईलाहि आतां जों जों दिवस गत होत चालली, तों तों त्यांचा लग्नाचा विचार असेल ही आशा धरणें कमी कमी शक्य वाटूं लागलें.

मामींनां वसंतराव गेल्यापासून चवथे दिवशीं पत्र आलें, त्यांत "आनंदरावांनां आपल्या घरीं आणलें आहे, अजून सुगावा मुळींच नाहीं, उद्यां सर्व गृहांतून व आश्रमांतून तपास करण्याचा बेत आहे; कारण, आल्याबरोबर भाड्याची जागा ठरवून घेण्यापूर्वी तीं कोठें तरी एकाद्या वसतिगृहांत एकाद दुसरा दिवस तरी राहिलीं असतील, म्हणून तेथें तपास लागण्याचा संभव आहे असें त्यांनां वाटत आहे. मला या मार्गानें फारशी आशा नाहीं, पण उद्यां आम्ही तो तपास करणार आहों. आनंदरावांचा विचार इतक्यांतच घरीं परत जाण्याचा नाहीं. पुढें काय होतें तें लिहीन." असा मजकूर होता. शिवाय ताजा कलमहि होता तो असाः—"मीं आज कर्नल फडक्यांनां लिहिलें आहे, कीं, नागेशरावांच्या सोबत्यांकडून त्यांचे इष्टमित्र अगर नातेवाईक मुंबईत कोण व कोठें रहातात त्याची चौकशी करून जरूर लवकर कळवा. असा जर कांहीं एकादा धागा हातीं लागेल, तर मग पुढें वाट काढायला कांहीं तरी साधन होईल. आज आम्ही एकाद्या महासागरांत एकाद्या लहानशा माशाला शोधावा तशीं शोधतों आहोंत. कर्नल फडके करवेल तो तपास करून कळवतीलच, पण मला आतां असें एक सुचतें आहे, कीं, कदाचित् ताराबाईलाहि ही माहिती असेल असा संभव आहे. सबब तिला विचारून काय तें जरूर ल्याहावें."

# आनंदराव परत आले.

ही माहिती वसंतरावांनीं आपणाला कां विचारली तें ताराबाईला सहज समजलें, व त्यामुळें तिला शरमहि वाटूं लागली; पण इलाज काय? बहिणी-करितां म्हणून ती पुष्कळ डोकें चोळचोळून स्मरण करूं लागली. पण आपल्या आईबापांशिवाय दुसऱ्या कोणाहि नातेवाईकांचें नांव काढतांना तिनें नागेशरावाला कधीं ऐकल्याचें स्मरण होईना, अन् आईबाप तर मयत होते हें तर तेच सांगत असत. तेव्हां ही माहिती नगराशिवाय दुसरीकडे मिळण्याचा संभव दिसेना.

रोज आतां शांतिसदनांत सर्वांचें लक्ष टपालाकडे असे. दिवसांतून दोन तीन वेळां टपाल येई. म्हणून दर वेळेला मोठ्या उत्सुकतेनें शिपाई बुइंडो डिलिव्हरीकरितां टपालांत त्यांना पाठवावा. कारण, आतां बरी वाईट बातमी काय ती टपालांतून यायची. पण टपालांतून हवें तें पत्र न येतां भलतींच हातीं येत: कुठें कोणच्या संस्थेला मदत द्या, अमुक पत्राला वर्गणीदार व्हा, अमुक लाइफइन्शुअरन्स सोसायटींत विमा उतरणें फार चांगलें, अशी छापील शिफारस असलेलींच पत्रें फार येत. पण त्यांतल्यात्यांत एक दिवस अगदीं अनपेक्षित ठिकाणचें एक पत्र आनंदरावांच्या नांवावर आलें. तें होतें नीलकंठरावाचें! शांताक्काला सगळीं पत्रें फोडून पहाण्याला आनंदराव सांगून गेले होते; ह्मणून तिनें तें फोडलें, व नीलकंठरावांचें पत्र कांहीं तरी विचित्र असणारच अशा खात्रीवरून ताराबाईनेंहि तें शांताक्का वाचीत असतां तिच्यामागें उभें राहून मोठ्या उत्सुकतेनें वाचलें. तें पत्र यणेंप्रमाणें:—

" **श्रीरंगनाथ स्वामी प्रसन्न.**

सुवर्णपुर, मित्ती पौष शु० ९,
जानेवारी ता० १२—

बंधुवर्य राजश्रिया विराजित रा. रा. आनंदरावजी दादासाहेब नगरकर मु. शिवदुर्ग, वडिलांचे सेवेशी.

अपत्यें बालकें नीलकंठ राजगुरु, कृतानेक शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना विशेषः कालरोजीं आमच्या श्वशुरांच्या गृहांतून सौभाग्यवतीला एक पत्र आलें. त्यावरून आपणावर व आपल्या सन्मान्य कुटुंबीय मंडळींवर केवढा संकटाचा भार येऊन कोसळला आहे, त्याची दुःखकारक बातमी कळून चित्ताला अत्यंत असमाधान उत्पन्न झालें, व आपणाशीं आमचें जवळचें नातें

असल्यामुळें, व आमच्या राजगुरूच्या महनीय स्थानाला अनुरूप अशा रीती-प्रमाणें, आपणाकडे आमची अत्यंत सहानुभूति व्यक्त करून जरूर पाठविणें, आमचें कर्तव्य आहे असें आम्ही समजतों. आमच्या स्वतःच्या, व त्याच-प्रमाणें सौभाग्यवतीच्याहि—कोमल मनाला ही गोष्ट अत्यंत लागून राहिली आहे; याविषयीं आपण यत्किंचितूहि शंका बाळगूं नये अशी आमची फार आग्रहपूर्वक विनंति आहे. हल्लींचा प्रसंग इतका दुर्धर आहे, कीं, त्याची तीव्रता कालांतरानेंहि कमी होणें अशक्य आहे. त्यांतून तो आपणांसारख्या प्रत्यक्ष जन्मदात्यांनां अत्यंत दुःसह झाला असेल, यांत नवल काय? यापेक्षां आपल्या कन्येला मृत्यु आला असता तरी तो सहस्रपटीनें जास्त सह्य झाला असता, असें कोणीहि कबूल करील. आपणाला हा हल्लींचा प्रसंग इतका अनिवार्यपणें दुःसह होण्याचें कारण सौभाग्यवतीप्रमाणें आम्हालाहि असें दिसून येतें, कीं, या पल्ल्याला मजल येऊन पोंचण्याचें मुख्य कारण आपल्या घरांत त्या कन्येचे होत असलेले फाजील लाडच आहेत, असें आपलें मन आपणाला खात असलें पाहिजे; परंतु माझी सविनय प्रार्थना आहे, कीं, आपण आपला तसा ग्रह करून घेऊं नये. कारण, कितीहि जरी परमावधीचे फाजील लाड आपण केले असले, तरी इतक्या लहान वयांत इतकें भयंकर निर्लज्जपणाचें वर्तन त्या कन्येच्या हातून होण्याला, मूळ तिच्या जन्मस्वभावांतच पापाचरणाकडे अत्यंत प्रवृत्ति असली पाहिजे, हा विचार मनांत आणून आपण विवेक केला पाहिजे. तें कसेंहि जरी असलें, तरी आज हरएक माणसांच्या हृदयांत आपणाविषयीं कींवच उत्पन्न झाली पाहिजे, अशी आज आपली स्थिति आहे. असें केवळ आम्हां उभयतांनां वाटतें असें नसून, आम्हीं पत्र आल्याबरोबर नजरबागेंत जाऊन सर्व प्रकार श्रीमंत मातुश्री राणी माईसाहेब यांच्याजवळ निवेदन केला, तेव्हां त्यांचाहि अभिप्राय, व श्रीमंत अक्कासाहेबांचाहि अभिप्राय, तंतोतंत आमच्याप्रमाणेंच पडला आहे. त्यांचा आणखी असाहि अभिप्राय पडला, कीं, एका कन्येच्या अशा अनन्वित कृत्यामुळें इतर कन्यांवरहि सडकून शिंतोडा उडाल्यावांचून राहणें अशक्य आहे. कारण, श्रीमंत माईसाहेब गंभीरपणानें म्हणाल्या, कीं, असल्या डागळलेल्या कुटुंबाशीं आतां कोण संबंध करण्यास तयार होईल?

आणि हा विचार किती बरोबर आहे आमच्या हें लक्षांत बिंबलें, तेव्हां गेल्या ज्येष्ठांत घडून आलेला आपल्या घरचा प्रकार, परमेश्वरानें आम्हांवर

अत्यंत कृपाळु होऊनच घडवून आणला अशी खात्री होते. नाहीं तर आपल्याबरोबर आज आम्हावरहि लज्जेनें अधोवदन करण्याचा दुर्धर प्रसंग गुदरला असता. परंतु श्रीमत्स्वामीमहाराजांच्या पुण्यप्रतापानें आज आम्ही अगदीं अलिप्त राहिलों आहोंत. सबब आपणालाहि आमची अत्यंत आग्रहाची शिफारस आहे, कीं, दगडासारखें मन घट्ट करून असल्या दुराचरणी कन्येला आपल्या गृहांतून व आपल्या हृदयांतून कायमची हांकलून लावा, व तिच्या पापाचरणाचीं कडू फळें होईल तितकें करून तिला एकटीलाच यथेच्छ उपभोगण्यास संधि आणून द्या. असें केल्यावांचून स्वतःचा बचाव करण्याची दुसरी तोडच नाहीं. कारण ‘ सर्वनाशे समुत्पन्ने अर्धं त्यजति पंडितः’ ही श्रुति प्रसिद्धच आहे.

कळावें, बहुत काय लिहिणें, लोभवृद्धि असों द्यावी, हे विज्ञापना.

नीलकंठ राजगुरु. ”

हें विलक्षण पत्र वाचून दोघी बहिणींनांहि चमत्कारिक वाटलें. शांताबाईचा स्वभाव जास्त खोल असल्यामुळें तिच्या मनाला तें पत्र वाचून फार वाईट वाटलें, व आपण या संकटांतून धडपणें निभावून जाणें अतिशय कठिण आहे, अशी तिची दृढ समजूत झाली. अशा स्थितींत त्यांत जो अचरटपणा नखशिखांत भरलेला होता, त्यामुळें हंसूं येणें तिला शक्यच नव्हतें. ताराबाईची मात्र यापेक्षां निराळी स्थिति झाली. ती म्हणाली “हें पत्र वाचून या माणसाच्या अचरटपणाला हसत रहावें, का त्याच्या अतिशयोक्तीचा संताप येऊं द्यावा, हें कांहींच मला कळत नाहीं ! एवढें मात्र खास, कीं, पंचतंत्रांतल्या पढतमूर्खांची गोष्ट वाचूनहि अगदीं खमंग राहिलेला असा हा एक महान् पढतमूर्ख आहे ! ”

वसंतरावांनां कर्नल फडक्यांकडून जबाब येईपर्यंत त्यांचें पुनः पत्र आलें नाहीं, व मागाहून आलें त्यांतहि समाधानकारक असें कांहींच नव्हतें. “ नगरास रिसाल्यांत कोणाला फारशी नागेशरावांची माहिती नव्हती. जवळचे आप्त कोणी असल्याचेंहि कोणाच्या ऐकिवांत नव्हतें. त्याचप्रमाणें रिसाल्यांत आल्यापासून त्यांनीं कोणाशीं फारसा विशेष स्नेहहि केलेला नव्हता. शिवाय, चार महिन्यांची बिनपगारी रजा घेऊन ते एकाएकीं गेले ती बातमीहि त्यांनीं कोणाला कळूं दिली नव्हती. कारण, त्यांच्यामागें

देणेकरी निकड लावतील ही भीति असावी. त्यामुळें त्यांचा मुंबईतला पत्ता वगैरे त्यांनीं कोणाला कधींच कळविलेला नव्हता. कर्नल फडक्यांनीं आपली अशी समजूत झाल्याचें लिहिलें होतें, कीं, हजारपांचशें तरी रुपये त्यांनां नगरास लोकांचें देणें खास असावें, व शिवाय जुगारीचाहि नाद असल्याची हल्लीं बातमी लागत आहे." या सर्व गोष्टी वसंतरावांनां शांतिसदनांतल्या मंडळीपासून चोरून ठेवण्याची जरूर दिसली नाहीं, म्हणून त्यांनीं सर्व हकीगत स्पष्ट लिहून टाकली होती. जुगारीचा छंद नागेशरावांनां आहे हें समजल्यापासून शांताबाईचें धाबेंच दणाणून गेलें होतें.

वसंतरावांनीं पत्रांत आणखी हेंहि कळविलें होतें, कीं, "येत्या शनिवारीं बहुतकरून आनंदराव शिवदुर्गास पोंचतील. आजपर्यंत त्यांनीं केलेल्या प्रयत्नांनां यश बिलकूल न आल्यामुळें ते आतां हताश झाले आहेत, म्हणून मींच त्यांची समजूत घातली, कीं, तुम्ही परत घरीं जा. मी सारें आतां पहातों. सबब शनिवारीं पहांटे गाडी स्टेशनवर जरूर पाठवावी."

हें पत्र आल्यामुळें आईची एक तरी हुरहुर शांत होईल, अशा आशेनें त्यांनीं तें मोठ्या उल्हासानें तिला नेऊन दाखविलें; पण तसें कांहीं न होतां सीताबाई उलट म्हणाल्या "काय—ते परत येताहेत ? अन् माझ्या सुंदरला घेतल्यावांचून ? त्यांचा पुरा तपास लावल्यावांचून कशाला येताहेत ? ते निघून आले तर मग नागेशरावांशीं भांडून त्यांनां तिच्याशीं लग्न करायला कोण लावणार ?"

शारदाबाईनांहि आतां आपल्या घरीं जावेंसें वाटूं लागलें. आजवर आनंदराव घरांत येथें नव्हते, व मुंबईत होते म्हणून त्या शिवदुर्गांत राहिल्या होत्या. पण आतां ते घरीं येणार तर आपणहि आपल्या घरीं जावें, अशी त्यांची इच्छा प्रदर्शित झाली. म्हणून त्यांनां जास्त आग्रह करणें बरोबर नाहीं, असें दोघी बहिणींनां वाटल्यावरून असें ठरविलें, कीं, गाडींतून शनिवारीं पहांटे त्यांनीं मुलांसह स्टेशनवर जावें, व त्याच गाडींतून आनंदरावांनीं स्टेशनवरून घरीं यावें.

उत्तर हिंदुस्थानांतून चटणीहून निघते वेळीं ताराबाई व भय्यासाहेब या दोघांविषयीं शारदामामींचें मन जसें दुग्ध्यांत होतें, तसेंच तें अजूनहि होतें. भय्यासाहेबांचें नांव एकदांसुद्धां ताराबाईनें आपण होऊन काढलें

नव्हतें. शारदाबाईंची अशी कल्पना होती, कीं, आपल्या मागोमाग भय्यासाहेबांकडून ताराबाईला कांहीं तरी पत्र येईल. पण त्यांचें आलें नाहीं; इतकेंच नव्हे, तर कोणाचेंहि तिकडून आल्याचें दिसेना. आणि त्याहूनहि आश्चर्याची गोष्ट ही, कीं, तसल्या एकाद्या पत्राची ताराबाई वाट पहात आहे, असेंहि तिच्या वर्तनावरून शारदाबाईंनां दिसेना. या सगळ्यांत काय खुबी आहे, तें मामींनां मुळींच समजेना. ताराबाई उदास दिसे खरी, पण शांतिसदनांतल्या मंडळींनां सध्यां उदास होण्याला भरपूर कारण होतेंच. म्हणून तिच्या उदासीनतेवरूनहि भय्यासाहेबांविषयीं कांहींएक तर्क होण्यासारखा नव्हता. अशा संशयमग्न स्थितींतच शारदामामी निघून गेल्या.

ताराबाईचे विचार मात्र खरोखरच हल्लीं पुष्कळदां दिलबहाराकडे ओढ घेत असत. भय्यासाहेबांविषयीं आपल्या मनांत कोणचा विकार आहे, याची तिला आतां यत्किंचित्‌हि शंका राहिली नव्हती. तिला आतां पक्कें वाटूं लागलें होतें, कीं, भय्यासाहेबांची आपली जर बिलकूल जानपछान नसती, तर आज वाटतें आहे त्यापेक्षां सुंद्रीच्या या लज्जास्पद प्रकाराचें आपणाला बरेंच कमी वाईट वाटलें असतें. अथवा आज जेथें त्यामुळें दोनदोन तास हंतरुणावर तळमळत पडावें लागत आहे, तेथें केवळ एकच तास तळमळण्यानें सहज भागलें असतें !

आनंदराव घरीं येऊन दाखल झाले. त्यांच्या चर्येवर नेहमाप्रमाणें एकाद्या साधूसारखी शांत वृत्ति दिसत होती. नेहमींच्या त्यांच्या पद्धतीप्रमाणें ते फारसे कोणाशीं बोललेच नाहींत. ज्या कामाकरितां ते गेले होते त्याचें त्यांनीं नांवहि काढलें नाहीं. जेवण होऊन जाईपर्यंत कोणींच ती गोष्ट काढली नाहीं. कारण, त्यांच्यापुढें बोलणार कोण ? अखेर तिसरे प्रहरीं चहाच्या वेळीं ताराबाईनें भीत भीत सुरुवात केली "कोण आपणाला तसदी पडली असेल, बाबा, त्या मुंबईमध्यें !"

त्यावर आनंदराव तिला म्हणाले "छे, अगदीं त्याबद्दल एक अक्षरसुद्धां बोलूं नको ! मला तसदी न पडेल तर कुणाला पडावी ? माझ्या हा ून जर चूक झाली तर मलाच भोगली पाहिजे !"

ताराबाई म्हणाली " असं इतकं जिवाला कडकपणानं लावून नका घेऊं, बाबा ! "

आनंदराव म्हणाले " तूं तारे मला सूचना केलीस तें उत्तमच केलेंस ! माणसाला नेहमीं स्वतःला बोल लावून घ्यायची भारी हौस असते, नव्हे ? छे छे, तारे, जन्मांत एकदां तरी माझी मला चूक कबूल करून दोष लावून घेऊंदे ! या अशा दोष लावून घेण्यानें मी अगदीं चीत होईन अशी नको तुला धास्ती पडायला ! ही आमची लहर लवकरच संपून जाईल ! "

ताराबाई म्हणाल्या "पण तीं अजून मुंबईतच असतीलसं वाटतं का तुम्हाला?"

आनंदराव म्हणाले "अलबत् ! मुंबईसारखी लपून राह्यला विपुल जागा कुठें मिळणार दुसरीकडे ? "

हिरी मध्येंच म्हणाली "हो हो ! सुंदरच्या मनांतनं तर मुंबईला जायचं अतोनात होतं ! "

आनंदराव कठोरपणें म्हणाले " असें का ? तर मग आतां हौसा पूर्ण होऊंद्या ! आतां बहुतकरून निरंतरच मुंबईत रहावें लागेल म्हणावें ! "

नंतर थोडें थांबून ते तारेला म्हणाले " तारे, काळच्या नवंबरांत सुंद्री नगरला जायच्या वेळीं तूं जो मला उत्तम सल्ला दिलास, त्याविषयीं मला तुझा कांहीं फारसा मत्सर वाटत नाहीं. एवढें मी कबूल उघडपणें करतों, कीं, पुढें आतां घडलेल्या हकीगतीवरून पाह्यलें, तर तुझी दृष्टि फारच दूरवर पोंचणारी आहे असें म्हटलें पाहिजे."

इतक्यांत शांताबाई आईकरितां चहाचा पेला घेऊन जायला आंत आली, तिला पाहून ते पुढें म्हणाले "हा दुखण्याचा आविर्भाव मोठा फायदेशीरच आहे! त्याच्यायोगानें संकटाला मोठें मोहक स्वरूप येतें वाटतें ! मीहि आतां एकाद्या दिवशीं तसेंच करीन. मारून शालजोडी पांघरून अन् कानटोपी घालून लायब्ररींतच बसून राहीन. अन् देववेल तितका तुम्हां साऱ्यांना त्रास देईन ! अथवा, हिरी पळून जाईपर्यंत आम्हीं हें आमचें सारें तहकूब ठेवणेंहि कांहीं वाईट नाहीं ! "

हिरी चिडून म्हणाली "मी नाहीं कधीं बाबा अशी पळूनबिळून जायची ! मी जर कधीं नगराला गेलें तर मी सुंदरपेक्षां किती तरी बरी वागेन. "

आनंदराव उपहासानें म्हणाले "नगराला जाणार? तें सारें विसरा आतां ! मला कोणीं पांचशें रुपये दिले तरी आतां तुला स्टेशनापर्यंतसुद्धां मी कधीं एकटी पाठवणार नाहीं ! छे, छे, हिरे आतां मी शहाणा झालों आहें, अन् त्याचा परिणाम पहिल्यानें तुझ्यावर घडणार. माझ्या घरांत आतां कोणी

ऑफिसर पाऊल घालील तर त्याची तंगडीच मोडीन. इतकेंच काय, या गांवांतसुद्धां मी त्याला येऊं देणार नाहीं. कोणाहि पुरुषाशीं अवाक्षर बोलायचें झालें, तरी या थोरल्या दोघी बहिणी जवळ असल्यावांचून अगदीं बोलायचें नाहीं. अन् सबंध चोवीस तासांतलीं निदान दहा मिनिटें तरी एकाद्या चांगल्या उद्योगांत तूं घालविल्याशिवाय तुला घरांतून मुळीं बाहेरच पडूं देणार नाहीं! अन् पार्टीला जाणें तर अगदीं साफ बंद झालें तुझें!"

हिरीला बिचारीला हें सारें बोलणें अशरक्षः खरें वाटलें, व ती रडायला लागली. तें पाहून तिची जणूं काय समजूत करण्याकरितां आनंदराव म्हणाले "बरें बरें, उगी, रडूं नकोस! आजपासून दहा वर्षें जर तूं नीट वागलीस, तर अखेरीला तुला एक सबंध पलटणच्या पलटण दाखवायला खास नेईन!"

---

## प्रकरण एकुणपन्नासावें.

### वसंतरावांची तार.

आनंदरावांनां येऊन आतां दोन दिवस झाले होते. तिसरे प्रहरीं चहा झाल्यावर शांताबाई व ताराबाई घराच्या मागच्या अंगणांत बागेमध्यें फिरत एकमेकींशीं बोलत होत्या. इतक्यांत त्यांचा म्हातारा गडी दाजीबा त्यांच्याकडे गेला व म्हणाला "काय अक्का बातमी आली आहे? आहे का कांहीं बरीशी?"

शांताबाई म्हणाली "काय ह्मणून आत्तां विचारतां दाजीबा? मुंबईहून आज पत्र मुळीं आलंच नाहीं."

दाजीबा आश्चर्यानें उद्गारला "म्हणजे! बाबासाहेबांनां मघाशीं तार आलेली नाहीं का तुम्हांला माहीत? अर्धा तास झाला, अन् जबाब न्यायला तारेचा शिपाई अजून बसला आहेसुद्धां!"

हे शब्द कानीं पडतांच दोघीजणी एकदम घराकडे धांवल्याच. मागील दारच्या ओटीवरून माजघरांतून दिवाणखान्यांत, व तेथून लायब्ररींत! पण आनंदराव कोठेंहि दिसेनात. तेव्हां वरच्या मजल्यावर आईच्या खोलींत असतील असें समजून त्या जिना चढूं लागणार, तों घोडेवाला पुढील दारून

आला. तो म्हणाला "तुम्ही बाबासाहेबांनां बघत असलां तर ते पहा थोरल्या दरवाजापाशीं उगाच फिरताहेत."

पुनः एकदां त्या दोघी दिवाणखान्यांतून ओटीवर येऊन टेनिस् कोर्टावरून धांवत धांवत थोरल्या दरवाजापाशीं गेल्या, तों तेथें आनंदराव नसून ते तबेल्याकडे गेल्याचें समजलें. ह्मणून पुनः तिकडे धांवत सुटल्या. शांताक्का थोडीशी स्थूल होती, अथवा ताराबाईइतकी सडसडीत व चपळ नव्हती, ती मागें राहिली, व ताराबाईनें पहिल्यानें आनंदरावांनां गांठलें. धांपा टाकीत टाकीत तिनें त्यांनां "काय तार आली बाबा? मुंबईची का तार आली आहे?" असें विचारलें.

आनंदराव म्हणाले "हो, आतां वसंतरावांची तार आली खरी!"

ताराबाईनें विचारलें "मग, काय बातमी—बरी का वाईट?"

आनंदराव शांतपणानें म्हणाले "आतां बरी काय येणार तें दिसतेंच आहे. पण तूंच का स्वतः वाचीनास?" असें ह्मणून त्यांनीं ती खिशांतून काढून तिला दिली.

ताराबाईनें ती उतावळीनें घेऊन उलगडली, तितक्यांत शांताहि तेथें येऊन पोंचली. तार खरोखरच भली लांबलचक होती, ती ताराबाई वाचूं लागणार इतक्यांत आनंदराव म्हणाले "मोठ्यानें वाच. मलाहि पुनः एकदां ऐकायची आहे."

तार पुढें लिहिलेल्या अर्थाची होतीः—

"आपण निघाल्यानंतर मिळालेल्या बातमीवरून शोध लावतां अखेर सुंदर सांपडली. (कच्ची हकीगत मागून भेटीअंतीं). मी त्या दोघांनांहि समक्ष भेटलों—"

शांताबाई मध्येंच उद्गारली "पाह्यलंत, माझी आशा खरी ठरली. त्यांचं केव्हांच लग्न लागलं असलं पाहिजे!"

ताराबाई तिकडे लक्ष न देतां पुढें वाचूं लागलीः—

"मी त्या दोघांनांहि समक्ष भेटलों. अजून अविवाहित. लग्नाचा विचारहि नव्हता. पण आतां आह्मीं कायम केला आहे. त्याच्या अटीः—मुलीकरितां ठेवलेल्या रकमेचा (दहा हजार) पांचवा हिस्सा दिला पाहिजे. तो फक्त योग्य वेळीं, आज नव्हे. शिवाय दरसाल पांचशें रुपये तुमच्या हयातीपर्यंत देणें. नागेशराव वाटला तितका कफल्लक नाहीं. सर्व कर्ज फेडून रकम त्याजजवळ

शिल्लक राहील ती स्त्रीधन करून त्यानें द्यावी. या अटी कबूल असल्यास उलट तार द्यावी. लग्न येथेंच उरकून घेऊं. आपण येण्याची जरूर नाहीं. सर्व मी करीन. उद्यां सविस्तर पत्र. आज सुंदरला माझ्या घरीं आणली आहे.

वसंतराव."

तार वाचून झाल्यावर ताराबाई म्हणाली "खरंच का हें लग्न होणार? किती तरी तें आपणांला हवं आहे!"

शांताबाई म्हणाली "तर मग आपणांला वाटलं होतं तितके कांहीं नागेशराव नीच नाहींत असं झालं! किती तरी छान हें झालं बाबा!"

ताराबाईनें विचारलें "अन् बाबा, उलट तार केलीत का?"

आनंदराव म्हणाले "नाहीं अजून. पण आतां लवकर केली पाहिजे."

ताराबाई म्हणाली "अलबत. अगदीं एक क्षणाचाहि विलंब करण्याची सोय नाहीं. चला बाबा, एकदम आधीं चला. एक एक क्षण अगदीं अत्यंत महत्त्वाचा आहे!"

शांताबाई म्हणाली "आपणाला तसदी होत असली तर मला सांगा, मी लिहितें."

आनंदराव म्हणाले "तसदी तर खरीच, पण आतां इलाज काय?"

असें म्हणून ते घराकडे वळले. तेव्हां ताराबाईनें विचारलें "अन् अटींबद्दल काय ठरवलंत? मला वाटतं त्या कबूल केल्या पाहिजेत."

आनंदराव म्हणाले "कबूल तर अर्थात्च! मला लाज इतकीच वाटते आहे, कीं, तो इतकें थोडें कां मागतो आहे!"

ताराबाई म्हणाली "अरेरे, हें लग्न आतां झालंच पाहिजे, अन् त्यामधें आपण आनंद मानला पाहिजे, अशी स्थिति आली अं!"

आनंदराव म्हणाले "हो निःसंशय! लग्नावांचून आतां गत्यंतरच उरलें नाहीं. मला फक्त दोनच गोष्टी कळायला हव्या आहेत—एक ही, कीं, तुमच्या मामानें स्वतःचे किती पैसे यांत घातले आहेत; अन् दुसरी ही, कीं, मी ते त्याचे कधीं व कसे फेडणार?"

शांताबाई आश्चर्यानें उद्गारली "पैसे? कसले पैसे म्हणतां आहां तुम्ही बाबा?"

आनंदराव म्हणाले "अलबत! माझें असें म्हणणें, कीं, सालीना पांचशें रुपये अन् मी मेल्यावर फक्त दोन हजार, एवढ्या लालुचीवर कोणीहि शहाणा

माणूस आपल्या कचाट्यांत सांपडलेल्या मुलीशीं लग्न करायला कधींहि कबूल व्हायचा नाहीं !"

ताराबाई म्हणाली "खरं, खरं, ! माझ्या ही गोष्ट नीटपणें लक्षांत आली नव्हती. त्यांचं सर्व कर्ज फेडून शिल्लक राह्यची ! तर मग अलबत मामांनीं बरीच भर घातली असली पाहिजे. किती तरी हे त्यांचे उपकार आहेत ! पण हें सारं थोड्याथोडक्यानं कसं भागणार ? त्यांनीं आपल्या अंगावर भलतं ओझं तर घेतलं नाहींना ? "

आनंदराव म्हणाले "छेग, थोड्या रकमेंत हें सारें नाहींच व्हायचें, खास ! आज रोख दहा हजार सुर्ती घेतल्यावांचून जर नागेशरावानें हें कबूल केलें असेल, तर महामूर्खच आहे म्हणायचा तो ! त्याच्याशीं नवीन नातें आमचें जुळतें आहे, इतक्यांतच त्याला गाढव म्हणण्याचें आम्हांला भाग पडलें तर मला किती तरी वाईट वाटेल !"

शांताबाई उद्गारली " दहा हजार आज रोख ! अरे बापरे !"

ताराबाई संकटानें म्हणाली "अन् आम्हीं ते कुठून आणायचे ? निम्मे-सुद्धां अशक्य !"

आनंदरावांनीं कांहींच उत्तर दिलें नाहीं. घरांत शिरल्यावर ते तडक लायब्ररीकडे तार ल्याहायला गेले, व दोघीजणी दिवाणखान्यांत शिरल्या. आंत गेल्यावर ताराबाई म्हणाली " बरं बाई, एकदांचं लग्न व्हायचं ठरलं. अन् या असल्या लग्नाकरतां आम्हीं परमेश्वराचे आभार मानायचे ना ? धडधडीत तो वाईट हें माहीत असून त्याच्याशीं लग्न ठरल्याबद्दल आनंद व्हायचा ! अरेरे, काय हें सुंदर केलंस तूं !"

शांताबाई म्हणाली " मी त्यांतल्या त्यांत इतकंच समाधान मानतें, कीं, तिच्याविषयीं त्यांच्या मनांत थोडंसं तरी प्रेम असल्याविना ते लग्न करायला कधींच कबूल नसते झाले. मामांनीं उदारपणानं कांहीं मदत केली असेल, पण मला नाहीं वाटत, कीं, दहा हजार अथवा त्याच्या आसपास कांहीं त्यांनां द्यावं लागलं असेल. त्यांचा त्यांनां संसार आहे, अन् अजून वाढणाराहि आहे. पांच हजार तरी त्यांनीं कसे द्यावे ?"

ताराबाई म्हणाली " नागेशरावाचं कर्ज किती होतं आणि ते स्त्रीधन किती करून देणार सुंदरला, हें कळलं आपणांला, म्हणजे मामांनीं किती

रक्कम दिली तें नक्की सहज समजेल. कारण, त्यांच्या स्वतःजवळ एक कपर्दिकहि नसलीच पाहिजे. किती तरी मामांचा अन् मामींचा चांगुलपणा हा! असल्या मुलीला आपल्या घरांत येऊं देऊन आपण तिच्या लग्नांत इतका पुढाकार घेणं, ह्मणजे त्यांनां कांहीं मोठी आनंदाची गोष्ट नव्हे. कसे आपण त्यांचे उपकार फेडूं कोण जाणे! कितीक वर्षे तरी आपण ते स्मरले पाहिजेत. इतकं त्यांनीं सुंदरवर ममत्व व कींव दाखवली आहे, कीं, तिनं त्यांचं आजन्म ऋणी राह्यलं पाहिजे. तसं जर तिला वाटलं नाहीं, तर सुखी होण्याला दिखील ती लायक नाहीं. जेव्हां ती पहिल्यानं मामींनां पाहील, तेव्हां किती शरमून जाईल!"

शांताबाई ह्मणाली "सगळ्यांनींच आतां झालं गेलं तें विसरण्याचा प्रयत्न केला पाहिजे. अजूनहि त्या दोघांनां सुख लागेल अशी मला आशा अन् भरंवसाहि आहे. लग्न करायला ते तयार झाले हेंच मुळीं आतां सुधारण्याची प्रस्तावना केल्यासारखं मी मानतें. पुढें तीं दोघं आतां शहाणपणानं अशीं राहतील, कीं, मागचं सारं लोक विसरून जातील."

ताराबाई विरक्तपणें ह्मणाली "या बोलण्यांत काय अर्थ आहे! कितीहि पुढें सुधारलीं, तरी मागचं अगदीं कसं कोण विसरूं शकेल? तें असो म्हणा. पण हें पहा, अजून आईला यांतलं कांहींच कळलं नसेल. चला चला, मी आतां बाबांनां विचारून येतें."

तारा लायब्ररींत गेली तों आनंदराव तारच लिहीत होते त्यांनां तिनें "आईला ही बातमी सांगूंना?" ह्मणून विचारलें. त्यांनीं वर मान न उचलतां फक्त म्हटलें "तुला वाटेल तें कर जा!"

ताराबाई भीत भीत म्हणाली "ती तार नेऊं का तिला दाखवायला?"

आनंदराव त्रासिकपणें उद्गारले "काय हवें असेल तें घे, पण नीघ इथून!"

ताराबाईनें टेबलावरची तार झटकन् उचलली व दोघीहि माडीवर आईच्याकडे खोलींत गेल्या. मथुरीहिरीहि आईजवळच होत्या. तेव्हां एका सांगण्यानें सर्वांनांच आनंद होईल असें होतें. चांगली बातमी आम्हीं आणली आहे अशी थोडीशी प्रस्तावना करून ताराबाईनें तार मोठ्यानें वाचून दाखविली. सीताबाईची कळी तत्काळ उमलली. लवकरच लग्न लावण्याचा बेत केला आहे, हें वाक्य ऐकून सीताबाई टुणदिशीं निजलेल्या पलंगावर उठून

बसल्या. जों जों पुढचा मजकूर कानावर पडत चालला, तों तों त्यांच्या आनंदाला भरती येत गेली. आज पंधरा दिवस धास्ती व काळजी या दोहोंनीं जी त्यांची वेड्यासारखी स्थिति झाली होती, तसलीच आतां हर्षवायु होण्याची स्थिति येते कीं काय, अशी भीति पडूं लागली. कारण, लग्न ठरलें एवढेंच त्यांनां बस्स झालें. त्या लग्नामध्यें हीनपणा किती होता, अथवा पुढें त्यापासून सुखाची कितपत आशा होती, याचा विचार सीताबाईनां कोठला ? त्या उद्गारल्या " अहाहा ! माझी लाडकी सुंदर ! छान छान, अगदीं अगदीं सुंदर हें होतं आहे. लगीन ! अग, सोळाव्या वर्षीं, इतक्या लहानपणीं—लग्न होणार अं ! किती तरी गोड ! मला ठाऊकच मुळीं, कीं, भाऊ असलं खास ठरवून टाकील ह्मणून ! अहाहा, कधीं बरं सुंदर तूं माझ्या दृष्टीला पडशील ? अन् तेंहि जांवईबोवांनां घेऊन जोड्यानं बरं ! बरं पण, शेला, शालू, साड्यांचं कसं काय ? मी आतां आधीं वहिनीला लिहितें ! तारा, बाळ, त्यांच्याकडे आधीं पळ बरं, अन् विचार, कापडाकरतां किती रक्कम खर्च करायची तें ! पण थांब, मीच जाऊन पुसतें ! हिरे, घंटा वाजवून त्या दाजीबाच्या बायकोला बोलाव पाहूं ! अहाहा, सुंद्रे पोरी धन्य तुझं नशीब ! तूं आलीस कीं मी तुला अश्शी अगदीं कडकडून भेटेन !"

या असल्या मर्यादेबाहेर वाहवलेल्या मूर्खपणाच्या फाजील आनंदाला थोडासा आळा घालण्याच्या हेतूनें, वसंतरावांनीं किती श्रम केले असतील, व आपण त्यांचें किती तरी उपकार मानले पाहिजेत, वगैरे गोष्टी आईच्या नजरेला स्पष्टपणें आणण्याचा शांताबाईनें प्रयत्न केला, व म्हटलें "हें पहा आई, मामांनीं जर अतोनात तसदी घेतली नसती, व बरीचशी पदरमोड केली नसती, तर आज हा असा इतका तरी गोड शेवट कधींच झाला नसता ! आम्हांला तर आज खास वाटतं आहे, कीं, नागेशरावांनां बरीचशी रक्कम द्यायची त्यांनीं स्वतः कबूल केली असली पाहिजे."

सीताबाई तोऱ्यानें म्हणाल्या "असेल ! त्यांत काय मोठंसं त्यानं केलं ? मामानं नाहीं झीज लावून घ्यायची, तर कोण लोकं का घेतील ? वेडीच आहेस तूं ! त्यांचीं त्यांनां मुलंबाळं नसतीं, तर त्यांची सगळी इस्टेट मीन् माझ्या मुली यांनांच मिळाली असतीना ? अन् आजपर्यंत ही पहिलीच कायती आमची त्यांनां तोशीस लागते आहेना ? कधीं कधीं नजराणे, बक्षिसं

पोरींनां तो पाठवीत असतो तें सोडून द्या, त्यांची काय मोठीशी किंमत! एः तुझ्या बोलण्यांत कांहींच अर्थ नाहीं. अहाहा, काय पण मौज! लवकरच अगदीं दोन दिवसांतच, माझ्या सोनुकलीचं लग्न होऊन जाणार! गोडबोली बाई! अहाहा, किती तरी मंजुळ हें नांव माझ्या कानाला लागतं! अन् कालच्या आखाडांत कुठं नुकतं सोळावं वरीस तिला टेंकतं आहे हो! शांते पोरी, मला इतका आनंद झाला आहे, कीं, माझ्याच्यानं आतां यादी लिहवत नाहींत. मी तोंडानं सांगतें अन् तूं लिही. रकमेचं मग त्यांच्याशीं ठरवून घेऊं. पण आतां आधीं यादी करून एकदम पुण्यास त्या मेघराजाच्या दुकानीं रवाना केल्या पाहिजेत!"

असें म्हणून सीताबाई खण, रेशमी, जरीकांठी, भरजरी, लुगडीं; शेले, शाल्, पैठण्या, पिलाव, पोल्के करण्याला रेशमी कापड, वगैरे यादी सांगण्यास सुरुवात करूं लागल्या. शांताबाईचा इलाज चालेना. ती बिचारी लिहीत होती; पण जेव्हां यादी फारच फुगायला लागली, तेव्हां ती म्हणाली "पण आई, आधीं एकदां रकम ठरवली, म्हणजे त्याप्रमाणें याद करायला उशीर का आहे? दोन चार तास उशीर का होईना, पण पक्की करावी."

तारानेंहि तसेंच कांहीं म्हटलें, तेव्हां मोठ्या प्रयासानें सीताबाई कबूल झाल्या. आज त्यांनां रोजच्याप्रमाणें हट्ट धरण्याची इच्छा नव्हती. शिवाय, दुसऱ्याहि कितीक गोष्टींच्या कल्पना मनांत त्यांनां जुळवायच्या होत्या. त्या म्हणाल्या "बरं तर. आधीं मी पोषाख करून गांवांत जातें, अन् ही गोड मधुर बातमी आमच्या रमाला सांगतें. तशीच परत येतांना रावबहादुरांच्या घरीं अन् सारजाबाईनांहि सांगून येईन. हिरे, जा बरं, गाडी जुंपायला एकदम सांग. एकदां फेरफटका करून गाडींतून जाऊन आलें, म्हणजे मला पुष्कळ आणखी हुशारीहि येईल. मुलींनों, तुमचं आहे का कांहीं काम गांवांत करण्यासारखं? बरं झालं ही आली—कळलं कां तुला हरणे, सुंदरचं लगीन ठरलं बरं! आतां चांगल्या घट्ट कंबरा बांधा कामाला, म्हणजे छानदार लुगडं मिळेल बरं!"

हरणी हें ऐकतांच आनंदून गेली, व मोठमोठ्यानें तसले उद्गार काढूं लागली. ताराबाईला हा सर्व अचरटपणा पाहून वाईट वाटूं लागलें, व ती आपल्या खोलींत निघून गेली. तेथें तिला स्वस्थपणें विचार करायला

फुरसत मिळाली. सुंदरची स्थिति एकंदरींत वाईटच; पण याहिपेक्षां जास्ती वाईट ती नाहीं, एवढीच काय ती त्यांतल्या त्यांत बरी गोष्ट होती; व पुढचा विचार करतांना सुंदरला संसारांत सुख अथवा मानमान्यता लाभण्याचा जरी मुळींच संभव दिसून येईना, तरी कालपर्यंत जी भयंकर दुर्दशा अगदीं डोक्यावर येऊन आदळतेशी वाटली होती, त्यांतून तरी सुटका झाली, ही कांहीं लहानसहान गोष्ट नाहीं, असें तिला वाटलें. सर्वांनां तितक्यानें थोडेंसें सुख वाटणें साहजिक आहे, असेंहि तिला वाटलें.

---

## प्रकरण पन्नासावें.

### सीताबाईचा आनंद !

आनंदरावांचें लग्न झाल्यापासून आज पंचवीस वर्षांत कितीकदां तरी त्यांनीं निश्चय केला होता, कीं, सालोसाल सर्व उत्पन्न खर्चून फस्त करण्यापेक्षां, अडीअडचणीकरितां दरवर्षीं कांहीं तरी मागें शिल्लक टाकावी, म्हणजे आपल्यामागें सीताबाई दुर्दैवानें राहिली तर तिला व आपल्या मुलांबाळांनां कांहीं तरी आश्रय होईल; परंतु मनुष्य पुष्कळ चांगले निश्चय करतो, त्यांची जी बहुशः स्थिति होते, तीच स्थिति याहि निश्चयाची होत असे. पण तसें झाल्याबद्दल आज आनंदरावांनां खरोखरीच पश्चात्ताप झाला होता. आपल्याजवळ जर कांहीं आज संचय असता, तर आज सुंदरकारितां अब्रू व नवरा विकत घेण्याकरितां मामाच्या तोंडाकडे पाहण्याची जरूर पडली नसती. मग अत्यंत कवडीमोल असा जांवई मिळविण्याचें श्रेय श्वशुरांनां तरी खुद्द घेतां आलें असतें. कोणालाहि ज्यापासून विशेष फायदा होण्याचा संभव नाहीं, असली गोष्ट घडवून आणण्याला देखील आपण मेव्हण्याकडे तोंड वेंगाडावें, ही गोष्ट त्यांनां अतिशय लागून राहिली. ह्मणून वसंतरावांनीं किती घीस सोसली आहे तिचा नक्की अंदाज काढून घेऊन, होईल तितक्या लवकर त्यांनां ती रकम भरपाई करण्याचा त्यांनीं निश्चय केला.

त्यांचें स्वतःचें लग्न झालें तेव्हां तर आटोपशीर संसार, मग काटकसर करण्याची जरूरच नव्हती. शिवाय, योग्य कालीं आपणास मुलगा होईल हीहि खात्री वाटत होती. मुलगा झालेला असला, म्हणजे मग आपल्यापश्चात्

नीलकंठरावांकडे सर्व इष्टेट जाण्याची भीति अर्थात्च संपली, आणि मग त्याबरोबर बायकापोरांचीहि काळजी करण्याची जरूर राहिली नाहीं. असा अत्यंत मधुर विचार आनंदरावांच्या व सीताबाईच्या मनांत असे. पण पुढें एकामागून एक भराभर पांच मुलें झालीं तरी त्या सर्व मुलीच. तरी सीताबाईनीं पांचदहा वर्षें मुलगा व्हायची आशा सोडली नव्हती. पण हिरिनंतर आज पंधरा वर्षांत कांहींच झालें नाहीं, तेव्हां आतां अलीकडे दोनचार वर्षें त्यांची अगदीं निराशा झाली होती. पण आतां संसार वाढून गेला, व शिवाय खर्चिकपणाची संवय आज पंचवीस वर्षें हाडामासांत खिळून गेली. आतां काटकसर कशी करणार ? शिवाय, सीताबाईच्या स्वभावाला डामडौल फार प्रिय होता. केवळ आनंदरावांनां भिऊनच त्या कधीं कर्ज करून खर्च करण्याची गोष्ट काढीत नसत, इतकेंच.

सीताबाईच्या लग्नाच्या वेळीं त्यांनां स्त्रीधन म्हणून दहा हजार रुपयांचे दागदागिने त्यांच्या अंगावर घातले होते, त्यांची वांटणी कशी करायची तें आईबापांनीं ठरवण्याचें ठरलेलें होतें. अर्थात्, पांची मुलींनां ती रकम सारखी वांटून देण्यांत कोणालाच अन्याय नव्हता, व म्हणून त्यांतले दोन हजारांचे दागिने योग्य वेळीं—म्हणजे सीताबाईच्या पश्चात्—सुंद्रीला देण्याचें कबूल करण्यांत आनंदरावांनां कांहींच जड वाटलें नाहीं. दरसाल पांचशें रुपये देणें—व तेहि उचलून देणें—जरासें जड होतें; पण सध्यांच्या प्रसंगाच्या मानानें तेंहि कबूल करण्यासारखें होतें. ह्मणून आनंदरावांनीं तार लिहिली त्यांत दोन्ही अटी कबूल करून वसंतरावांचे थोडक्यांत पण मनापासून फार फार आभार मानिले. इतक्या स्वल्पांत ही आलेली गळ्यांतली घोरपड निघेल, अशी त्यांनीं कधींहि क्षणमात्र कल्पना केली नव्हती. आजच्या अटींनीं त्यांचें प्रत्यक्ष आज नुकसान सालाचें दोनशें रुपयांचेंहि होत नव्हतें. कारण, सुंदरच्या कपडालत्त्यांचा व भोजनखर्च, व आईची लाडकी असल्यामुळें सीताबाई नेहमीं तिला कांहींना कांहीं तरी करून देत तो खर्च, अशी मिळून सर्व रकम सालीना तीनचारशें रुपयांच्या जवळजवळ सहज होई.

आणखी आपणा स्वतःला त्या कामांत इतकी स्वल्प तसदी पडावी, हें पाहूनहि त्यांनां पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें. कितीक दिवस तरी ही खटपट आपल्या स्वतःच्या मागें लागून राहील, अशी प्रथम त्यांनां भीति पडली होती;

पण तसें कांहीं न होतां, चारआठ दिवस एकदां मुंबईला फेरी टाकून येण्यापलीकडे आपणाला जास्त श्रम करण्याची जरूर नाहीं, हें पाहून ते खरोखरच खूष होऊन गेले. कारण,हल्लीं त्यांची ग्रंथ लिहिण्याची सर्व कच्ची तयारी पुरी होऊन प्रत्यक्ष लिहिणें सुरू होणार होतें. अशा वेळीं संसारांतल्या उपाधींपासून होतां होईल तों अलिप्त रहाण्याची त्यांनां साहजिकच उत्कट इच्छा होती. सुंद्री निघून गेल्याची प्रथम वार्ता आल्याबरोबर त्यांची तिरपीट होऊन त्या धांदलींत ते मुंबईला गेले खरे, पण एकदां तेथून मेव्हण्यांनीं परत जा म्हटल्याबरोबर ते खुषीनें त्यांच्यावर सर्व भार टाकून निघून आले होते, व शांतिसदनांत परत आल्यावर तर आतां कांहीं कर्तव्य राहिलें नसल्यामुळें त्यांचा वर्तनक्रम पूर्ववत् सुरळीत चालू झाला होता. जगाशीं फारसा निकट संबंध न ठेवतां तास दोन तास वर्तमानपत्रें व दोनतीन तास ग्रंथलेखन इतकें केलें, कीं, आपली इतिकर्तव्यता झाली. असें ते खुशाल मानीत असत. त्यांत कशानेंहि व्यत्यय येऊं लागला, कीं, त्यांची तब्बेत खप्पा होई. अशा स्थितींत वसंतरावांनां एक तार पाठवण्यानें हें प्रकरण अखेरचें निकालास लागतें हें समजून त्यांनां आनंद व्हावा, यांत नवल काय ? मोठ्या मिनतवारीनें त्यांनीं त्याच झपाट्यासरशीं वसंतरावांनां एक पत्र खरडून टाकलें, कीं, "आपण या कामांत फार पदरमोड केली असली पाहिजे, हें उघड दिसत आहे. तरी त्याबद्दल मेहरबानी करून स्पष्ट खुलासा करावा." ते सुंद्रीवर इतके संतापले होते, कीं, त्यांनीं पत्रांत तिला आशीर्वाद देखील लिहिण्याची तसदी घेतली नाहीं.

लग्न होण्याची गोड बातमी झटदिशीं सगळ्या घरभर झाली,व हां हां म्हणतां गांवांतहि पसरून गेली. गांवांतल्या मंडळींनीं ती बातमी जेमतेम समाधानानें ऐकून घेतली. सुंदरची पुरी फजिती होऊन नगरकरांच्या घराला कायमचा डाग राहिला असता,तर अर्थातूच लोकांनां गप्पा उठवायला एक कायमचा विषय होऊन बसला असता.अथवा ती कोठें तरी नाहींशी होऊन गेली असती, तरीहि तोच लाभ लोकांनां झाला असता. पण आतां लग्नाबद्दलच काय चार दिवस बोलायला मिळेल, त्यापेक्षां जास्त मौज या प्रकरणांत फारशी राहिली नाहीं, असें वाटून लोकांचा जरासा हिरमोड झाला. त्यांतल्यात्यांत समाधान इतकेंच मानण्यासारखें होतें, कीं, रिकामटेंकड्या बायाबापड्यांनां नेहमीं "कशी ग बाई असल्या पाजी नवऱ्याशीं सुखानं संसार करील!" असा

मोठा विवंचनेचा स्वर काढून, तिची बाह्यात्कारी कींव करण्याची तरी रगडशी संधि देवानें कायम ठेवली होती !

आज पंधरा दिवसांत सीताबाई खोली सोडून खालीं आल्या नव्हत्या, त्या आज रात्रीच्या जेवणाला नेहमींप्रमाणें येऊन आपल्या जागेवर बसल्या होत्या. त्यांचा आज हर्ष काय सांगावा ? त्यांच्या जिवाला झाल्या प्रकाराची ओशाळगत यत्किंचित्‌हि शिवलेली नव्हती. शांता सोळा वर्षांची झाल्यापासून तिच्या लग्नासाठीं त्या हपापलेल्या असून, आज कोठें त्यांच्या इच्छेला कळी फुटली होती; म्हणून लग्नांत असा सोहाळा करीन, तसा डामडौल करीन, हेच विचार त्यांच्या डोक्यांत तुडुंब भरून राहिले होते. लग्नानंतर न गेशरावांनां व सुंदरला राहण्याला योग्य बंगला आसपास कोणचा आहे याचा त्या मनाशीं तपास करीत होत्या. मनांतल्यामनांत कांहीं विचार करणें त्यांनां माहीत नव्हतेंच ! अर्थात्‌च ते विचार हळुहळू बाहेरहि पडण्यास सुरुवात झाला होती. त्यांनां महिन्याचा किती खर्च करण्याचें सामर्थ्य आहे याचा विचारहि न करितां, कितीक बंगले फार लहान अथवा फार कमी दर्जाचे, असें म्हणून त्यांनीं नाकारण्यासहि सुरुवात केली होती. त्या म्हणाल्या "'सुखभुवन' चालेल, पण तीं तेलसंगकर तिथें राहतात, तीं कशीं सोडणार? इनाम मळ्यांतला बंगला टुमदार आहे—पण छे, दिवाणखानाच मुख्य अगदीं कोता !'आनंदधाम' उत्तम आहे, पण इथनं किती तरी दूर ! दहा मैल सुंदर दूर राहणं म्हणजे कसं बाई चालेल ? आपल्या घरीं गोड भाजी झाली तर उन्हन उन्हन जांवयांच्या घरीं पोंचती करतां आली पाहिजे ! 'गिरिशिखर' ठीक आहे, पण पाण्याची कोण हाकाहाक !"

जेवणाघर नोकराचाकरांच्यादेखत आपण कशाला बोला, अशा विचारानें आनंदराव स्वतः कांहीं न बोलतां सीताबाईनांच हवें तसें बोलूं देत होते. पण जेवणें झाल्यावर मंडळी मुखशुद्ध व विडे खायला दुसऱ्या खोलींत जमली तेव्हां नोकरलोक निघून गेल्यावर ते तिला म्हणाले. "हें पहा, आतां तुम्ही जेवणावर नांवं सांगितलींत त्यांतला एकादा अथवा सगळेहि बंगले जांवयां-करितां तुम्ही घ्यायच्या अगोदर माझे दोन शब्द ऐकून ठेवा, म्हणजे बरें होईल. या गांवांतल्या एका बंगल्यांत मात्र मी त्यांचें नखहि कधीं शिरकूं देणार नाहीं. समजलें ? स्पष्ट सांगतों पाहिजे तर. या शांतिसदनांत जर ती

बेश्रमपणानें यायचें म्हणतील, तर खुशाल तंगडीच मोडून टाकीन त्या दोघांचीहि ! ”

सीताबाई अगदीं चकित होऊन गेल्या. त्या नवऱ्याला पुष्कळ बोलल्या, पण आनंदराव बिलकूल आपलें ह्मणणें सोडीनात. त्यावरून दुसऱ्याहि एका गोष्टीचा खुलासा होऊन गेला व त्याहिविषयीं असाच वाद सुरु झाला. आनंदरावांनीं स्पष्ट सांगितलें, कीं, “ कपडेलत्ते घ्यायला मी एक पैहि देणार नाहीं. इतकेंच काय, माझी माया तिच्यावर आहे असें दिसण्यासारखें यत्किंचित्‌हि मी कांहीं करणार नाहीं.”

हा कोण दुराग्रह तें सीताबाईंनां मुळींच समजेना ! आपल्याच लेंकरावर वडील इतका राग धरतील, कीं, तो राग तिला अत्यंत जरूर असलेले कपडेलत्तेसुद्धां नवे न घेतां जुन्या घरांतल्या बोळ्यांवर लग्न करण्यापर्यंत दूर जाईल, अशी त्यांनां कधींहि कल्पना झाली नव्हती. मुलीचें लग्न अशा नामुष्कीनें होत आहे याची ओशाळी वाटण्याच्याऐवजीं, नवे कपडे न घेतल्याबद्दलच त्यांनां अतोनात ओशाळी वाटूं लागली होती !

मुक्षुत संपल्यावर ताराबाई आपल्या खोलींत गेली. त्याबरोबर बाह्यसृष्टि नाहींशी होऊन तिची मनःसृष्टि पुनः सुरू झाली. आज तिला असें वाटूं लागलें होतें, कीं, दुःखाच्या झटक्यांत आपण विनाकारण चटणीस भय्यासाहेबांनां सुंदरची खरी हकीगत उगीच कळवून टाकली. तशी जर त्यावेळेला कळवली नसती, जरा जर आपल्या मनावर त्या वेळीं दाब ठेवला असता,तर आतां लग्नामुळें बाह्यतः सर्व यथास्थित होऊन जात असल्यामुळें, आंतलें हें सारें काळेंबेरें आपणाला भय्यासाहेबांसारख्या माणसांपासून सहज चोरून ठेवतां आलें असतें; व एकदां त्यावेळीं तें कळलें नसतें, ह्मणजे इतक्या दूर त्यांनां कशानें खरी हकीगत कळली असती ? त्यांच्याकडून दिलबहारांतल्या दुसऱ्या माणसांनां ती दुष्ट गोष्ट कळेल ही तिला भीति वाटत नव्हती. कारण, आपण दुःखाच्या आवेगांत सांगितलेली गोष्ट ते कमलिनीला किंवा भाऊसाहेबांनां खास बोलणार नाहींत, असा तिला भरंवसा वाटत होता. पण आपल्या बहिणीची ही विटंबना दुसऱ्या कोणालाहि कळली असती तरी बेहत्तर, पण भय्यासाहेबांपासून तरी ती चोरून रहायला जरूर हवी होती. त्यांनां कळण्यापासून होणारी तिची स्वतःची

मानखंडणा तिला अत्यंत दुःसह वाटूं लागली. त्यापासून आतां म्हणजे तिचें स्वतःचें कांहीं नवीन नुकसान होणार होतें असें अलबत नव्हतेंच;कारण, आतां त्यांच्या व आपल्यांत भयंकर खोल दरी पडून राहिली आहे हें तिला निःसंशय वाटत होतें. कारण, झाला हा अश्लाघ्य प्रकार मुळींच न होतां, अगदीं व्हावें तशा उत्तम प्रकारानें जरी सुंदरचें लग्न नागेशरावांशीं जुळून आलेलें असतें, तरी आधींच असलेल्या नानाविध अडचणींमध्यें ही एक नवीनच अक्षम्य भर येऊन पडली असती, कीं, ताराबाईशीं लग्न करण्याचें मनांत आणलें, तर त्यामुळें नागेशरावासारखा दुष्ट व अत्यंत पाजी माणूस आपला प्रत्यक्ष साडू बनून जाणार ! अर्थात्, नागेशराव आनंदरावांचे जांवई बनले, कीं, भय्यासाहेबहि जांवई बनण्याचा मार्ग सपशेल बंद झाला, हें उघड होतें.

असला भयंकर आघात भय्यासाहेबांच्या मनावर बसल्यानंतर, ते आपलें नांवहि निघाल्याबरोबर अंगावर शहारेच आणतील, यांत नवल काय ? आपण त्यांनां चांगलें लेखावें, अशी जी इच्छा त्यांच्या मनांत असलेली चटणीस अथवा दिलबहारांत उघड दिसूं लागली होती, ती आतां साफ नाहींशी होऊन जाईल, तिचा लेशमात्रहि शिल्लक राहणार नाहीं, हें स्पष्ट दिसत होतें. तें पाहून ताराबाईला अत्यंत खट्टू वाटलें, अत्यंत विषण्णपणा उत्पन्न झाला. एक प्रकारें पश्चात्तापहि मनांत डोकावूं लागला, पण तो कशाविषयीं वाटूं लागला तें अजून तिचें तिलाच नीटसें समजेना. आपणाविषयीं भय्यासाहेबांच्या अंतःकरणांत आदरबुद्धि शिल्लक राहण्यापासून आतां यत्किंचित्‌हि उपयोग नाहीं असें वाटत होतें, तरीहि तेथें आदरबुद्धि रहावी अशी हौस उत्पन्न झाली. त्यांची खबर आतां समजण्यापासून लाभाची यत्किंचित्‌हि आशा नसतां, त्यांची हालहवाल कळण्याची उत्कट इच्छा उत्पन्न झाली. पण आतां तिकडील वार्ता कानीं येण्याचा मार्गच बंद झाला होता. आतां पुनः कधीं त्यांची गांठहि पडणें शक्य नाहींसें झालें, तर आतां तिचें मन तिला सांगूं लागलें, कीं, त्यांच्या संगतीमध्यें आपला संसार बहुतकरून अत्यंत सुखमय झाला असता !

"अरेरे ! किती भय्यासाहेबांनां धन्यता वाटेल बरं, जर कदाचित् त्यांनां अकस्मात् कळून आलं, कीं, नुकती चार महिन्यांपूर्वीं जिनं आपली मागणी अत्यंत धिक्कारपूर्वक पायांखालीं तुडवून धुडकावून दिली, तीच स्त्री आज

आपली सांवली तिच्या अंगावर पडून चार प्रेमाचे शब्द आपल्या तोंडून ऐकण्याकरितां इतकी आतुर झाली आहे! त्या मागणीचा अत्यंत आनंदानं आणि कृतज्ञपपणानं मी आज स्वीकार करण्याचा विचार करीन, असं आज त्यांनां जर कोणीं सांगितलं, तर तें त्यांनां खरं तरी वाटेल काय ? त्यांच्या अंगीं उदारबुद्धि, दुसऱ्याच्या दोषांविषयीं सहिष्णुता जरी पुष्कळ असली तरी जोंपर्यंत मानवी स्वभावाचे साधारण गुणदोष त्यांच्या अंगीं आहेत, तोंपर्यंत त्यांनां धन्यता वाटल्याशिवाय, खूप आपण हिला नरम आणली, असें वाटल्या-शिवाय, ते कसे राहातील ?

"अरेरे ! एकाद्या अजागळ माणसाला एकादा निखारा सांपडला असा भास होऊन, त्यानं तो आपणापासून झटकनू फेंकून द्यावा, व कांहीं वेळानें तो दुसऱ्याच्या हातीं गेल्यावर, तो निखारा नसून उत्तम लाल माणकाचा खडा आहे असं त्यानं अभिमानपूर्वक सांगितल्यावर, मग आपणाला त्याची आधीं किंमत कळली नाहीं म्हणून त्या अजागळ माणसानं हळहळावं, व आपणाला सांपडलेला खडा आपणाला आतां लाभण्याचा संभव राहिला नसल्यानं मग अत्यंत श्रमी व्हावं, अशी माझी स्थिति झालीना ?"

आज ताराबाईंचे डोळे पुरे उघडले. आजपर्यंत आपल्या डोळ्यांवर मस्ती होती, असें आज तिला वाटूं लागलें. "द्राक्षं मागितल्याबरोबर आपणाला तीं खास मिळतील असं वाटत होतं, तोंवर तीं आंबटच आहेत का, तीं कदाचित् कडसर तर नसतील, असल्या कुकल्पना व्यर्थ मनांत आणून आपण त्यांचा अव्हेर केला; पण आतां तीं नशिबानं आपल्या आटोक्याच्याबाहेर अगदीं दूर गेल्याबरोबर आज आपणाला त्यांचं खरं स्वारस्य कळूं लागलें, व आतां तीं आपणाला कुठून लाभणार असं मनांत येऊन आतां आपण खिन्न होऊन बसतों आहोंत, यापेक्षां आपला जास्ती मस्तपणा कुठें आढळणार ?"

आज ताराबाईला वाटूं लागलें, कीं, बुद्धीनें व स्वभावानें अगदीं योग्य असा भय्यासाहेबांसारखा दुसरा कोणी पुरुष आपल्या आढळांत आला नाहीं. पण आळशावर एवढी थोरली गंगा येऊन मी पुनः कोरडी ठणठणीतच राहिलें आहें !

जरा वेळानें तिचे विचार सुंद्री व नागेशराव यांच्याकडे वळले. दोघेंहि डामडौली, उधळीं, एकालाहि काटकसर किंवा व्यवस्थितपणाचा गंध नाहीं,

अशा स्थितींत त्या दोघांचा कसा संसार चालणार ? पण बोलूनचालून जेथें संसाराला सुरुवातच असल्या मूर्खपणाच्या धांवपळींत व धांगडधिंग्यांत होणार, त्या संसारांत शांततेचें अथवा समाधानाचें सुख यत्किंचित्‌हि न लाभलें तर त्यांत नवल काय ?

असले नाना तऱ्हेचे बरेबुरे—विशेषतः बुरेच—विचार करीत ती इंतरुणावर दोनतीन तास तळमळत पडली होती. अखेर केव्हां तिचा डोळा लागला कोण जाणे.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं वसंतरावांकडून सविस्तर पत्र आलें; पण त्यांत बहुतेक तारेंतल्याच मजकुराचा अनुवाद होता. नवीन माहिती कांहीं विशेषशी नव्हती. नंतर दोनतीन दिवसांनीं पुनः पत्र आलें, तें आनंदरावांच्या तारेचें व पत्राचें उत्तर म्हणून मुख्यतः होतें. " आपल्या बहिणीच्या मुली-करितां योग्य ती हरएक खटपट करण्यास सदैव मी तयार असणें माझें कर्तव्य आहे. त्यापेक्षां मी या प्रसंगीं जास्त कांहीं केलेंसें मला वाटत नाहीं.त्याविषयीं आपण माझे आभार मानण्याची मुळींच जरूर नाहीं." वगैरे मजकूर प्रथम लिहून वसंतरावांनीं पुढें ताज्या कलमांत पुढील मजकूर लिहिला होताः—

"आमचा असा विचार ठरला आहे, कीं, नागेशरावांनीं आतां रिसाल्यांतला राजीनामा द्यावा. जेथें इतका त्यांचा बजबजाट झाला, त्या पलटणींत पुनः नोकरी करणें कोणालाच श्रेयस्कर होणार नाहीं, असें आपणहि सहज कबूल कराल. त्यांचा आतां विचार कोठें तरी पोलिसखात्यांत नोकरी करण्याचा आहे, व त्यांच्या पूर्वीच्या कांहीं मित्रांच्या मनांत अजून त्यांनां मदत करून पुनः एकदां नीट रीतीनें मार्गावर नेऊन सोडण्याचें फार आहे. नागपुराकडे एका संस्थानांत मुख्य पोलिसऑफिसरची जागाहि त्यांनां मिळवून देण्याची खटपट चालू आहे, सुदैवेंकरून तिला खास यश येईल. राजीनाम्याचा विचार मी क.फडके यांनां कळविला आहे,व तेथें कोणाचें किती कर्ज असेल त्याची यादी मागविली आहे,त्याचप्रमाणें आपणहि भागवत वकिलांकडून शिवदुर्गांत कोणाचें किती देणें आहे याची माहिती काढून इकडे पाठविण्यास त्यांनां मेहरबानीनें सांगावें, व तें सर्व फेडलें जाईल अशी सर्वांनां हमी द्यावी. मी इकडून ताबडतोब पैसे पाठवीन. त्यांनीं स्वतः यादीच दिली आहे, पण ती बरोबर आहे कीं नाहीं एवढेंच पहावयाचें आहे. लग्न झाल्याबरोबर येथूनच नागपुराकडे नवीन जाग्याचा चार्ज घेण्याकरितां गेलें पाहिजे.पण सुंदरची इच्छा

एकवार आपणां सर्वांनां भेटल्याशिवाय इतक्या दूर एकदम जाऊं नये अशी फार असल्याचें सौभाग्यवतीकडून समजतें. आपली परवानगी येईल तर तसें करूं. तिची प्रकृति बरी आहे व तिनें आपणां सर्वांनां सा. नमस्कार प्रविष्ट केले आहेत. कळावें, हे विनंति.

वसंत केळकर."

रिसाल्यांतून नागेशराव निघावेत हें शांताताराबाईनांहि आनंदरावांप्रमाणेंच पसंत पडलें; पण सीताबाईनां तें मुळींच पटेना! नागपुराकडे काळ्यापाण्यावर पाठविल्याप्रमाणें सुंदरनें जावें—आणि तेंहि सीताबाई आपल्या आसपास कोणचा बंगला त्यांच्याकरतां ठरवावा या गहन विचारांत असतां—हा विचार त्यांनां अत्यंत खेदजनक झाला. त्या म्हणाल्या "हें काय बाई भलतंच करणं भाऊचं! त्या फडकीणबाईशीं कोण गट्टी आहे माझ्या सुंदरची! तिच्यापासून सुंदरची ताडातोड करण्यांत काय पुरुषार्थ वाटला त्याला कुणाला ठाऊक? पण या साऱ्यांनां तिच्या उलट जाण्यांत मोठा आनंदच होतो जसा!"

सुंदरनें मामांच्यामार्फत जी विनवणी केली होती—अलबत ती विनवणीच म्हटली पाहिजे—कीं, नागपुरास जाण्याच्या आधीं एकदां आपल्याला घरीं येऊं द्यावें, ती विनवणी आनंदरावांनीं एकदम साफ नाकारून टाकली. परंतु अंमळशानें शांतातारांनीं वडिलांजवळ आपल्या बहिणीतर्फे इतकी रदबदली केली, व तीहि इतक्या शहाणपणानें व तालामाला पाहून जपूनजपून केली, कीं, लग्न झाल्यानंतर एकवार त्या नवरानवरीनें शांतिसदनांत येऊन एकदोन दिवस रहावें हें आनंदरावांनीं अत्यंत नाखुषीनें कां होईना—पण अखेर मोठ्या मिनतवारीनें कबूल केलें. म्हणून आपल्या नूतनपरिणीत कन्येला बरोबर घेऊन गांवांतून निरनिराळ्या स्नेह्यांच्या घरीं मोठ्या कौतुकानें हिंडत रहाण्याची सीताबाईची इच्छा तृप्त होण्याची संधि त्यांनां मिळण्याची आशा दृढ झाली. त्याप्रमाणें आनंदरावांनीं पत्रहि लिहिलें, व लग्न लागल्याबरोबर दुसऱ्याच दिवशीं हें नवें जोडपें शिवदुर्गास येण्याचें ठरलें. तरी पण, सुंदरची इच्छा जरी ताराबाईला सरळ वाटली, तरी नागेशराव पुनः शांतिसदनांत तोंड दाखविण्यास कबूल कसे व्हावेत, याचें ताराबाईला अतोनात आश्चर्य वाटूं लागलें. स्वतःच्या दृष्टीनें पाहिलं, तर नागेशराव पुनः आपल्या नजरेला देखील पडूं नयेत, असें ताराबाईला स्पष्ट वाटत होतें!

## प्रकरण एकावन्नावें.

### दोघेंहि निर्लज्जच !

मुंबईत सुंदरच्या लग्नाचा दिवस उगवला. सीताबाईच्या मनांत कितीतरी लग्नाला मुंबईला जाण्याचें होतें, पण वसंतरावांनीं तुम्ही कोणीहि येऊं नका असें पुनः एकदां स्पष्ट लिहिल्यामुळें त्यांचा नाइलाज झाला. त्या दिवशीं प्रत्यक्ष सुंदरलाहि वाटलें नसेल त्यापेक्षां किती तरी जास्त वाईट शांता व ताराबाईला वाटलें. मुंबईत लग्नाला काय, सर्व तऱ्हेच्या सोयी जय्यत तयार असतात. एका सकाळपासून दुपारीं बारा वाजेपर्यंत सर्व विधि आटपले. गुजराथी लोकांच्या मोठमोठाल्या महाजनवाड्या असतात, त्यांत सर्व भांडींकुंडीं वगैरे आयती तयारी असते. वसंतरावांची व्यापारी लोकांत विशेष वग, त्यामुळें त्यांनीं गोष्ट काढण्याचा अवकाश, सर्व तयारी परस्पर त्यांच्या एका व्यापारी स्नेह्यानें केली. वसंतराव, शारदाबाई व सुंदर अशीं सकाळीं आठ वाजतां तेथें गेलीं. नागेशरावहि लगेच तेथें आले. सकाळीं दहा घटकेचा मुहूर्त होता, त्याला लग्न लागून बाराला जेवणखाण पंचवीस ब्राह्मणांचें होऊन, चार वाजतां मंडळी घरीं परत सुद्धां आली. रात्रींच्या गाडीनें निघून पहांटे शिवदुर्गाच्या स्टेशनवर नवरानवरी येऊन दाखल सुद्धां झालीं. घरची गाडी त्यांनां आणायला, स्टेशनावर गेली होती. त्यांच्या येण्याची शांतातारांनां—विशेषेंकरून शांताबाईला कितीतरी हुरहुर लागून राहिली होती. शांताबाईच्या स्वतःच्या हातून असा सुंदरसारखा मूर्खपणा झाला असता, आणि मग मामांच्या परिश्रमानें एकदांचें तिचें लग्न लागलें असतें, तर ती लज्जेनें जशी अर्धमेली झाली असती, तशीच स्थिति सुंदरची खास झालेली असेल, असें शांताबाई मनांत समजत होती. ह्मणून सुंदर किती उतरून गेली असेल, किती ओशाळी झाली असेल, ही कल्पना मनांत आणून शांताबाई अत्यंत खिन्न झाली होती.

गाडीचीं चाकें दुरून ऐकूं येतांच सर्व मंडळी दिवाणखान्यांत जमून राहिली. गाडी दाराशीं उभी राहिल्याबरोबर सीताबाईच्या चेहऱ्यावर संतोषदर्शक स्मित झळकूं लागलें. आनंदराव अत्यंत गंभीर मुद्रा करून खुर्चीवर बसून राहिले. चौघी मुली मात्र अस्वस्थ, लज्जित व खिन्न अशा होऊन उभ्या होत्या.

सुंदरचा शब्द ओटविरूनच खणखणीत ऐकूं येऊं लागला, व ती झटकन् दार उघडून दिवाणखान्यांत शिरली. सीताबाई झटकन् पुढें झाल्या, त्यांनीं

तिला प्रेमानें आपल्या बाहूंनीं मिठी मारली, व "या तुह्मी सुंद्राबाई गोडबोल्या!" असें कौतुकानें तिचें स्वागत केलें. मागून लगेच नागेशराव आंत आले. त्यांनीं सासूबाईंनां नमस्कार केला, व सासुबाईंनींहि अत्यंत प्रेमपूर्वक त्यांनां आशीर्वाद दिला. नागेशरावांच्या अथवा सुंदरच्या चेहऱ्यावर यत्किंचित्‌हि ओशाळी दिसत नसून, जणूं काय आज आपण मोठी बहादुरी करून आल्याची झांक दोघांच्याहि मुद्रेवर दिसत होती.

नंतर दोघेंहि आनंदरावांकडे वळलीं; पण त्यांची चर्या जास्तच गंभीर व हुप्प झालेली दिसली. त्या दोघांचा नैसर्गिक बेश्रमपणा पाहून त्यांनां चीडच येऊन गेली. ताराबाईला तर अगदीं असल्या वर्तुणुकीचा तिट्कारा आला, व शांताबाईलाहि तें फार विपरीत वाटलें. इतके सारे धिंडवडे होऊनहि सुंदर अजून पूर्ववत् खमंग आहे, तिला लाज नाहीं, माणूसकी नाहीं, व्यवस्थितपणा नाहीं, भीति नाहीं, कीं कशाचाहि पोंच नाहीं, अशीच ती अजूनहि आहेसें दिसलें. तिनें प्रत्येक बहिणीकडे वळून "कसं छान झालं ना, माझं लग्न झालं तें !" असें प्रत्येकीला आवर्जून विचारलें. नंतर इकडे तिकडे पाहून एकदम हंसून म्हणाली "वा, हें कपाट आतां या भिंतीशीं ठेवलंत होय ! तेंहि बरंच दिसतं आहे. मला जाऊन कांही फार दिवस नाहीं झाले, पण एवढ्यांत बराच फरक झालेला दिसतो आहे ! "

नागेशरावांचीहि बहुतेक तीच तऱ्हा होती. त्यांनांहि यत्किंचित् किंतु मनांत असेलसें दिसलें नाहीं. पण त्यांची बोलण्यासंवरण्याची नेहमींचीच अशी ऐटदार ढब होती, कीं, ते कांहीं जरी बोलते तरी तें मोहकच झालें असतें. इतका बेश्रमपणा त्यांच्यांत असेल अशी ताराबाईचीहि पूर्वीं कधीं कल्पना झाली नव्हती. पण आतां तिनें ओळखून काढलें, कीं, बेश्रम माणसाच्या बेश्रमपणाला कुठें तरी हद्द असेल, ही आपली समजूतच चुकीची! शातातारांचीं तोंडें लज्जेनें गोरीमोरीं झालीं, पण ज्यांच्या वर्तनाकारितां त्यांनां एवढी लज्जा वाटत होती, तीं दोघें खुशाल चैनींत दिसत होतीं !

आज बोलण्याला विषय थोडाच कमती होता ! सुंदर व सीताबाई यांनां तर किती बोलूं असें होऊन गेलें होतें. नागेशराव बसले ती खुर्ची ताराबाईच्या जवळ होती, म्हणून ते तिच्याशीं शिवदुर्गांतल्या त्यांच्या ओळखीच्या मंडळी-विषयीं इतके सहजलीलेनें भाषण करूं लागले, कीं, तो सहजपणा आपल्या उत्तरांत आणणें अशक्य आहे असें ताराबाईला वाटलें. दोघां नवराबायकोंचीहि

स्मरणशक्ति मोठी सुखदायक असावी, असें दिसूं लागलें. कोणच्याहि गत-गोष्टीची आठवण होऊन त्यांनां दुःख होत असल्याचें दृष्टोत्पत्तीला येईना. सुंदर तर आपण होऊन खुशाल असल्याहि गोष्टी सहज काढी, कीं, त्या गोष्टींचें नांवहि काढण्याची शांताताराबाईची कधींहि छाती झाली नसती ! सुंदर मध्येंच म्हणाली "मला जाऊन सबंध तीन महिने झालेना, पण पहा जशी काय मी आठपंधरा दिवसांमागेंच गेलेंसं मला वाटतं आहे. अन् तसंच म्हटलं तर किती तरी गोष्टी दरम्यान घडून गेल्या. अरे बापरे, मी इथनं गेलें तेव्हां माझ्या स्वप्नांतसुद्धां कधीं विचार नव्हता आला, कीं,मी पुनः इथें येईन तेव्हां लगीन झालेली अशी येईन असं ! बाकी तसं कांहीं झालं तर मोठीच जंमत होईल, असं मात्र मला कधींकधीं मनांत वाटत असे हो!"

आनंदरावांनीं आश्चर्यानें भिवया वर उचलल्या, शांताबाई तर अत्यंत ओशाळली, ताराबाई रागावून सुंदरकडे निरखून पाहूं लागली. परंतु आपणाला नको असेल तें कधींहि सुंदरला दिसत नसे वा ऐकूंहि येत नसे. सुंदर तशीच ऐटीनें पुढें बोलली "आई, या गांवांतल्या लोकांनां माझं काल लगीन झालं तें माहीत आहे का ग ? मला नाहीं वाटत तें माहीत असेलसं ! आतां वाटेनं ते रामभाऊ तेलसंगकर छकड्यांत बसून चालले होते, त्यांनां म्हटलं तें कळवावं, म्हणून गाडीची खिडकी उघडून मीं आपला हात जरासा बाहेर सोडला, कीं, त्यानं लगीनचुडा माझ्या हातांतला स्पष्ट पहावा. पण तो काय भ्रमिष्ट ! तेव्हां मग मोठ्यानं हांक मारून हात हालवीत मीं त्याला म्हटलं 'का रामभाऊ, ठीक आहांतना ? मळ्याला चाललां वाटतं ?' तेव्हां कुठें त्यानं लगीनचुडा पाह्यला, अन् मग मात्र हंसूं लागला ! "

ताराबाईला तर हा बाष्कळपणा ऐकून डोक्यांत तिडीकच उठली. तिच्यानें आतां तेथें स्वस्थ बसवेना, म्हणून ती उठून आपल्या खोलींत जाऊन बसली, ती सर्व मंडळी जेवणाच्या खोलींत जायला निघाल्याचें ऐकूं येईपर्यंत खालीं आलीच नाहीं. मंडळी आंत जाऊन आपआपल्या पानांवर बसत होती. सीताबाईंच्या खालच्या पानावर नेहमींप्रमाणें शांताबाई बसणार, इतक्यांत सुंदर पुढें होऊन हंसत म्हणाली "अं हं,आक्का,आतां आपला नंबर आमच्याखालींच बरं का ! आईच्याजवळ बसण्याचा मान आतां आमचा आहे म्हटलं ! "

शांता बिचारी कांहीं न बोलतां एक पान खालीं बसली !

जेवणावरहि असाच प्रकार बराच झाला. सुंदरला तारतम्य कधीं येणारच नाहीं असें स्पष्ट होत चाललें. रमामावशी, रावबहादुरांची मंडळी व दुसरी परिचित मंडळी आपणाला भेटायला कशी आली नाहींत, याचेंच तिला आश्चर्य वाटत होतें. तें तिनें स्पष्ट बोलूनच दाखविलें. जेवण संपल्यावर मागीलदारीं आंचवायला ती गेली, तेव्हां दाजीबा, हरणी व इतर नोकरांनां ती मोठ्या कौतुकानें आपला लगीनचुडा दाखवून आली.

पानसुपारी चालली असतां सुंदर आईला म्हणाली "कां आईसाहेब, कशी आहे आमची स्वारी ? आहेत कीं नाहीं अगदीं ऐटदार ? या माझ्या बहिणींनां माझा मोठा मत्सर होत असेल ! मी म्हणतें, माझ्या निम्म्यानं तरी यांनां नवरे मिळोत म्हणजे मोठं भाग्य त्यांचं ! तें नाहींच ! त्याला मुळीं नगरालाच जावं लागतं ! उत्तम नवरे हवे तर तिथें जावं ! आपण सारींच गेलों नाहींग, आई, नाहीं तर यांनांहि नसते का मिळाले ! "

सीताबाई कौतुकानें म्हणाल्या "खरंच गडे ! मी तर तसं म्हणतसुद्धां होतें. तें असो म्हणा आतां. पण सुंदर, इतकं लांब नागपुराकडे तुम्हांला गेलंच का पाहिजे ? "

सुंदर म्हणाली " होय बाई, तें तर आलंच आमच्या वांट्याला ! पण तें कांहीं वाईट नाहीं. मला तर दूर जाणं भारी आवडतं. तुम्ही सारीं आम्हांला कधीं कधीं भेटायला येत जा, म्हणजे झालं. आम्ही चार महिने कुचनैगडासच रहाणार आहों. तिथें अलबत राजवाड्यांत वगैरे इव्हिनिंग पार्ट्या रगड होतील. तुम्ही सारीं आलांत तर मौज होईल ! "

सीताबाई उद्गारल्या " वा, काय पण ती मौज होईल ! मलासुद्धां हा विचार आवडतो. "

सुंदर हंसून म्हणाली "अन् तुम्ही इकडे परत यायला लागलां, म्हणजे यांतल्या एकदोघी बहिणींनां मजपाशीं ठेवून जा. पहा बरं, दोनतीन महिन्यांत मी त्यांनां फक्कड नवरे गाठून देतें कीं नाहीं तें !"

तारा उपाहासाच्या स्वरानें म्हणाली "आमच्यावरच्या या आपल्या मेहेर-नजरेबद्दल सुंद्राबाई, मी आपले फार आभार मानतें ! पण नवरा मिळवायची आपली पद्धत आम्हांला विशेषशी पसंत आहे असं नाहीं ! "

## दोघेंहि निर्लज्जच!

पण हा टोमणा तिनें ऐकला कीं नाहीं कोण जाणे! असो. नंतर मंडळी आपापल्या ठिकाणीं गेली. नागेशराव व सुंदर आठ दिवस राहून कुचनैगडाला जाण्याला निघायचे होते. फक्त सीताबाईनां मात्र हे दिवस थोडे वाटले, म्हणून त्यांनीं होतां होईल तितका त्या दिवसांचा उपयोग करून घेण्याचा निश्चय केला. रोज कोणीना कोणी मंडळी घरीं जेवायला त्या बोलवीत, व सकाळ संध्याकाळ त्या सुंदरला घेऊन गाडींत हिंडत. तिला आपले कपडेलत्ते व दागदागिने घालायला देऊन चांगली सजवीत, तेव्हां ती खरोखरीच सुंदर दिसे. पण मायलेंकी निघून गेल्या म्हणजे जें तें त्यांनां हंसत राही, त्याची त्या दोघींनांहि कल्पना नसे.

ताराबाईची कल्पना होती त्याच प्रकारचें प्रेम नागेशरावांचें आपल्या बायकोवर होतें; तिचें मात्र त्यांच्यावर ओतप्रोत दिसे. ती त्यांच्याबरोबर गेली त्यांत मुख्य इच्छा तिचीच असावी. पण तिच्यावर जर त्यांचें प्रेम नव्हतें, तर त्यांनीं तरी तिच्याबरोबर कां जावें? या प्रश्नाचें उत्तर तिनें असें ठरविलें, कीं, कर्जाचा बुजबुजाट फार झाल्यामुळें एवींतेवीं त्यांनां पळायला हवेंच असेल, व तसें असलें तर एकट्यानें जाण्यापेक्षां वाटेंत मनरंजनाला जर ही आयती येते आहे, तर उगाच नाहीं तरी तिला कशाला म्हणा? आपल्या थोड्याशा फायद्याकरितां दुसऱ्याचें जन्माचेंहि नुकसान करण्यास कांकूं करणारे असे नागेशराव थोडेच होते? तिच्या दृष्टीनें मात्र आपला नवरा म्हणजे अगदीं परब्रह्म. घडोघडीं त्याची वाखाणणी व कौतुक ती करीत असे. आपण अगदीं नवरत्नांचा हारच मिळवला असें ती जणूं काय समजे.

एके दिवशीं सकाळीं सुंदर दोघी थारल्या बहिणींजवळ बसली असतां ती ताराबाईला ह्मणाली "मी आपल्या लग्नाची मौज, तारा, तुला नाहीं अजून कधीं सांगितली. बाकीच्यांनां ती इत्थंभूत मीं सांगितली तेव्हां तूं नव्हतीस तिथें. तुला नाहीं का तें सारं ऐकावंसं वाटत?"

ताराबाई ह्मणाली "छे, मुळींच नाहीं. मी तर म्हणतें त्या गोष्टी आतां न बोललेल्याच बऱ्या!"

सुंदर हंसत ह्मणाली "वा! मोठी विलक्षणच आहेस तूं! पण मी सांगतें तें सारं एकदां ऐक तर खरी. आमचं लग्न मुळीं मामींच्या घरीं झालंच नाहीं. गुजराथ्यांची महाजनवाडी भुलेश्वरावर आहे तिथें लागलं. मीन् मामामामी अशीं सकाळीं आठ वाजतां तिथें जायचीं ठरवलं होतं. सकाळीं रोजच्यासारखीं

उठलों, चहापाणी झालं, जसं कांहीं लगीन आज नव्हतचं व्हायचं. लगीनघराची गडबड बिडबड मुळीं नाहींच कांहीं. साडेसाताला गाडीसुद्धां दाराशीं आली. तितक्यांत ते मामांच्याकडे एक घेलाशेट सॉलिसिटर येत असत ते बाई अकस्मात् आले. ते आले कीं मामान् ते तासभर बोलत रहात असत. मीं ह्मटलं हा आला खो! पण नाहीं बाई, एका दहा मिनिटांत ते गेले. मला असं झालं होतं, कीं, केव्हां मी एकदां लगीनघरीं जाऊन सगळी मजा पहातें. मामा खोलींत बोलत होते, तों वर मामी तर काय एकसारख्या मोठं गंभीर तोंड करून मला एक भलं मोठं लेक्चरच देत होत्या जशा ! पण मीं दहांतला एक तरी शब्द लक्षांत घेतला असेल तर शपथ ! माझ्या डोळ्यांसमोर एकसारखे लग्नाचे सोहाळे दिसूं लागले होते. मामामामींनां मात्र त्यांत मोठंसं कांहीं वाटत नव्हतं, असं स्पष्ट दिसत होतं. पहा, इतके दिवस मी मुंबईंत त्यांच्या घरीं होतेंना, पण कधीं घराबाहेर पडणं नाहीं कीं कांहीं नाहीं. ह्मटलं नाटकाला नेतील, समुद्रावर फिरायला जाऊं, पण छे, रामाचं नांव ! भारीच चिक्कू माणसं हो ! पैशाकरितां जसा जीव टाकतात अगदीं. इतक्या दिवसांत मामीसुद्धां कधीं घरांतून बाहेर पडली नाहीं! मोठी जबरी म्हणायची ती बाई ! तें असो ह्मणा, काय सांगत होतें बरं ? हो! एकदांचीं आम्ही गाडींतून निघालों अन् लगीन-घरीं जाऊन पोंचलों. उतरल्याबरोबर मामा भय्यासाहेबांशीं कायसं बोलायला गेले आणि आह्मी–"

"कोणाशीं ?" ताराबाई अत्यंत आश्चर्यानें मध्येंच उद्गारली !

सुंदर म्हणाली " हो, भय्यासाहेबांशीं. ते तिथें यायचे आधींच ठरलेलं होतं–पण–अगबाई, मी काय हें बोलून गेलें ! भय्यासाहेबांचं नांव अगदीं गुपित ठेवायचं, असं मला साऱ्यांनीं अनेक वेळां बजावलं होतं. अन् मींहि अगदीं शप्पथ घेतली होती नाहीं बोलणार म्हणून ! "

शांताबाई म्हणाली " मग आतां आणखी शपथ मोडूं नकोस. मी कांहीं मुळींच जास्ती विचारीत नाहीं आतां तुला. "

ताराबाईहि म्हणाली " हो हो अलबत् ! आम्ही नाहींच विचारणार."

हें बोलतांना ताराबाई आपली जिज्ञासा किती तरी प्रयत्नानें दाबून ठेवीत होती. तितक्यांत सुंदर म्हणाली " तें तर चांगलंच ! कारण जर तुम्हीं विचारलंत, तर मी सारं बोलून जाईन, अन् मग ते माझ्यावर रागावतील भारी. "

इतकें उत्तेजन असल्यावर ताराबाईच्या अगदीं जिभेवर शब्द यायला लागले, पण तो मोह टाळण्याकरितां ती मुळीं तेथून निघूनच चालती झाली.

पण असल्या गोष्टीविषयीं अजाण राहणें ताराबाईला केवळ अशक्य होतें. अर्थात् माहिती काढण्याची खटपट करणें तरी निदान अत्यंत जरूर होतें. नागेशरावांच्या लग्नाला भय्यासाहेब आले होते ? आणि तें लग्न मुंबईत वाणगट घेलाशेटांच्या धर्मशाळेंत कसें तरी उरकून जात असतांना ? हा प्रकार केवळ अतर्क्य, केवळ अविश्वसनीय ! पण सुंदर तर स्पष्ट दोनदां तसें म्हणाली. असें काय बरें कारण असावें, कीं, असल्या चमत्कारिक प्रसंगीं व विलक्षण परिस्थितींत भय्यासाहेब जाऊन मिसळावेत ? तिनें नानाप्रकारचे तर्क लढवून पाहिले, पण एकहि जुळेना. जो तर्क तिच्या मनाला पटावा, व भय्यासाहेबांनांहि श्रेयस्कर असा शोभावा, तो तर तिला अत्यंत अशक्य भासूं लागला. कितीक वेळ विचार करून जेव्हां कांहींच तर्क जुळेना, तेव्हां जास्त वेळ दुग्ध्यांत राहणें अशक्य होऊन, तिनें झटकन् कागद घेऊन शारदामामींनां मुंबईस एक पत्र खरडलें. "सुंदरनें बोलतां बोलतां भय्या-साहेबांचें नांव काढलें, व पुढें जीभ चावून तें फार गुपित आहे असें म्हणाली. जर तें तुम्हांला तितकें गुपित नसून आम्हांला सांगणें शक्य असेल, तर भय्यासाहेबांसारखे आमच्या कुटुंबाशीं संबंध नसलेले गृहस्थ असल्या ठिकाणीं कां यावे, तें समजण्याची मला किती भयंकर जिज्ञासा झाली असेल, त्याची तुम्हाला सहजच कल्पना होईल. सबब होईल तितक्या जलद या पत्राचें उत्तर लिहून आमची जिज्ञासा तृप्त करावी. सुंदरप्रमाणें आपणहि शपथ घेतली असली, किंवा गुप्त ठेवण्याचें कोणाला वचन दिलें असलें, तर तसें ल्याहावें, म्हणजे मी नाइलाजानें अज्ञानांत समाधान मानून घेण्याचा प्रयत्न करीन."

हें पत्र पाकिटांत घालतां घालतां ताराबाई आपल्या स्वतःशीं म्हणाली "तें पाहूं म्हणा. मी कसली तशी स्वस्थ राहतें ! आपण खूप समजा मामीसाहेब, कीं, आपण सरळ रीतीनं जर तें मला नाहीं सांगितलेंत, तर युक्तिप्रयुक्ति लढवण्यालासुद्धां मी मागें घ्यायची नाहीं. वाटेल तें करीन, पण सारं समजून येईन !"

शांताबाईनेंहि त्याविषयीं ताराबाईजवळ पुनः कधीं गोष्ट काढली नाहीं. तें एकप्रकारें तिला चांगलेंच वाटलें. मामींच्याकडून आपणाला बरोबर उत्तर

येतें कीं नाहीं हें समजेपर्यंत, आपण असें मामींनां पत्रानें विचारिलें आहे,ही गोष्ट तरी आपल्याशिवाय दुसऱ्याला कशाला उगाच कळवा ?

---

## प्रकरण बावन्नावें.

### शारदामामींचें पत्र.

मामींनां लिहिलेल्या पत्राचें उत्तर अत्यंत लवकर म्हणजे कोणच्या दिवशीं हातीं येईल, याचा ताराबाईनें हिशोब करून नक्की वेळ ठरवून ठेवली होती. आणि खरोखरच अगदीं त्यावेळीं मामींकडून पत्राचें उत्तर येऊन ताराबाईच्या हातीं पडलें, पाकीट तर वरून चांगलें जाडेंजुडें लागत होतें, तेंव्हां मामी-साहेबांनीं "मला ती गोष्ट तुला सांगणें शक्य नाहीं" असलें केवळ नकारार्थी उत्तर दिलें नाहीं हें उघड झालें. म्हणून पत्र हातीं येतांच, तें वाचीत असतांना मध्येंच कांहीं अडथळा येऊं नये, म्हणून ताराबाई बागेच्या एका दूरच्या कोंपऱ्यांत जाऊन बांकावर बसून, अत्यंत उत्सुकतेनें तें पत्र निवांत-पणीं वाचूं लागली. तें पत्र येणेंप्रमाणें:—

"श्री. १२० कांदेवाडी, मुंबई १६ फेब्रुवारी—

चि. कुमारी ताराबाई नगरकर, प्रेमपूर्वक अनेक आशीर्वाद वि. वि.—

आम्ही सर्व खुशाल आहोंत. तुझें ता. १५ चें छोटें पत्र आत्तां सकाळींच पावलें व त्याचा जबाब लिहिण्याला मीहि लागलीच बसलें आहें, व दोन तास खर्च करून ताबडतोब पाठवीन म्हणतें आहें; कारण मला जें काय ल्याहायचें आहे, तें थोडक्यांत लिहून भागायचें नाहीं हें उघड आहे.

तारा, तुझ्याकडून आजच्यासारखा प्रश्न येईल ही आमची कधींहि कल्पना नव्हती. म्हणून आजचें तुझें पत्र वाचून आम्हांला अतिशय आश्चर्य वाटलें. ही असली चौकशी आमच्यापाशीं करण्याइतकी तुला जरूर पडेल, असें आम्हांला मुळींच वाटलें नव्हतें. मला तुझ्या चौकशीचा राग आला असें नव्हे; माझा काय हेतु हें लिहिण्याचा आहे तो जर तुला उमजला नसेल, तर निदान माझ्यावर रागावूं तरी नकोस. माझ्याप्रमाणेंच त्यांनांहि आज तुझें पत्र पाहून अतिशय आश्चर्य वाटलें. इतकेंच नव्हे, त्यांनीं जी काय व्यवस्था कबूल केली, ती तुझा या कामांत रगडसा संबंध असावा अशा पक्क्या समजुतीवरच केवळ त्यांनीं कबूल केली, नाहींतर कधींहि केली नसती.

पण तूं आतां म्हणतेस तसें खरोखरच जर तुला यांतलें कांहीं एक माहिती नाहीं, आणि तुझा यांत खरोखरच जर कांहीं संबंध आलेला नसेल, तर मला तरी एकदां इत्थंभूत प्रकार कसा काय घडून आला तें एकदांचें तुला कळवून टाकलें पाहिजे.

तर मग आतां जास्त प्रस्तावना करीत नाहीं. मी ज्या दिवशीं संध्याकाळीं मुंबईस घरीं आलें,त्याच दिवशीं तुझ्या मामांनां भेटायला,अगदीं कल्पना होणार नाहीं असे गृहस्थ अकस्मात् सकाळीं आठ वाजतां आले,ते भय्यासाहेब होते,व ते दोन तास त्यांच्याशीं बोलत राह्यले. अर्थात्च मी संध्याकाळीं आलें त्यामुळें मला हें एकदम समजलें नाहीं, व मला त्यामुळें चौकशी करण्याचें कारणहि पडलें नाहीं. पण रात्रीं घरीं तुझे मामा आल्यावर मला सगळी हकीगत कळली. ती अशीः—भय्यासाहेबांनीं सांगितलें,कीं, नागेशराव—अथवा त्यांच्या शब्दानें बोलायचें तर नागोपंत—व सुंद्री यांनां त्यांनीं मुंबईत हुडकून काढलें असून ते त्या दोघांनां भेटूनहि आले होते. ते स्वतः कायसे आपण सारीं चटणीहून निघालों त्याच्या दुसऱ्याच दिवशीं, दिलबहाराहून निघून नागोपंताला हुडकण्याच्या उद्देशानें एकदम मुंबईस आले. असें करण्याचा हेतु त्यांनीं तुझ्या मामांनां असा सांगितला,कीं, नागोपंताची खरी किंमत आपण स्वतः शिवदुर्गामध्यें असतांना तेथल्या मंडळींनां कळवली नाहीं,व त्यामुळेंच आनंदरावांसारख्या कुळशीळवान व अब्रूदार घराण्यांत त्यांचा प्रवेश होऊं शकला; व तसा प्रवेश झालेला आपण पहात असूनहि आपण स्पष्टपणें तोंड उघडणें जरूर असतां तसें केलें नाहीं, व त्यामुळेंच आज त्या घराण्यांतल्या माणसांवर आजचें संकट प्राप्त होणें शक्य झालें. तेव्हां हा असा भयंकर प्रसंग गुदरण्याला मुख्य कारण आपण स्वतः असें भय्यासाहेबांनां वाटून, आपल्या हातानें उत्पन्न झालेलें संकट निस्तरण्याचीहि जबाबदारी आपणावर अतिशय येते.व त्या जबाबदारींतून मोकळें होण्याकरितां म्हणून त्यांनीं मुंबईत येऊन ही सर्व खटपट चालविली आहे, असें त्यांनीं पुनः पुनः आवर्जून सांगितलें. ( यापेक्षां मनांतला दुसरा कांहीं गुप्त हेतु असला, तर तो त्यांनीं मुळींच बोलून दाखवला नाहीं. मग तो आम्हांला कसा कळावा ? पण तसा कांहीं दुसरा हेतु असला, तरी तोहि अर्थात्च या वर लिहिलेल्या हेतूसारखाच थोरपणाचा असला पाहिजे !)

हेतु कांहींहि असो; एवढी गोष्ट खरी, कीं, ते तडक आपल्या मागोमाग मुंबईला आले. त्यांनांहि एकदम तलास लागेना. मागें कधीं त्यांच्या बहिणी-

कारितां एक गवर्नेस त्यांनीं ठेवली होती, पण पुढें कांहीं कारणानें त्यांनीं तिला काढून टाकली होती—कां तें कोणाला ठाऊक ? असेल कांहीं तरी पण तिनें कायसें अलीकडे ग्रँटरोड स्टेशनजवळ एक बरेंचसें मोठें भोजन—वसतिगृह काढलें आहे. तिची आणि नागोपंताची बरीच ओळख होती. म्हणून मुंबईत आल्याबरोबर त्यांनीं तिच्याकडे जाऊन तपास केला. दोनतीन दिवस तिनें कांहीं दाद लागूं दिली नाहीं. पण अखेर जरा कांहीं जरब व कांहीं लालूच दाखवितांच ती वळली; मग तिनें कबूल केलें, कीं, नागेशरावांनीं एक तरुण मुलगी आणून प्रथम तिच्या वसतिगृहांत एक दिवस वस्ती केली होती खरी. पण अलीकडे त्यानंतर ते दुसरीकडे परळास एका चाळींत गाळा घेऊन राहिले आहेत. तोहि चाळीचा पत्ता तिच्यापासून मिळवून भय्यासाहेब तिकडे जाण्याला निघाले असतां, त्यांची इतकी अत्यंत उत्कंठा पाहून तिनें त्यांनां पुनः थांबवून धरिलें, व आणखी रक्कम मिळण्याची ही संधि पाहून तिनें त्यांनां सांगितलें, कीं, इतक्या दूर परळावर आगगाडीनें न जातां येथल्या येथें मी तुमचें काम पाहिजे तर करीन. भय्यासाहेबांनां तेंच पाहिजे होतें. त्यांनीं तिची मूठ सुवर्णमंत्रानें भारल्यावर तिनें सांगितलें, कीं, “ती मुलगी हल्लीं आमच्याच या गृहांत आहे. अतिशय वस्ताद पोरगी आहे ती. मी आज आठ दिवस तिला पहातें आहें, पण ती मोठी खंबीर आहे. ती फसली असेल अशी तुम्हाला यत्किंचित् काळजी नको आहे.” अर्थात्च भय्यासाहेब एकदम त्या बाईबरोबर सुंद्रीच्या खोलींत गेले. सुंद्री पहिल्यानें अगदीं ओशाळी झाली. भय्यासाहेबांनीं “तूं हें केवढें वेड्यासारखें कृत्य केलें आहेस! यापासून तुझ्या घराण्याला केवढा काळिमा लागणारा आहे हें तुझ्या कसें लक्षांत येत नाहीं ? मुंबईत तुझी मामामामी आहेत त्यांच्याकडे मी रदबदली करून तुझी तरतूद लावतों ” वगैरे पुष्कळ समजूत केली.

पण सुंद्री कुठें कबूल होती ? तिनें भय्यासाहेबांनां साफ सांगितलें, कीं, “ मला तुमची मुळींच मदत नको, आणि मामांशीं रदबदली करण्याचीहि जरूर नाहीं. नागेशरावांनीं माझ्याशीं लग्न करण्याचें मला वचन दिलें आहे तें ते कधींहि मोडणार नाहींत. त्यांनीं बाबांनांसुद्धां तार दिली आहे पुण्याहून, पण सध्यां पौषांत लग्नेंच लागत नाहींत ह्मणून त्यांचा नाइलाज आहे. मी जी एकदां लग्नाकरितां ह्मणून घराबाहेर पडलें आहें ती लग्न लागल्याखेरीज घरीं परत जाणार नाहीं. एवढा पौषाचा महिना संपतांच पहिल्या मुहूर्तावर लग्न

खास होईल." हा तिचा विश्वास पाहून भय्यासाहेबांनां तिची कींव आली व त्यांनीं तिचे डोळे उघडण्याचा हरप्रयत्न केला. पण तिचा विश्वास अढळ होता. ती ह्मणाली "माझ्याबद्दल कोणालाहि अगदीं काळजी वाटूं नका देऊं ! माझी मी अगदीं प्रथमपासूनच सावध आहें. मी यत्किंचित्‌हि फसलें नाहीं आहें. माझें कुळशीळ ओळखून मी अगदीं खंबीरपणानें वागतें आहें. मी आजपर्यंत अगदीं धुतल्या तांदुळासारखी शुद्ध आणि स्वच्छ आहे, आणि अगदीं तश्शीच राहीन." भय्यासाहेबांनीं चार लोकांचा किती गैरसमज होईल त्याची तिला समजूत घालण्याचा प्रयत्न केला; पण ती ह्मणाली "माझें मन जोंवर मला खात्री देतें आहे, तोंवर मी लोकांच्या बडबडीची बिलकूल पर्वा करीत नाहीं. याच बाईनां विचारा मी कशी सावधपणानें राहात आहें ती !"

झालें ! आतां काय करावें हा भय्यासाहेबांनां मोठा विचार पडला, आणि नागोपंतांशीं तिचें लवकर लग्न लागेल असें करण्यापलीकडे दुसरी तोड दिसेना! ह्मणून परळास जाऊन त्यांनां त्यांनीं गांठलें. पण त्यांच्या मनांत लग्नाची गोष्ट मुळींच नव्हती. "कर्जाचा सुळसुळाट अत्यंत त्रास देऊं लागला ह्मणून मीं नगराहून पाय काढला, ती पोरगी माझ्यामागें आली ह्मणून मी बरोबर आणली. नाहींतर मला काय जरूर होती ?" असें ते ह्मणूं लागले. त्यांनीं जणूं काय आपली तिच्याशीं मुळींच ओळखदेख नाहीं असें केलें. "रिसाला तर सोडलात, आतां पुढें काय करणार" ह्मणून विचारतां तेंहि अजून नक्की असें कांहीं नाहीं, असेंहि ते म्हणाले. 'कांहीं तरी केलें पाहिजे खरें, पण काय तें अजून मुळींच कल्पनेंतहि नाहीं, पण आतां लवकर जर केलें नाहीं तर मोठी अडचणच आहे, असेंहि ते म्हणाले. त्यावरून भय्यासाहेबांनीं सांगितलें "तर मग सुंदरशीं लग्न तरी करा. म्हणजे, आनंदराव जरी फारसे श्रीमंत नाहींत, तरी कांहीं तरी चांगलीशी रकम आज देतील. शिवाय कुठें तरी वशिला लावून एकादी नोकरी तरी सोईस्कर लावून देतील, असा एकंदर तुमचा फायदा होईल." पण नुसत्या गुळचट बोलण्याला ते का बधतात ? त्यांनीं स्पष्ट सांगितलें, कीं, "आतां माझी भिस्त सगळी काय ती एकाद्या श्रीमंताच्या मुलीशीं लग्न लावतां येण्यावर आहे, ती संधि मी असल्या निष्कांचन मुलीशीं लग्न करून कां घालवीन ?" हें सर्व ते म्हणत होते खरे, पण पैशाची अत्यंत टंचाई असल्यामुळें काम थोडेंसें बोटचेपें झाल्यासारखें भय्यासाहेबांनां वाटलें. त्यावर भय्यासाहेबांनीं अगदीं त्यांचा पिच्छाच घेऊन

एकदांचें त्यांनां ताळ्यावर आणलें, व ते लग्न करण्यास कबूल झाले. अथात् त्यांची पहिली मागणी भलतीकडेच होती, पण अखेर त्यांच्या डोळ्यांत अंजन पडून स्वारी जेमतेम सरळ रस्त्यावर येऊन पोंचली !

हें सारें शिजून झाल्यावर मग भय्यासाहेब तुझ्या मामांच्या शोधाला लागले, व मी मुंबईला यायच्या आदल्या दिवशीं संध्याकाळीं ते प्रथम आमच्या घरीं येऊन गेले. पण तुझे मामा घरीं नव्हते, त्यामुळें गांठ पडली नाहीं. शिवाय, त्यांनां नोकरांनीं सांगितलें, कीं, आनंदराव रात्रीच्या गाडीनें शिवदुर्गास जायला निघायचे आहेत. म्हणून आनंदराव गेल्यानंतरच या गोष्टीचा उपक्रम करणें फार चांगलें असें त्यांनां वाटलें; व अनायासानें ते लगेच जाणारहि होते म्हणून भय्यासाहेब तसेच निघून गेले. त्यांनीं जातांना आपलें नांवगांव सुद्धां गड्याला सांगितलें नव्हतें. असो. दुसऱ्या दिवशीं ते सकाळीं आले तें मीं तुला प्रथम सांगितलेंच आहे. त्या दिवशीं पुष्कळ बोलणें झालें. पुनः दुसऱ्या दिवशीं ते आले तेव्हां मींहि त्यांनां पाह्यलें. याहि दिवशीं रगड भवति न भवति झाली, पण अखेर नीटपणें सर्व ठरलें. त्याबरोबर आम्हीं तुम्हांला एक्सप्रेस तार दिली.

पुढें तुमच्याकडून जबाब आल्यावर जास्त भवति न भवति सुरू झाली. कोणी कांहींहि म्हणो, पण भय्यासाहेब पराकाष्ठेचे हट्टी आहेत खरे. लोक त्यांच्यामध्यें नाना प्रकारचे दोष काढीत असतात, ते कांहीं मला खरे नाहीं वाटत, पण मनस्वी हट्ट मात्र त्यांच्यांत ओतप्रोत भरला आहे, एवढेंच मात्र खरें. जी काय घस सोसायची ठरली, ती सारी मी स्वतः सोशीन. या बोलण्यांत त्यांनीं अखेरपर्यंत बदल करूं दिला नाहीं. आम्हीं जंग जंग पछाडलें, कीं, आम्हीहि सुंद्रीची कोणी आहोंत, आम्हीहि कांहीं संभाळतों, बाकीचें तुम्ही संभाळा. पण छे, रामाचें नांव, त्यांनीं आम्हांला बोलायलासुद्धां सवड दिली नाहीं. कितीक वेळ तरी हाच वाद चालला होता. आम्ही तर सगळी रकम द्यायला तयार होतों (आणि हें मी निवळ तूं आमचे आभार मानावेस ह्मणून लिहीत नाहीं हें उघड दिसेलच ), पण अखेर त्यांनीं आम्हांला एक पैची देखील तोशीस लागूं दिली नाहीं, इतक्या पल्ल्यावर बोलणें आणलें. नागोपंत काय किंवा सुंद्री काय, दोघांच्याहिकरतां त्या दोघां गृहस्थांनीं इतका वाद करीत बसावें अशी त्यांची मुळींच योग्यता नव्हती. पण मुख्य वाद होण्याचें कारण हें, कीं, आम्ही ह्मणत होतों, कीं, तुम्ही जर सगळें

करणार,तर तुमचें नांव आम्ही सगळ्यांनां सांगू;आणि ते ह्मणत, तें कांहीं नाहीं, मी सारें करणार, पण माझें नांव मुळींच कोणालाहि सांगायचें नाहीं. आणि तुझ्या मामांनां नको होतें तें हेंच, कीं, आपण यत्किंचित्‌हि घस न सोसतां बाह्यतः विनाकारण आपला बडेजाव व्हावा, व साऱ्या नगरकरांनीं आपले उपकार उगीचच्या उगीच मानावेत. पण अखेर त्यांच्या हट्टामुळें आह्मी अगदीं हात टेंकले, अन् अगदीं ते म्हणाले तस्सें निमूटपणानें सारें कबूल केलें. ह्मणून तर आज सकाळीं तुझें पत्र आलें, तेव्हां तुझ्या मामांनां फार बरें वाटलें, कीं, आतां या पत्रानें तरी आपल्याला खरी हकीगत सांगून मोकळें व्हायची आयती संधि घरीं चालून आली आहे. ह्मणजे त्यामुळें तरी आपल्या अंगावर भय्यासाहेबांनीं जुलमानें चढवलेलें हें मोहक स्वरूप निघून जाईल, आणि ज्यांचे वास्तविक उपकार अतोनात झाले आहेत, त्यांची योग्य किंमत तरी तुम्हांला समजून येईल. मात्र इतकेंच लक्षांत ठेव, कीं, ही सर्व हकीगत फक्त तुझ्यापाशींच, किंवा फार तर शांताक्कापर्यंतच—ठेव, पुढें जाऊं देण्याची आम्हांला भय्यासाहेबांची परवानगी नाहीं.

आतां त्या दोघांनां काय काय द्यायचें ठरलें तें सांगतें—अथवा काय काय केलें तेंच सांगतें म्हणेनास ! तीन हजारांपर्यंत नागोपंताचें कर्ज होतें तें एकदम फेडलें. शिवाय सुंद्रीला नवऱ्याकडचें स्त्रीधन म्हणून आणखी तीन हजार रुपये दिले. ( शिवाय तुमच्याकडचे दोन हजार स्त्रीधनाचे ते निराळे परस्पर आहेतच. ) आणि शिवाय कुचनैगड संस्थानांत शंभर रुपयांची फौजदारीची नोकरी मिळवून दिली. हें सारें भय्यासाहेबांनीं स्वतः केलें. हें सारें त्यांनीं करण्याचें कारण मी आरंभीं लिहिलेंच आहे. तें हें, कीं, त्यांच्या हलगर्जीपणामुळें आनंदरावांचें घराणें असल्या पेंचांत आलें, सबब तो पेंच सोडवायचा सर्व खर्च त्यांनींच केला पाहिजे. या ह्मणण्यांत कदाचित् कांहीं थोडेंसें सत्य असेल, पण मला नाहीं वाटत त्यांत फारसा अर्थ आहे असें. आणि या सगळ्या वर्तनाचें कांहीं तरी ‘ न्यारेंच कारण’ आहे अशी जर आरूची कल्पना नसती, तर तुझ्या मामांनीं नुसत्या तिऱ्हाइताला इतकी तसदी खास घेऊं दिली नसती. नंतर भय्यासाहेब चार दिवस अवकाश लग्नाला होता ह्मणून दिलबहारला गेले होते. पण पुनः लग्नाच्या दिवशीं खास येईन ह्मणून सांगून गेले हाते. कारण, लग्न झाल्याशिवाय या गोष्टीचा पिच्छा सोडायचा नाहीं असा त्यांचा निश्चय होता.

त्याप्रमाणें ते लग्नाच्या दिवशीं पहांटे पुनः आले. व आम्हीं जों लग्नघरीं जातों तों आमच्या आधीं दारांत उभे होते. लग्न झाल्यावर लगेच त्याच दिवशीं संध्याकाळीं नवरानवरी शिवदुर्गाला गेलीं; पण आह्मीं विनंति केल्यावरून भय्यासाहेब एक दिवस राहून, आमच्या घरीं मुद्दाम जेवायलाहि बोलावलें होतें, तसे आले,व मग परत दिलबहारला गेले.

आणखी एक गोष्ट सांगणार नव्हतें, पण परवां शांताचें पत्र आलें त्यावरून तोच प्रकार तुमच्या तिथेंहि झाला, तेव्हां आतां लिहायला हरकत नाहीं. सुंद्री आमच्या घरीं इतका वेळ होतीना, पण तिच्या तोंडावर यत्किंचित् लाज दिसली असेल तर शपथ. मी तिला कितीक शिकवीत होतें, तिनें केवढी चूक केली, त्याचा परिणाम किती वाईट झाला असता, असें मी आपली पुष्कळ बोलत होतें, पण तिचें मुळीं थोडेंहि माझ्याकडे लक्ष नव्हतें. मधें मधें तर मला अगदीं संतापानें भिरभिरी येई, पण तुम्हां दोघींची आठवण होऊन मी आपली मूग गिळीत असें. नागोपंताची तर गोष्टच बोलायला नको !

अशी ही काहणी असून, तूं ह्मणतेस, तुला यांतलें अक्षरहि ठाऊक नव्हतें, हें खरें कसें मानावें ? मला तूं कांहीं ह्मण, पण माझे कान कांहीं ही गोष्ट ऐकत नाहींत. खरोखरच भय्यासाहेब किती सज्जन मनुष्य आहे ह्मणून सांगूं. आपण उत्तरहिंदुस्थानांत होतों तेव्हां जशी त्यांची वृत्ति दिसली, तीच अगदीं तंतोतंत कालच्या प्रसंगींहि होती. किती नम्र, किती सज्जन, बुद्धि तर किती चलाख. तुझ्या मामांनां त्यांचा बहुश्रुतपणा भारी विलक्षण वाटला. काय थोडेंसें कमी आहे तें फक्त जरासा तरतरीतपणा. आणि त्यांनीं जर बरोबर रीतीनें पाहून बायको केली, तर तो तरतरीतपणा त्यांच्या अंगीं ती तेव्हांच आणूं शकेल! आणि वस्तादहि कांहीं कमी नाहींत हो ! इतक्यांदां आले गेले ना,पण एकदांसुद्धां तुझें नांव काढलें नाहीं. पण ही अशी वस्तादगिरी करण्याची अलीकडे टूमच निघली आहेसें दिसतें, नाहीं बरें ?

प्रिय तारे! मीं जर जरा जास्त स्पष्ट लिहिलें असलें तर तें मनांत आणूं नको. निदानपक्षीं माझ्या बोलण्याचा राग मनांत धरून दिलबहारांत मला येऊंच द्यायचें नाहीं, एवढी तरी कडक शिक्षा करूं नको! दिलबहारांत मी थकलें त्यामुळें माझा हिरमोड झाला तें लक्षांत असेलच. सगळा बाग पाह्यल्यावांचून

माझें समाधान व्हायचें नाहीं. एक छानदारशी व्हिक्टोरिया आणि तिला दोन सुंदरशीं आरबी छोटीशीं तट्टें—कीं अगदीं बहार होईल !

पण आतां थांबतेंच. लेंकरें मघांचपासून माझी वाट पहात आहेत त्यांनां जेवूं घालायला. कळावें, हें आशीर्वाद.

शारदा केळकर."

हें पत्र वाचून होतांच ताराबाईच्या डोक्यांत नानाप्रकारच्या अनेक विचारांनीं एवढें मोठें काहूर करून सोडलें,कीं, आपणाला बरें वाटत आहे, कीं, वाईट वाटत आहे, हेंच तिला कितीक वेळ समजेना.सुंदरचें लग्न घडवून आणण्यांत भय्यासाहेबांचें किती अंग असावें, याविषयीं तिच्या मनांत ज्या अस्पष्ट व संदिग्ध अशा कल्पना आज दोन दिवस उत्पन्न होऊन बसलेल्या होत्या, त्यांनां ती फारसें उत्तेजन देऊं इच्छीत नव्हती. कारण, इतकी तसदी त्यांनीं केवळ उदारबुद्धीनें घेतली असेल हा फारसा संभव नव्हता. त्याचप्रमाणें त्या कल्पना खऱ्या ठरल्या तर आपणावर भय्यासाहेबांच्या उपकारांचें एक ओझेंच चढून जाईल,या भीतीनें त्या कल्पना खऱ्या न ठरलेल्या बऱ्या, असेंहि तिला वाटत होतें. पण आतां हें पत्र वाचून सर्वच खुलासा होऊन आतां अविश्वास करावयाला जागाच उरली नाहीं. आपल्या सर्व कल्पनांच्याहि पलीकडे भय्यासाहेबांनीं श्रम केले, हें आतां निर्विवाद होऊन गेलें. मुद्दाम आपल्या मागोमाग ते चटणीहून मुंबईला आले,व हलक्या मंडळींची मुलाखत घेऊन कसा तरी त्यांनीं त्या दोघांचा शोध लावला. सुंदरविषयीं यत्किंचित् आदरबुद्धि मनांत नसतां, इतकेंच काय, तिच्या वर्तनानें तिचा मनस्वीं तिटकारा येणें साहाजिक असूनहि, तिची त्यांनां विनवणी करावी लागली.व नागोपंत दृष्टीला पडला असतां त्यांच्या पायाची आग मस्तकाला जाई असें असून तें सारें निमुटपणें गिळून, त्याच्याशीं बोलून, त्याची मनधरणी करून, त्याला पैशाचें आमिष दाखवून, व अखेर एवढी मोठी रक्कमहि आपल्याच पदरची त्याला देऊन, त्यांनीं नागोपंताला ताळ्यावर आणला ! कोण हे भगीरथ प्रयत्न! आणि कितीदां तरी त्यांची मानखंडना झाली असेल! आणि हें सारें कोणाकरितां त्यांनीं केलें? सुंद्रीकरितां ? छे, अगदीं अशक्य ! तर—मग—कोणा करितां बरें ?

तारेच्या अंतःकरणांत अगदीं खोल ठिकाणीं एक अस्पष्ट ध्वनि निघूं लागला, कीं, "तारे! हें सारें तुझ्या स्वतःकरितां आहे!" क्षणभर—अगदीं एकच क्षणभर—

तो ध्वनि तेथें राहिला; लगेच दुसरे विचार मनांत येऊन ही कल्पना अगदीं अशक्य आहे असें तिला वाटूं लागलें. आपण किती जरी उत्तम असलों, तरी आपण एकदां त्यांनां अत्यंत मानभंग करून धुडकावून दिलें आहे; असें असून अजून हें सारें आपल्याकरितां आहे हें क्षणभर तरी कसें शक्य आहे? त्यांतून आतां नागेशरावांचे साडू बनण्याची भयाण खात्री तर त्यांच्या अंगावर शहारेच उत्पन्न करील ! छे, तें अगदीं असंभवनीय, साफ मनांतून हांकून काढलें पाहिजे. भय्यासाहेबांनीं भगीरथ परिश्रम केले खरे. इतके कीं, त्यांची कल्पनाच आपणाला ओशाळी आणते—पण तसें करण्याचें त्यांनीं जें कारण सांगितलें, तें ह्मणजे केवळ असंभनियच आहे असें नव्हे. त्यांनीं नागेशरावांविषयीं शिवदुर्गांत थोडी सावधगिरी बाळगली असती तर बरें झालें असतें. तशी बाळगली नाहीं ही चूक झाली, असें वाटणेंहि संभवनीय आहे. तसें वाटल्यावर चूक आपली आपण दुरुस्त करण्याची इच्छा होणेंहि वाजवी आहे. उदारबुद्धि असली व ती वापरायला द्रव्यसामर्थ्य असलें, ह्मणजे तें द्रव्य तशा कामांत खर्च करणें कठिण नाहीं. हें सर्व कृत्य आपल्या स्वतःच्या प्राप्तीच्या लालसेनें केलें असें समजण्याचें प्रयोजन नाहीं; फार तर माझ्याविषयीं पूर्वीं एकदां त्यांच्या मनांत प्रेमभाव होता, त्यामुळें माझ्या मनाला व्यर्थ शीण होण्यापेक्षां कांहीं तरी समाधानाची प्राप्ति करून देणें आपल्या हातीं आहे, तर तें करून द्यावें अशा हेतूनेंहि हें सर्व त्यांनां करणें शक्य आहे.

तें कसेंहि असो, एवढी गोष्ट निर्विवाद आहे, कीं, अशा गृहस्थानें आपणावर उपकारांचें एवढें ओझें करून ठेवलें आहे, कीं, ते उपकार अंशतःहि फेडणें आपल्या घराण्याला शक्य नाहीं. जरी आज आपण आपला जीव गहाण टाकून त्यांच्या रकमेची भरपाई करूं म्हटलें, तरी तेंहि समाधान मिळण्याजोगें नाहीं. कारण, एकतर त्यांचें नांव पुढें नसून ते पैसे घेतील ही आशा व्यर्थ आहे; शिवाय मुख्य गोष्ट ही, कीं, त्यांचे उपकार अशा प्रकारचे आहेत, कीं, निव्वळ द्रव्य-रूपानें कधींहि त्यांची फेड होणें नाहीं. सुंदरचें लग्न, सुंदरची अब्रू, आपल्या सर्व घराण्याची अब्रू आज चारचाघांत जी शिल्लक राहिली, ती केवळ त्यांच्यामुळें. आज निवळ त्यांच्या परिश्रमानें आपला माथा उजळ आहे. अरेरे ! अशा सद्गृहस्थाची आपण आजपर्यंत कितीदां टर उडवली, कितीदां उपहास केला, कितीदां अन्यायानें अभिप्राय बनवून लोकांचें मन त्यांच्याविषयीं कलुषित केलें ! आणि या असल्या आपल्या अत्यंत मूर्खपणाच्या वर्तनाचा

किंतु बिलकूल मनांत न आणतां, त्यांनीं आपणाला किती अलोटपणें ऋणी करून ठेवलें आहे, हा त्यांच्या मनाचा किती थोरपणा ! त्यांच्याशीं तुलना करून पहातां आपण किती तरी क्षुद्र, किती तरी अर्ध्या हळखुंडांत पिवळीं होऊन जाणारीं आहोंत, हें तिच्या मनांत पूर्णपणें बिंबून ताराबाईचा सर्व अहंकार गळाला, व ती अगदीं लीन होऊन गेली. अशा परोपकाराच्या कामीं आपलें तनमनधन वेंचलें, याविषयीं त्यांच्यासंबंधानें तिच्या मनांत अभिमानबुद्धि जागृत झाली. शारदामामींनीं त्यांची केलेली वाखाणणी तिनें पुनःपुनः वाचून पाहिली. ती तिला आतां फारच तुटपुंजी—फारच अपुरी दिसूं लागली. परंतु त्यांनीं मनोभावानें स्तुति केल्याबद्दल तिला समाधान वाटूं लागलें. असल्या थोर मनाच्या सज्जन गृहस्थाचें प्रेम आपणावर असावें अशी मामामामींचीहि कल्पना दृढ होत असावी, हें एक प्रकारें जरी तिला भूषणास्पद वाटे, तरी त्यांच्या मनांत भय्यासाहेबांच्या व आपल्यामध्यें कांहीं तरी हितगुज चालत असावें व त्याच्या जोरावरच भय्यासाहेबांनीं इतकें उच्च वर्तन केलें, अशी जी समजूत झाली आहे, तो किती भ्रामक आहे असें वाटून तिला थोडेंसें वाईटहि वाटूं लागलें.

अशा प्रकारें विचारांत तन्मय असतां कोणी आल्याचा भास होऊन ती भानावर आली, व इकडे तिकडे पहाते तों नागेशराव फिरत फिरत तिकडेच येत होते ते दिसले. ते पुढें येऊन हंसत म्हणाले "आपल्या एकांताचा भंग नाहींना आम्ही करीत आहोंत ताराबाई ?"

तिनेंहि हंसत उत्तर दिलें "भंग तर खराच झाला आहे. पण तो मला नको आहे असें कांहीं त्यापासून होत नाहीं."

नागेशराव म्हणाले "आमचा तरी तुम्हाला नाखुष करायचा कुठें हेतु आहे? आपला स्नेह आजवर होता, आतां तर काय, नातेंच सुरु झालें आहे !"

ताराबाई गंभीरपणें म्हणाली "तें तर खरेंच ! बाकीची मंडळी बागेंत आली आहेत का ?"

नागेशराव ह्मणाले "कांहीं ठाऊक नाहीं. तुमची आई आमच्या पत्नीला घेऊन गांवांत जाणार आहे इतकें मात्र खरें. बरें असो, पण आपण खुद्द दिलबहार पाहून आलां ह्मणून वसंतराव सांगत होते ?"

ताराबाईनें उत्तर दिलें " हो. "

नागेशराव ह्मणाले " मला किती तुमचा जणूं काय मत्सर वाटतो आहे त्याबद्दल ! पण छे, तिथें जाणें मला आतां नाहीं गोड लागायचें. तसें असतें तर उद्यां नागपुराला जातांना वाटेंत नसतों का गेलों ? हं. अन् त्या कारकुनाची ती म्हातारी आजीबाई होती का ? भारी बडबडी बोवा, असें तिचें मजवर प्रेम होतें म्हणतां,पण तिनें बहुतकरून तुमच्यापाशीं माझें नांव नसेल काढलें!"

ताराबाई म्हणाली " हो, काढलं की. "

नागेशराव चिकित्सेनें म्हणाले "असें का ? अन् काय म्हणाली ती ? "

ताराबाई सहजपणें म्हणाली "कीं, 'तुम्ही अलीकडे रिसाल्यांत नोकरी धरली आहे, पण कांहीं चांगलेसे नाहीं निघालांत !' इतक्या दूरपर्यंत बातमी जातां जातां कशी उलटी सुलटी होत जाते म्हणतां !"

नागेशराव ओंठ चावीत म्हणाले "हो, तें तर खरेंच."

ताराबाईला वाटलें, कीं, हे आतां पुनः कधीं तसल्या गोष्टी काढणार नाहींत आपल्याजवळ. पण जरा वेळानें ते पुनः बोलले "परवां मुंबईतसुद्धां मला भय्यासाहेब दृष्टीला पडले होते. दोनचारदां त्यांची आमची कुठें कुठें गांठहि पडली. मग कशाकरितां ते आले होते कोण जाणे !"

"कांहीं लग्नाबिग्नासाठीं आले असतील,"एवढें वाक्य बोलून ताराबाई थोडी थांबली आणि पुढें ह्मणाली "त्यांच्या त्या इंदुमतीदेवींना कांहीं कंटाबिंटा देऊन खूष करायच्या विचारांत असतील,कदाचित् ! आह्मी दिलबहारला गेलों तेव्हां ते तिथें होते. मग तसेंच कांहीं विशेष काम असल्याविना मुंबईला कशाला येतील ?"

नागेशराव ह्मणाले " अर्थात्च ! पण तुमची त्यांची भेट झाली होती का तिकडे ? "

ताराबाई ह्मणाली "हो, त्यांनीं आपल्या बहिणीचीहि माझ्याशीं ओळख करून दिली ! "

नागेशराव भिंवया चढवून म्हणाले " अस्सें ? मग ती तुह्माला कशी काय वाटली ? "

ताराबाई ह्मणाली "फारच पसंत ! "

नागेशराव ह्मणाले "असेलच ती अलीकडे पसंत पडण्यासारखी झालेली. अलीकडे एकदोन वर्षांत तर फारच सुधारली आहे ह्मणतात. तुह्माला आवडली तें ठीकच झालें. बरी निघो बिचारी एकदांची!"

ताराबाई ह्मणाली "मला तर त्यांत संशय नाहीं आतां वाटत. मोठ्या आणीबाणीचं अन् काळजीचं असं वय आतां तिचं गेलं. तिला आतां नीट समजूं लागलं आहे!"

नागेशराव तरीहि पुढें विचारूं लागले "तुह्मी दिलबहारला गेलां तेव्हां चणकापुर लागलें का तुह्माला?"

ताराबाई ह्मणाली "कांहीं एवढें लक्षांत नाहीं. पण नाहींच बहुतेक."

नागेशराव म्हणाले "मी आपलें एवढ्याचकरितां विचारलें, कीं, चणकापुर म्हणजे आम्हाला इनाम द्यायचें ठरलेलें गांव.आम्ही चणकापुरचे इनामदार होणार होतों बरं! फार छानदार गांव आहे.जुना इनामदारांचा वाडाहि मोठा आहे. पाणी मोठें पाचक आहे. सर्वतोपरी तें गांव आम्हाला अगदीं अत्यंत सुखावह झालें असतें."

ताराबाईनें खोंचून विचारलें "पण तुह्माला इनामदारीची रहाणी आवडली असती का?"

नागेशराव उत्साहानें उद्गारले "हें काय विचारावें? खुशाल इनामी उत्पन्न खात मनाला आवडेल तो उद्योग करीत पडलों असतोंना! माणसानें कधीं असंतुष्ट असूं नये म्हणतात, तें बरोबर आहे; पण किती विवेक केला, तरी कधीं तरी तें मनांत चलबिचल करून सोडतेंच! स्वस्थ, कोणाचें एक नाहीं दोन नाहीं, असें निरामय निवांत स्थितींत जीवित घालवायला मिळणें,ह्मणजे अगदीं माझ्या अति उच्च कल्पना सफल झाल्यासारखें मला वाटलें असतें.पण नाहीं जगदीशाची मर्जी! भय्यासाहेब तिकडे कधीं या इनामाविषयीं तुमच्यापाशीं गोष्ट बोलत होते का?"

ताराबाई नागेशरावाकडे रोंखून पहात ह्मणाली "मीं तर असं ऐकलं—अन् तेंहि त्यांच्याचसारख्या खात्रीलायक माणसाकडनं—कीं, तें इनाम तुह्माला कांहीं अटींवर द्यायचं होतं, अन् तेंहि भय्यासाहेबांच्या निवळ खुषीवर ठेवलेलं होतं!"

नागेशराव म्हणाले "हो-तें कांहीं अगदीं खोटें नव्हे. आपणाला आठवतच असेल, कीं, मी तरी प्रथमपासून तसेंच ह्मणतों आहें."

ताराबाई पुढें ह्मणाली ''तसंच आणखी मीं हेंहि तशाच विश्वसनीय माणसाकडनं ऐकलं आहे, कीं,आज जितकी तुह्माला इनामदाराची निवांत स्वस्थता पसंत आहेशी दिसते आहे,तितकी ती पूर्वीं एका वेळीं पसंत नव्हती. अन् तुह्मीं एकदां साफ सांगितलंत, कीं, मला इनामदारी नको, अन् ह्मणून त्या इनामाचा हक्क तुम्हीं कायसा सोडून दिलात म्हणे? ''

नागेशराव एकदम चरकले, पण लगेच सावरून म्हणाले ''असें का ? तसें खरेंच. तुम्हाला नाहींका आठवत मीं तुह्माला पहिल्यांदांच तसें सांगितलें?''

इतकें बोलणें होईपर्यंत घर जवळ आलें. कारण ही ब्याद टाळण्याकरितां ताराबाई झप्झप् चालत आली होती. आतां नागेशरावांशीं तंटा करण्यांत अर्थ नाहीं, ते आतां आपले मेव्हणे झाले आहेत, अशा विचारानें घराच्या दरवाजाशीं ती त्यांनां हंसत ह्मणाली ''हें पहा नागेशराव,आतां तुम्ही आमचे मेव्हणे झालांत. उगाच मागच्या गोष्टींचा वाद कशाला आपल्यामधें आतां हवा ? याउप्पर आपलीं मनं नीट असलीं ह्मणजे झालं. ''

त्यांनींहि नुसतें ''हो हो, हें काय विचारावें'' असें म्हटलें, व दोघेंहि घरांत शिरलीं. त्यानंतर पुनः कधींहि नागेशरावांनीं ताराबाईजवळ त्या गोष्टी काढल्या नाहींत !

---

## प्रकरण त्रेपन्नावें.

### उत्साहकारक बातमी.

नागेशराव शांतिसदनांतून जाण्याचा दिवस जवळ येत चालला. सीताबाइचा सगळ्यांनींच कुचनैगडाला जाण्याचा विचार कोणालाच पसंत पडला नाहीं, तेव्हां सुंदरला एकटी पाठविण्याखेरीज दुसरा मार्गच उरला नाहीं. ती त्यांची पराकाष्ठेची आवडती असल्यामुळें त्यांनां फार तें कठिण वाटलें हें उघड आहे. सीताबाई उद्गारल्या '' कधीं ग सुंद्रे पोरी पुन्हां मला भेटशील ? ''

सुंदर ह्मणाली ''काय सांगूं आई ! कदाचित् दोनतीन वर्सेंहि भेट नाहीं व्हायची !''

सीताबाई गहिंवरून म्हणाल्या ''पण बाळ पत्र तरी नेहमीं पाठवीत जा बरं ! ''

सुंदर म्हणाली '' होईल फुरसत तसं पाठवीन. एकदां संसारांत पडलं म्हणजे फारशी फुरसत कुठली होणार मला ? या माझ्या बहिणींनीं मात्र मला नेहमीं पत्रं पाठवावींत. त्यांनां दुसरा काय उद्योग आहे ?''

## उत्साहकारक बातमी.

सुंदरनें अशीं जरा तेढीं उत्तर दिलीं, त्यापेक्षां नागेशरावांनीं किती तरी मोहकपणानें त्यांचा निरोप घेतला. ते सारखे हंसतमुख होते, गोडगोड बोलत होते, व इतर तऱ्हेनें अगदीं झोंकांत होते.

हें प्रेमळ जोडपें स्टेशनकडे चालतें झाल्यावर आनंदराव म्हणाले "कसे आहेत आमचे फक्कडराव ! नटतो काय, मुरडतो काय, जसा कांहीं नाटकांतला नायकच ! त्या रावबहादुरांनां म्हणावं आणा तुमचा जांवई, अन् आमच्या जांवयापुढें कसला मेषपाल दिसतो तो पहा ! "

सुंदर गेल्यामुळें किती तरी दिवस सीताबाईनां फार उदासवाणें होऊन गेलें. त्यांनां अगदीं करमेनासें होऊन त्या एकदां म्हणाल्या " अशीं आपलीं माणसं दूर जाणं मला भारी अवघड वाटतं बाई. मला तर वाटतं, कीं, सारीं नेहमीं आपल्याजवळ असावींत."

ताराबाई जवळ होती ती एकदम म्हणाली "आई, हा सगळा लेंकीचं लग्न झालं त्याचा परिणाम बरं ! बाकीच्यांचं अजून झालं नाहीं हें उत्तम नव्हे का ? "

सीताबाई म्हणाल्या "तसं नव्हे कांहीं. सुंदरचं लगीन झालं म्हणून नाहीं कांहीं ती दूर गेली. तिच्या नवऱ्याची चाकरी दूर आहे म्हणून इतक्या लवकर ती गेली.तशी दूर नसती तर कशाला मीं इतक्यांत पाठविली असती!"

पण सीताबाईची ही उदासवाणी स्थिति तीनचार दिवसांवर टिकली नाहीं. कारण, लोक गांवांत हळुहळू बोलायला लागलेली एक बातमी त्यांच्या कानीं गेल्यापासून तर त्यांच्या मनांत पुनः आशा, इच्छा व उल्हास यांनीं ठाणें दिलें. आनंदभुवनांतल्या कारकुनाला भाऊसाहेबांचं पत्र आलें होतें, कीं, " एकदम बंगल्यांत सर्व तयारी ठेवावी. आम्ही चार मंडळी घेऊन तिथें कांहीं दिवस हवापालट करायला एकदोन दिवसांत येतों आहोंत. " ही बोलवा ऐकतांच सीताबाईची गडबड काय विचारावी ! त्या शांताकडे पहात, खुदकन् हंसत, पुनः मान हालवीत, असें कांहीं वेळ चाललें होतें.

ही बातमी प्रथम त्यांनां रमामावशींनीं कळवली, तेव्हां त्या ह्मणाल्या " भाऊसाहेब येताहेत ? आले तर ठीकच. बाकी आह्मांला ते आले काय न् गेले काय, एकच ! आमचा काहीं संबंध नाहीं हें तर दिसतंच आहे. मला तर मुळीं त्यांनां भेटायची दिखील इच्छा नाहीं. येवो बिचारा आपल्या

बंगल्यांत ! खुशाल का येईना ! अन् त्यांतूनहि काय घडून येईल याचा तरी काय नेम सांगावा ? पण आह्मांला काय त्याचं ! आपण तर, रमा, मागंच नाहीं का एकदां ठरवून टाकलं, कीं, पुन्हां ह्मणून त्यांचं नांव काढायचं नाहीं ! आधीं पण, तो येणार हें तरी खरं का ? ”

रमामावशी ह्मणाल्या “तुह्माला अगदीं संशय नको राह्यला. तो कारकूनच काल संध्याकाळीं गांवांत आला होता. आमच्या दारावरनं चालला होता तो मी मुद्दाम बातमी काढायला आंत बोलावला. त्यानं स्वतः सांगितलंन्, कीं, बातमी अगदीं खरी. येत्या गुरुवारीं आलेच पाहिजेत. कदाचित् बुधवारींहि येऊन पोंचतील. तो कारकून मुळीं मुद्दाम गवळ्याकडे ‘दूध मंगळवारींच हवं ’ ह्मणून सांगायला चालला होता. ”

भाऊसाहेब येणार ही बातमी शांताबाईच्या कानावर पडतांच तिची चर्या पालटली. अलीकडे कितीक महिन्यांत तरी त्यांचें नांव थोरल्या दोघी बहिणींमध्यें निघालें नव्हतें, पण आज ती ताराबाईला ह्मणाली “ मघाशीं रमामावशींनीं बातमी सांगितली तेव्हां तारा, तूं मजकडे पाहूं लागलीस हें मीं पाह्यलं. अन् माझीहि मुद्रा जराशी बदलली, हें खरं. पण ती कांहीं वेड्यासारखी आशा मला उत्पन्न झाली ह्मणून फिरली नाहीं. भाऊसाहेब येताहेत असं कळल्याबरोबर साऱ्यांनीं माझ्याकडे पाहूं कां लागावं, या विचारानं मी नुसती गोंधळून गेलें इतकंच. खरोखरच या बातमीपासून बरं वाईट असं मला कांहींच वाटत नाहीं, मी ह्मणतें, कीं, ते सडे येताहेत इतकं चांगलंच. कारण मग आपणाला त्यांची भेट व्हायचं तितकं कारण कमी पडेल. मी ह्मणजे गांठ पडली तर भितें आहे असं नव्हे; पण उगीच लोकं बडबडायला लागतील तें बरं नाहीं मला वाटत. ”

या बातमीचा काय अर्थ समजावा तें ताराबाईला कळेना. तिनें त्यांना जर चटणीस पाहिलें नसतें, तर निवळ हवा बदलायला ते येत असतील हें तिला शक्य वाटलें असतें. त्यांचें मन शांताक्कावर अजूनहि आहे अशी तिला खात्रीच होती. आज तिला प्रश्न इतका पडला होता, कीं, भय्यासाहेबांच्या परवानगीनें व संमतीनें ते इकडे येत आहेत, कीं, त्यांच्या अनुमतीची पर्वा न करितां ते येण्याची छाती करिताहेत, या दोहोंतलें जास्त शक्य कोणतें ? असा प्रश्न पुनः पुनः डोक्यांत आला म्हणजे ती एकादे वेळीं म्हणे “हें काय बाई ! मालक आपल्या

घरीं राह्यला येतो आहे, तर तो कां येत असेल, कां नसेल येत, या प्रश्नांची आम्हांला उठाठेव इतक्यांतच कशाला हवी ? आला तर येईना. दोनचार दिवसांत काय असेल तो रंग दिसूं लागेल ! ”

शांताबाई किती जरी म्हणाली, व किती जरी स्वतःची समजूत करून घेई, कीं, भाऊसाहेब आले काय न आले काय मला एकच, तरी कोणालाहि तिला पाहून सहज कळण्यासारखें होतें, कीं, तिच्या नेहमींच्या शांतवृत्तींत बरीच चलबिचल उडून गेली होती; व कां येतात, कधीं येतात, हा प्रश्न तिच्या मनाला बराच लागून राहिला होता.

गतवर्षीं याच दिवसांत आनंदराव व सीताबाई यांच्यामध्यें एके दिवशीं ज्या प्रश्नाचा कडाक्याचा वाद चालला होता, तोच प्रश्न आतांहि सीताबाईनीं पुनः काढला. त्या ह्मणाल्या “ हें पहा, भाऊसाहेब आल्याबरोबर त्यांनां भेटायला तुह्माला अलबत गेलंच पाहिजे, हो !”

आनंदराव म्हणाले “हट्. मी तर आतां मुळींच जायचा नाहीं ! गतवर्षीं तुह्मीं मला जुलमानें पाठवलेंत अन् सांगितलेंत, कीं, मी जर भेटायला गेलों तर ते माझी एक मुलगी पतकरतील असें. पण तें कांहीं झालें नाहीं. सारा भुसका लड्डू. मी पुन्हां तेंच तेंच करण्याइतका मूर्ख खास नाहीं !”

सीताबाई म्हणाल्या “असं कसं बोलणं ? ते परत इतक्या दिवसांनीं आपल्या गांवांत येणार, तर सगळया गृहस्थांनीं त्यांनां भेटायला गेलंच पाहिजे, असा शिष्टाचार आहे हो !”

आनंदराव ह्मणाले “हा असला वेडगळ शिष्टाचार आम्ही नाहीं पाळणार! त्यांनां आमची जरूर असली तर त्यांनीं यावें. आह्मी कुठें राहतों तें काय त्यांनां माहीत नाहीं ? हे असले शिष्ट नेहमीं येतील अन् नेहमीं जातील, ह्मणून त्यांनां दर वेळां सलामी द्यायला धांवण्यांत आम्ही आपला वेळ नाहीं खर्चणार ! ”

सीताबाई म्हणाल्या “ मला बाई एवढंच समजतं, कीं, तुम्ही नाहीं गेलांत तर तें भारी बेपर्वाईचं दिसेल. आपण जा—नका जाऊं म्हणा, पण न गेलांत तरी मी त्यांनां जेवायला बोलवायची सोडायची नाहीं. तो तर निश्चयच आहे माझा. त्यांच्याबरोबर सारजाबाईला अन् दुसऱ्या कांहीं जणांनां पंगतशोभेला बोलावूं ह्मणजे काय अगदीं थाटच उडेल ! ”

हा विचार मनांत आला, तेवढ्यावरच सीताबाई कसेंबसें समाधान मानून घेऊं लागल्या. तरी पण इतर लोक भेटायला जातील, आणि हे आमचे गृहस्थ मात्र जात नाहींत, यामुळें त्यांनां बरीच हुरहुर वाटूं लागली, दुसऱ्या सगळ्यांची त्यांच्याशीं भेट होईल, पण आपण मात्र निराळीं राहूं, तें त्यांनां कसेंसेंच वाटूं लागलें. शांताबाईलाहि निराळ्याच प्रकारचा त्रास होऊं लागला. ती ह्मणाली "कशाला उगीच येताहेत कोण जाणे. न येतील तर बरें, असं मला आतां वाटूं लागलं आहे. कोण ही रोज एकसारखी कानाशीं रिपरीप ! सहजगत्या आले गेले—तसं का व्हायचं आहे ? आईचा हेतु चांगला आहे खरा, पण ही अशी रोज वाच्यता करण्यानं मला कोण त्रास होतो त्याची तिला कल्पना नाहीं. एकदांचे चार दिवस काय राह्यचे ते राहून गेले ह्मणजे ही पीडा संपेल तरी लवकर !"

ताराबाई हंसून ह्मणाली "माझ्या हातांत ही तुमची पीडा कमी करायचं असतं तर केव्हांच केलं असतं; पण तसं मुळींच नाहीं. तुह्माला हें सारं सोसलंच पाहिजे. आतां नेहमींप्रमाणें विवेक करा ह्मणून तुह्माला सांगायचं, तर तेंहि मला करतां येत नाहीं. कारण तुमच्यापाशीं विवेक किती तरी आहे !"

बुधवारीं भाऊसाहेब शिवदुर्गास येऊन दाखल झाले. सीताबाई अगदीं पाळत ठेवून होत्या. त्यांनीं त्यांची बातमी काढण्यांत पक्की असलेली बहिण रमामावशीला अगदीं ताकीद देऊन ठेवली होती, कीं, ते आल्याचें कळल्याबरोबर आह्मांला निरोप पाठीव. तसा निरोपहि आला व सीताबाईच्या मनाची चलबिचल एकसारखी वाढूं लागली. त्यांनां आपल्या घरीं जेवणाला कधीं बोलावलेलें बरें दिसेल, त्याचा विचार करून त्या दिवससुद्धां मोजूं लागल्या होत्या. कारण जेवायला बोलावल्यावांचून त्यांची आपली भेट होण्याची त्यांची निराशाच झाली होती. पण शनिवारीं सकाळीं त्या वेणीफणी करून खिडकींत सहज उभ्या होत्या, तों त्यांनीं दुरून भाऊसाहेबांचा घोडा आपल्या मळ्याच्या फाटकांतून आंत येतांना ओळखला. त्याबरोबर त्यांनीं झटकन् मुलींनां ती मौज पहायला आपल्याजवळ बोलाविलें. शांताबाई मुळींच उठली नाहीं. ताराबाई आईच्या हांकेसरशी उठून खिडकीशीं गेली. तेवढ्यांत मागून दुसरा घोडाहि आलेला दिसूं लागला होता. त्यावर बसलेले भय्यासाहेब तिनें ओळखले व शांताक्काजवळ जाऊन तीहि बसली. तितक्यांत हिरी म्हणाली "दुसरं कोणसं त्यांच्याबरोबर आहे ! कोणग असेल, आई?"

सीताबाई ह्मणाल्या "असेल कोणी स्नेहीबिई, झालं. मला नाहीं ओळखत बाई."

हिरी उद्गारली " अरेच्या, तो गतवर्षी त्यांचा स्नेही नसे का बरोबर, तो दिसतो आहे. तो, ग, काय त्याचं नांव, बरंचसं कायसं होतं. उंच नू गर्विष्ठ असे तो !"

सीताबाई ह्मणाल्या " खरं ग खरं. भय्यासाहेब. मलाहि आतां तो ओळखला. भाऊसाहेबांचा मित्र ह्मणून येवो बापडा इथें. नाहीं तर मला तर तो डोळ्यांसमोर नको आहे अगदीं."

शांताबाई आश्चर्यानें ताराबाईकडे पाहूं लागली. उत्तरहिंदुस्थानांत त्यांची व ताराबाईची भेट झाली असल्याचें तिला मुळींच माहीत नव्हतें ! तिचा समज असा, कीं, सुवर्णपुरीं त्यांनीं तिच्या हातीं पत्र दिलें, त्यानंतर आजच ही त्यांची पाहिल्यानें भेट होत आहे. ह्मणून अशा भेटीच्या वेळीं तिची फार त्रेधा उडेल, अशी शांताक्काची कल्पना होऊन तिला तिच्याबद्दल वाईट वाटूं लागलें. अशा तऱ्हेनें दोघींनां स्वतःकरितां व एकमेकींकरितां हुरहुर वाटूं लागली. इकडे सीताबाई भय्यासाहेब आपणाला अत्यंत नापसंत असल्याबद्दल एकसारख्या बोलतच होत्या.

पण शांताक्काला कल्पना नव्हती अशीं काळजीचीं कारणें ताराबाईच्या डोक्यांत किती तरी होतीं. तिनें शारदामामींच्या पत्राची वार्ताहि शांताबाईला कळविली नव्हती, अथवा आपल्या अंतःकरणांत त्यांच्यासंबंधानें केवढा बदल झाला होता, त्याचा शांताबाईला तिनें वासहि येऊं दिला नव्हता. शांताबाईला भय्यासाहेबांची मागणी तिनें धुडकावून टाकली, व त्यांची तिनें योग्य किंमत कधीं जाणली नाहीं, इतकेंच वाटत होतें; पण ताराबाईच्या नजरेनें आज भय्यासाहेब ह्मणजे आपल्या घराण्यावर पराकाष्ठेचे उपकार केलेला, व त्यांच्यासंबंधानें आपल्या मनांत, आक्कांनां जसे भाऊसाहेब, तसा प्रेमभाव उत्पन्न झालेला असा सद्गृहस्थ होता. भय्यासाहेबांनीं आतां शिवदुर्गास यावें, इतकेंच नव्हे, तर आपण होऊन शांतिसदनांत यावें, व आपली भेट होण्याची संधि मुद्दाम आणावी हें पाहून तिला अत्यंत आश्चर्य वाटलें. तितकें आश्चर्य फक्त एकदां दिलबहारामध्यें त्यांचें बदललेलें वर्तन पाहून वाटलें असेल.

एवढा वेळ काळजीनें निस्तेज झालेली तिची मुद्रा एक नवीन विचार तिच्या डोक्यांत येतांच एकदम सतेज झाली, व तिचे नेहमींचे विशाळ डोळे

जास्तच प्रफुल्लित होऊन त्यांमध्यें एक विलक्षण प्रकारचें पाणी चमकूं लागून तीं आपल्याशीं हळूच हंसूं लागलीं. ती मनांत ह्मणाली " इतके वेडेवांकडे प्रकार होऊनहि अजून त्यांचें प्रेम मजवर कायम आहेसं चिन्ह दिसतं आहे. पण अजून एवढ्यांत तर्क करण्यांत अर्थ नाहीं. ते आले ह्मणजे कसे काय वागतात तें पाहूंया. मग आशा करायला रगड वेळ मिळेल ! "

इतक्यांत शिपायानें येऊन वर्दी दिली, कीं, खालीं दिवाणखान्यांत मंडळी आली आहेत, तेथें बाबासाहेबांनीं बोलावलें आहे. अर्थात् सीताबाई तिघी लेकींनां घेऊन खालीं गेल्या. जातांना ताराबाईनें आक्कांच्या तोंडाकडे पाहिलें, तों त्याहि गडबडलेल्याच दिसत होत्या. एकदांची ही मंडळी कशीबशी दिवाणखान्यांत शिरली. सीताबाई प्रथम फारसें बोलल्याच नाहींत. शांताबाईनें जास्त पोक्तपणा धरून रागाचें चिन्ह न दाखवितां, व विशेष सलगीचाहि आविर्भाव न करितां, त्यांनां शांतपणानें औपचारिक कुशल प्रश्न विचारले. ताराबाईनेंहि भाऊसाहेबांशीं स्मित करून त्यांच्या बहिणींची वगैरे हकीगत थोडक्यांत विचारली. भय्यासाहेबांकडे तिनें फक्त एकदां नजर टाकली. तिला ते दिलबहारांतल्यासारखे न दिसतां सुवर्णपुरांतल्यासारखे घोंटाळलेले असेच वाटले. पण कदाचित् आमच्या मामामामींच्याशीं ते जसे मोकळ्या मनानें वागतात, तसें त्यांनां येथें या आमच्या मंडळांत मोकळें वाटत नसेल, असा तिनें तर्क केला; व तो जरी तिला आवडला नाहीं, तरी जास्त सयुक्तिक खास वाटला.

भाऊसाहेबहि तिला बरेचसे घोंटाळलेले दिसत होते, तरी एकंदरींत ते खुषींत असल्याचें तिला वाटलें. तितक्यांत सीताबाईनां धीर येऊन त्यांनींहि फारच लाघवी रीतीनें भाऊसाहेबांची विचारपूस केली, व दुसऱ्याच क्षणां भय्यासाहेबांशीं अगदीं तुटकपणानें औपचारिक दोन शब्द उच्चारले. हें दोघांसंबंधीं दाखविलेलें अंतर व हा भेदभाव पाहून ताराबाईला अतिशय वाईट वाटलें. ज्यांच्या उपकारांमुळें आज आपण जगांत अब्रूनें रहातों आहोंत, व ज्यांच्या श्रमानेंच केवळ सीताबाईच्या लाडक्या लेंकीची आज घडगत लागली होती, त्यांच्याशीं सीताबाईनीं असा भेदभाव धरावा, याची ताराबाईला शरम वाटूं लागली, व आतां आपण तरी ही आई करीत असलेली चूक दुरुस्त करावी असा विचार तिच्या मनांत आला.

# उत्साहकारक बातमी.

तितक्यांत भय्यासाहेबांनीं स्वतःच " वसंतराव अन् शारदाबाई खुशाल आहेत ना," असें ताराबाईला विचारलें. पण तो प्रश्न ऐकून तिची ओशाळी जास्तच वाढली. ते नुकते त्यांनां मुंबईत भेटून आले होते ही गोष्ट ताराबाईला माहीत नसेल, अशा समजुतीवर त्यांनीं आपणाला हा प्रश्न विचारला होता हें उघड होतें. तिनेंहि नुसतें "हो" असें उत्तर दिलें. नंतर भय्यासाहेब कांहीं बोलेनात. ते तिच्यापासून दूर बसले होते हें एक कारण असेल, पण चटणीला वगैरे असें नसे. तेथें तिच्याशीं बोलतां न आलें तर ते तिच्या मामामामींशीं बोलत असत. पण आतां कितीक मिनिटें गेलीं तरी त्यांचा शब्द कानीं पडेना. ह्मणून ती मध्येंमध्यें हळूच चोरून त्यांच्याकडे पाही, तों ते शांताकाकडे किंवा आपल्याचकडे किंवा नुसत्या सतरंजीकडे पहात आहेत असें तिला दिसून येई. चटणींतल्यापेक्षां आज येथें हे जास्ती विचारांत गढलेले आहेत, व तेथल्यासारखा आज ते दुसऱ्यांशीं बोलण्याचा यत्न करीत नाहींत हें आज तिला स्पष्ट दिसून आलें, व तें पाहून तिला निराशा वाटूं लागली. पण ती लगेच स्वतःशीं ह्मणाली " मी मूर्ख तर नव्हें ? असली भलती आशा करतें ती माझ्यासारखी बेअकली कोणी नसेल. तसेच ते अलबत वागणार. निराळे कसे ते वागावेत ?—तें खरं, पण मग इथें आले तरी कशाला?"

आतां तिला संभाषणांत तात्पर्य वाटेनासें झालें. त्यांच्याशिवाय दुसऱ्या कोणाशीं बोलण्यांत अर्थ नाहीं, पण त्यांच्याशीं तर बोलायची छाती होईना. मोठा धीर करून तिनें एकदां "सरलादेवी बरी आहेना" ह्मणून विचारलें, त्याला त्यांनीं मान हलवूनच फक्त उत्तर दिलें. तितक्यांत सीताबाई मोठ्यानें ह्मणाल्या " आपण गेल्याला, भाऊसाहेब, किती तरी महिने झाले!"

भाऊसाहेब ह्मणाले " हो हो—खरेंच. "

सीताबाई म्हणाल्या " मला वाटूं लागलं, कीं, आपण पुनः या बाजूला येत नाहीं. लोकं तर स्पष्ट बोलूं लागलीं होतीं, कीं, आपण आनंदभुवन सोडूनच देणार म्हणून. पण मी नेहमीं म्हणे—तसं व्हायचं नाहीं. इकडे दरम्यान कितीक घडामोडी होऊन गेल्या. रावबहादुरांच्या मालतीचं लगीन होऊन ती आपल्या घरीं राह्यला गेली. तसंच माझ्याहि एका मुलीचं लगीन झालं. आपण ऐकलं असेल कदाचित् हो, अलबत तुम्हीं तें वर्तमानपत्रांत वाचलंच असेल. ज्ञानप्रकाशांत अन् वांईवृत्तामधें छापलं होतं गृह्यसंस्काराखालीं.

जसं द्यावं तसं नव्हतं नीट लिहून दिलं. नुसतं इतकंच होतं, कीं, 'नागेशराव गोडबोले यांचा विवाह कुमारी सुंद्राबाई नगरकर इच्याशीं गेल्या आठवड्यांत मुंबईत झाला.' पण कुठली सुंद्राबाई, तिचे वडील कोण, कुठले, हें कांहीं नव्हतं. आमच्या वसंतरावाचं असलंच नेहमीं अर्धवट करणं असायचं! पण अशा महत्त्वाच्या बाबतींत तरी मला नव्हतं वाटलं तो इतकी हलगर्जी करीलसं ! आपण वाचलं होतंत का तें ?"

भाऊसाहेब थोडक्यांत ह्मणाले " हो हो, वाचलें तर. फार चांगलें झालें बरें तें."

ताराबाई वर मान तरी कशी उचलणार ? अर्थात् भय्यासाहेब कसे दिसत होते तें तिला कळणें अशक्य होतें. सीताबाई पुढें बोलल्या "लेकीचं चांगलं लगीन झालं म्हणजे, भाऊसाहेब, मोठी मौज वाटते खरीच; पण ती दूर जाते तें नाहीं गोड लागत. तीं नवराबायको गेलीं आहेत कुचनैगड संस्थानांत. तें दूर नागपुराकडे आहे तिथें ती राह्यची आहे–किती वर्सं कोण जाणे–तिथें तिच्या नवऱ्याला मोठी नोकरी आहे. तुह्मीं ऐकलंच असेल, कीं, त्यांनीं आतां रिसाला सोडला, अन् आतां ते पोलिस ऑफिसर झाले आहेत बडे ! बरं बाई देवाच्या कृपेनं अजून कांहीं तरी त्यांनां मित्र शिल्लक राहिले आहेत–बाकी असावेत तितके नाहींतच !"

हा बाण आईसाहेबांनीं भय्यासाहेबांवर सोडला, तें पाहून ताराबाईला तर इतकी लज्जा वाटूं लागली, कीं, आतां आईचें बोलणें थांबवण्याकरितां तरी आपण दुसरा विषय काढलाच पाहिजे असें तिला वाटलें. येथवर धीर करून बोलण्याचा नुसता डोक्यांत चाललेला विचार यामुळें अगदीं पक्का होऊन कांहीं तरी बोलण्याच्या हेतूनें ती म्हणाली " आहे कां आतां कांहीं दिवस मुक्काम, भाऊसाहेब ? "

भाऊसाहेबांनीं उत्तर दिलें " हो, कांहीं दोनतीन आठवडे होणार आहे असें म्हणतों आहें. "

सीताबाई मध्येंच म्हणाल्या " आपण हवा बदलायला आलां आहांत, तर आनंदभुवनाची हवा पुरेशी झाली म्हणजे आणखी एकदां हवा बदलायला आमच्या घरीं येऊन रहा तुम्ही, भाऊसाहेब. आमच्या इथली हवा तिकडच्यापेक्षां किती तरी निराळी आहे. आम्ही तुमची अगदीं सगळी उत्तम सोय करूं."

असलें अचरटपणाचें व फाजील स्वागत करण्याचें सिताबाईचें भाषण—व तेंहि एकट्या भाऊसाहेबांनां उद्देशून केलेलें—ऐकून ताराबाईची लज्जा क्षणोक्षणीं वाढत चालली. तिला अशी धास्ती वाटूं लागली, कीं, गतवर्षीं-प्रमाणें यंदांहि जर कदाचित् कांहीं सुचिन्हें दृष्टीला पडूं लागलीं, तर या अशा मूर्खपणाच्या भाषणानें व वर्तनानें गतवर्षींच्याचप्रमाणें त्यांची विधुळवाट लागून जाईल. आज तिच्या मनाला इतके विंचू लागून राहिले होते, कीं, कैक वर्षें जरी आपल्याला व शांताक्काला पुढें पूर्ण सुखाचीं गेलीं, तरी आजचे हाल आपण विसरणार नाहीं. ती स्वतःशीं ह्मणाली "आज मला मनापासून अत्यंत हवं आहे, तें हें कीं, या दोघांशीं पुनः कधीं आमची भेट न होवो! हे असे विंचू लागतात त्याला त्यांच्या अशा नुसत्या येण्यानं काय सुख लागणार बाइ ! न आलेलेच पत्करले ! "

पण हें असें कैक वर्षांच्या पूर्ण सुखानेंहि भरून न येणारें विंचू लागणें लवकरच बरेंच उतरलें, व मनाला बराच आरामहि वाटूं लागला. ही अजब गोष्ट होण्याचें कारण इतकेंच कीं, भाऊसाहेबांचें लक्ष्य क्षणोक्षणीं शांताक्का-कडे जास्त वेधत असल्याचें ताराबाईला स्पष्ट दिसूं लागलें. तिचें स्वरूप गतवर्षाप्रमाणेंच त्यांचें मन आकर्षीत असल्याचें दिसलें. त्याचप्रमाणें शांता-क्काहि गतवर्षीप्रमाणेंच मुद्दाम मोकळ्या मनानें त्यांच्याशीं बोलूं लागली होती. तिचा हेतु असा होता, कीं, आपल्या मनांत त्यांच्याविषयीं रोष आहे असें बिलकूल दिसूं नये.ह्मणून ती आपणाकडून पुष्कळ बोलण्याचा प्रयत्न करीत होती, पण तो साहजिकच तितका साधत नसे.

जरा वेळानें दोघे जायला निघाले,तेव्हां सीताबाईनीं पूर्वीं बेत केल्याप्रमाणें त्या दोघांनांहि जेवणाचें आमंत्रण देण्याचें पतिराजांना सुचविलें, आणि आनंदरावांनींहि "हो, हो, अगदीं जरूर अवश्य या.आम्हाला तरी त्यामुळें अनायासानें सुग्रास अन्न मिळेल," असें हंसत हंसत ह्मटलें. त्यावर सीताबाई ह्मणाल्या "कधीं येतां सांगा? मी म्हणतें शुभस्य शीघ्रं! उद्यांच या! आपण मागंच यायचं कबूल केल असून आम्हांला फसवून गेलांत तें मी कांहीं विसरलें नाहीं. तुम्हीं आपला शब्द राखला नाहींत म्हणून तेव्हां माझा किती हिरमोड झाला म्हणतां ! "

हें ऐकून भाऊसाहेब ओशाळले व म्हणाले "हो, तसें झालें खरें! कामाकाजापुढें माझा नाइलाज झाला, म्हणून मी आलों नाहीं. पण आतां आपण म्हणाल तेव्हां अगदीं खास येतों."

नंतर ते दोघे निघून गेले. सीताबाईच्या तर एकदां इतकेंसुद्धां मनांत आलें होतें, कीं, त्यांनां आजच जेवायला ठेवून घ्यावेत. पण ज्याला इतका आपल्या जाळ्यांत पकडायचा आहे, असल्या भाऊसाहेबासारख्या श्रीमंत गृहस्थाला जेवण द्यायचें, तर निदान जोडीचें तरी पक्कान्न नको का, एवढ्याच संशयानें त्या मागें सरल्या होत्या !

---

## प्रकरण चोपन्नावें.

### पुनः आशा उत्पन्न झाली.

दोघे भेटण्याला आलेले गृहस्थ निघून गेल्यावर, ताराबाई बागेंत एकटीच विचार करावयाला गेली; कारण, तेथें कोणाकडून अडथळा येण्याचा संभव कमी असणार. विचार येऊन जाऊन करण्याचा विषय एकच, तो हा कीं, भय्यासाहेबांच्या आजच्या वर्तनाचा काय अर्थ करावा. तिला घडपणीं कोणताच अर्थ लागेना, व कोणचाहि अर्थ लावला तरी तो मनाला रुचेना. ती स्वतःशीं ह्मणाली "असं तोंड मिटून हुप्प होऊन बसायचं होतं, तर मग हे आले होते तरी कशाला ? आमच्या मामामामींशीं यांनां सलोख्यानं बोलतां येतं, नानाप्रकारच्या गप्पा मारून करमणूक करून घेतां येते, इतकंच काय, परवां मुंबईंत गेले होते तेव्हांसुद्धां त्यांच्याशीं मन मोकळं करून बोलले संवरले. तर मग माझ्याशींच बोलायला कुठं नडतं ? मी काय जबाब देईन त्याची भीति त्यांनां वाटते आहे म्हणावी, तर मग इथें आले कशाला ? माझ्याविषयीं प्रेमबुद्धि नाहीं म्हणावी, तर मग इतर लोकांशीं ते बोलतात तसं इथेंहि न बोलतां तोंड मिटून धरायचं काय कारण ? उगीच निव्वळ छळ मांडला आहे झालं माझा ! मी आतां मुळीं त्यांचा विचारच सोडून देतें कशी !"

तितक्यांत शांताबाईहि तेथें आली, त्यामुळें त्यांचा विचार सोडून देण्याचा निश्चय अनायासानें आपोआपच अमलांत आला. कारण, आतां येऊन गेलेल्या मंडळीच्या येण्यानें ताराबाईपेक्षां शांताक्का जास्त आनंदल्या होत्या, असें त्यांच्या चर्येवरून ताराबाईला स्पष्ट दिसून आलें. शांताबाई ह्मणाली " बरं

झालं बाई, एकदांची प्रथमची भेट पार पडून गेली. आतां मला मोकळंसं वाटूं लागलं आहे. मला माझ्या मनाचं बळ पक्कं माहीत आहे. आतां पुनः ते कधीं येतील तेव्हां माझी मुळींच चलबिचल व्हायची नाहीं. ते येत्या मंगळवारीं एकदां जेवायला येताहेत तेंहि फार बरंच आहे. त्यामुळें एकदां तिऱ्हाइतांनांसुद्धां स्पष्ट कळून जाईल, कीं, आम्हां दोघांमधें विशेष कांहीं नसून, इतर चार माणसं एकमेकांशीं बोलतात तशींच आह्मीहि साधेपणानें प्रेमशून्य रीतीनें वागतों."

ताराबाई हंसत म्हणाली "हो हो, अगदीं प्रेमशून्य,अलबत खास तसंच! शांताक्का, संभाळा हो!"

शांताबाई ह्मणाली "हें काय तारा, अजून पुनः मी घोटाळ्यांत पडेन इतकी का तूं मला कच्ची समजतेस?"

ताराबाई ह्मणाली "मला तर खास वाटतं, कीं, पूर्वीं तुह्मी घोंटाळ्यांत पडण्याचा जितका एके काळीं संभव होता, तितकाच अगदीं आज आहे! मला तर अगदीं मागच्यासारखीं सुचिन्हं दिसूं लागलीं आहेत!"

इतक्यांत कोणीसें तेथें आलें ह्मणून तें बोलणें तसेंच राहिलें. मंगळवारा-पर्यंत ते दोघे पुनः शांतिसदनाकडे आलेच नाहींत. पण भाऊसाहेबांचें अगदीं नांव सोडून दिलेल्या सीताबाई मात्र, एकवेळ अर्धा तास ते घरीं येऊन औपचारिक तऱ्हेनें भेट घेऊन गले एवढ्या कोत्या पायावर सातसात मजली शोभिवंत इमारती भराभर उभारूं लागल्या होत्या!

मंगळवारीं जेवणाला त्या दोघांच्या पंगतीला दुसरीहि कांहीं मंडळी आनंदरावांनीं बोलाविली होती.भाऊसाहेब व भय्यासाहेब तर इतर मंडळीच्या आधींच येऊन दाखल झाले, त्यामुळें आयत्या वेळीं गतवर्षींप्रमाणें कांहीं खो येतो कीं काय, अशी जी सीताबाईंनां धास्ती पडली होती, ती एकदांची निरर्थक ठरली. सर्व तयारी आहे अशी वर्दी आल्यावर मंडळी जेवणाचीं पानें मांडलीं होतीं त्या दालनांत गेलीं. गवतर्षीं भाऊसाहेब जेथें नेहमीं बहुतेक करून बसत असत, त्या शांताबाईच्या शेजारच्या पानाकडे ते आज जातात कीं काय हें ताराबाई उत्सुकतेनें पहात होती.सीताबाईंच्याहि मनांत तीच कल्पना आली असल्यामुळें त्यांनींहि शहाणपणानें त्यांनां आपणा स्वतःजवळ बसण्यास सुचविलें नाहीं. आंत आल्याबरोबर भाऊसाहेब एक

दोन मिनिटें घुटमळलेसे दिसले. तितक्यांत शांताबाईचीहि हंसतमुख दृष्टि त्यांच्याकडे वळली. मग काय, जमलेंच. ते झट्‌कन्‌ जाऊन तिच्याच शेजारीं नेहमींप्रमाणें बसले.

विजय मिळविल्यासारखा उल्हास वाटून ताराबाईनेंहि त्यांच्या मित्रांना तें कसें रुचलें तें पहाण्याकरितां भय्यासाहेबांकडे दृष्टि फेंकली. पण त्यांच्या चर्येवर नापसंतीचें चिन्ह उमटलेलें दिसेना. त्यामुळें अशा तऱ्हेनें सुखी होण्याची भय्यासाहेबांनीं सदर परवानगी त्यांनां दिली असावी, असा तिचा समज होत होता. इतक्यांत भाऊसाहेबांनींहि भय्यासाहेबांकडे जणूं भीतभीत अवघट हंसत पाहिल्याचें तिच्या नजरेला पडलं.

जेवण चालू असतां भाऊसाहेब हळुहळू शांताबाईशीं बोलण्यांत गुंग होत चाललेसे दिसूं लागले. जरी अजून गतवर्षीइतके ते तिच्या भाषणांत गुरफटून जात नव्हते, तरी एकंदरींत ताराबाईला अशीं लक्षणें स्पष्ट दिसूं लागलीं, कीं, आतां मध्यें जर कोणीं विनाकारण लुडबूड न करितां त्यांनां हवें तें करण्यास मोकळें सोडून दिलें, तर शांताक्कांची व त्यामुळें आपलीहि सर्व आशा लवकरच पूर्ण होईल. आज इतक्यांतच फार दूरवर पल्ला बांधणें ठीक नाहा खरें, पण आजच्या त्यांच्या वागणुकीवरून मनाला आल्हाद होणें अगदीं वाजवी होतें. तसा तिला बराच आल्हादहि झाला. पण आज ती फारशी खुषींत नव्हती. कारण तिचें स्वतःचें पान भय्यासाहेबांच्या पानापासून अतिशय दूर गेलें होतें, व त्यांच्या शेजारीं एका बाजूला सीताबाईचें पान होतें. अशा दोघांनां एकमेकांपासून काय मौज वाटणार ती उघडच होती. त्यांचें काय बोलणें चाललें होतें तेंहि ताराबाईला ऐकूं येण्यासारखें मुळींच नव्हतें. पण तिला इतकें सहज दिसे, कीं, आधीं तीं दोघें फारशीं एकमेकांशीं बोलतच नव्हतीं, व मधून मधून थोडेंसें बोललींच तर तें अगदीं औपचारिक व वरवरचें असे असें दिसे. आपल्या घरीं जेवायला बोलावलेल्या गृहस्थाशीं आपल्या आईनें इतकें तुटकपणानें वागावें, हें पाहून त्यांनीं आपल्या घराण्यावर केलेल्या उपकारांचें जास्तच महत्त्व तिला वाटूं लागलें, व असल्या कृतघ्नपणाच्या वर्तनावर विरजण पाडण्याकरितां तरी निदान तिला अंतःकरणापासून अशी इच्छा होऊं लागली, कीं, काय वाटेल ती युक्ति करून आपण एकदां त्यांनां सांगून टाकावें, कीं, आपण आमच्यावर जे उपकारांचे डोंगर लादून

ठेविले आहेत, ते आम्हांला ठाऊक नाहींत असें नसून, आह्मांला त्यांची खरी किंमतहि समजते आहे.

जेवणावरतीं ताराबाईची अशी फसगत झाली. आतां तिची फक्त भिस्त एवढ्यावरच राहिली होती, कीं, जेवणानंतर पानसुपारी, सोडावॉटर वगैरे घेण्याला मंडळी दिवाणखान्यांत जमतील तेव्हां तरी आपणाला भय्यासाहेबांशीं दोन शब्द बोलायला सांपडतील. या आशेवर ती अगदीं टपून होती. म्हणून ती अर्ध घटका आपणाला काय समाधानवृत्ती आणून देते तें पहावें, असें तिला होऊन गेलें होतें. "त्या वेळांत जर ते मजकडे मुद्दाम आले नाहींत, तर मग मीं साफ अशा सोडून दिलीच पाहिजे!" असें ती स्वतःशीं म्हणाली.

पण आज ताराबाईलाहि फारशी फुरसत नव्हती. घरच्या घरीं ताजें सोडावॉटर करण्याचें छोटेंसें यंत्र आनंदरावांनीं नुकतेंच मुंबईहून आणविलें होतें. अर्थात् ताराबाई हुषार म्हणून सीताबाईनीं मंडळीचीं जेवणें झाल्याबरोबर त्यांनां एक एक ग्लास भरून सोडावॉटर देण्याची कामगिरी ताराबाईवर सोंपविली होती. शांताबाईकडे फक्त गुलाबदाणींतून गुलाबपाणी देण्याचें काम होतें, पण तें अगदीं अखेरीला असल्यामुळें तिला फुरसत रगड होती. ती नेहमींप्रमाणें भाऊसाहेबांशीं गप्पागोष्टी करूं लागली होती. पण ताराबाईचें काम आधीं एकदम झालें पाहिजे, व सर्वांनां हवें तेवढें सोडावॉटर पुरविण्याची जबाबदारीहि तिच्यावर होती. नवीन तऱ्हेचें यंत्र असल्यामुळें लहानलहान मुलें व शेवंती, सारजाबाई अशांचा जंगी घोळका ताराबाईच्या त्या यंत्राच्याभोंवतीं जमा झाला; तो इतका, कीं, कोणाला मध्यें शिरकण्याची मुष्कील होऊन गेली. अशा स्थितींत भय्यासाहेबांशीं आपले दोन शब्द कसे होतात याची तिला शंकाच होती. तितक्यांत सोडा घेण्याकरितां म्हणून भय्यासाहेब तिच्याकडे येतातसे दिसल्याबरोबर शेवंती जास्तच कोंडाळें करून हळूच ताराबाईला म्हणाली "इथें पुरुषांचं काय काम आहे यायचं! जाग्यावर बसल्या बसल्या सोडावॉटर चालत येईल. नाहींग ताराबाई?"

ताराबाईला शेवंतीचा असा संताप आला, कीं, दोन्ही हातांनीं तिला दूर जशी कांहीं लोटून भय्यासाहेबांनां आपणाजवळ येण्याला जागा करून द्यावी! पण उपयोग काय? ही गर्दी पाहून भय्यासाहेब दिवाणखान्यांत दूर दुसरीकडे जाऊन मंडळीशीं गप्पा मारीत उभे राहिले. एका वाढप्यानें तेथें

त्यांनां सोड्याचा ग्लासहि नेऊन दिला.आतां तर आशा संपलीच ! ताराबाई भारी खट्टू झाली. ते ज्यांच्याज्यांच्याशीं बोलत अथवा हंसत त्या माणसांचा तिला अतिशय मत्सर वाटूं लागला. कोणी सोडा मागायला आलें तर त्याच्याशीं धडपणीं बोलूंच नये, असेंहि होऊं लागलें, व नंतर मग तिचा तिलाच रागहि येऊं लागला. ती म्हणाली "कितीतरी मी गाढव ! एकदां त्यांची इतकी शोभा करून स्पष्ट नाहीं मीं म्हटलं, अन् आतां त्यांची इच्छा मनांत धरून बसतें अं ? त्यांत मुळींतरी शहाणपणा आहे का माझा ? पुरुषांच्यामधें असा अपमान स्त्रीनं केलेला कधीं खपत नाहीं म्हणतात. अशा तऱ्हेनं एकदां लाथा खाऊन पुनः जर ते मजकडे तोंड वगाडीत गेल्याचं इतर पुरुषांनां समजलं, तर त्यांनां कोडगाच म्हणतील ! मी मुळीं असली भलती आशा धरतें हाच माझा मूर्खपणा ! "

अश विचारांत ती आहे तों तिच्या भोंवतालचें कोंडाळेंहि मोडून गेलें. अजून कोणाला सोडा लागलाच तर द्यावा अशा हेतूनें ताराबाई अजून यंत्राशींच होती. तितक्यांत सोड्याचा रिकामा ग्लास घेऊन भय्यासाहेबच तिच्याकडे आले. तिनेंहि हंसत "आणखी सोडा हवा का?" असें भीतभीत विचारलें.

भय्यासाहेब म्हणाले "हो, एकादा ग्लास चालेल. जेवण बरेंच सडकून झालें आहे, त्यावर सोडा गेलेला चांगलाच !"

ताराबाईनें त्यांचा ग्लास भरून देत असतां पुनः विचारले "आपली सरलादेवी अजून दिलबहारांतच आहे का ? "

भय्यासाहेब म्हणाले " हो, अजून महिनाभर राहणार आहे."

ताराबाई म्हणाली "एकटीच आहे का ? दुसरी मडळी गेली वाटतं ?"

भय्यासाहेब म्हणाले "एकटी नाहीं, तिची गवर्नेस सुलोचनाबाई आहे बराबर. दुसरी मंडळी ग्वालेरीला गेली आहेत आज पंधरा दिवस. "

जास्त काय बोलावें तें तिला सुचेना. पण त्यांनां सुचलें तर त्यांनीं बोलावें अशी तिची मुद्रा दिसत होती. तेहि दोनचार मिनिटें सोड्याचे घुटके घेत पण कांहीं न बोलतां तेथें उभे होते. इतक्यांत आणखी कोणी मंडळी सोडा मागण्याला आली, त्याबरोबर ते निघून गेले. नंतर पानसुपारी अत्तर गुलाब वगैरे झाल्यावर मंडळी घरोघरीं चालती झाली. सीताबाईनीं ऊन्ह कमी होईपर्यंत त्यांनां ठेवून घेण्याचा विचार केला होता, पण त्यांची गाडी आल्यामुळें तोहि फसला.

## पुनः आशा उत्पन्न झाली.

मंडळी सर्व निघून जातांच सीताबाई उल्हासानें ह्मणाल्या "कसं काय ग झालं मुलींनों ? फक्कड बेत उडाला, नाहीं बरं ? स्वैंपाक तर अगदीं छान झाला होता. जिलब्या फार नामी साधल्या होत्या. लोकं अगदीं म्हणूं लागलीं, कीं, असे पदार्थ आपण कधींच कुठं पाहिले नव्हते! परवां रावबहादुरांच्या घरीं सांबारं काय पण धडान गोडाचं झालं होतं ! आजचं आपल्या इथलं त्याच्या निदान पन्नास पटीनं तरी छान खमखमीत बनलं होतं. भय्यासाहेबांच्या घरीं नेहमीं अगदीं पट्टीचे आचारी असतील ना, पण तेसुद्धां मला ह्मणाले, कीं, त्यांच्या घरीं वाटलीडाळ अशी उत्तम कधींच होत नाहीं—अन् माझी शांती आज किती सुंदर दिसत होती ह्मणून सांगूं ! आजच्याइतकी ती झकपक कधींच दिसली नाहीं. मीं सारजाबाईला विचारलं तेव्हां ती मुळीं स्पष्ट तसं ह्मणालीचना ! अन् आणखीहि काय ह्मणाली तें कुठं माहीत आहे तुह्मांला ? ती ह्मणाली, कीं "सीताबाई,तुमची शांता खास आनंदभुवनाची राणी होणार बरं ! ' खरोखर, अगदीं अस्सं ह्मणाली ! सारजाबाईसारखी हुशार बायको फार विरळा. आहेच ती मोठी चांगली ! तिच्या त्या भाच्याहि हंसूनखेळून चांगल्या मुली आहेत. आतां, त्या सुरेख नाहींत त्याला त्यांनीं काय करावं ? पण एकंदरींत मला त्या भारीच आवडतात."

अशा तऱ्हेनें सीताबाई अत्यंत आनंदून गेल्या होत्या. भाऊसाहेबांच्या शांताबाईशीं झालेल्या वर्तनावरून त्यांनां पुनः पराकाष्ठेची आशा उत्पन्न झाली होती, व ती आशा सफल होऊन शांताबाई आनंदभुवनाची राणी झाल्यापासून किती तरी अनेक फायदे आपल्या घराण्याला होतील, अशी सुखमय कल्पना त्या करीत बसूं लागल्या. हळुहळू त्यांनीं आपलें मन इतकें हुरळून ठेवलें, कीं, उद्यांच्या उद्यांसुद्धां भाऊसाहेब येऊन तिला मागणी घालतील, व तसें जर त्यांनीं करण्याचें चुकविलें तर खरोखर आपला फार हिरमोड व निराशा होईल, असें त्यांनां पूर्णपणें वाटूं लागलें.

दोघी थोरल्या बहिणी एकीकडे भेटल्यावर शांताबाई ह्मणाली "आजचा बेत चांगला झाला, मंडळीहि सगळी शहाणी सुर्तीं होती, व एकमेकांशीं जुळण्यासारखी होती. पुनः अशा मंडळीमधें आपल्या भेटी वारंवार होतीलच!"

ताराबाई फक्त हंसली. त्यावर शांताबाई पुनः ह्मणाली " हंसूं नको. हंसतेस कां तू ? तुला अगदीं दुसरा तिसरा संशय नको यायला. अशी तूंच हंसूं लागलीस ह्मणजे मी मग खट्टू होतें. मी तुला खरोखरच सांगतें, कीं,

इतर चार माणसांप्रमाणंच भाऊसाहेबांशींहि बोलणंसंवरणं मला आवडतं, इतकंच. यापेक्षां कांहींएक जास्त नाहीं. आजच्या त्यांच्या माझ्याशीं बोलण्याच्या पद्धतीवरून तर मला स्पष्ट दिसतं, कीं, मजवर प्रेम करण्याचा त्यांचा आजपर्यंत कधींच हेतु नव्हता. इतर लोकापेक्षां ते स्वभावतःच जास्त गोड व मनमिळाऊ आहेत, व लोकांशीं मर्यादेनं कसं वागावं तें त्यांनां जास्ती समजतं, इतकंच काय तें ! ”

ताराबाई हंसत हंसत ह्मणाली “तुमचा आपला जुलूमच आहे माझ्यावर ह्मणायचा ! तुह्मी मला हंसूंहि देत नाहीं, अन् बोलतांहां मात्र असं, कीं, पदोपदीं मला हंसूं येतं आहे ! ”

शांताबाई ह्मणाली “ आपलं ह्मणणं लोकांनां खरं मानायला लावणं कधींकधीं किती कठिण जातं ! अन् केव्हां केव्हां तर अगदीं अशक्यच होतं! मी स्पष्ट कबूल करतें आहें त्यापेक्षां माझ्या मनाला जास्त वाटतं आहे असा तूं आग्रह कां धरतेस ? ”

ताराबाई ह्मणाली “ प्रश्नाचा जबाब द्यायला मला आत्तां येत नाहीं, इतकंच. दुसऱ्यांनीं आपलं ह्मणणं खरं समजावं अशी माणसाला फार हौस असते खरी; पण जेवढं लोकांनां उघड दिसतं, तितकंच आपलं बोलणं लोकं खरं मानतात त्या गोष्टी आतां मला नका सांगूं. अजूनहि जर तुह्मी समजत असाल, कीं, तुमचं मन अगदीं प्रेमशून्य आहे, तर हें असलं माझ्याशीं तरी बोलूं नका!”

---

## प्रकरण पंचावन्नावें.

### अखेर यश आलें !

त्यानंतर चार दिवसांनीं भाऊसाहेब पुनः भेटावयाला आले, आणि तेहि एकटेच. भय्यासाहेब आज सकाळीं मुंबईला गेले, ते आतां आठरहा दिवस परत येत नाहींत, असें ते ह्मणाले. चांगले एक तास इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलत ते राहिले, व तेव्हां ते मोठ्या खुषींतहि असलेले दिसले. दहा वाजायला आले तेव्हां सीताबाईनीं “मग आतां जेवायलाच रहाना ? ” ह्मणून त्यांनां ह्मटलें; पण “काय करावें, त्या याच्याकडे आज जेवायला जायचें कबूल केलें आहे, नाहीं तर राहिलों असतों, ” असें त्यांनीं उत्तर दिलें.

सीताबाई ह्मणाल्या “बरं, पुनः याल भेटायला, तव्हां पाहूं आमचा योग असला तर ! ”

भाऊसाहेब ह्मणाले " हो हो, त्यांत योग कसचा ? मीं काय मोकळाच असतों. केव्हांच येऊन ह्मणेन, कीं, मी जेवायला आलों हो ! "

सीताबाई ह्मणाल्या "उद्यांच याना तर मग ! "

भाऊसाहेब ह्मणाले "ठीक आहे. उद्यां कुठें जायचें नाहीं. खास येतों!"

दुसऱ्या दिवशीं भाऊसाहेब इतक्या लवकर येतांना दिसले, कीं, एकीचीहि तयारी झालेली नव्हती. सीताबाईंची कोण धांदल आणि त्रेधा उडाली म्हणतां! त्यांची स्वतःची वेणीफणी अर्धीच झालेली होती, ती तशीच हातांत धरून त्या मुलींच्या बसायच्या ठिकाणीं ओरडतच गेल्या " अग शांते, आटप आटप झटकन्!अग ते आले—अग थट्टा नव्हे. खरोखरच भाऊसाहेब आले. अगदीं खरं. जलदी कर जलदी. हरणे, ए हरणे, आधीं एकदम शांतीकडे ये, अन् तिच्या त्या गुलाबी पिलावाच्या निऱ्या झटकन् करून दे. तारीची वेणी राहूं दे तशीच !"

शांताबाई म्हणाली "हो, आमचं आटोपलं कीं आलोंच. हिरी बहुतकरून पुढं गेली आहेच. तिला अर्धा तास झाला इथनं जाऊन. "

सीताबाई त्रासून म्हणाल्या "अग मरो हिरा! तिचा काय संबंध आज? आटप म्हटलंना झटकन् ? तुझा तो पाल्का कुठं आहे बरं! "

अशी गडबड करून सीताबाई निघून गेल्या, पण ताराची तयारी झाल्याशिवाय शांताबाई एकटी खालीं जाईना. नंतर दोघी गेल्या.

सकाळची वेळ इकडे तिकडे गप्पा मारण्यांत गेली. नंतर रीती-प्रमाणें जेवण झालें. अर्थात् उन्हांतून परत न जाण्याचा आग्रह सीताबाईंनीं केला, व आज भाऊसाहेबांनींहि तो ऐकला. दोन वाजेपर्यंत ते दिवाणखान्यांतच एका कोचावर लोळत पडले होते. नंतर चहा होईपर्यंत तास दीड तास अवकाश होता. आनंदराव नित्यप्रमाणें लायब्ररींत गढून राहिले होते. मथुरी वर आपल्या खोलींत अभ्यास करीत होती. अशा दोन अडचणी आपोआप नाहींशा झाल्या होत्या. फक्त आपण, तारा व हिरी एवढीच मंडळी दूर गेली, तर भाऊसाहेबांनां शांतीशीं बोलायला संधि मिळेल, या हेतूनें सीताबाईंच्या जिवाची अगदीं धडपड चालला होती. त्यांनीं आपणाकडून नाना प्रकारच्या खुणा करून तारीहिरींनां बाहेर जाण्याचा इषारा दिला, पण व्यर्थ ! ताराबाई मुद्दामच आईकडे बघेना. आणि अखेर एकदांची

हिरीच्या लक्ष्यांत आईची खूण आली तेव्हां ती ह्मणाली "काय म्हणतेस आई? मला खूणबीण कांहीं कळत नाहीं ! मी काय करूं तें स्पष्ट सांग !"

सीताबाई घोंटाळून ह्मणाल्या "छे ग बाळ, मी मुळींच खुणा नव्हतें करीत."

असें ह्मणून त्या पांच मिनिटें स्वस्थ राहिल्या. पण अशी सोन्यासारखी संधि त्यांच्यानें वांया दवडवेना, ह्मणून त्या एकदम उठून बाहेर जाऊं लागल्या, व जातां जातां हिरीला ह्मणाल्या "हिरे, बाळ, जरा वर चल बरं मजबरोबर !"

त्या दोघी गेल्याबरोबर शांताबाईनें ताराकडे अशा अर्थपूर्ण नजरेनें पाहिलें, कीं, "हें काय बरं असं ? तूं कांहीं हें आईचें ऐकूं नकोस."

हा तिचा अर्थ ताराबाई स्पष्ट समजली. दोन तीन मिनिटांतच सीताबाईनीं दार उघडून दारांतूनच ताराला म्हटलें "तारा, जरा इकडे ये बरं !"

आतां ताराबाईचा केवळ नाइलाज झाला ह्मणून ती आईच्याकडे बाहेर गेली. तों सीताबाई तिला हळूच ह्मणाल्या "इतकं कसं तुला कळत नाहीं! त्या दोघांनांच आपण एकटं सोडलं पाहिजे कांहीं वेळ ! मीन् हिरी वर माझ्या खोलींत जाऊन बसतों आहोंत !"

आईशीं ताराबाई आतां वाद घालीत बसली नाहीं. हिरीला घेऊन आई वर गेल्याबरोबर ती पुनः दिवाणखान्यांत येऊन गोष्टी बोलूं लागली. साडेचार वाजतां चहा येईपर्यंत त्या त्रिवर्गांच्या फार आनंदानें गप्पा चालल्या होत्या. ते नाना प्रकारच्या विषयावर बोलत, नवी नवी माहिती विचारीत व सांगत. ताराबाईनें केलेल्या प्रवासाच्याहि रगड गोष्टी झाल्या. अशा तऱ्हेनें दोन तास फार मौजेंत गेले. चहाची वेळ होतांच पुनः सर्व मंडळी दिवाणखान्यांत जमली. सीताबाईंनां आपली खटपट ऑफस् झाल्याचें कळून वाईट वाटलें. नंतर अर्धा तास चहा व गप्पा सर्वांच्या मिळून झाल्या. सीताबाई मध्यें मध्यें नेहमींच्या पद्धतीनें जर कांहीं अचरट बोलल्या, तर भाऊसाहेब तें न ऐकलेंसें दाखवीत, किंवा त्याचा शहाणपणाचा अर्थ लावून घेणें शक्य असल्यास तसा लावून घेत. अखेर त्यांची गाडी तयार होऊन येतांच आनंदरावांनीं "त्यांनां उद्यां सकाळीं शिकारीला याल का?" ह्मणून विचारलें व तें त्यांनींहि कबूल केलें.

असें आणखीहि दोनतीन वेळां होऊन गेलें. भाऊसाहेब आनंद-भुवनांत एकटेच असल्यामुळें त्यांनांहि तेथें एकट्याला करमत नसे,

व आनंदरावांच्या घरीं तर त्यांनां निरंतरचेंच आमंत्रण मिळाल्यासारखें होतें. एकंदरींत सर्व रंग असा दिसूं लागला, कीं भय्यासाहेबांनीं मध्येंच कांहीं विघ्न येऊन घातला नाहीं, तर या सर्व गोष्टींनां अत्यंत मधुर असें फळ लवकरच खास येईल. ताराबाईला मात्र स्वतःला असें वाटत होतें, कीं, हें सर्व भय्यासाहेबांच्या पूर्ण संमतीनेंच चाललेलें असावें.

भाऊसाहेबांचें आनंदरावांशींहि चांगलें छान जमत चाललें होतें. शिकारीला जात तेव्हां, अगर लायब्ररींत आनंदरावांच्या ग्रंथाविषयीं बोलत असतांना, ते आनंदरावांनां कल्पना नव्हती इतके बहुश्रुत असल्याचें त्यांनां समजून आलें. त्यांच्यांत अचरटपणा अथवा आढ्यता यांचा लेशहि नव्हता, त्यामुळें आनंदरावांनां त्यांची कुचाळी करण्याचें कधीं प्रयोजन पडलें नाहीं.

एके दिवशीं भाऊसाहेब चार वाजतां चहाला येऊन रात्रीं जेवण करून परत जायचे ठरलें होतें. चहा आटोपल्यावर ऊन्ह कमी होतांच मंडळी टेनिस कोर्टावर खेळण्यांत गुंतली होती. बाहेरचीहि दोनचार मंडळी खेळावयाला आली होती, त्यांचा खेळ चालला होता. कांहीं जवळच्या खुर्चांवरून खेळ पाहात होती. ताराबाईला तितक्यांत एक जरूरीचें पत्र ल्याहायची आठवण झाली. म्हणून ती दिवाणखान्यांतल्या टेबलावर तें ल्याहावें म्हणून झट्कन् दार उघडून आंत शिरली, तों भाऊसाहेब व शांताक्का थोरल्या आरशासमोर उभीं राहून विशेष उत्सुकतेनें बोलत आहेत, असें तिनें पाहिलें. तिला तेवढ्यावरून जरी संशय कदाचित् नसता आला, तरी दार उघडल्याचा आवाज ऐकून झट्कन् दोघेंहि जरा दूर होऊन मागें पाहतात, तों त्यांच्या चर्येवरून ताराबाई सर्व समजून गेली. त्यांनां तर चोरट्यासारखें झालें असेलच; पण ताराबाईला तर अगदीं मेल्यासारखें वाटलें. ती तशीच मागच्या पावलीं निसटणार होती, इतक्यांत भाऊसाहेब स्मित करीत तिच्याकडे आले, व हातानें खूण करीत आनंदानें म्हणाले " या या, आपण आलांत तर चालेल, आपली कांहीं आह्मांला अडचण नाहीं होत. आपण या घटकेपासून आमची मेव्हणी व्हायचें ठरलें बरें का!"

असें ह्मणून ते बाहेर निघून गेले. नंतर शांताबाईनें डोळ्यांत आनंदाश्रु येऊन ताराबाईला घट्ट मिठी मारली व सद्गदित कंठानें ती ह्मणाली "खरंच तारा, आज माझ्यासारखी नाशिबवान मीच! देवानं अत्यंत—अत्यंत सुखाचा आज दिवस दाखविला. असाच साऱ्यांनां कां नाहीं बरं तो आणीत!"

ताराबाईनेंहि अत्यंत हर्षपूर्वक आक्कांचें अभिनंदन केलें. आज तिला किती उल्हास वाटला, किती पराकाष्ठेचा आल्हाद झाला, तें वर्णन करणें सोपें नाहीं. थोड्या क्षणांनीं शांताबाई आपला आनंद बाजूला करून ह्मणाली " छे, आतां आपणाला इथें असा वेळ घालविणें नीट नव्हे. एकदम आईकडे जाऊन तिला ही अत्यंत मधुर गोष्ट कळविली पाहिजे. माझ्याशिवाय दुसऱ्या कोणाच्याहि तोंडून हें तिला कळतां उपयोगी नाहीं. मी जाऊन आधीं तिला सांगतें ते स्वतः बाबांनां भेटून त्यांची संमति मागण्याला गेलेच आहेत. अहाहा, ही आजची वार्ता ज्याच्या ज्याच्या कानीं पडेल त्याला किती तरी हर्ष होईल ! इतकी सुंदर कृपा परमेश्वरानं आज मजवर केली आहे, त्याची मी कशी उतराई होईन ! "

असें म्हणन ती आईकडे निघून गेली. ताराबाई दिवाणखान्यांत एकटी राहिली. तिच्या डोक्यांत नानाप्रकारचे विचार एकसारखे येत होते. ती अत्यंत समाधानानें स्वतःशीं म्हणाली " अहाहा ! अखेर इतका गोड, इतका सुंदर असा परमेश्वरानं प्रसाद दिला अं ! काय मित्रांनीं खटपटी केल्या, बहिणींनीं किती लपंडाव, किती लबाड्या लढवल्या, नानाप्रकारचे उपद्व्याप केले; पण त्या सर्वांनांहि न जुमानतां अत्यंत सौख्यदायक, अत्यंत न्याय्य अन् अत्यंत योग्य असं मधुर फळ आह्मांला लाभलं अं ! धन्य आहे परमेश्वरा तुझ्या कर्तबगारीची ! "

थोड्या मिनिटांनीं तेथें भाऊसाहेब आनंदरावांनां भेटून परतसुद्धां आले. त्या दोघांच्या भाषणाला फारच थोडा वेळ सहज पुरला. उघडच आहे. असला जांवई मिळाल्यावर संमतीला अवकाश काय ह्मणून लागणार ?

भाऊसाहेबांनीं हंसत विचारलें "आपली बहीण कोठें आहे ? "

ताराबाई ह्मणाली " वर आईकडे गेली आहे, इतक्यांत येईल. "

भाऊसाहेब तिच्या जवळ येऊन एका खुर्चीवर बसले. त्यांच्या चर्येवर परमानंद दिसत होता. ते मोठ्या उल्हासानें ह्मणाले " बाबासाहेबांनींहि फार खुषीनें आपली संमति दिली. आतां मला ह्मणायला संशय वाटत नाहीं, कीं, तुह्मी खास आतां आमच्या मेव्हणी होणार ! अहाहा, तुमची बहीण किती गोड स्वभावाची, किती सदा हास्यमुख दिसते ह्मणून सांगूं. ग्वाल्हेरीपासून मी पहात पहात आलों, तों इथें मला इतका सद्गुणांचा ठेवा अशा सुस्वरूपाशीं मिळून असलेला गवसला. अशी सर्वगुणसंपन्न स्त्री मीं दुसरी

कुठेंहि पाहिली नाहीं. धन्य माझें नशीब, कीं, इतकी सर्वांगसुंदर स्त्री मला लाभली. आतां माझी संसारयात्रा अत्यंत सुखमय होईल, यांत यत्किंचित्‌हि संशय नको. अशी गृहिणी लाभल्यावर माझें आनंदभुवन खरोखरच सार्थ होईल ! ”

प्रेमाच्या भरांत सर्वच पुरुष कदाचित् असे उद्गार काढीत असतील ! पण आतां भाऊसाहेब बोलताहते तें अगदीं अक्षरशः खरें आहे, असें ताराबाईलाहि मनापासून निःसंशय वाटत होतें. शांताक्का व भाऊसाहेब अशा दोन सुवृत्त व सुबुद्ध माणसांचा संबंध अत्यंत श्लाघ्य, अत्यंत मनोहर व अत्यंत आनंदपर्यवसायी होईल,यांत संशय कशाला ? ताराबाईनेंहि अत्यंत मनःपूर्वक भाऊसाहेबांचें अभिनंदन केलें.

आज शांतिसदनांत आनंदाला काय तोटा?शांताबाईच्या चर्येवर आनंदाचें इतकें मनोहर हास्य व तेज पसरून राहिलें होतें, कीं, ती आज एखाद्या स्वर्गलोकींच्या परीसारखी दिसूं लागली. हिरी हर्षानें अगदीं उड्या मारूं लागली, व आपलीहि पाळी आतां जवळच आली असें मानून खूष होऊन गेली. मधुरी बाहेर एकटी फिरायला गेली होती,तिला घरीं आल्याबरोबर ही बातमी लागतांच, आपल्या खोलींत जाऊन या प्रसंगाला योग्य असें एक लहानसें भाषण जुळवीत बसण्यांत ती गढून गेली. सीताबाईच्या आनंदाच्या उकळ्या भाऊसाहेबांजवळ अर्धा तास फुटत होत्या, तरी अजून उकळी कमी होण्याचें चिन्ह दिसूं लागलें नव्हतें. आनंदराव जेवणाकरितां मंडळींत आले ते जरी त्याबद्दल प्रत्यक्ष कांहींच बोलले नाहींत, तरी त्यांच्या बोलण्याच्या स्वरावरून व इतर नानाप्रकारानें त्यांचें अंतःकरण आनंदमय झालें असल्याचें उघड होत होतें.

जेवणें झाल्यावर भाऊसाहेब आनंदभुवनाकडे निघून गेले, त्याबरोबर मंडळी परत दिवाणखान्यांत आल्यावर आनंदराव म्हणाले “शांते,फार छान झालें ! तुला भारी सौख्य लागेल ! ”

शांताबाई पटकन् त्यांच्यापुढें जाऊन त्यांच्या पायां पडली, तशीच मातुश्रींच्याहि पडली, पण लज्जेनें कांहींच बोलली नाहीं. आनंदराव पुनः ह्मणाले “ तूं फार सज्जन मुलगी आहेस.तुला इतकें उत्तम स्थळ मिळालेलें पाहून मला फार बरें वाटतें आहे. तुह्मां दोघांचा संसार अति सुखाचा होईल, यांत संशय नाहीं.तुमचे स्वभावहि एकमेकांशीं छान जुळण्यासारखे आहेत.

दोघांनांहि दुसऱ्याचें मत इतकें विचारावेंसें वाटतें, कीं, तुह्मां दोघांमध्यें निश्चय असा कधींच कोणत्या गोष्टीचा व्हायचा नाहीं ! दोघेंहि इतकीं साधीं भोळीं आहां, कीं,एकूनएक नोकर तुह्मांला सदा फसवील ! अन् दोघांनांहि उदारबुद्धी इतकी आहे, कीं, एवढें मोठें तुमचें उत्पन्न आहे,तरी त्याच्याहि पेक्षां जास्ती तुमचा खर्च होत जाईल !"

शांताबाई लाजून ह्मणाली"छे बाबा,द्रव्याच्या बाबतींत उधळमाधळ किंवा अविचार माझ्या हातून तर कधीं न होवो ! "

सीताबाई उद्गारल्या " काय ? उत्पन्नापेक्षां खर्च जास्ती होईल! भलतंच कांहीं तरी बोलायचं झालं ! केवढं तरी त्यांचं उत्पन्न आहे ! अहाहा, शांते पोरी, आज तूं मला खरं सुखी केलंस ! या हर्षानं मला आतां आठ दिवस कांहीं दुसरं सुचायचं नाहीं,अन् आज तर सगळ्या रात्रींत डोळ्याला डोळा नाहीं लागणार ! मला हें असं शुभ चिन्ह आज कितीक वर्सं दिसतच होतं. मी नेहमीं म्हणायची ना, कीं, ही इतकी सुरेख कांहीं देवानं उगीच नाहीं केलीन्. गतवर्षी भाऊसाहेबांनीं आनंदभुवन भाड्यानं घेतल्याचं मला समजलं मात्र, त्याचक्षणीं मीं ठरवलं, कीं, ते शांतीशीं लग्न लवणार! पहा बरं मी कशी चतुर आहें ती ? "

आज सीताबाईनां शांताबाईच्या व भाऊसाहेबांच्या पुढें त्यांची लाडकी सुंदर व तिचे फक्कड नागेशराव यांचासुद्धां विसर पडला. मथुरीच्याहि नजरेनें शांताक्काची किंमत आज एकदम किती तरी वाढून गेली.आपल्याला आनंदभुवनाच्या लायब्ररींतलीं रगड पुस्तकें आतां वाचायला मिळतील ह्मणून तिला विशेष आनंद झाला,तर हिरीला तेथें आतां वारंवार इव्हिनिंग पार्ट्यां होतील ह्मणून हर्ष होऊं लागला.

तेव्हांपासून भाऊसाहेब रोज शांतिसदनांत येत, हें उघडच आहे. कधीं कधीं तर ते सकाळीं चहालाच येत ते रात्रीचीं जेवणें झाल्यावर घरीं परत जात. नेहमीं सकाळच्या जेवणाला तर असायचेच.फक्त कधीं कोणीं गृहस्थानें त्यांनां मध्येंच जेवणाचें आमंत्रण दिलें तर त्यांचा नाईलाज होई, व त्यामुळें ते तिकडे गेले ह्मणजे त्या गृहस्थावर सीताबाईची पुष्पांजळी मात्र होई.

आतां शांताबाईशीं गप्पागोष्टी करण्याला ताराबाईला पूर्वीप्रमाणें अवसर सांपडेनासा झाला. कारण भाऊसाहेब घरांत असत तेव्हां दुसऱ्या

कोणाशीं बोलायला आक्कांनां फुरसत असे कोठें ? परंतु जेव्हां कधीं कांहीं इतर कारणांनीं भाऊसाहेब एकटे असत, तेव्हां ते ताराबाईशीं बोलत रहात, व भाऊसाहेब घरांत नसतील तेव्हां तिच्याशीं शांताक्काहि कधीं कधीं बोलत राही. अशीच एक दिवशीं ती बोलत बसली असतांना शांताबाई ह्मणाली " काल आमच्या सहज गोष्टीवरून गोष्टी निघाल्या होत्या, तेव्हां त्यांनीं मला स्पष्ट सांगितलं, कीं, गतवर्षीं मी चार महिने पुण्यामुंबईत होतें हें त्यांनां बिलकूल ठाऊक नव्हतं. हें ऐकून मला किती बरं वाटलं म्हणतेस. मला दिखील कधीं शक्य वाटलं नव्हतं, कीं, त्यांनां तें तेव्हां माहीत असेलसं."

ताराबाई म्हणाली " मला तर संशय आलाच होता, कीं, हें बहिणींनीं चोरून ठेवलं असेल; पण त्यांनीं त्याचा खुलासा काय केला ?"

शांताबाई म्हणाली " खुलासा दुसरा कशाला ? बहिणींनीं केलं हें स्पष्टच आहे. त्या दोघींनां प्रथमपासूनच आमचा दृढ संबंध व्हावा असं वाटत नव्हतं. पण त्याचं मला नाहीं इतकं वाईट वाटत. कारण, माझ्यापेक्षां सर्व प्रकारें जास्त लायक बायको त्यांनां सहज मिळाली असती. पण आतां जों जों त्यांची माझ्याशीं जास्त सलगी होत जाईल, तों तों त्यांनां दिसून येईल, कीं, माझ्यापासूनहि त्यांच्या भावालासौख्य प्राप्त होतं, अन् तसं त्यांनां कळलं म्हणजे त्यांचं समाधान होऊन त्या माझ्याशीं नीट सलोख्यानं राहतील. बाकी आतां किती झालं तरा पूर्वीं जसं प्रेम मला त्या दोघींविषयीं वाटत असे, ती घडी कांहीं फिरून कधीं यायची नाहीं."

ताराबाई म्हणाली "अरे वा! इतकं निष्ठुर भाषण आक्कांनीं आजच तोंडांत येऊं दिलं. बरं बरं, आतां तरी तुम्ही त्यांनां फसून जाणार नाहीं, हें तरी एक पसंतच झालं !"

शांताबाई म्हणाली "काय तुला सांगूं तारा, गतवर्षी जेव्हां ते इथनं पुण्याला गेले, तेव्हांच खरोखर मजवर अत्यंत प्रेम होतं. अन् मागून लोकांनीं पुण्यास मनांत भरवून दिलं, कीं, मी प्रेमशून्य आहें, म्हणूनच केवळ ते इकडे यायचे राह्यले. कोणाला हें खरंसुद्धां वाटणार नाहीं."

ताराबाई म्हणाली "त्यांनीं तरी बहिणींचं म्हणणं खरं मानण्यांत मोठी चूकच केली. पण त्यांचा तो तसा स्वभावच आहे."

शांताबाई म्हणाली " तें कांहीं पुसूं नको. आपला हट्ट चालवायचा हें बिलकूल कधीं माहीत नाहीं. सदा दुसऱ्यांच्या म्हणण्याला मान द्यायचा."

भय्यासाहेबांनीं मध्यें केलेली खटपट भाऊसाहेबांनीं शांताबाईला कळविली नाहीं, हें पाहून ताराबाईला समाधान वाटलें. शांताक्कांनां ती हकीकत कळली असती तरी आपल्या गोड स्वभावाप्रमाणें आतां भय्यासाहेबांनां त्यांनीं क्षमाच केली असती हें जरी उघड होतें, तरीहि थोडीशी तरी त्याविषयीं त्यांच्या मनांत भय्यासाहेबांबद्दल अढी राहिलीच असती; तितकी-सुद्धां ताराबाईला रहायला नको होती ! शांताबाई आतां अगदीं पूर्णपणें तृप्त झाली होती. ती एकदां ताराबाईला म्हणाली " खरोखर माझ्यासारखी नशिबवान आज जगांत कोणी नसेल ! खरंच गडे, देवानं मला एकटीलाच आपल्या इतर माणसांपेक्षां असं उत्तम सुखी कां बरं करावं ! माझ्यासारखी तूंहि तारा सुखी झालेली मी कधीं बरं पाहीन ! त्यांच्यासारखा दुसरा एकादा गृहस्थ एक जरी असता, तर तुला सुद्धां–"

ताराबाई मध्येंच हंसत म्हणाली " असले चाळीस जरी असले, तरी तुमच्यासारखं आक्का मला सुख कधीं होणार नाहीं ! तुमचा गोड स्वभाव अन् तुमची समाधानी वृत्ति जेव्हां माझ्यांत येईल, तेव्हांच तुमच्याइतकं मला सौख्य लाभेल. छे छे, आमचं आपलं आमच्या पद्धतीनं चालूंद्या ! न जाणो, तितकाच सुयोग असला, तर दुसरे एकादे नीलकंठरावच कां नाहीं अवतीर्ण व्हायचे ! "

नगरकरांनां भाऊसाहेबांसारखा जांवई मिळणार, ही बातमी फार वेळ शांतिसदनांत गुप्त राहणें अशक्यच होतें. दुसऱ्या दिवशीं सीताबाईंनीं रमाबाईला बोलावणें पाठवून तिच्या कानांत ती अगदीं गुप्त म्हणून सांगितली, व रमाबाईनेंहि जास्त कोणाची परवानगी न मागतां जाता जातां ज्या त्या बंगल्यांत शिरून तितकीच गुप्त ठेवण्याबद्दल तीनतीनदां बजावून साऱ्यांच्या कानांत सांगून टाकली.

थोड्या दिवसांपूर्वीं सुंदरच्यामुळें जीं सारीं लोकें नगरकरांनां तुच्छ मानून अगदीं दुर्दैवी म्हणत होतीं, तींच आतां ही नवी बातमी ऐकल्याबरोबर त्यांचा मनांतून हेवा, पण बाह्यात्कारीं त्यांनां अत्यंत दैववान म्हणून त्यांचें अभिनंदन करूं लागलीं होतीं.

---

# प्रकरण छपन्नावें.

## कडाक्याचें भांडण !

भाऊसाहेबांची मागणी शांताबाईनें स्वीकारल्याला आतां आठ दिवस झाले होते. एके दिवशीं सकाळीं चहापाणी वगैरे सर्व होऊन शांतिसदनांतली मंडळी स्वस्थ गोष्टी सांगत नेहमींप्रमाणें बसली होती. आनंदराव व मथुरी आपापल्या खोलींत आपापल्या उद्योगांत होतीं. सीताबाई तिघी मुलींनां घेऊन भाऊसाहेब नुकतेच आले होते त्यांच्याशीं गप्पा सांगत होत्या. इतक्यांत मोठ्यानें चौचाकी गाडी वाजल्याचा आवाज कानावर आला. " इतक्यांत सकाळीं कोण भेटायला आलं बाई ! " असें म्हणत सीताबाई खिडकीशीं गेल्या, तशीच त्यांच्या मागोमाग ताराबाईहि जाऊन पाहूं लागली. "गाडी तर शिवदुर्गाच्या स्टेशनवरची भाड्याची दिसते आहे—पण पुढंमागं हे लाल डगल्याचे पट्टेवाले कोण बाई ? " सीताबाई पुढें म्हणाल्या. कोणी तरी तिऱ्हाईत अनोळखी माणसं येताहेत खास, असें वाटून भाऊसाहेबांनीं शांताबाईला हळूच खूण केली, आणि लगेच तीं दोघें मागील दारच्या जिन्यानें खालीं उतरून मागें बागेंत हंसत खेळत गेलीं. बाकी राहिलेल्या तिघीजणींचे तर्क चालूच होते; पण समाधान होण्यासारखा अंदाज होईना. तेवढ्यांत गाडी दारांत थांबली, व तिच्यांत बसून आलेलें माणूस शिपायांनीं वर मंडळी बसली होती त्या दालनाशींसुद्धां आणून पोंचविलें. दार उघडलें व ताराबाई पहाते तों—श्रीमंत राणी माईसाईब आंत आल्या !

कोणी तरी अनपेक्षित माणूस येणार असा साऱ्यांचा आधीं तर्क झालाच होता; परंतु त्यांच्या कल्पनेपेक्षांहि अगदीं पलीकडे अशी एक भव्य सरदारी थाटाची स्त्री आपल्या लवाजम्यानिशीं येईल, ही यत्किंचित्‌हि कल्पना नसल्यामुळें तिघींनांहि फार आश्चर्य वाटलें. त्यांतून या बाई कोण याचा सीता-बाई व हिरी यांनां मुळींच वास नसल्यामुळें त्यांनां तर ताराबाईपेक्षांहि जास्तच आश्चर्य वाटलें.

माईसाहेब दृष्टीस पडल्याबरोबर ताराबाईनें हळूच आपल्या आईला त्यांचें नांवगांव सांगून टाकलें. माईसाहेब आंत आल्या त्या नेहमींपेक्षांहि जास्त तोऱ्यांतच व आपल्या श्रीमंतीच्या ऐटींत इतरांनां तुच्छ मानीत अशा थाटांत आल्या. ताराबाईनें सुवर्णपुरांतल्या प्रमाणें त्यांनां नमस्कार केला,

त्याचा त्यांनीं फक्त जराशी मान हलवण्यापलीकडे दुसरा स्वीकार केला नाहीं, व कांहींएक न बोलतां एका खुर्चीवर येऊन बसल्या. त्याबरोबर त्यांची बरोबर आलेली दासी त्यांनां पंख्यानें वारा घालूं लागली, व दुसरी चवरीनें माशा हाकूं लागली. येवढ्या इतमामाची सरदारीणबाई आपल्या घरीं अनायासें आपण आलेली पाहून सीताबाई तो सर्व थाटमाट पाहून चकितच होऊन गेल्या; पण प्रसंगावधान धरून त्यांनीं त्यांचें यथायोग्य आदरातिथ्य करण्याच्या हेतूनें स्वतः खुर्चीवर न बसतां अत्यंत अदबीनें त्या दूर उभ्या राहिल्या.

थोड्या वेळानें माईसाहेब जरा कुर्‍यांतच ताराबाईला म्हणाल्या "बर्‍या आहांत ना ताराबाई ? या बाई तुमची आई वाटतं ?"

ही उद्धटपणाची रीत पाहून ताराबाईनेंहि जरा ताठ्यानें फक्त 'हो' एवढेंच उत्तर दिलें. वास्तविक म्हटलें तर माईसाहेबांनीं आपल्या थोरपणाला अनुरूप असें लीनपणाचें बोलणें ताराबाईच्या घरीं गेल्यावर तिच्याशीं व तिच्या आईशीं करावयास पाहिजे होतें.

माईसाहेब म्हणाल्या "अन् ही तुमची बहीण वाटतं ?"

सीताबाई आपणच म्हणाल्या "होय महाराज, ही माझी सगळ्यांत धाकटी मुलगी. तिच्यावरची परवांच लगीन होऊन नागपुराकडे नवर्‍याबरोबर रोजगारावर गेली आहे. सगळ्यांत थोरली इतक्यांत इथें होती ती आपल्या भावी नवर्‍याबरोबर नुकतीच कुठंशी गेली आहे—"

सीताबाईनां कांहींच उत्तर न देतां माईसाहेब पुनः ऐटींतच म्हणाल्या "ही तुमची बाग लहानशीच आहे !"

सीताबाई म्हणाल्या "श्रीमंतांच्या नजरबागेच्या मानानं लहान आहे हें उघडच आहे. पण आमच्या गांवांतल्या रावबहादुरांच्या बागेपेक्षां किती तरी ही मोठी आहे."

माईसाहेब म्हणाल्या "उन्हाळ्यांत ही खोली बसायला तर फार वाईट असेल. खिडक्या सगळ्या पश्चिम बाजूला आहेत. दोन प्रहरापासून सारखं ऊन बडवीत असेल इथें!"

सीताबाई म्हणाल्या "पण सरकार, इथें आम्ही कधीं संध्याकाळीं बसतच नाहीं ! श्रीमंतस्वार्‍या सुवर्णपुराहून निघाल्या तेंव्हां आमचे नीलकंठराव न् मालुबाई खुशाल होतीं ना ?"

माईसाहेब म्हणाल्या "हो, अगदीं खुशाल. आम्हांला परवां रात्रीं तीं दोघं भेटायला आलींच होतीं."

आतां ताराबाईची कल्पना झाली, कीं, मालुबाईचें एकादें पत्र बित्र माईसाहेबांनीं बरोबर आणलें असेल, व तें देण्याकरितां त्या इकडे सहज आल्या असतील. पण माईसाहेब आपल्या दासीला तसलें कांहीं बोलेनात, तेव्हां तिचा पुनः घोटाळा झाला.

सीताबाईनीं अत्यंत विनयपूर्वक माईसाहेबांनां "थोडंसं साखरपाणी आम्हां गरीबांच्या इथें घेतलं तर फार बरं वाटेल आम्हांला; निदान थोडासा गरम गरम चहा आणवतें," असें पुनः पुनः म्हटलें, पण माईसाहेबांनीं तुटकपणानें "छे, आम्हाला कांहीं नको!" असें उत्तर दिलें. नंतर एकदम उठून त्या ताराबाईला म्हणाल्या "आत्तां येतांना मला उजव्या बाजूला दूर द्राक्षीच्या वेलासारखे मांडव दिसले. आमच्या नाशकाकडे तीं फार उत्तम होतात. पण इकडे या प्रांतांत नसतील होत अशी माझी समजूत होती. खरंच का द्राक्षांचे आहेत, कां आपले पडवळीबिडवळीचे आहेत ? चला मला दाखवा बरं काय आहेत ते !"

सीताबाई आपणच मध्यें तोंड घालून म्हणाल्या "नाहीं, महाराज, द्राक्षांचेच आहेत. अन् अजून कांहीं घोंस असतीलसुद्धां. जा बरं तारा, सरकारांनां दाखव ते सारे. आमची आपली गरिबाची ही झोंपडी आहे, यांत दुसरं पहाण्यासारखं काय असायचं आहे ?"

माईसाहेबांनीं या बोलण्याला औपचारिक असेंहि उत्तर दिलें नाहीं. ताराबाई झटकन् उठून माईसाहेबांबरोबर निघाली. जिना उतरतांना त्या म्हणाल्या "जिना तेवढा बरा सोपा आहे." खालीं आल्यावर दिवाणखान्याचें दार उघडें होतें, तें त्यांनीं मुद्दाम जास्त उघडून आंत डोकावून पाहिलें व म्हटलें "आहे, जेमतेम ठीक आहे दिवाणखाना." पायऱ्या उतरल्यावर बरोबरच्या कुणबिणींनां त्या म्हणाल्या "तुम्ही रहाग गाडीशीं. आमच्याबरोबर नका येऊं."

ताराबाई व माईसाहेब पुढें द्राक्षांच्या मांडवाकडे चालूं लागल्या. सकाळची आठ साडेआठाची वेळ, ऊन सडकून तापत होतें. माईसाहेबांनां चार पावलेंसुद्धां उन्हांत चालावयाची कधीं सवय नाहीं, त्यामुळें त्या मांडवाशीं पोंचण्याला लागलेल्या दोनतीन मिनिटांतच उन्हानें लाल होऊन मांडवाखालीं

जाईपर्यंतच धांपा टाकूं लागल्या. ताराबाई त्यांनां दाखविण्याकरितां घोंस पाहूं लागली, व एक लहानसा घोंस जवळच आढळला तो तोडून ती माईसाहेबांनां देऊं लागली. जरा दम कमी न झाल्यामुळें माईसाहेब बोलूं लागण्याला अजून तयार झाल्या नव्हत्या. त्यांनीं आपल्या आईशीं इतकें असभ्यपणाचें वर्तन केलें असल्यानें ताराबाईहि जराशी त्यांच्यावर नाखुष होऊन आपण होऊन यांच्याशीं कांहींएक बोलायचें नाहीं ' असा निश्चय करीत होती. " काय पण मामी ! भाच्यांच्या सारख्या शहाण्या कधीं होतील कोण जाणे ! पण आतां कशाच्या सुधारतात त्यांच्यासारख्या ! " असेंहि ती मनांत म्हणत होती.

माईसाहेबांनीं ताराबाईच्या हातचा घोंस न घेतां जरा दम कमी झाल्याबरोबर सुरुवात केली. "आमचं इतक्या दूर या भिकार खेडेगांवांत येणं कां झालं आहे तें तुमच्या लक्षांत चट्‌कन् आलं असलंच पाहिजे. तुमचं मन, तुमचं अंतःकरणच तें तुम्हाला सहज सांगेल !"

ताराबाईला या भाषणाचा खरोखर मुळींच अर्थ न समजून ती चकित होऊन ह्मणाली "नाहीं, अगदीं मुळींच नाहीं ! आपली खरोखरच फार चुकी होते आहे ही. आपण इकडे येण्याची तकलीफ कां घेतलीत त्याची मला बिलकूल कल्पना होत नाहीं आहे. "

माईसाहेब संतापून म्हणाल्या " तारा, माझ्याशीं असल्या गमजा चालायच्या नाहींत हें खूप लक्ष्यांत ठेव. तूं कितीहि माहीत नसल्याचं ढोंग केलंस, तरी तशानं मी कधीं फसायची नाहीं. माझा स्वभाव अगदीं सडेतोड व निर्भीड आहे हें साऱ्या जगताला ठाऊक आहे, अन् आजच्यासारख्या प्रसंगीं मी कुण्णाचीच भीडमुर्वत धरणार नाहीं ! मी अगदीं आतां स्पष्ट बोलतें ऐक. परवांच्या दिवशीं सकाळीं आमच्या कानीं अत्यंत भयंकर अशी एक बातमी आली. ती अशी, कीं, तुझ्या थोरल्या बहिणीला एक उत्तम स्थळ मिळालं, इतकंच नव्हे, तर तूं—म्हणजे तूं स्वतः ताराबाई—तुझं स्वताचंहि लग्न होण्याचं तशाच उत्तम स्थळाशीं घाटत आहे. तें स्थळ म्हणजे आमचा खुद्द भाचा भय्यासाहेब ! वा, वा, आहे का नाहीं कमाल ? माझी खात्रीच आहे, कीं, ही बातमी अगदीं निखालस खोटी आहे. भय्यासाहेब असला हलकट विचार क्षणभर दिखील मनांत येऊं देणार नाहीं. असं जरी अगदीं खास आहे,

तरी आम्हीं ताबडतोब विचार ठरवला, कीं, एकदम तुझ्या घरीं जावं अन् असल्या लग्नाला आम्ही कसं लेखूं तें तुला स्पष्टपणें सांगून टाकावं ! म्हणून तर आम्ही इथें आलों आहों."

आश्चर्यानें व तिरस्कारानें ताराबाईची चर्या पालटली, व ती म्हणाली "आपणाला जर हें सारं अशक्य वाटलं म्हणतां,तर मग इतक्या दूर धांवत कशाला आलांत ? मग असं येण्याचं प्रयोजन काय होतं ?"

माईसाहेब म्हणाल्या "प्रयोजन इतकंच,कीं,ही बातमी अगदीं खोटी आहे असं तुमच्याचकडून जिकडे तिकडे प्रसिद्ध करवावं."

ताराबाई म्हणाली " पण तुम्ही स्वतः आमच्या घरीं उठून आलां व आमच्याशीं बोलत राह्यलां,यामुळं ती बातमी जास्तच पक्की नाहीं व्हायची? म्हणजे, जर ! तसली जर खरोखरच उठली असली तर !"

माईसाहेब फणकाऱ्यानें म्हणाल्या "जर!जशी कांहीं ती तुझ्याला माहीतच नाहीं असा बहाणा करतां काय आपण ? तुम्हीच नाहीं का मुद्दाम लबाडीनं ती उठवली ! खरंच का तुला ही बातमी कधीं कळली नाहीं ?"

ताराबाई गंभीरपणानें म्हणाली " मीं तर कधीं ती ऐकिली नाहीं."

माईसाहेब उतावीळीनें म्हणाल्या "अन् तिच्यांत कांहीं आधार नाहीं असंहि तूं म्हणतेस का ?"

ताराबाई तिरस्कारानें म्हणाली " आपल्या इतकी मी कुठें स्पष्टवक्ती आपणाला म्हणवतें आहें ? प्रश्न विचारणं तुम्हाला ठीक आहे; पण उत्तर देण्याचं माझ्या मर्जीवर आहे !"

माईसाहेब संतापानें म्हणाल्या " असं काय ? मला कधीं हें असलं खपायचं नाहीं! तारे, तूं मला उत्तर दिलंच पाहिजेस.बोल, त्यानं-आमच्या भाचानं–तुला कधीं लग्नाची मागणी घातलीन् का ?"

ताराबाई शांतपणानें म्हणाली " आपण तर आत्तांच म्हटलंत, कीं, तें अशक्य आहे अगदीं !"

माईसाहेब म्हणाल्या "म्हणजे तें अशक्य असलं पाहिजे ! जर त्याच्यांत यत्किंचित् अक्कल शिल्लक असेल तर त्यानं मागणी घालणं अशक्य आहे.पण तुमची कौटाळं काय कमी आहेत?तुम्हीं आपली मोहनी त्याच्यावर घालून जर त्याला भारून टाकला असला, तर अक्कलमंद होऊन आपण कोण, कुठले, आपला

लौकिक किती, याचं स्मरण नाहींसं होऊन कदाचित् त्यानं घातली असेल मागणी ! काय सांगावं ? तुम्हीं त्याला चेटूक केलं असेल ! ”

ताराबाई म्हणाली “तसं जर असलं, तर आम्ही कधीं कबूल करूं का तें?”

माईसाहेब चिडून म्हणाल्या “तारे, मी कोण आहें तें लक्षांत आहे ना ? असली भाषा ऐकायची मला संवय नाहीं ! भय्यासाहेबाला माझ्याइतकी जवळची दुसरी कोणी आप्त नाहीं, म्हणून त्यांच्या साऱ्या नाजुक गोष्टीसुद्धां मला समजून घेण्याचा अगदीं हक्क आहे ! ”

ताराबाई म्हणाली “पण माझ्या तसल्या गोष्टी विचारण्याचा तर तुम्हाला हक्क नाहींना पोंचत ? अन् अशा तऱ्हेनं माझ्याशीं बोलण्यानं तर मी कधीं तरी सांगूं इच्छीन का ? ”

माईसाहेब आपला राग आवरून थोड्या शांतपणानें म्हणाल्या “ माझं म्हणणं पुनः एकदां नीटपणीं समजून घे. ज्या अति उच्च स्थळावर तुम्हीं डोळा ठेवला आहे, तें स्थळ तुमच्या हातीं लागणं शक्य नाहीं—नाहीं, कधीं नाहींच! भय्यासाहेबांचं माझ्या लेंकीशीं ठरलेलंच आहे किती तरी दिवस. बोल आतां काय म्हणतेस तें ! ”

ताराबाई हंसून म्हणाली “हात्तेच्या ! मी इतकंच म्हणतें, कीं, तसं जर ठरलेलं आहे, तर ते मला मागणी घालतील ही तुम्हला धास्ती कां वाटते आहे ?”

माईसाहेब क्षणभर विचार करून म्हणाल्या “ तें ठरलेलं आहे म्हणजे एका विवक्षित अर्थानं तें ठरलेलं आहे. अगदीं दोघांच्या बाळपणापासून तीं एकमेकांकरितां आहेत, असा आमचा समज आहे. भय्यासाहेबाच्या आईची व आमची स्वतःची तशी अतोनात इच्छा होती. दोघेंहि बाळें पाळण्यांत होतीं तेव्हांपासून आम्हीं नणंदाभावजयांनीं हे बेत करून ठेवलेले आहेत, ते बेत फळाला यायची आत्तां कुठें संधि प्राप्त झाली आहे. आत्तां कुठें आम्हां नणंदाभावजयांची अत्यंत आवडती गोष्ट सिद्धीस जायची वेळ आली असतांना मधें आतां खो आणणार कोण ?—तर तुझ्यासारखी हलक्या कुळांतली दरिद्री, कुणा थोरामोठ्याशीं यत्किंचित् संबंध नसलेली अशी उपटसुंभ स्त्री ? दोन्ही घराण्यांतल्या माणसांना काय आवडतं त्याची तुला बिलकूल पर्वा नाहीं का ? आमच्या नणंदेशीं इतके दिवस जें ठरून राह्यलं आहे तें मोडायला तुला कांहींच दिक्कत नाहीं ना वाटत ? इतकी का तूं अगदीं बेपर्वा अन् अविचारी झाली आहेस ? अगदीं लहानपणापासून तीं दोघं

नवरानवरी म्हणून आम्ही सारीं म्हणत आलों,त कधींच का तुझ्या कानावर आलं नाहीं ? ”

ताराबाई ह्मणाली “हो, आलं तर काय झालं ! पण मला काय त्याचं? तुमच्या भाचाशीं लग्न लावायला एवढ्याशिवाय दुसरी जर मुळींच कांहीं मला अडचण नसेल, तर त्याच्या मामीनं अन् आईनं निराळा बेत मनांत योजला होता, एवढ्याकरितां मी कधींच मागें घेणार नाहीं ! तुम्हीं दोघींनीं ढीग त्यांचं लग्न मनांत ठरवून ठेवलंत, पण तें प्रत्यक्ष घडून येणं न येणं दुसऱ्यांच्याच स्वाधीन आहे!भय्यासाहेबांचाच खुद्द कल जर तुमच्या लेंकीकडे नसला,आणि त्यांचा स्वतःचा जर कधीं तसा शब्द गेला नसला, तर त्यांनीं आपल्या इच्छेप्रमाणं दुसरी बायको पसंत करायला हरकत कोणची ? अन् ते मला जर निवडून काढीत असतील, तर मीं तरी त्यांचं ह्मणणं कां कबूल करूं नये ? ”

माईसाहेब आवेशानें म्हणाल्या “ कां करूं नये ? कारणं काय हवी तितकीं मी सांगतें! एक कारण अ ं, कीं, खरेपणा, भलाई, अब्रू हीं सारीं तुला तसं करूं नको ह्मणून सांगतील. इतकंच काय, निव्वळ स्वार्थाच्या दृष्टीनं जरी पाह्यलंस,तरीहि असली गोष्ट करण्याचं तूं अगदीं एकदम मनांतून काढून टाकलं पाहिजेस ! हो हो, तुझ्या स्वार्थाकरितांसुद्धां ! कारण, तूं जर आम्हां साऱ्या आप्तइष्टांचं मन मोडून अन् भय्यासाहेबाच्या सगळ्या इष्टमित्रांनां धाब्यावर बसवून एकादं कांहीं वर्तन केलंस, तर आम्ही कुण्णी तुझ्याकडे ढुंकून दिखील पहाणार नाहीं! सर्व त्याचीं माणसं तुला पाण्यांत पहातील, पदोपदीं अपमान करतील, अगदीं तिरस्कार करतील. तुझं लग्न म्हणजे लज्जास्पद गोष्ट असं आम्ही समजूं. इतकंच काय, तुझं नुसतं नांव दिखील आम्ही कधीं उच्चारणार नाहीं—”

ताराबाई मोठ्या कष्टानें आपलें हंसूं आवरून म्हणाली “ वा ! मोठींच संकटं हीं आहेत ह्मणायचीं ! पण भय्यासाहेबांची जी एकदां बायको झाली, तिच्याहि हातांत सुख लावून घ्यायच्या इतक्या रगड गोष्टी येतील, कीं, तुमच्यासारख्या आप्तइष्टांच्या गैरमर्जीची तिला मुळींच पर्वा करायला नको, नाहीं बरं ! ”

माईसाहेब त्रासानें उद्गारल्या “हट्टी आडदांड पोरी ! मला तुझी आत शरम वाटूं लागली आहे.गतवर्षीं माझ्या घरीं मी तुला सन्मानानं वागवलं

याचे हे असे उपकार फेडतेस वाटतं ? त्याची तरी आठवण करून नीट विचार करून बोल. हें बघ, अशी खालीं बैस, मी दिखील बसतें. आतां नीट लक्ष दे. मी जी इथें आलें आहें, ती आपलं म्हणणं खरं करण्याचा पूर्ण निश्चय करूनच आलें आहें.अन् तो अजून तस्सा ठाम आहे. दुसऱ्याच्या तंत्रानं वागायची मला संवय नाहीं. ह्मणून माझी इच्छा मोडून निघालेली पहाण्याची कधीं आमच्या घरीं वहिवाट नाहीं. आहे ना ठाऊक तुला ? ”

ताराबाई तिरस्कारव्यंजक स्वर काढून ह्मणाली “ पण तशी तुह्माला संवय नसली तर आज आपली भारी निराशा होते आहे, ह्मणून मला आपली रगड कींव येईल इतकंच ! पण माझा निश्चय तिळमात्र बदलणार नाहीं. ”

माईसाहेब जोरानें म्हणाल्या “ ऐक, मधें बोलूं नको, गप राहून माझं पुरं ऐकून घे. आमचा भय्यासाहेब न् आक्कासाहेब यांचा मुळीं जन्मच एकमेकांकरितां झाला आहे. दोघांचंहि घराणं थोर खानदानीचं सरदारी आहे. त्याच्या आईचंहि घराणं जरी सरदारी नाहीं, तरी तसंच प्रतिष्ठित अब्रूदार व लौकिकवान असं जुनं आहे. दोन्हीहि बाजूला संपत्ति विपुळ आहे. दोन्ही घराण्यांत सगळ्यांची आतुर इच्छा अशी आहे, कीं, त्या दोघांचं लग्न व्हावं. असं सगळं सोज्वळ असून आतां मधें बिब्बा घालायला कोण पुढं होतं आहे ? तर म्हणे असली एक भिकारडी पोरगी, कीं, जिला ना कुळशील, ना सगेसोयरे, ना फुटकी कवडी ! हें असलं आम्ही चालूं देऊं का ? नाहींच, अलबत नाहींच ! आम्ही महा भगीरथ खटपटी करूं, पण तुला उधडून लावूं. तूं काय समजली आहेस ? तुझी तुला जर अक्कल असती, तर तूं सुद्धां स्वतःच आपल्या दर्जाच्या बाहेर लग्न करायचं मनांत आणलं नसतंस ”

ताराबाई स्थिर स्वरांत म्हणाली “ तुमच्या भाचाशीं लग्न करणं ह्मणजे मी आपला दर्जा मुळींच सोडल्यासारखं करीत नाहीं. मला कुठं तुमचं सरदारघराणं हवं आहे ? तुमचा भाचा गृहस्थ आहे, मीहि गृहस्थाचीच मुलगी आहें. यांत कुठें तफावत आली ? ”

माईसाहेब म्हणाल्या “तें असेल! तुझा बाप गृहस्थ आहे खरा; पण तुझ्या आईचं घराणं काय आहे ? तुझे मामे अन् मावशा कोण दर्जाच्या आहेत ? आम्हाला जसं कांहीं तें ठाऊकच नसेल अगदीं ? ”

ताराबाई धिंमेपणानें म्हणाली "तो वाद मी नाहीं आतां घालीत. माझीं असलीं माणसं बरींबुरीं जर तुमच्या भाचाला पसंत असलीं तर तुम्हाला काय त्याचं ?"

माईसाहेबांनीं विचारलें "तें राहूं दे. एक गोष्ट आधीं स्पष्ट सांग. तुझं भय्यासाहेबाशीं नक्की ठरलेलं आहे का ?"

असला प्रश्न माईसाहेबांच्या मुर्वतीखातर म्हणून ताराबाईनें कधींच ऐकून घेऊन उत्तर दिलें नसतें. पण क्षणभर विचार करून उगाच या म्हातारीला व्यर्थ घोळांत कशाला पाडा असें वाटून ती म्हणाली "नाहीं."

तें ऐकून माईसाहेब बऱ्याच खूष झाल्या, व ताराबाई वठणीला आली असें वाटून तिला आणखी दाबण्याच्या उद्देशानें त्या म्हणाल्या "अन् कधींहि तसलं कांहीं कबूल करणार नाहीं असं मला तूं वचन देतेसना ?"

ताराबाई आवेशानें म्हणाली "मी कांहींएक वचनबिचन देत नाहीं साफ !"

माईसाहेब म्हणाल्या " तारे, तारे, कोण हा तुझा आडदांडपणा ! किती स्वैच्छ पोरगी आहेसग ! मी म्हणत असें, कीं, तूं मोठी समजूतदार मुलगी आहेस. पण मी कधीं माघार घेईन असं समजून उगाच फसूं नको. तूं काय समजली आहेस ? मी मागतें तसं वचन घेतल्याशिना मी इथनं हलायचीच नाहीं, समजलीस ?"

ताराबाई म्हणाली " असं का ? तर मग माईसाहेब, आपला मुक्काम इथें या मांडवांतच आज ! कारण, मी तर कध्धीं कध्धीं तसलं वचन देणार नाहीं. असल्या दटावणीला मी कधीं दाद देत नसतें, समजलांत ! भलतीच भीक मी कधीं घालीत नसतें ! काय चमत्कार पहा ! म्हणे भय्यासाहेबांनीं तुमच्या अक्कासाहेब पतकराव्यात म्हणून मीं असलं वेडगळ वचन द्यावें ! पण जरी कदाचित मीं तसलं वचन दिलं, तरी तेवढ्यानं अक्कासाहेबांना ते मिळतील का ? जर मी त्यांना हवी असेन, अन् मीं त्यांनां पतकरलं नाहीं, तर तेवढ्यावरून ते अक्कासाहेबांकडे वळतलिच का ? ही काय कल्पना ! छे छे माईसाहेब, आज तुम्ही जें माझ्यापाशीं हें विलक्षण मागणं मागतां आहां, त्याला तुम्ही सांगतां तीं कारणं तर इतकीं विचित्र आहेत, कीं, कांहीं बोलायची सोय नाहीं ! असल्या कारणांनीं माझं मन वळेल इतकी का मला आपण भोळी समजतांहां ! छे, आपण फार मोठी चूक करतांहां. हें तुमचं

लुडबुडणं तुमच्या भाचाला किती आवडेल तें त्यांनां ठाऊक, पण माझ्या बाबतींत तरी तुम्हाला ही असली लुडबुड करण्याचं बिलकुल प्रयोजन नाहीं! तेव्हां आतां हें सगळं भाषण संपलं, असं समजा."

माईसाहेब ह्मणाल्या "हां हां, इतकी उतावळी नको होऊं. माझं अजून मुळींच संपलं नाहीं. सगळीं कारण अजून मीं तुला कुठं सांगितलीं आहेत ? मुख्य अजून पुढंच आहे. तुझी ती बहीण कुणाचा हात धरून निघून गेली तें मला माहीत नाहीं असं नाहीं, मला सगळं इत्थंभूत ठाऊक आहे. अखेरीला लग्न झालं म्हणजे काय, जेमतेम तुझ्या बापानं न् मामानं पैसे भरून कसं तरी ठिगळं देऊन घडवून आणलं.—अन् असली उठून गेलेली पोरटी का माझ्या भाच्याची मेव्हणी व्हायची ! तिचा नवरा—म्हणजे माझ्या नणंदेच्या घरच्या यःकश्चित कारकुनाचा मुलगा—तो का भय्यासाहेबाचा साडू व्हायचा! इडापिडा टळो—अरे देवारे ! पोरी, तूं काय मनांत आणलं आहेस ? तुझ्यामुळं त्या दिलबहाराला विटाळ होईलना अगदीं ! "

ताराबाई पराकाष्ठेची संतापून ह्मणाली " बस करा आतां बाईसाहेब ! तुह्मीं करायचा तितका माझा पाणउतारा केलात. ही मी निघालें पहा—"

असें ह्मणून ताराबाई उठलीच. माईसाहेबहि उठल्या. दोघीहि चालूं लागल्या. माईसाहेब अगदीं सडकून चिडून गेल्या व ह्मणाल्या "तर मग माझ्या भाचाच्या अब्रूची, लौकिकाची मुळींच फिकीर नाहीं, अं ? आप्पलपोटी निर्लज्ज पोरी ! तुझ्याशीं लग्न करून त्याचे धिंडवडे झाले तरी तुला ते चालतात अं ? "

ताराबाई ह्मणाली " बाईसाहेब, मी एकदां काय तें बोललें. मला जास्त ठाऊक नाहीं. "

माईसाहेब ह्मणाल्या "तर मग त्याच्याशीं लग्न करण्याचा तुझा निश्चयच आहे ह्मणेनास ? "

ताराबाई ह्मणाली "मीं कधीं तसं ह्मटलं नाहीं. मला ज्या वेळीं जें करणं योग्य वाटेल तें करायला माझी मी मुक्त्यारीण आहें. मी माझ्या सुखाचा विचार पाहूनच काय तें करीन. तें मग तुमच्या किंवा तुमच्यासारख्या इतरांच्या पसंतीस असो वा नसो ! "

माईसाहेब आवेशानें ह्मणाल्या "ठीक ठीक! तर मग हाच तुझा अखेरचा जबाब ना ? फार उत्तम. पुढं काय करायचं तें मी आतां बरोबर समजलें.

तूं कसल्या भ्रमांत आहेस पोरी ! तूं असं समजूं नकोस, कीं, ही तुझी इच्छा कधीं पुरी होईल. मी केवळ आपली तुझी चांचणी करायला आलें होतें. मला वाटलं होतं, कीं, तूं वेळींच उमजून माझं ऐकशील.पण मी माझं ह्मणणं तडीस नेल्याखेरीज कधा नाहीं राह्यची !"

अशा तऱ्हेनें बडबडत दोघी गाडीपाशीं पोंचल्या. गाडींत शिरतांना मागें वळून माईसाहेब ह्मणाल्या "मी तुझा निरोप घेत नाहीं,वा तुझ्या आईला विचारलं आहे ह्मणून सांगत नाहीं. तुझी किंमत आहे कुठं तशी ? मी अतिशय संतापलें आहें, समजलीस ?"

ताराबाईनें मुळींच जबाब दिला नाहीं, कीं जरा, घरांत चला ह्मणून देखील माईसाहेबांनां म्हटलें नाहीं. त्यांच्याकडे न पहातां ती तडक घरांत शिरली. ती जिना चढून जाते तों बाहेर गाडीहि चालू झाल्याचीं चाकें वाजलीं. सीताबाई उतावळीनें वर वाट पहात होत्या, त्यांनीं तीं चाकें ऐकून " माईसाहेबांनां आंत कां नाहीं बोलावलंस ?" ह्मणून तिला विचारलें.

ताराबाई ह्मणाली "नाहीं त्यांची मर्जी लागली. त्या जातेंच ह्मणाल्या."

सीताबाई ह्मणाल्या " फारच प्रतिष्ठित थोर बाई होती हो ! एवढं आवर्जून इकडे आली हा तिचा किती तरी थोरपणा बरं ! नुसती मालतीची खुशाली कळवायला का आल्या होत्या ? कुठं गांवाला जात असतांना वाटेंत आपल्या तुला भेटून गेल्या वाटतं! कांहीं विशेष नव्हत्या ना बोलत,तारा?"

ताराबाईला थोडीशी येथें लबाडी करावी लागली,व ती फक्त हुं म्हणाली. खरें संभाषण काय झालें होतें तें आईला सांगणें केवळ अशक्य होतें.

---

## प्रकरण सत्तावन्नावें.

### पसंत नसलेला विनोद.

श्रीमंत माईसाहेबांशीं अगदीं अकल्पितपणानें ताराबाईचें जें हें कडाक्याचें भांडण झालें, त्याच्या योगानें तिच्या मनांत उडालेली खळबळ लगेच शांत होणें अशक्य होतें. माईसाहेब तावातावानें निघून गेल्यानंतर ती आपल्या खोलींत जाऊन कितीक वेळ तरी विचार करीत राहिली. माईसाहेबांनीं इतक्या दूर तीनशें मैल धांवत येण्याची तसदी घेतली त्याचा हेतु काय बरें असावा? भय्यासाहेबांनीं केलेली मागणी मीं कबूल केली असल्यास ती जबरीनें

मोडून टाकावी ? वा ! मागणी मोडायला माईसाहेबांनीं ही युक्ति तर विशेष शहाणपणानें शोधून काढली, यांत शकाचं नाहीं ! प्रश्न एवढाच राहिला, कीं, ही असली बातमी मूळ उठली तरी कशी ? कितीक वेळ तरी या प्रश्नाचें तारेला उत्तर सुचेना. अखेर तिची इतकीच कल्पना झाली, कीं, भाऊसाहेबांचें शांताबाईशीं ठरलेलें लग्न ऐकून लोकांनां दुसरेंहि एकादें लग्न ठरावें अशी साहजिक इच्छा झाली असावी, आणि ह्मणूनच रिकामपणीं बसल्याबसल्या लोकांनीं भाऊसाहेबांचे स्नेही भय्यासाहेब यांचें लग्न शांताबाईच्या बहिणीशीं ठरवून टाकलें! यापेक्षां जास्त मीमांसा ताराबाईला लावतां येईना. शांताक्काच्या ठरलेल्या लग्नामुळें आपलें व भय्यासाहेबांचें दळणवळण जास्त होणार, हें तिच्याहि लक्षांत येऊन गेलेंच होतें. अर्थात्, तेवढ्यावरून रावबहादुरांच्या घरच्या मंडळींनीं हें असें दुसरें लग्न ठरण्याचा संभव बराच आहे असा तर्क मालतीला लिहिला असेल, व मालतीकडून नीलकंठराव व तेथून माई-साहेबांपर्यंत जातांना त्या तर्काचें रूपांतर होऊन हें दुसरेंहि लग्न खास ठरणार याच्या ऐवजीं तें खास ठरलेंच अशी वार्ता माईसाहेबांच्या कानीं गेली असावी. माझ्या मनांत मी जी गोष्ट निवळ शक्य ह्मणून समजतें आहें, ती त्यांनीं तावडतोब ठरवूनसुद्धां टाकली ! या सांखळीला मध्यें आणखी दोन दुवे असते तर कदाचित् तें लग्न लागूनसुद्धां गेलें, येथपर्यंतहि वार्ता माईसाहेबांच्या कानावर गेली असती !

परंतु माईसाहेबांनीं उच्चारलेल्या कांहीं कांहीं वाक्यांवरून ताराबाईच्या मनांत बरीच अस्वस्थता उत्पन्न झाल्याशिवाय राहिली नाहीं. माईसाहेब मनस्वी हट्टी आहेत. एकदां मनानें घेतलेली गोष्ट त्या सहसा सोडणाऱ्या नव्हत. आपण स्वतः त्यांनां वाटाण्याच्या अक्षता लावल्या एवढ्यानें त्या तो नाद सोडून स्वस्थ राहतील, असें कधींच होणें नाहीं. " हें लग्न कसं होतं तें मी पाहीन, " या त्यांच्या म्हणण्यावरून तें मोडण्याचा त्या आटोकाट यत्न करणार, हें स्पष्टच दिसत होतें. अर्थात्च त्या एकदम आपल्या भाचाची गांठ घेऊन त्यांची सडकून कानउघाडणी करतील, हें ठरलेंच. आपणाला माईसाहेबांनीं जीं नानातऱ्हेचीं कारणें सांगितलीं, त्या सगळ्यांचा पाढा त्या जास्ती तिखटमीट लावून त्यांच्यापुढें वाचतील, व हा असा पाढा ऐकला म्हणजे त्यांच्या मनांत काय परिणाम होईल हें कोणीं सांगावें ? भय्यासाहेबांच्या मनांत आपल्या मामीविषयीं वास्तविक प्रेम अगर आदर किती आहे,

त्याचा ताराबाईला पक्का अंदाज नव्हता. पण आपण स्वतः आज जशी माई-साहेबांनां कःपदार्थ मानतों, तशी अवहेलना भाचानें आपल्या मामीची करणें निदान शक्य नाहीं. आज माईसाहेब भय्यासाहेबांनां मातुश्रीच्या ठिकाणीं आहेत, त्यामुळें त्यांच्या शब्दाला त्यांनां कांहीं तरी मान द्यावा लागेल. शिवाय मुख्य गोष्ट ही कीं, आपलें कुळशीळ, लौकिक कमी आहे. असल्या मुलीशीं लग्न केल्यानें आपल्या थोर घराण्याला बट्टा लागेल हा सर्व विचार भय्यासाहेबांच्याहि डोक्यांत आज कितीक दिवस आहेच, व त्यामुळेंच त्यांचें मन किती तरी दिवस हेलकावे खात होतें. आतां जरी कदाचित् त्यांनीं तो विचार विशेष महत्त्वाचा नाहीं असें ठरविलें असलें, तरी माईसाहेबांनीं त्याला पुनः जोरानें चालन दिलें ह्मणजे, त्यांच्या अत्यंत नाजुक अशा मर्म स्थानावरच आघात केल्यासारखें होणार, व आजपर्यंत थंड केलेला अग्नि पुनः झपाट्यानें प्रज्वलित होण्याचा खास संभव आहे. जीं कारणें आपणासारखीला आज केवळ हास्यास्पद वाटतात, तींच भय्यासाहेबांसारख्या मानी माणसाला कदाचित् अत्यंत रास्तहि वाटूं शकतील !

आजपर्यंत जर भय्यासाहेबांचें मन 'दहीं खाऊं महीं खाऊं' म्हणत द्विधा झालेलें असेल, तर माईसाहेबांच्या या अत्यंत आग्रहाच्या निषेधानें तें ठाम पक्कें होऊन जाईल, व आपल्या घराण्याचा दर्जा कायम राखून आपणाला जितकी उत्तम बायको मिळणें साध्य असेल, तसलीवरच समाधान मानून राहण्याचाहि ते कदाचित् निश्चय ठरवून टाकतील. तसा जर एकदां त्यांचा पक्का निश्चय ठरला, तर मग ते इकडे कधीं तोंडहि करणार नाहींत. मुंबईवरून सुवर्णपुरास जातांना माईसाहेब त्यांनां मुंबईत खास गांठतील, व त्यांचा आग्रह जर सिद्धीस जाईल, तर भाऊसाहेबांशीं कबूल केलेला परत शिवदुर्गास येण्याचा भय्यासाहेबांचा बेत कायमचा रहित होईल. चारआठ दिवसांत जर भय्यासाहेब एव्हाशीं इकडे येत नाहींत अशी कांहीं बातमी आपल्या कानीं आली, तर तिचा काय अर्थ करायचा, आणि त्यांतलें खरें इंगित काय, तें नक्की झालेंच! मग मी पुनः त्यांची आशा करीत बसण्याचें सोडून देईन, इतकेंच काय, तर तशी इच्छाहि करणार नाहीं ! मनांतून अत्यंत आवडणारी स्त्री आपलें प्रेम व आपला हस्त मनापासून देण्यास आनंदानें तयार असतां, त्याचा स्वीकार न करितां, फक्त ती आपल्याहून कमी योग्यतेची आहे

एवढेंच ह्मणून हळहळत बसण्याची जर त्यांनां हौस वाटत असेल, तर मीहि त्यांच्याविषयीं हळहळ मानण्याचें एकदम अजीबाद सोडून देईन !

आज आपल्या घरीं केवढी उच्च दर्जाची राणी भेटायला आली होती, तें घरांत इतरांनां समजलें तेव्हां त्यांनां कौतुक व आश्चर्य वाटलें; परंतु ती कां व कशाला आली होती याची कोणीं विशेष शहानिशा केली नाहीं. सीताबाईनीं जें कारण लावून समाधान करून घेतलें तसलींच कारणें इतरांनींहि आपापल्या समजुतीप्रमाणें लाविलीं. त्यामुळें ज्याला त्याला पुनः पुनः खोटें कारण सांगत बसण्याचें ताराबाईला मुळींच प्रयोजन पडलें नाहीं, व त्यापासून होणारा त्रास आपोआप चुकला.

दुसरे दिवशीं सकाळीं ताराबाई लायब्ररीच्या खोलीवरून सहज चालली असतां, तिचे वडील लायब्ररींतून दार उघडून बाहेर पडत होते त्यांनीं तिला पाहून हांक मारली. त्यांच्या हातांत एक पत्र दिसत होतें. ते म्हणाले " तारे, मी तुलाच बघत होतों. जरा आंत ये पाहूं. "

बाबा कधीं न बोलवायचे ते आज मुद्दाम आपल्याला लायब्ररींत कां बोलावताहेत ही तारेची जिज्ञासा, कदाचित् त्यांच्या हातांतल्या पत्राशीं तर कांहीं आपला संबंध नसेल, या कल्पनेनें पराकाष्ठेची प्रदीप्त झाली. तिचा एकदम तर्क झाला, कीं, तें पत्र कदाचित् माईसाहेबांनीं परस्पर आपल्या वडिलांनां लिहिलेलें असेल! तसें असलें तर, अरे बापरे, किती तरी त्यांनां सगळें समजून सांगण्यांत आपली त्रेधा उडेल !

कांहीं न बोलतां ती आनंदरावांच्या मागोमाग लायब्ररींत गेली, व दार लाऊन घेऊन त्यांच्यासमोर टेबलाशीं एका खुर्चीवर बसली. नंतर आनंदराव म्हणाले " आज सकाळीं हें पत्र आलें त्यानें मला किती तरी चकित करून सोडलें आहे ! तें तुझ्याबद्दल बरेंचसें आहे, म्हणून मीं ह्मटलें, तुला कळवावें तें चांगलें. मला बिलकुल कल्पना नव्हती, कीं, माझ्या दोन मुली आजच विवाहशृंखलेनें बांधल्या जाण्याच्या संकटांत पडायला झाल्या आहेत! एक फार उत्तम अशी सोन्याची शृंखला तूं आपणाकरितां शोधून काढली आहेस म्हणायची! वा वा, फारच छान ! "

ताराबाईची एकदम खात्री होऊन चुकली, कीं, हें पत्र मामीसाहेबांचें नसून त्यांच्या भाचाचें असावें, व ती एकदम चर्या पालटून अत्यंत लाजून गेली. भय्यासाहेबांनीं एकदम परस्पर आपल्या वडिलांनां लिहून त्यांनां परवानगी विचारली

त्यांत आपण हर्ष मानावा, कीं, प्रथम आपल्या स्वतःची संमति घेतल्याविना त्यांनीं एक पाऊल पुढें कां टाकलें याबद्दल त्यांच्यावर राग धरावा,हा तिचा निश्चय होईना. तेवढ्यांत आनंदराव पुढें बोलूं लागले "तारे, तुला ओळख पटलीशी दिसते! तरण्याताठ्या मुली या असल्या बाबतींत 'ता म्हणतां ताकभात' ओळखीत असतात.पण तूं जरी इतकी मोठी चतुर आहेस,तरी मी पैज लावतों कीं, तुझ्याशीं लग्न करण्याला कोण हा इतका उल्लू झाला आहे तो तुला खास ओळखतां येणार नाहीं ! हें पत्र आहे—नीलकंठरावाचें ! "

ताराबाई आश्चर्यानें ह्मणाली "नीलकंठरावांचं ? अन् ते काय लिहिणार ?"

आनंदराव हंसत म्हणाले "काय लिहिणार ? नेहमींप्रमाणें अत्यंत मुद्देसूद कांहीं तरी लिहिणार, हें उघडच आहे ! त्यांनीं प्रथम शांतीचें लग्न भाऊसाहेबांशीं ठरल्याबद्दल अभिनंदन करून सुरुवात केली आहे. ती बातमी बहुतकरून त्यांनां रावबहादुरांच्या इथल्या कोणींतरी रिकामटेकड्या गप्पा मारण्याचा शोक असणारानें कळवली असावी. पण त्याबद्दल त्यांनीं काय लिहिलें आहे तें तुला सांगत बसून तुझें कुतूहल मी वाढवूं इच्छीत नाहीं. तुझ्याविषयीं जें काय आहे तें आतां एकदम वाचून दाखवतों झालें:—

'या आनंददायक गोष्टीबद्दल आमचें स्वतःचें व सौभाग्यवतीचेंहि मनःपूर्वक अभिनंदन आपणास कळवून झाल्यानंतर, दुसरीहि एक गोष्ट आम्हाला त्याच मार्गानें कळली आहे तिच्याविषयीं थोडीशी इशारत देण्याची परवानगी मागून घेतों. आपली कन्या ताराबाई ही आतां फार दिवस नगरकर हें नांव धारण करणार नाहीं; थोरल्या बहिणीनें तें नांव सोडल्यानंतर लवकरच तीहि तोच कित्ता गिरवील,व तिनें स्वतःकरितां पसंत केलेला वर या अखंड महाराष्ट्र देशांतल्या अत्यंत उच्च दर्जाच्या पुरुषांमध्यें सहज गणना होण्यासारखा आहे असें समजतें—' "

आनंदराव पुढें म्हणाले "बोल,तारे,या शब्दांचा काय अर्थ आहे याची आहे तुला यत्किंचित् तरी कल्पना ? बरें असो, पुढें ऐकः—

'त्या तरुण सुदैवी पुरुषाला जगांतील सर्व उत्तम गोष्टी यथेच्छ मिळालेल्या आहेत. माणसाला जी जी ह्मणून इच्छा शक्य आहे, ती तीं सर्व त्याची अगोदरच विशेष तऱ्हेनें पूर्ण झालेली आहे. विपुल दौलत, महान् थोर असें उच्च कुलशील,व याचकांनां देण्याकरितां हातीं रगड देवस्थानचीं वगैरे उत्पन्नें !

ही सारी तयारी त्याच्या हातीं जन्मतःच लाभली आहे. असल्या मनुष्यानें जर कोणा स्त्रीला मागणी घातली, तर तिनें व तिच्या आतेष्टांनीं ती ताबडतोब स्वीकारून टाकावी, हें अत्यंत साहजिक आहे, हें खरें; पण इतक्या जरी मोहक गोष्टी त्या मागणींत आहेत, तरी ती मागणी विचार न करतां एकदम स्वीकारण्यापासून दुसऱ्या किती दुर्धर आपत्ति तुमच्यावर येऊन आदळतील, त्यांचा इशारा आमच्या प्रिय ताराबाईंनां आम्ही देऊन ठेवणें अत्यंत जरूर आहे.'

आनंदराव ह्मणाले "बोल तारे, अजून तरी कांहीं तर्क झाला का तुला कोण हे थोर पदवीचे गृहस्थ असतील तो ? पण आतां पुढें स्पष्टच आहे. ऐकः—

'हा आगाऊ इशारा देण्यामध्यें आमचा हेतु येणेंप्रमाणें आहे, कीं, आह्मांला असें खात्रीलायक आधारावरून मानण्याला सबळ कारण आहे, कीं, त्या गृहस्थांची मामी ह्मणजे श्रीमंत मातुश्री राणी माईसाहेब यांची असल्या विवाहावर स्नेहयुक्त दृष्टि नाहीं.'

आनंदराव ह्मणाले "पाह्यलेंस तारे, हे गृहस्थ म्हणजे भय्यासाहेब हो ! पहा बरें मीं तुला देखील चकित केलें कीं नाहीं ? कोण अजागळ लोक बेटे ? अरे, कंडीच पिकवायची तर कांहीं तरी वेळ टिकेल अशी तरी पिकवावी, एवढीहि या नीलकंठरावाला अगर रावबहादुरांच्या माणसांनां अक्कल कशी नाहीं ? आपल्या सगळ्या ओळखीच्या माणसांत त्यांनां तुझ्या नांवाशीं जुंपण्याला हें रत्न कोठून सांपडलें ? हें नांव ऐकूनच कोणीहि एकदम ह्मणेल, कीं, अगदीं ही अशक्य गोष्ट ! भय्यासाहेब ! जो कधीं कोणच्याहि स्त्रीकडे दोषैक दृष्टीवांचून बघतच नाहीं, व ज्यानें तुझ्याकडे तर आजन्मांत एकदांहि कधीं लग्नाच्या हेतूनें पाह्यलं नसेल, असला माणूस खूप काढला त्यांनीं ! वा ! फारच बहार केलीत !"

ताराबाईनें वडिलांच्या बरोबर थट्टा करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, पण मोठ्या मिनतवारीनें एक लहानसें स्मित तिच्या चर्येवर येऊं शकलें. तिला इतका नापसंत असणारा असा विनोद आजपर्यंत सबंध जन्मांत कधीं तिच्या वडिलांच्या तोंडांतून निघाला नसेल !

आनंदराव मोठ्यानें हंसून म्हणाले " कां तारे, मौज आहे कीं नाहीं, अगदीं बहारीची ?"

## पसंत नसलेला विनोद.

ताराबाई बळेंच हंसून ह्मणाली "हो हो, बरं पुढं तरी ऐकूं या !"

आनंदराव पुढें वाचूं लागले " हा दुसरा विवाह जु न येण्याचा संभव तों दिसतो आहे असें आम्हीं काल रात्रीं श्रीमंतांच्या कानावर घातलें, सरकारांनीं आपल्या नेहमींच्या कृपापूर्ण पद्धतीला अनुरूप अशा सद्-बुद्धीनें त्या विषयावरचीं आपलीं मतें आम्हांस व्यक्त करून दाखविलीं. त्यांच्या बोलण्यांत असे स्पष्टोचार आले, कीं, नगरकरांचें घराणें बिनीवाल्यांच्या घराण्यापेक्षां किती तरी अत्यंत हीन असल्यामुळें या विवाहाची कल्पनासुद्धां भय्यासाहेबांच्या मनांत येणार नाहीं, व स्वतः त्यांच्याकडून या विवाहाला संमत्ति कालत्रयींहि मिळणार नाहीं. हा निषेध आमच्या कानीं आल्याबरोबर आम्ही चित्तांत असें आणलें कीं, आमच्या प्रिय ताराबाईनां व आपणालाहि खुद्द ती गोष्ट होईल तितक्या लवकर कळवून टाकावी, व आपण केवढी चुकी करणार होतां, व आम्हीं इशारा दिला नसता तर केवढीं महान् संकटें आपण आपल्या कुटुंबावर ओढून घेत होतां, तें आपल्या निदर्शनास स्पष्टपणें आणून देण्याचें आमचें कर्तव्य बजवावें." ऐकलंस तारे ? पण आणखी मौज ऐक—

" आमच्या प्रिय सुंद्रीचें वांकडें पडलेलें पाऊल कसें तरी करून पुन्हा सरळ मार्गावर आणून सोडलें' हें ऐकून आह्मांस खरोखरच ठीक वाटत आहे, व प्रत्यक्ष लग्न होण्यापूर्वीं ती आपल्या नवऱ्याच्या जवळ कांहीं दिवस राहिली होती ही गोष्ट बहुत जनांनां विदित झालेली असावी एवढेंच आह्मांला वाईट वाटत आहे. परंतु आमच्या स्वतःच्या राजगुरूच्या दर्जा-प्रमाणें आमचें आह्मांला कर्तव्यकर्म करण्याचें सोडतां येत नाहीं, सबब त्या दोघांचें लग्न लागल्याबरोबर आपण त्या दोघांनां एकदम घरीं येऊं दिलेंत ही मोठी चुकी आपण कशी केलीत याचें आश्चर्य व्यक्त केल्याशिवाय आमच्यानें राहवत नाहीं. तसें करण्यानें आपण पापाचरणाला प्रत्यक्ष मदत केल्यासारखें आह्मांला वाटतें. इतकेंच नव्हे, आम्ही जर शंकराचार्यांचे मुखत्यार असतों, तर आपणा स्वतःला त्याबद्दल आम्हीं स्वतः जाब देखील विचारला असता. आपण त्यांनां क्षमा करणें शास्त्रविहित आहे हें खरें, परंतु आपण त्या उभयतांनां कधींहि आपल्या सन्मुख येऊं देणें अथवा त्यांचें नांवहि आपल्या देखत कोणालाहि उच्चारूं देणें अत्यंत गर्हणीय होतें."

आजपासून पन्नास वर्षांनीं !

आनंदराव ह्मणाले "कसा अकलेचा खंदक आहे कीं नाहीं ? क्षमेची बेट्याची कल्पना पहा किती कोती व असमंजस आहे ! बाकीच्या पत्रांत फक्त मालतीला कांहीं महिने गेले आहेत व एक छोटा राजगुरु उत्पन्न होण्याची आशा आहे, वगैरे मजकूर आहे."

तारेकडे पहात आनंदराव पुनः बोलूं लागले " पण काय ग तारे, या पत्राची तुला मोठीशी मौज वाटलीशी मला दिसत नाहीं. असली अजागळ बातमी उठवल्याबद्दल तूं त्याच्यावर चिडली तर नाहींस? राग धरण्यांत कांहीं अर्थ नाहीं. अग, जगामध्यें माणसांत आपला राहण्याचा हेतू एवढाच नव्हे का, कीं, लोकांनीं आपली थट्टा करावी, अन् आपणहि दुसऱ्यांची चेष्टा करून उसनें सव्याज फेडावें ? "

ताराबाई विमनस्कपणें ह्मणाली " हो बाबा, मला भारीच मौज वाटली या पत्राची. पण किती तरी विचित्र बाई हें सगळंच ! "

आनंदराव ह्मणाले "अग, सगळी मौज आहे या विचित्रपणांतच कायती ! भय्यासाहेबांखेरीज दुसऱ्या कुणाचेंहि त्यांनीं नांव जुळवलें असतें, तर मग कांहींच नव्हती मौज ! विशेष स्वारस्य येतें त्या पत्राला, तें फक्त त्यांची तुझ्याविषयीं पूर्णपणाची तटस्थ वृत्ति आहे व तुझ्या मनांतहि त्यांच्याविषयीं सडकून अप्रीति आहे, एवढ्याच दोन गोष्टींनीं ! या दोन गोष्टी लक्षांत आल्या म्हणजे नीलकंठरावांच्या अचरटपणाला अशी मजेदार बहार येते ह्मणतेस ! मला नेहमीं पत्रें लिहीत बसण्याचा कंटाळा असतो खरा, पण नीलकंठरावाशीं पत्रव्यवहार करणें मी कधीं सोडणार नाहीं. कारण, त्यांच्यासारखीं अचरट पत्रें दुसरें कोण लिहूं शकेल ? असें त्यांचें एकादें झोंकदार पत्र वाचलें, म्हणजे मला वाटूं लागतें, कीं, आमचे जामात नागेशराव जरी बेश्रमपणा व ढोंग करण्यांत कमती नाहींत, तरी त्यांच्याहि पेक्षां वरताण हे नीलकंठराव आपल्या अचरटपणानें करून आमची जास्त करमणूक करतात ! अन् काय ग तारे, या उठलेल्या बातमीबद्दल काल माईसाहेब नाहीं का कांहीं ह्मणाल्या? अथवा कदाचित् त्या आपली संमति नाहीं ह्मणून तुला बजावायला आल्या असतील ! वा, तें तर फारच छान ! "

या वडिलांच्या कल्पनेला ताराबाईनें हंसण्यावारी घालविण्यापलीकडे काय करणें शक्य होतें ? आपली कल्पना सत्याच्या किती जवळ जवळ येऊन

भिडली होती, तें आनंदरावांनां मुळींच माहीत नव्हतें. म्हणून पुनः एकदां चेष्टेनें ती कल्पना उच्चारून करमणूक करून घेतली तरी तिला जास्त वाईट वाटलें नाहीं. आपल्या मनांतली खरी स्थिति झांकून ठेवण्याला आज ताराबाईला जितके प्रयास पडले, तितके जन्मांत कधींहि पडले नव्हते. ती एकटी असती तर जेथें तिला अत्यंत वाईट वाटून डोळ्याला पाणी येण्यापर्यंत मजल गेली असती, अशा प्रसंगीं आपल्याला मोठी मौज वाटते आहे असा तिला बहाणा करावा लागत होता, व तो संपादण्याकरितां हंसावें लागत होतें. भय्यासाहेब आपणाविषयीं अगदीं तटस्थ, अगदीं प्रेमशून्य आहेत, अशी बाबांची समजूत झालेली पाहून तिचें मन अत्यंत खट्टू झालें, व तिच्या मनाला फार जबर असा विषण्णपणा येऊन निराशा होऊं लागली. भय्यासाहेबांच्या अंतःकरणाची खरी प्रेममय स्थिति आपल्या वडिलांसारख्या चाणाक्ष व धूर्त माणसाच्या तीक्ष्ण नजरेस आल्याशिवाय कशी राहिली, याचें तिला नवल वाटूं लागलें. आपले वडील इतके आंधळ्यासारखे काय म्हणताहेत कोण जाणे ? अथवा त्यांनां दिसत नाहीं म्हणून आंधळे म्हणण्यापेक्षां, आपल्या स्वतःच्याच नजरेला, जें खरोखर मुळांतच नाहीं, तें उगीच दिसतें आहे, असें तर नसेल ? वस्तु-स्थितींत खरोखर प्रेम नाहीं म्हणूनच तें बाबांनांहि दिसलें नाहीं, व आपण मात्र विनाकारण मृगजळाप्रमाणें प्रेम म्हणून हपापून बसलों आहोंत कीं काय, ही भीति तिच्या हृदयास त्रस्त करूं लागली.

---

## प्रकरण अठ्ठावन्नावें.

### अखेर कसें जमलें !

मागील प्रकरणांत सांगितलेल्या हकीगतीनंतर सहासात दिवस झाले होते. भाऊसाहेब दररोज शांतिसदनांत येऊन मौजेनें काळ घालवीत असत. प्रौढविवाहपद्धतीप्रमाणें विवाह जुळून आल्यापासून तों विवाह समारंभ प्रत्यक्ष साजरा होऊन जाईपर्यंतचा काळ विवाहेच्छु तरुण जोडप्यांनां अत्यंत आल्हादकारक वाटत असतो. त्या काळचा आल्हाद एका विशिष्ट प्रकारचा असतो. पुढें विवाह होऊन नवराबायकोचें प्रत्यक्ष नातें सुरू झालें म्हणजे पुढें किती जरी एकमेकांपासून सौख्यप्राप्ति झाली, तरी विवाहापूर्वीच्या लाभणाऱ्या सौख्याची महती अत्यंत निराळ्या प्रकारची असते. परीक्षा उतरण्याचा आनंद रिझल्ट लागण्याच्यापूर्वीं जसा मनाला तन्मय

करून टाकीत असतो, त्या मानानें प्रत्यक्ष रिझल्ट लागून परीक्षा उतरल्याची तार हातीं आल्यावर त्याची तीव्रता क्षणोक्षणीं कमी होत जाते, व एकदोन दिवसांत तो आनंद बहुतेक सर्व मावळून जाऊन पुढच्या मार्गक्रमणांतल्या अडचणींच्या काळजीनेंच मन भरून जाऊं लागतें. या एका लहानशा अनुभवावरून वरील विधानाची सत्यता तेव्हांच पटण्यासारखी आहे.

रोज भाऊसाहेब आले म्हणजे ताराबाईचें काळीज धडधडूं लागे, कीं, भय्यासाहेब सध्यां इकडे येत नाहींत म्हणून पत्र आल्याची ते आज बातमी सांगतात कीं काय ? ती दुष्ट वार्ता आपल्या कानीं होईल तितकी उशीरां यावी, अशा हेतूनें ती भाऊसाहेब आल्याचें कळतांच पूर्वींप्रमाणें त्यांना भेटण्यालाहि उत्सुकतेनें पुढें जात नसे. सात दिवस रोज सकाळीं, ही भीति आज खरी ठरून आपला आजचा दिवस निराशेनें काळाकुट्ट जातो कीं काय, असें वाटे, व रोज भाऊसाहेब येऊन ते तसलें कांहीं बोलले नाहींत म्हणजे धीर उत्पन्न होई. पण शहानिशा करून घेण्याची अतोनात इच्छा असूनहि प्रश्न विचारून खुलासा करून घेण्याचीहि तिला भीति वाटे, व रोज ही तो प्रश्न कां विचारीत असते असें कोणाला वाटेल कीं काय, हीहि चोरी मनांत दृढपणें असेच. अखेर कांहीं तरी कारणावरून गोष्टी निघून आज त्यांचें कांहीं पत्र आलें नाहीं असें समजलें म्हणजे दुसऱ्या दिवसापर्यंत हुशारी येई. असा प्रकार सात दिवस चालला, तसतशी दरम्यान उत्पन्न झालेली भीति हळुहळू कमी कमी होत जाऊन त्याचप्रमाणें आशाहि मनांत जास्त जोर करूं लागली होती.

आठव्या दिवशीं सकाळीं रोजच्याप्रमाणें ताराबाई काळजी करीत होती. अजून ती आपल्या खोलींतच बसली होती. भाऊसाहेब सकाळीं चहाच्या वेळीं आले नसल्यामुळें ते आज येऊन काय सांगतील, भय्यासाहेब नाहीं येत असें सांगून आपली निराशा सुरू करतील, किंवा कांहींच न बोलतां दुग्ध्यांतच आपणाला रहावें लागेल, किंवा ते येणार असल्याचें पत्र आल्याची गोड वार्ता आपणाला सांगतील, अशा इष्ट, अनिष्ट आणि दुष्ट कल्पनांची रेलचेल ताराबाईच्या डोक्यांत चालली होती. प्रत्येक कल्पनेला अनुरुप अशी तिची चर्याहि क्षणोक्षणीं बदलत जात होती, ती मोठी मौजेची होती. हल्लींच्या संशयाचे अनिवार तडाखे निमूटपणानें सोशीत राहण्याची स्थिति तिला आतां दुःसह झाली होती. तोंड दाबून बुक्क्यांचा मार ! एवढी काळजी

हृद्रोगाप्रमाणें तिला रात्रंदिवस लागून राहिली होती खरी, पण त्या गोष्टी-विषयीं साधकबाधक गोष्टी बोलून मनाला धीर देईल असें एकहि माणूस त्या घरांत नव्हतें. शांताक्का आपल्याच आनंदांत गर्क! सीताबाई तिच्याबरोबर नाचायला तयारींतच. मथुरीहिरीनां तर या काळजीचा अर्थहि समजण्याची अक्कल नाहीं. येऊनजाऊन बाबासाहेब राहिले, पण त्यांनीं तर परवां नीलकंठरावांचें पत्र आलें असतां जे उद्गार काढले होते ते लक्षांत आले असतां ताराबाईची गाळणच उडूं लागे. हल्लींची संदेहयुक्त कष्टतम स्थिति संपून जाऊन केव्हां एकदां बरावाईट सोक्षमोक्ष व्हायचा असेल तो होऊन जावो, अशी स्थिति ताराबाईच्या मनाची होऊन ती अगदीं जेरीस येऊन गेली होती.

अशा स्थितींत असतां पुस्तकें वगैरे वाचण्याचा नेहमींचा कोणचाहि उद्योग तिच्या हातून होणें शक्य नव्हतें. सूर्योदय खास होणार अशी खात्री देणाऱ्या उषःकालाचें आगमन होण्यापूर्वींची घटका अत्यंत अंधकारमय भासते असें म्हणतात, ती स्थिति आज ताराबाईच्या मनाची झाली होती. आज कां कोण जाणे, तिच्या मनांत विशेष हुरहुर लागून राहिली होती. परंतु ज्याप्रमाणें अत्यंत गाढ अंधकाराचें साम्राज्य निरंतरचें राहणार असें वाटूं लागल्याबरोबर एकाएकीं पूर्वदिशेकडे उषःकालाची प्रभा दृष्टीस पडतांच ती सर्व निराशा एकदम नाहींशी होते, त्याप्रमाणें तिनें आपल्या खोली-च्या खिडकींतून बाहेर नजर टाकली मात्र, तों दूर फाटकांतून दोन घोडेस्वार शिरतांना दृष्टीस पडले, ते तिनें क्षणार्धांत ओळखून टाकले. एकदम तिच्या चर्येंत जमीनअस्मानाइतका बदल होऊन गेला! दोन मिनिटांपूर्वी जी ताराबाई वाट पाहून पाहून रंजीस आली होती, ती तिची स्थिति एकदम बद्लून तिच्या अंगावर रोमांच उभे राहिले, व ती आपल्याशीं आशापूर्ण स्वरानें बोलूं लागली "शाबास ताराबाई, शाबास ! मना, आतां धीर धर, धीर धर! सर्व आशांनां नष्ट करून टाकणारी धास्ती तर आज एकदम संपली. माईसाहेबांची चटवट फक्त माझ्याचपुढं झाली असून एकतर त्यांची छाती भय्यासाहेबांच्या पुढं असली लुडबुड करण्याइतकी धीट नाहीं, अथवा त्यांनीं आपणाकडून होती तितकी पुण्याई खर्चीं घातली पण त्यांची डाळ शिजली नाहीं हें तरी एक. याशिवाय तिसरी गोष्ट शक्यच नाहीं! भय्यासाहेबांशीं गोष्ट काढण्याची त्यांची आशा तरी नाहीं, अथवा काढून कांहीं वळलें नाहीं ! कोणचीहि गोष्ट खरी

असली तरी आपल्या मार्गांतला एक मोठाच कांटा आपोआप समूळ उपटून निघाला. आतां ताराबाई ! तुला रान मोकळं मिळतं आहे, व सावजहि आपखुशीनें तुझ्या टप्प्यांत आयतेंच चालून येतं आहे. आतां तूंन् तुझी अक्कल पाहूं कशी काम करते ती ! ”

असे शब्द मनाशीं बोलत तिनें आरशामध्यें एकवार स्वतःकडे हंसत पाहिलें, एकवार आपल्या कैंसांवरून हातबीत फिरवून नीटनेटकेपणा आणला, झट्कन् एक सुंदरसें काळ्या रंगाचें बुट्टेदार पातळ नेसून त्याशीं खुलून दिसणारा असा पांढरा शुभ्र पोल्का चढविला, व ती खालीं दिवाणखान्यांत गेली. भाऊसाहब व भय्यासाहेब नुकतेच घोड्यांवरून उतरून आंत येऊन बसले होते. सीताबाईहि आंत येऊन “तरी म्हटलं आज भाऊसाहेबांना उशीर कां झाला इकडे यायला ! आतां कारण मीं ओळखलं ! या आपल्या स्नेह्यांची समजूत घालायला आपणाला वेळ लागला असेल ! ” असें भय्यासाहेबांनां लागण्यासारखें व आपला जय झाला असें दाखविणारें भाषण करीत होत्या. आपल्या आईनें भय्यासाहेब येतांक्षणींच किती मूर्खपणाची ही त्यांची संभावना केली, तें पाहून ताराबाईला वाईट वाटूं लागलें, भय्यासाहेब व भाऊसाहेब हे दोघेहि शरमल्यासारखे दिसूं लागले. इतक्यांत सीताबाई पुनः बोलूं लागल्या “तें असो ह्मणा. जें तें आपापल्या समजुतीप्रमाणं वागत असतं ! झाल्यागेल्या गोष्टी आतां उगाळण्यांत काय अर्थ आहे ? भाऊसाहेबांकरितां ह्मणून त्यांची सर्वच मंडळी आतां आह्मांला अगदीं मनापासून प्रिय आहेत, असंच म्हटलं पाहिजे. ”

सीताबाई आणखी काय बोलतील कोण जाणे, असें भाऊसाहेबांनां व ताराबाईला होऊन गेलें. येथें त्यांनां जास्त वेळ बोलण्याची सवड मिळाली तर “तुमच्या मामी पहा बरं किती थोर मनाच्या अन् खऱ्या सज्जन ! आपण होऊन आम्हां गरिबांच्या घरीं आल्या, अर्ध घटका आमचा समाचार घेतला अन् मग गेल्या,” असलें कांहीं तरी बोलतील, अशी भीति ताराबाईला पडली. भाऊसाहेबांनांहि सीताबाईच्या कचाट्यांतून आपली कशी सोडवणूक करावी, हा विचार पडला असावा. कारण ते लगेच ह्मणाले “आज बाहेर हवा किती प्रसन्न पडली आहे म्हणतां ! आतां आम्ही आलों तेव्हां आम्हांला फारच मौज वाटत होती. अशा वेळीं घरांत बसण्यापेक्षां बाहेर हिंडायला जाण्यांत फार मजा आहे. चला आपण सारींच फिरायला जाऊं !”

ताराबाईला ही युक्ति फार पसंत पडून तिनें तिला लगेच दुजोरा दिला. शांताबाईची हरकत असणें शक्यच नव्हतें ! मथुरीला बाजावर वाजवीत बसायचें होतें,व सीताबाईंनां घरांत काम होतें. म्हणून बाकीचीं पांच जणें— भाऊसाहेब, शांता, भयासाहेब, तारा व हिरा—हिंडायला निघालीं. पांचचार मिनिटांतच भाऊसाहेब व शांताबाई मागें रेंगाळूं लागलीं. त्यांनां हल्लीं एकमेकांच्या सहवासाशिवाय दुसऱ्या कशांतहि लज्जत नसे. भय्यासाहेब, ताराबाई व हिरी पुढें बोलत चाललीं होतीं. रावबहादुरांचा बंगला दिसूं लागतांच हिरीला आठवण झाली,कीं,आपल्याला शेवंतीला भेटून फार दिवस झाले, तेव्हां आज जरूर जाऊन तिची भेट घेतलीच पाहिजे. तिनें ती गोष्ट काढतांच ताराबाई म्हणाली "बरं आहे,तूं जा पाहिजे तर, आम्हांला तिकडे येण्याचं कारण नाहीं." हिरीला पडत्याफळाची आज्ञा. ती झट्कन् तिकडे वाट फोडून जाऊं लागली, व बाकीचीं दोघें सरळ रस्त्यानें पुढें निघालीं.

कितीक तरी वेळ ताराबाई कांहींच बोलली नाही.आज तिच्या मनांत नाना तऱ्हेचे विचार काहूर उठवीत होते. आज आठ दिवस अहोरात्र आपल्या मनाची कशी त्रेधा उडून राहिली होती, संशयाच्या भयंकर भोंवऱ्यांत सांपडून आपण किती गिरक्या खाल्लया, कितीदां तरी ही दुःसह अशी दुग्ध्यांत राहण्याची स्थिति एकदम संपून जावी अशी आपणाला प्रबल इच्छा झाली होती ! एकदांचा काय तो बरावाईट सोक्षमोक्ष होऊन निकाल लावून घेण्याला सोन्यासारखी संधि आली आहे तिचा उपयोग करून घ्यावा, असा धटकुलेपणाचा बेत तिच्या मनांत तयार होत होता; पण बेत मनांत येणें जितकें सोपें, तितकेंच तो करून टाकणें दुर्घट आहे, हाहि विचार तत्क्षणींच तिच्या मनांत आला. आज आपणाला उतावळी झाली आहे, ह्मणून काय आपणाला स्पष्ट प्रश्न विचारण्याची थोडीच सोय आहे ? " अहो मी आपणांला पतकरायला तयार आहें, आपण मला मागणी घालतांहां का ?" असा प्रश्न थोडाच करतां येईल ? व तसा करणें आपल्याच्यानें कालत्रयींहि होणार नाहीं ! ज्या मीं एकदां त्यांनीं मागणी घातली असतां त्यांनां निवळ अपशब्द बोलून लाथाडून दिलें, ती मी आज असा प्रश्न विचारून त्यांच्या पायाशीं लोटांगण घालीत आहें असें त्यांनां वाटणार नाहीं का ? छे छे, असला मूर्खपणाचा विचार क्षणभरहि बरोबर नाहीं, व तो प्रचलित वहिवाटीप्रमाणें शक्यहि नाहीं.पूर्वींच्या पद्धतीप्रमाणें ऐन बालविवाहाच्या प्रसंगींसुद्धां मुलाकडून

मुलीकडे मागणी जात असे, इतकी स्त्रीजातीची महती समजत असत. मधल्या अर्धवट रानटी काळांतच कायतीं मुलींचीं आईबापें आपल्या मुलींचीं टिपणें घेऊन मुलाच्या घरीं हेलपाटे घालण्यांत जोडे फाडून घेत असत. ती गर्हणीय स्थिति नष्ट होऊन आतां आपल्या समाजामध्यें फार पुरातनकाळीं असलेली प्रौढविवाहाची पद्धति सुदैवानें पुन: रूढ झाली आहे, व तिच्या बरोबर स्त्रीजातीला योग्य असा मानहि हल्लीं त्यांनां मिळून मागणी घालण्याचें काम स्त्रीचें नव्हे,तें पुरुषानें केलें पाहिजे, व ती मागणी स्वीकारणें अगर न स्वीकारणें निवळ तिच्या स्वत:वर ठेवलेलें आहे,अशी ही सर्वांगसुंदर पद्धति रूढ झाली असून,मी आज आपण होऊन भय्यासाहेबांच्यापुढें लोटांगण घालून "माझा स्वीकार करतां काहो" असें उलट म्हणूं काय ?अलबत् कधींहि नाहीं!

हा विचार ठरून जाण्याला दोनचारच मिनिटें पुरलीं. इतका तो स्वत:-सिद्ध होता. परंतु तेवढ्यानें तिचें समाधान होणें शक्य नव्हतें. या गृहस्थानें आपणां सर्वांवर किती उपकार केले आहेत त्याची आठवण होऊन तिचें अंत:करण ओथंबून गेलें. ज्याच्यामुळें आज आपला सर्वांचा उजळ माथा झाला आहे, शांताक्कांचा भाग्योदय होत आहे, आपलाहि होण्याचा संभव आहे, व सुंद्रीची बेअब्रू झांकून गेली,त्या माणसाचा आपल्याच घरांत आपल्याच आईनें पदोपदीं पाणउतारा करावा,तो माणुस आपणाला आवडत नाहीं असें पाहुणचाराच्या साध्या नियमाविरुद्ध स्पष्टपणें त्याच्या तोंडावर उद्गारून दाखवावें, यासारखें दुसरें निंद्य वर्तन कोणचें ? अशा तऱ्हेनें आपली आई आणखी एकदोनदां त्यांनां टाकून बोलेल, हाहि उघडपणें संभव दिसत होता. कारण, सीताबाईंनां मनाचा थोरपणा कसा तो बिलकुल ठाऊक नसून लोकांनां घालूनपाडून कुजकेंनासकें बोलण्यांत त्यांचा हातखंडा असे. आजच्या दिवसांत जर त्या आणखी तसलें कांहीं बोलूं लागल्या, तर आपण त्याचा प्रतीकार कसा करणार ? खरी गोष्ट स्पष्टपणें त्यांनां सांगितल्याशिवाय त्यांची समजूत पडणें कधींहि होणार नाहीं,व तसें स्पष्ट करून सांगण्याचीहि आपणाला परवानगी नाहीं. जरी कदाचित् आपण वचनभंग करून शारदामामींचें पत्र आईला दाखविलें, तरी केव्हांहि झालें तरी कोणच्या तरी एका टोंकाशीं राहणाऱ्या आईसाहेब हल्लींच्या उलट टोंकाला जाऊन पदोपदीं भय्यासाहेबांचे आभार मानून त्यांनां तिकडूनहि बेजार करून सोडतील,अशीहि खात्री, त्यांचेच सजातीय नीलकंठराव यांच्या वर्तनावरून, तिला वाटूं लागली. एवंच आई-

साहेबांनां इशारत देण्यापासून मुळींच फायदा होण्यासारखा नसून दुसरीच कांहीं तरी योजना केल्याखेरीज गत्यंतर नाहीं, व तीहि आतां अगदीं या घटकेलाच करून टाकली पाहिजे. कारण, घरीं परत गेल्याबरोबर भाऊसाहेबां-बरोबर भय्यासाहेबांनांहि जेवणाला राहण्याचा आग्रह होणारच, व तो त्यांनीं स्वीकारला तर जेवणाच्या वेळीं भलतेंच बोलून आईसाहेब सर्व बरेंग करून टाकण्याचा फार संभव तिला दिसूं लागला.

पण अशी नवीन योजना तरी काय योजावी ? भय्यासाहेबांनां आमच्या आईसाहेबांचा स्वभाव पुरता ठाऊक झालेला आहेच. त्यांत त्यांनां आज नवीन कांहीं समजणार आहे, असें मुळींच नाहीं.त्याचप्रमाणें त्यांनीं आपल्या घराण्यावर केलेले उपकारहि त्यांनां स्वतःला पूर्णपणें माहीत आहेत. या उप-काराची आम्हांकडून कांहीं फेड व्हावी अशीहि त्यांची इच्छा नाहीं, हें त्यांनीं तो प्रकार अगदीं गुप्त ठेवण्याबद्दल वसंतरावांनां वारंवार बजाविलेलें आहे यावरून स्पष्टच होत आहे. उपकार गुप्त ठेवण्याची उत्कट इच्छा आहे त्या अर्थी त्यांच्याबद्दल आम्हीं कृतज्ञता व्यक्त करावी अशीहि त्यांची अपेक्षा नसणारच ! मग,आतां काय तोड राहिली ? पण कृतज्ञता व्यक्त व्हावी अशी जरी इच्छा नसली,तरी निदान आमच्या माणसांनीं त्यांची विनाकारण अवहेलना तरी करूं नये,एवढी तरी साहजिकपणेंच इच्छा त्यांनां असली पाहिजे. पण तीहि करायला आमच्या मातुश्री चुकत नाहींत. वेळीं अवेळीं त्यांची कुचाळी काढून मर्मभेदक शब्द त्या उच्चारीत असतात.त्यांचा कांही परिणाम होऊं नये ह्मणून आगाऊ आपणच त्यांच्या मनांत आपणाविषयीं सद्बुद्धि उत्पन्न करून ठेवावी. ज्याप्रमाणें प्रतिपक्ष्याच्या शस्त्रास्त्रांचे आघात लागूं नयेत ह्मणून अंगांत शिपाई आगाऊच चिलखत घालून ठेवतो, अथवा प्लेगचा मारा चालूं नये ह्मणून आगाऊ प्लेगप्रतिबंधक लस टोंचून ठेवितात, त्याचप्रमाणें आपल्या मातुश्रींचीं विषयुक्त मर्मभेदक भाषणें त्यांच्या हृदयास झोंबूं नयेत,ह्मणून आपण आगाऊच भय्यासाहेबांनीं केलेल्या महान् उपकारां-बद्दल अत्यंत कृतज्ञता त्यांच्यापाशीं प्रांजलपणानें व्यक्त करून दाखवून त्यांचें अंतःकरण स्निग्ध करून ठेवावें, म्हणजे आईसाहेबांचे विषारी बोल तेथें चिकटणें अशक्य होईल. कृतज्ञतेची त्यांनां जरी अपेक्षा नसली, तरी ती व्यक्त केल्यापासून ते नाखुष तरी खास होणार नाहींत, व निदान एक माणूस तरी आपली खरी किंमत ओळखून आहे या जाणिवेनें दुसऱ्या माणसाचें

अचरट बोल सोसण्यास त्यांच्या अंगीं सहज लीलेनें समर्थता उत्पन्न होईल. निदान आपण कृतज्ञता व्यक्त केल्यापासून जरी कदाचित फायदा झाला नाहीं तरी नुकसान तरी खास होणार नाहीं !

एवढा विचार डोक्यांत तयार होण्याला पांच मिनिटेंहि लागली नाहींत, हें उघड आहे. एकदां विचार कायम झाल्यावर वाट पहात बसणारी ताराबाई नव्हती! विचार डोक्यांत ताजा आहे तोंवर तो अमलांत आणण्याचा हिय्या करून ती एकदम बोलूं लागली " मी किनई, खरोखर, भय्यासाहेब, मोठी आपस्वार्थी आहें ! माझा फायदा होत असला म्हणजे दुसऱ्याचें किती नुकसान होईल त्याची मी दिक्कत बाळगीत नाहीं. आपण माझ्या बहिणीकरितां मुंबईत जी महा तसदी घेतली, ती गुप्त ठेवावी अशी आपली इच्छा आहे खरी, पण ती मला समजल्यापासून आपणापाशीं मी केव्हां एकदां आभार मानीन अशी मी वाट पहात होतें. आतां अनायासें ही संधि आली आहे, तिचा मी उपयोग करून घेणारच. त्याशिवाय माझ्या मनाला शांति म्हणून मिळणार नाहीं. आपणाला हें आवडणार नाहीं हें मी जाणून आहें; पण आम्ही सारीं आपलीं किती अपरंपार ऋणी झालों आहों, तें मला एकदां स्पष्ट बोलून टाकूंच द्या. आमच्या घरांत तें दुसऱ्या कुणालाच माहीत नाहीं, एवढ्याचमुळं केवळ मी असे एकीकडे हे आपले उपकार मानीत आहें."

भय्यासाहेब अगदीं चकितच होऊन गेले ! क्षणभर त्यांची चित्तवृत्ति क्षुब्ध होऊन ते ह्मणाले " या गोष्टी आपणाला कळूं नयेत अशीमाझी फार इच्छा होती. कारण, कळलें तर मजविषयीं तुमचा भलताच ग्रह होण्याचा संभव होता, असें मला वाटलें. पण शारदाबाईच्या तोंडांत इतका तीळ भिजत नसेल अशी माझी कल्पना नव्हती !"

ताराबाई ह्मणाली "छे छे, त्यांची मुळींच चूक नाहीं ! आमची सुंदरच पहिल्यानें इथें बोलतांना सहज चुकून आपलं नांव उच्चारून गेली. अन् एकदां मला थोडंसं कळलं ह्मणजे सबंध कळल्याशिवाय माझ्यानं राहवत नाहीं, तें आपल्याला ठाऊकच आहे. मीं मामींनां पत्र लिहून आग्रहानं सगळं काढून घेतलं. किती आपण श्रम केलेत, किती तरी पराकाष्ठेच्या मानखंडणा सोसल्यात, अन् पदरमोड तरी किती थोरली केलीत ! आपण आमच्या कुटुंबावर केवढं थोरलं तरी उपकारांचं ओझं करून ठेवलं आहे. तें कालत्रयींहि फिटणं तर दूरच पण आमची मंडळी त्यांची किंमतहि—"

भय्यासाहेब मध्येंच बोलूं लागले "छे छे, आधीं आभार मानण्याचीच मुळीं जरूर नाहीं. त्यांतूनाहि तुमच्या घरांतल्या इतर मंडळींनीं तर बिलकूल नाहीं! कारण, त्यांच्याकरितां ह्मणून मीं कांहींहि केलेलें नाहीं. मीं जें काय थोडेंसें केलें असेल तें करण्याच्या इतर हेतूंमध्यें तुम्हाला स्वतःला सौख्य व्हावें हाहि एक हेतु होता, हें मी प्रांजलपणें कबूल करतों. ह्मणून आपल्याकरितां पाहिजे तर माझे आभार मानणें कदाचित् वाजवी होईल. बाकीच्यांचा मात्र मुळींच यांत संबंध नाहीं !"

"आतां काय बोलावं बाई माणसानं !" असें मनांत ह्मणून ताराबाईची अत्यंतच चलबिचल होऊन गेली. काय बोलावें तें तिला यत्किंचित्‌हि सुचेना.

तितक्यांत भय्यासाहेबच पुढें बोलूं लागले "तुमच्या स्वभावाला विनाकारण चाळवण्या दाखविणें अगदीं आवडत नाहीं, हें मला ठाऊक आहे. ह्मणून एकदां काय तें आपण स्पष्ट बोला. सुवर्णपुरांत मीं माझें मन एकदां उघडें करून दाखविलें, तस्सेंच तें अजूनहि आहे ! माझ्या इच्छेमध्यें यत्किंचित्‌हि फरक झालेला नाहीं. आपलें मन त्या काळच्यासारखेंच अजूनहि असलें, तर एका शब्दांत तें सांगा, ह्मणजे मी अखेरची निराशा समजून पुनः कधीं अवाक्षराहि उच्चारणार नाहीं !"

हें अगदीं अनपेक्षित भाषण कानीं पडतांच ताराबाईच्या मनाची काय स्थिति झाली असेल ! पावसाविषयीं चिंतातुर होऊन हपापलेल्या शेतकऱ्याच्या कानावर एकाएकीं पावसाची मुसळधार सुरू झालेली पडली असतां त्याची चर्या जशी तत्क्षणीं प्रफुल्लित होते, त्याप्रमाणें तिची वृत्ति झाली ! चक्रवाक पक्ष्यांचा जोडा झाडाच्या एकाच फांदीवर बसलेला असूनहि दोघांच्यामध्यें एक पान येऊन एकमेकांला एकमेक दिसेनाशीं झालीं ह्मणजे तीं दोघेंहि रात्रभर एकमेकांकरितां रुदन करीत असतात, असें वर्णन तिनें वाचल्याचें आतां ताबडतोब तिला स्मरण झालें, व बहुतांशीं आपणां दोघांची तशीच स्थिति झाली आहे, असें तिला वा लागलें. एक क्षणभर ती ब्रह्मानंदांत तल्लीन होऊन बाह्यसृष्टि पार विसरून गेली. पण दुसऱ्याच क्षणीं ती भानावर येऊन, आपण अजून कांहींच उत्तर दिलं नाहीं, त्यांचें मन अजूनहि संशयाच्या भोंवऱ्यांत गिरके खातच आपण राहूं दिलें आहे ही आपली केवढी भयंकर चूक होत आहे, ही जाणीव तिच्या अंतःकरणांत जागृत झाली, व ताबडतोब तिनें आपल्या अंतःकरणांत केवढा जमीनअस्मानाचा फरक होऊन गेला होता, व

आजचे हे भय्यासाहेबांचे शब्द आपल्या कानांनां कसे अमृततुल्य लागत आहेत तें थोड्याशा आणि अस्पष्ट तुटक शब्दांनीं तिनें व्यक्त करून दाखविलें. अजून भय्यासाहेबांचें प्रेम आपल्यावर कायम आहे याची आपल्याला किती धन्यता वाटत होती व त्याबद्दल किती तरी कृतज्ञता आपल्या हृदयांत उचंबळत होती, तीहि तिनें तशीच व्यक्त करून दाखविली.

ताराबाईचें हें उत्तर ऐकून भय्यासाहेबांनां जो आल्हाद झाला, तसा जन्मांत कधींहि कोणच्याच गोष्टीनें झाला नव्हता ! तसा परमावधीचा आनंद झालेला माणुस जसे उद्गार काढतो तसे काढून भय्यासाहेब नानाप्रकारांनीं आपला आनंद दर्शवूं लागले. ताराबाईनें प्रेमभरानें लज्जित होऊन साहजिकपणें खालीं मान घातली होती. तिची दृष्टि जर त्या समयीं भय्यासाहेबांच्या तोंडाकडे गेली असती, तर त्यांच्या मुद्रेवर हर्षातिशयानें कसे निरनिराळ्या प्रकारचे ठसे एकामागून एक उठत होते, व त्यामुळें त्यांची मुखश्री कशी विकसित होऊन गेली होती, तें तिला स्पष्ट दिसलें असतें. पण जरी तिच्यानें वर बघवलें नाहीं, तरी त्यांच्या तोंडून निघत असलेले शब्द तिच्या कर्णद्वारें अंतःकरणापर्यंत पोंचत होते, व आपणावर यांचें किती अपरंपार अलोट प्रेम आहे व त्यामुळें यांच्या जीविताला आपल्यामुळें किती सौख्य प्राप्त होत आहे, याची तिला बरीचशी स्पष्ट कल्पना झाली.

अशा तऱ्हेनें प्रेममय अंतःकरणानें एकमेकांशीं गुज गोष्टी बोलण्यांत तन्मय होऊन गेल्यावर आपण कोणच्या वाटेनें कोणीकडे चाललों आहों, याची शुद्धबुद्ध कशी असणार ? जिकडे पावलें आपोआप पडत होतीं तिकडे तीं दोघें चाललीं होतीं ! ताराबाईला लवकरच कळून आलें, कीं, आजच्या या सुदैवाचें श्रेय त्यांच्या मामीसाहेबांनांच दिलें पाहिजे. कारण, माईसाहेब खरोखरीच सुवर्णपुरीं न जातां थेट मुंबईस जाऊन त्यांनीं भाचाची भेट घेतली होती, व आपण शिवदुर्गास कोणच्या हेतूनें गेलों होतों व तेथें काय प्रकार झाला तो इत्थंभूत तिखटमीठ लावून त्यांनीं त्यांच्याजवळ वर्णन केला होता. विशेषेंकरून ताराबाईचा हट्टी स्वभाव स्पष्ट दर्शविणारे असे जे त्यांच्या समजुतीनें तिनें शब्द वापरले होते, ते त्यांनीं मुद्दाम भाचांजवळ आवर्जून सांगितले होते. असले शब्द सांगून त्याचें मन तिच्याविषयीं विटून जावें, व ताराबाईनें जी गोष्ट कबूल करण्याचें माईसाहेबांनां साफ नाकारलें होतें ती गोष्ट भय्यासाहेबांकडून तरी कबूल करून घ्यावी, असा त्यांचा फार हेतु

होता; परंतु त्यांच्या हेतूहून अगदीं उलट असा मात्र परिणाम भय्या-साहेबांच्या मनावर होऊन गेला ! ते म्हणाले " माईसाहेबांनीं सांगितलेल्य हकीगतीवरून मला दुसऱ्या कशानेंहि कधीं उमेद आली नसती इतकी उमेद उत्पन्न झाली ! कारण, मला हें पक्कें ठाऊक होतें, कीं, तुमच्या अंतः-करणांत जर पूर्वींप्रमाणें निवळ अप्रीतीचेंच साम्राज्य वसत असतें, तर तुम्हीं उघड उघड तसें स्पष्टपणें माईसाहेबांनां सांगण्याला कधींहि कसूर केली नसती ! "

ताराबाई लाजली व ओशाळून जाऊन हंसत म्हणाली "हो, माझ्या सडे-तोडपणाचा अनुभव आपणाला सडकून होताच ! आपल्या स्वतःच्या तोंडावर यथेच्छ शिव्या देण्यांत जर मी मागें सरलें नाहीं, तर आपल्या मामींच्या तोंडावर बोलायला मी थोडीच भ्यायलें असतें ? "

भय्यासाहेब म्हणाले " छे छे, आपण सुवर्णपुरांत कोणची गोष्ट मला विनाकारण बोललांत ? अगदीं अत्यंत योग्य असेंच तुमचें सर्व बोलणें होतें. कारण, आपली माहिती जरी चुकीची होती, तरी माझें आपणाशीं वर्तन इतकें भयंकर आढ्यतेचें व फाजील डौलाचें होतें, कीं, आपण केलेली कान-उघाडणी अगदीं यथायोग्य होती. माझी वागणूक इतकी अक्षम्य होती, कीं, अजूनहि मला तिची आठवण झाली, कीं, मला अत्यंत लज्जा वाटूं लागते—"

ताराबाई मध्येंच म्हणाली " त्या दिवशीं संध्याकाळीं जो प्रकार झाला त्यांत जास्त दोष कोणाचा होता तो वाद आतां आपण सोडून देऊं ! वास्तविक पाहिलं तर निर्दोषी कोणीच नव्हतं, असं म्हणावं लागेल. एवढं मात्र खरं, कीं, तेव्हांपासून आपण दोघंहि आपआपले दोष सुधारीत आहोंत."

भय्यासाहेब म्हणाले "इतक्या सोप्या रीतीनें माझें समाधान व्हायचें नाहीं ! त्या दिवशीं मीं तुम्हांला काय काय म्हटलें, कसें वर्तन केलें, डौल किती दाखविला व आविर्भाव कसा केला होता, त्याची आठवण झाली म्हणजे माझें मन मला अतिशय खाऊं लागतें ! तुम्हीं मला जें झाडलेंत तें इतकें यथार्थ होतें, कीं, तें माझ्या स्मरणांतून कधींच गेलं नाहीं. ' जर तुम्ही एकाद्या सभ्य माणसासारखं वर्तन ठेवलं असतंत,' असे तुमचे शब्द होते. या शब्दांनीं आजपर्यंत माझ्या मनाला कशा डागण्या बसल्या आहेत त्याची तुम्हाला माहिती तर नाहींच, पण कल्पनाहि कधीं झाली नसेल ! ते शब्द मीं प्रत्यक्ष ऐकिले तेव्हां ते मला तसे झोंबले नाहींत, हें मात्र खरें आहे. "

ताराबाई म्हणाली "त्यांच्यापासून इतका तीव्र परिणाम आपल्या मनावर व्हावा अशी माझी बिलकुल इच्छा नव्हती, व तशी माझी आजवर कधीं कल्पनाहि झाली नव्हती—"

भय्यासाहेब म्हणाले "तें साहजिकच आहे. कारण, त्या वेळीं मी अगदीं गर्वानें इतका फुगलेला होतों, कीं,माझ्यावर तशाचा परिणाम कसचा होतो, असें तुह्माला वाटणें ठीकच होतें. तसेंच तुम्ही मागून म्हणालांत कीं 'वाटेल त्या तऱ्हेनें जरी मागणी घातली असतीत तरी ती स्वीकारायचा मला क्षणभरहि मोह पडला नसता.' हें बोलतांना जी तुम्हीं तुच्छतादर्शक सडकून मान हलवलीत ती तर मी जन्मभर विसरणार नाहीं !"

ताराबाई शरमून म्हणाली "नका,नका, मी तेव्हां काय म्हणालें त्याचा आतां उच्चार करूं नका ! या मागच्या आठवणी आतां काढूं नका. मला आज कितीक दिवस त्या एकंदर प्रकाराची अगदीं शरम वाटूं लागली आहे."

भय्यासाहेबांनीं आपल्या पत्राची आठवण देऊन विचारलें " त्या पत्रानें मजविषयीं कांहीं थोडासा बरा ग्रह होऊं लागला का?पाहिल्यानें वाचून त्यांतला मजकुर खरा तरी वाटला का ?"

त्या पत्राचा कसा परिणाम हळूहळू होत गेला व अखेरीला तिच्या मनांतले सर्व दुष्ट ग्रह कसे वितळून गेले, तें तिनें स्पष्ट करून सांगितलें.

भय्यासाहेब ह्मणाले "मीं तें लिहिलें तेव्हां तुह्माला तें फार वाईट लागेल हें मला समजत होतें; पण माझा नाइलाज होता. तें फाडून टाकलेंत ना पण? कारण, त्यांतला पहिला भाग फारच तुह्माला लागण्यासारखा होता, असें मला आठवतें. कांहीं कांहीं शब्द तर असे होते,कीं, आज जरी तुम्हीं ते पुनःवाचले तर आजसुद्धां तुह्मांला माझा संताप येईल—"

ताराबाई हंसून ह्मणाली " हो, हो, तें पत्र फाडल्यावांचून जर आपणा-विषयीं माझी आदरबुद्धि दृढ होणं शक्य नसेल तर अलबत तें फाडलंच पाहिजे! माझं मन कधीं बदलत नाहीं असं नाहीं हें जरी खरं आहे,तरी आज मीं पुनः तें पत्र वाचलं,तर आपला मला संताप येईल इतकं कांहीं माझं मन चंचल नाहीं, असं मला वाटतं !"

भय्यासाहेब ह्मणाले "मी पत्र लिहीत होतों तेव्हां मी अगदीं शांत आहें असें मला वाटत होतें;पण आतां अलीकडे मला असें वाटूं लागलें आहे,कीं, तें पत्र मी अत्यंत संतापाच्या झपाट्यांत असतांना लिहिलें—"

ताराबाई ह्मणाली " त्या पत्राची सुरुवात संतापाच्या आवेशांत झालेली असेल खरी, पण त्याचा शेवट मात्र अगदीं शांतपणांत झालेला आहे. शेवटचं वाक्य तर अत्यंत उदारपणाचें द्योतक आहे—पण आतां त्या पत्राची आठवण कशाला? तें पत्र लिहिलं त्यांचं, व तें ज्याला पाठवलं त्याचं मन त्या वेळेपेक्षां आतां इतकं बदलून गेलेलं आहे, कीं, त्याच्या संबंधाच्या कडू आठवणी आतां एकदम नष्ट करून टाकणं वाजवी आहे. माझा एक जगतांत वागण्याचा गोडसा नियम ऐकून ठेवा आपण, कीं,गतगोष्टींपैकीं जेवढं आनंददायक असेल तेवढंच लक्षांत धरावं—"

भय्यासाहेब ह्मणाले "असला नियम तुम्हीं करावा,त्यांत कांहीं मोठेंसें नाहीं. कारण तुमच्या स्वतःच्या गतगोष्टींमध्यें स्वतःच्या मनाला खात राहण्यासारखें जर कांहीं कधीं तुमच्या हातून घडतच नाहीं, तर तसला नियम तुम्हाला पाळणें कठिण नाहीं.कारण,दुःखदायक असें तुमच्या वागणुकींत कधीं नसतेंच. म्हणून तें विसरण्याचेंहि प्रयोजन राहत नाहीं; पण माझी स्थिति तशी नाहीं. कितीहि प्रयत्न केला, तरी आपल्या हातून घडून गेलेल्या दुःखकारक गोष्टी पटकन् डोळ्यांपुढें उभ्या राहूं लागतात, त्या दूर जातां जात नाहींत. सर्व जन्मभर आजपर्यंत निवळ स्वतःच्याच तोऱ्यांत, स्वतःच्याच ऐटींत माझा काळ गेला आहे.ह्मणजे माझ्या मिळालेल्या शिक्षणांत दोष आहे असें नव्हे. बरेंवाईट, खरेंखोटें, योग्य अयोग्य हें ओळखून काढण्याचें शिक्षण मनाला व बुद्धीला रगड मिळालें होतें; पण प्रत्यक्ष वागण्यांत आमची स्वतःची मर्जी जरा कोणीं दुखवली, कीं, आमची स्वारी आकाशपाताळ एक करून टाकी, तें सुधारण्याचा कोणीं कधीं प्रयत्न केला नव्हता.चांगलीं नीतितत्वें आमच्या बुद्धीवर बिंबवून दिलीं जात खरीं, पण, प्रत्यक्ष आचरणांत त्यांची ओळख मला राहत नसून त्यांत सगळी अहंकाराची व स्वाभिमानाची रेलचेल असे. आईबापांचा मी एकुलता एक मुलगा,—इतकंच काय, कितीक वर्षें तर कमेवाद्वितीयं असा होतों.कारण,बहीण फार वर्षांनीं झाली त्यामुळें- आमच्या आईबापांनीं आमचे लाड ह्मणजे अगदीं पराकाष्ठेचे केले. आमचीं आईबापें चांगलीं समंजस होतीं, वडील तर विशेष मनमिळाऊ व परोपकारी असे होते. पण जों जों आम्हीं हट्ट करावा, जों जों आम्हीं आप्पलपोटेपणा करून दुसऱ्याविषयीं पर्वा सोडून द्यावी, तों तों त्यांनां आमचें कौतुकच वाटूं लागे ! सगळ्या जगाला हलकें समजावें, त्यांनां

आपल्यापेक्षां बेअकली समजावें, व आपण मात्र सर्वांच्यापेक्षां हुशार, धूर्त, शहाणे, सज्जन, परोपकारी आहोंत असें समजण्याचा रोज जणुं काय आम्हांला धडाच मिळत असे ! याप्रमाणें बुद्धि जरी रगड सुसंस्कृत झाली, व सर्व गोष्टींचा तारतम्यभाव पूर्णपणें लक्षांत येण्या इतकी असाधारण हुशारी जरी डोक्यांत आली,तरी स्वभाव मात्र पराकाष्ठेचा आग्रही, हेकेखोर, बेपर्वा,आणि आपस्वार्थी असा विलक्षण बनून राहिला. तो पांच वर्षांपासून पंचवीसांपर्यंत अगदीं तसा वाढत गेला, व तस्साच अजूनहि खास राहिला असता—पण तुमच्यासारखा उत्तम वैद्य भेटला, त्यानें तें सगळें बदलून गेलें ! माझ्या अत्यंत प्रिय तारे !तूं जशी अत्यंत सुंदर आहेस तशीच किती तरी तूं चतुर आहेस ! तूं माझ्या डोळ्यांत उत्तम अंजन घातलेंस ! पहिल्यानें तें भारी झणझणलें, अत्यंत झोंबलें, मला त्यामुळें तुझा अतोनात संताप आला ! पण अखेर माझी धुंदी साफ उतरून गेली. तुझ्या मात्रेनें माझा सर्व रोग नष्ट झाला, अहंकार गळाला, बेपर्वा साफ :निघाली. दुसऱ्याला तुच्छ मानण्याची माझी वृत्ति मावळळी,व मी गरीब होऊन अत्यंत विनयशील बनून गेलों आहें. हा किती तरी सोन्याहून पिंवळा असा बदल माझ्यामध्यें झाला. मी प्रथम तुमच्या मंडळींत आलों तेव्हां माझी सर्वांनीं थुंकी झेलीत राह्यलेंच पाहिजे, इतका मी उच्च आहें; अशी माझ्या मनाची भावना होती. पण तूं माझा नक्षा उतरवलास, व जिच्या अंगांत गुणांची खरी पारख करण्याची शक्ति आहे अशा स्त्रीच्या नजरेनें मी किती नादान होतों तें तूं मला स्पष्टपणें दाखवून दिलेंस ! ”

ताराबाई थोडी लाजली व कांहीं वेळानें हंसत हंसत म्हणाली “आपल्याला अगदीं असं वाटत असेल तेव्हां, कीं, आपण जरा हेतु प्रदर्शित केल्याबरोबर ही आपला स्वीकार करील ! ”

भय्यासाहेब म्हणाले “तें काय पुसावें ? मला तर असें वाटलें होतें, कीं, ही एका पायावर तयार असून कधीं मी बोलतों अशी वाटच पहात असेल!”

ताराबाई म्हणाली “तर मग माझ्या बोलण्याचालण्यांत माझी चुक होत असेल हेंच खरें ! कारण, आपण मला मागणी घालावी अशी मीं क्षणभराहि कधीं इच्छा धरली नव्हती. उगाच तुमची चुकभूल करावी असा माझा कधींच हेतु नव्हता. पण त्या खटक्यानंतर कोण तुम्ही दांत धरला असेल पण !”

भय्यासाहेब म्हणाले " दांत ? छे, मला प्रथम भारी राग मात्र आला; पण लवकरच त्या रागाला योग्य वळण लागत चाललें. "

ताराबाई म्हणाली " प्रथम आपण मला दिलबहारांत पाह्यलंत तेव्हां आपल्याला काय वाटलं तें विचारायचीसुद्धां मला भीति वाटते आहे. अलबत, ही इथें कशाला तोंड दाखवायला आली, असंच वाटल असेल—"

भय्यासाहेब म्हणाले " मुळींच नाहीं! मला फक्त विस्मय वाटला. "

ताराबाई म्हणाली" पण आपण माझं सभ्यपणानं आदरातिथ्य करतांना पाहून मला जो विस्मय वाटला, त्याच्या मानानं आपला विस्मय कांहींच नसेल. म.झं मन मला सांगत होतं, कीं, यांनीं आपल्याशीं सभ्यपणा धरावा असं आपण वर्तन केलेलं नाहीं, म्हणून माझ्या वर्तनाला साजेल असं आपणहि माझ्याशीं वागाल असं मला वाटत होतं. "

भय्यास.हेब म्हणाले "त्यावेळीं माझ्या मनांत एवढाच हेतु होता, कीं, तुमच्याआमच्यांतल्या गतगोष्टींवरून दांत धरण्याइतका नीचपणा माझ्या अंगीं नाहीं, हें तुमच्याशीं चांगलें वर्तन करूनच प्रत्यक्ष दाखवावें. आणखी तुमच्या म.त्रेनें किती गु. आला आहे हेंहि तुमच्या नजरेला स्पष्टपणें आणून द्यावें, म्हणजे तरी मजविषयींचा तुमचा वाईट अभिप्राय थोडासा तरी बदलेल. इतकीच प्रथम इच्छा मनांत होती. यापेक्षां जास्त इच्छा केव्हां मनांत उद्भवली तें ांगणें कठिण आहे. पण मला वाटतें, कीं, दिलबहारांत तुम्हाला पाहिल्यापासून एकदोन घटकांच्या आंतच पूर्वीचें प्रेम पुनः उत्पन्न झ.लें. "

भय्यासाहेबांनीं नंतर आपल्या बहिणीला ताराबाई किती पसंत पडली होती वें सांगितलें. ते म्हणाले " एकदम तुम्ही निघून गेलांत त्यामुळें तिचा किती हिरमोड झाला म्हणतां. " त्यावरून सुंद्रीची गोष्ट ओघानेंच निघाली, तेव्हां भय्यासाहेबांनीं सांगितलें, कीं, "तिथें तुम्हाला इतक्या भेदरून गेलेल्या पाहून तिथल्यातिथें मीं निश्चय करून टाकला, कीं, मीं स्वतः या कामांत मन घालून तें तडीला लावायचें. अन् मी जो तिथें विचारांत गढलेला दिसत होतों, तो विचार हाच चाऊला होता, कीं, असल्या कामांत आपणाला किती हलकट माणसांच्या मनधरण्या कराव्या लागतील."

ताराबाईनें त्यावरून पुनः एकदां त्यांचे आभार मानले, पण तो विषय कोणालाच इष्ट नसल्यामुळें तेवढ्यावरच राहिला. कांहीं वेळ पुढें चालत जाऊन

उन्हाचा चटका जास्त भासूं लागल्यामुळें तीं दोघें भानावर येऊन आपापलीं मनगटावरचीं घड्याळें पहातात तों ,पावणेदहा होऊन गेले होते ! आतां घरीं परत निघालेंच पाहिजे होतें. "पण आपल्याबरोबर निघालेले भाऊसाहेबनू शांताबाई यांचा काय पत्ता आहे बोवा ?" असें भय्यासाहेब ह्मणाले. " वा, कितीतरी उत्तम गोष्ट झाली त्यांचें लग्न जुळलें ती ! भाऊसाहेबांनीं मला तर मुंबईत एक्सप्रेस तारेनें ती कळविली."

ताराबाई ह्मणाली "मग आपणाला भारी आश्चर्य वाटलं असेल ?"

भय्यासाहेब ह्मणाले "मुळींच नाहीं ! मी इथून गेलों तेव्हांच मी समजलों होतों, कीं, तें आतां लवकरच जुळणार ह्मणून !"

ताराबाई हंसत ह्मणाली "म्हणजे आपली परवानगी आगाऊच झाली होती ह्मणायची. मला वाटलंच तसं !"

भय्यासाहेब संकोचानें ह्मणाले " परवानगी ! परवानगी कसली ? माझी सल्ला झाली होती खरी."

ताराबाई हंसत ह्मणाली "त्याचाच अर्थ तो ! एकूण एकच !"

भय्यासाहेब ह्मणाले "मी मुंबईस जायच्या आदल्या दिवशीं माझ्या मनाला खात असलेली एक गोष्ट फार दिवस सांगेन ह्मणत होतों, ती मीं त्यांनां स्पष्टपणें कबूल करून टाकली. मीं शांताबाईच्या बाबतींत जें त्यांनां पूर्वी म्हटलें होतें, ती सारी माझी चूक होती अशी माझी खात्री झाली असल्याचें मीं त्यांनां सांगितलें. त्यांनांसुद्धां तें ऐकून फार बरें वाटलें. शिवाय तिचें अंतःकरण मला वाटलें होतें तसें प्रेमशून्य नसून अत्यंत प्रेमपूर्ण होतें, व तें हल्लीं विव्हल आहे अशीहि माझी पक्की खात्री झाली असल्याचें मीं त्यांनां कळविलें. अर्थात्, त्यांच्या मनांतलें प्रेम यत्किंचित्हि कमी झालें नव्हतें हें मला दिसतच होतें. तेव्हां आतां हीं दोघें जुगणार हें उघडच झालें."

ताराबाई ह्मणाली "असल्या नाजुक कामांत आपल्या स्वतःच्या अंदाजापेक्षां दुसऱ्या लोकांच्या अंदाजावर एवढी भिस्त टाकून वागणारा मित्र लाभणं ही तरी सुदैवाचीच गोष्ट ह्मणायची ! तें असो ह्मणा. पण शांताक्का प्रेमविव्हल आहे ह्मणून आपण त्यांनां सांगितलंत तें स्वतःच्या परीक्षेनं, कीं, मी तसं ह्मणालें होतें एवढ्याचवरून ?"

भय्यासाहेब ह्मणाले "अलबत् माझ्या स्वतःच्या परीक्षेवरून. मी तुमच्या घरीं दोनदां आलों तेव्हां सूक्ष्म नजरेनें तिची वृत्ति मीं पाह्यली, अन् माझी तेव्हांच उत्तम खात्री होऊन गेली!"

ताराबाई हंसून ह्मणाली "अन् आपली खात्री होतांच त्यांचीहि झाली असेल ?"

भय्यासाहेब ह्मणाले "हो. भाऊसाहेब फार भिडस्त आहेत. त्यांनां आत्मप्रत्यय मुळींच नाहीं. ह्मणून तर त्यांनीं पहिल्यानें आमचें ऐकलें. तसेंच माझ्यावर त्यांचा पूर्ण विश्वास आहे. त्यानें सगळें सुरळीत होऊन गेलें. मीं माझा एकच झालेला लपंडाव त्यांच्याजवळ सांगून क्षमा मागितली. तो हा, कीं, गतवर्षीं चार महिने शांताबाई पुण्यामुंबईंत असल्याचें मला ठाऊक असून मीं तें त्यांनां कळविलें नव्हतें. त्यांनां प्रथम राग आला; पण माझा सद्धेतु पाहून मला त्यांनीं मनापासून आतां क्षमा केली आहे."

असला वेसण घातल्याप्रमाणें घाण्याच्या बैलासारखा हवा तिकडे वळणारा मित्र मिळाल्याबद्दल त्यांची चेष्टा करावी, असें ताराबाईच्या अगदीं जिभेवर आलें होतें; पण तिनें जीभ आवरून धरली. अजून दुसऱ्यांनीं केलेली थट्टा सहन करण्याला ही स्वारी शिकलेली नाहीं, अन् आजच चेष्टा सुरू करणेंहि ठीक नव्हे, असें ताराबाईला वाटलें. आतां या लग्नापासून त्या दोघांनां किती तरी सौख्य प्राप्त होईल त्याची तुलना करण्याला आपल्या स्वतःच्या लग्नाखेरीज जगांत दुसरें जोडपें मिळणार नाहीं, असें बोलत व पुनःपुनः एकमेकांचें जुळून आल्याबद्दल धन्यता मानीत तीं दोघें घरीं पोंचलीं.

---

## प्रकरण एकुणसाठावें.

### वडिलांची संमति.

"अग तारा, आज दोन तास कुठें तरी हिंडत होतां तुम्ही ?" हा प्रश्न शांताबाईनें ताराबाईला घरांत शिरून ती खोलींत जात असतां विचारला. पण जेवणाचीं पानें मांडून तयार होतीं या सबबीवर उत्तर देण्याचें तिनें चुकविलें. पण जेवणावर सगळी मंडळी जमल्याबरोबर तोच प्रश्न पुनः अनेकजणांनीं केला. ताराबाईची चर्या लज्जित झाली, पण तिनें झटकन्

सांगून टाकलें, कीं, " आम्ही चालतां चालतां वाट चुकलों ती कितीक वेळ पुनः सांपडेचना ! " या सफाईदार उत्तरानें खरा प्रकार काय होता त्याचा कोणालाहि संशय आला नाहीं !

जेवतांना विशेष कांहींच झालें नाहीं. भाऊसाहेबांप्रमाणें भय्यासाहेबांनांहि आग्रहानें ठेवून घेतलें होतें. भाऊसाहेबांच्या शेजारीं शांताबाईंचें पान असून त्यांच्या गप्पागोष्टी वगैरे चालून हास्यविनोदहि चालू होता. भय्यासाहेबांजवळ ताराबाई नव्हतीच, पण सतिाबाईहि दूरच होत्या, त्यामुळें त्या वेडेवांकडे ठोसरे त्यांनां देतील ही भीति नव्हती. भय्यासाहेब नेहमींप्रमाणें फारसे बोलले नाहींत. अत्यंत हर्ष झाला असतांहि त्याविषयीं बडबड न करणारा असा त्यांचा स्वभाव होता. ताराबाईंची मात्र त्रेधा उडाली होती. आपणाला अत्यंत आनंद देणारी गोष्ट झाली आहे ही जाणीव फक्त तिच्या बुद्धीला होती. परंतु अंतःकरणाला अजून प्रत्यक्ष आनंदाचा रसास्वाद मिळूं लागला नव्हता. भय्यासाहेब या आपल्या घरांत कोणालाच आवडत नाहींत, एक शांताक्काखेरीज कोणालाहि त्यांची थोडीशीहि योग्यता समजत नाहीं, असल्या माणसाला आपण पतकरायला तयार झालों आहों हें समजलें म्हणजे तें कोणालाच पसंत पडणार नाहीं, निवळ त्यांच्या द्रव्याला भुलून जाऊन हिनें अगदीं नादान नवरा स्वीकारला असेंहि कोणी म्हणतील, त्या सर्वांशीं वाद घालून त्यांचें मन आपल्या मनाप्रमाणें बनवण्यांत आपणाला कोण यातायात पडेल, व अखेर यश येईल कीं नाहीं कोण जाणे, असे तिचे विचार चालले होते.

दिवसभर पाव्हणेमंडळी घरांतच होती. शांताक्काला ताराबाईशीं निवांतपणें बोलत राहायला तेव्हां फुरसत कोठली ? अखेर दिवे लागणीच्या सुमाराला ते दोघेहि आनंदभुवनाकडे गेले. रात्रीचीं जेवणें झाल्यावर शांताबाईच्या खोलींत जाऊन ताराबाईनें तिच्यापाशीं प्रथम आपलें मन खुलें करून दाखविलें. शांताबाईचा स्वभाव तारानें सांगितलेली कोणचीहि गोष्ट खोटी मानणारा नव्हता, तरी तिला ताराबाईची हकीगत अगदीं खोटी वाटली. ती ह्मणाली "वा वा तारा, आज खूपच माझी तूं चेष्टा मांडली आहेस ! काय ? भय्यासाहेबांचा तूं स्वीकार केला म्हणतेस ? अशक्य ! अगदीं झूट ! मी अशी तुझ्या थट्टेला फसायची नाहीं ! "

ताराबाई हंसत हंसत ह्मणाली " वहावा वहावा ! प्रथमग्रासे मक्षिकापातः ! माझी सारी मदार काय ती आक्का तुमच्यावर होती. अन् आपणच असं करूं लागलां तंर मग पुढं कसं होईल ? पण मी मुळींच ही थट्टा करीत नाहीं आहें. मी अगदीं अगदीं खरं तेंच सांगतें आहें. त्यांचं अजूनहि मजवर मन आहे. आम्हीं आज सकाळीं ठरवलंसुद्धां सगळं ! "

तरी शांताबाईच्या मनाची खात्री होईना ! ती संशयित मुद्रेनें ताराबाईकडे बघत ह्मणाली " नाहींच ! तारा, अगदीं तें होण नाहीं ! किती तुला ते नापसंत हाते ! "

ताराबाई ह्मणाली "तुम्हाला त्यांतलं कांहीं अजून माहीत नाहीं. तें सारं अगदीं विसरून जायचं ठरलं आहे आमचं ! आज जितकं माझं प्रेम आहे तितकं तें नेहमींचि आजवर होतं असं नव्हे; पण तें पूर्वीचं सारं आतां डोक्यांतनं हांकलून लावा. मीसुद्धां कधीं तें पुनः आतां आठवणार नाहीं आहें!"

अजूनहि शांताबाईला कळेना, कीं ही चेष्टा आहे, का हें सगळें खरेंच आहे! ताराबाईनें पुनः एकदां तिला आवर्जून सांगितलें. त्यावर शांताबाई ह्मणाली "अगबाई ! खरंच का ही थट्टा नव्हे ? नाहीं–पण आतां गैरविश्वास करून नाहीं चालायचं ! खरंच तर मग, तारा, मी तुझं मनापासून अभिनंदन करूं इच्छितें–नाहीं–करतेंच आतां ! पण हें पहा, मला माफ कर, मी पुनः एकदां तुला विचारतें, तुझी खात्री आहे ना–तुझी खात्री आहे ना–अगदीं पक्की खात्री आहे ना, कीं, तूं यांत सुखी होशील ह्मणून ? "

ताराबाई ह्मणाली " त्यांत मुळींच शंका नाहीं. आम्हीं आज सकाळींच मुळीं ठरवून टाकलं आहे, कीं, आमच्यासारखा सुखी जोडा त्रिभुवनांत मिळणार नाहीं असं म्हणायचं ! पण तें आमचं राहूं द्या. तुह्माला हें आवडतं का नाहीं तें सांगा आधीं. असले मेव्हणे आपल्याला आहेत का पसंत ? "

शांताबाई ह्मणाली " अलबत्, अगदीं अत्यंत पसंत आहेत ! मलानू भाऊसाहेबांनां ही गोष्ट अतिशय आवडेल. आम्हांला आपली ती अशक्य वाटत होती, इतकीच कायती ! पण हें बघ तारा, इतकं तुझं मन आहेना त्यांच्यावर ? हें पहा, खरोखरी तितकं प्रेम मनांत असल्याविना मात्र त्यांनां पतकरूं नको. तूंच आपल्या मालतीला किती हंसत होतीस तें विसरली नाहींसना ? तिच्यासारखं तूं मात्र करूं नको., बेहत्तर आहे आणखी कांहीं दिवस वाट पहावी लागली तरी. पण कायावाचामनानं अगदीं पूर्णपणानं

पसंतीला आल्याखेरीज घाईघाईनं असली गोष्ट पतकरून टाकूं नको. तशी तुझ्या मनाची अगदीं पुरी पुरी तयारी आहेना ?"

ताराबाई ह्मणाली "हो हो, अगदीं तशी आहे. मीं सगळं तुह्माला सांगितलं, तर तुह्माला वाटेल कीं असावी त्यापेक्षां जास्तच आहे !"

शांताबाई ह्मणाली " ह्मणजे कशी बरं ?"

ताराबाई हंसत ह्मणाली "ह्मणजे अशी. मला भाऊसाहेबांपेक्षांहि भय्यासाहेब आतां जास्त आवडूं लागले आहेत ! अन् तें कसं तुम्हाला खपणार?"

शांताबाई ह्मणाली "आतां चेष्टा पुरे नाहीं का झाली ? खरं नीट बोल. एकदां सारं इत्थंभूत सांग पाहूं कधींपासून ही गोष्ट सुरू झाली ती."

तारा पुनः हंसून ह्मणाली "ही गोष्ट इतकी सावकाशीनं बनत गेली, कीं, तिला अगदीं कधीं न् कुठें सुरुवात झाली तें मला कुठें ठाऊक आहे ! पण मला वाटतं, कीं, तो सुंदर दिलबहार प्रत्यक्ष पाह्यला त्या घटकेपासनं सुरुवात झाली असावी !"

शांताबाई ह्मणाली " हीहि चेष्टा नव्हे ना, तारा ? बरं बाई माझं काय जातं !"

आतां मात्र ताराबाईनें चेष्टा सोडून आक्कांनां सगळें इत्थंभूत सांगून टाकलें. तिचें खरोखर प्रेम भय्यासाहेबांवर बसलेलें समजतांच शांताबाईची सर्व कांक्षा दूर होऊन ती म्हणाली " आतां मात्र मी अगदीं तृप्त झालें. कारण, अगदीं माझ्यासारखी तूंहि, तारा, सुखी होणार ! मला तर नेहमीं भय्यासाहेबांविषयीं आदरबुद्धि होतीच. दुसरं कांहीं कारण नसतं तरी त्यांचं तुझ्यावर इतकं प्रेम जडलं होतं, एवढ्याचकारतां मला त्यांच्याविषयीं आदर वाटला असता. आतां तर काय ? भाऊसाहेबांचे स्नेही अन् तुझे पति! या जोडगोळीच्या संबंधानं मला तुझ्यान् भाऊसाहेबांच्याइतकेच अगदीं प्रिय होतील. पण काय ग तारा, बरींच कींग तूं लबाड आहेस ! माझ्यापासनं सुद्धां इतकं सारं चोरून ठेवलं होतंस अं ? दिलबहारांतन् चटणीला काय काय झालं तें तुझ्याकडून मला अवाक्षरहि न कळतां सारं दुसरीकडूनच कळलं !"

ताराबाई ह्मणाली " मीं कां तें चोरलं त्याचा हेतु सांगतें. चटणीला अन् दिलबहारांत काय झालं तें सांगायचं, ह्मणजे भाऊसाहेबांचं नांव कसं मला वगळतां आलं असतं ? शिवाय, त्यांच्या स्नेह्याविषयीं माझं मन कसं होतं

तें मलाच जर नक्की समजलं नव्हतं, तर त्यांचं तरी नांव कसं काढूं ! पण आतां तुम्हाला आपल्या सुंदरच्या लग्नाची किती खटपट भय्यासाहेबांनीं केली तें सारं सांगतें ऐका. ”

तो विषय निघाल्यावर मग आश्चर्याला आणि गोष्टींनां काय तोटा ! दोघी बहिणी रात्रीं दोन वाजेपर्यंत बोलत राहिल्या होत्या. ती सर्व हकीगत ऐकून ताराबाईचें मन भय्यासाहेबांविषयीं कसें फिरलें, त्याची शांताबाईला बिलकूल शंका राहिली नाहीं. इतकेंच नव्हे, तर पूर्वीचा आग्रह सोडून त्यांची खरी किंमत कबूल करण्यास ताराबाई तयार झाली याबद्दल तिनें तिचें उलट कौतुकच केलें !

दुसऱ्या दिवशीं सकाळीं सीताबाई खिडकींत उभ्या असतांना म्हणाल्या “ अगबाई, आमच्या भाऊसाहेबांच्याबरोबर ही ब्याद कशाला रोज रोज येत असते बाई ? ही भय्यासाहेबांची पीडा तर आमची अगदीं पाठच पुरवणार असं दिसत आहे ! कशाला रोजरोज येतो कुणाला ठाऊक ! मला वाटलं होतं, कीं, तो आपला बंदुक घेऊन शिकारीबिकारीला जात जाईल, अन् आमच्याकडे यायला आमच्या भाऊसाहेबांनां मोकळे सोडील. पण छे, आतां कसं बरं करावं ? बाळ तारा, तूं तरी कालच्यासारखी त्यांनां घेऊन हिंडायला जा. म्हणजे भाऊसाहेबांची मोकळीक होईल या कटकटींतून ! ”

आईनें इतकी सोयीची युक्ति काढलेली पाहून ताराबाईला हंसूं येऊं लागलें; परंतु दुसरीकडे आईनें त्यांनां असलीं नांवें ठेवावींत हें फार वाईट लागलें.

ते दोघे दिवाणखान्यांत आल्यावर भाऊसाहेबांनीं ताराबाईकडे इतक्या अर्थपूर्ण नजरेनें पाहिलें व अशा खुबीनें तिच्याकडे पाहून ते हंसले, कीं, त्यांनां वित्तं बातमी लागली असल्याची ताराबाईची खात्री झाली. चहापाणी झाल्यावर भाऊसाहेब सीताबाईनां हंसत म्हणाले “ कायहो, कालच्यासारखीं आजहि वाट चुकायला ताराबाईला कांहीं दुसरीं स्थळं नाहींत का आसपास ? ”

सीताबाई म्हणाल्या “ मी म्हणतें, कीं, आज भय्यासाहेबांनीं ताराबाई-हिराबाईनां घेऊन आमच्या गांवचा मोडका किल्ला पाहून यावा. फारसा दूरहि नाहीं. जुन्या काळचा गड आहे, त्यावरून तर आमच्या गांवाला शिवदुर्ग असं नांव पडलं असावं. वरनं देखावा असा उत्तम दिसतो ! एक लहानसं पांडवलेणंहि आहे तिथें. ”

भाऊसाहेब ह्मणाले " हो तें ठीक आहे. पण हिराबाईंच्यानं इतकं दूर चालून गड चढवेलसं मला नाहा वाटत. नाहीं बरं हिराबाई ? "

हिराबाई फारशी चालायला खुषी नव्हतीच. भय्यासाहेब ह्मणाले " वा, पांडवलेणें तर अवश्य पाह्यलेंच पाहिजे. " ताराबाई कांहीं न बोलतां गालांतल्या गालांत हंसत बाहेर फिरायला जाण्याला तयार व्हायला गेली. सीताबाई तिच्या मागोमाग गेल्या व म्हणाल्या " तारा, ही पीडा तुझ्या एकटीच्या राशीला आली आहे खरी; पण त्याला काय करावं बरं ? हें बघ, आपल्या आक्कांकरतां थोडंसं सोसायला नको का ? अन् असं पहा, फारसं त्यांच्याशीं बोलण्याचं कारणहि नाहीं तुला. नुसतं बरोबर जावं अन् पांडवलेणं दाखवून आणावं. कालच्या वेळेला परत या, म्हणजे झालं ! "

कालच्याप्रमाणें आजहि रगड बोलणें झालें. परत येतांना त्यांनीं ठरवून टाकलें, कीं, आजच्या दिवसांत योग्य संधि केव्हांतरी साधून भय्यासाहेबांनीं बाबासाहेबांनां कळवून त्यांची परवानगी मिळववी. आईला कळविण्याचें काम ताराबाईनें आपल्याकडे घेतलें. ही गोष्ट तिला कशी वाटेल त्याची ताराबाईला बरोबर कल्पना होईना. एकदां वाटे, कीं, कदाचित् तिचा त्यांच्यावर इतका राग पहिल्या दिवसापासून आहे, कीं, एवढें मोठें त्यांचें उत्पन्न असूनहि ते तिला पसंत पडणार नाहींत. पण एक गोष्ट मात्र निश्चयानें होती, कीं, तिला तें अत्यंत पसंत तरी होईल किंवा अत्यंत नापसंत तरी होईल. मधली स्थिति सीताबाईनां कधीं जशी ठाऊकच न ती. कांहींहि तऱ्हा झाली तरी त्या अतिरेक करून सोडतील. तें प्रदर्शन भय्यासाहेबांच्या अथवा दुसऱ्या कोणाच्याहि नजरेला पडूं नये अशी ताराबाईंची उत्कट इच्छा साहजिकपणें होती.

जेवणें होऊन पानसुपारी झाली. दोन तास विश्रांति घेऊन आनंदराव दोन वाजतां नित्याप्रमाणें लायब्ररींत जाऊन बसल्याचें पाहून भय्यासाहेब त्याच बाजूला जातांना ताराबाईच्या नजरेला पडले, आणि तिच्या मनाची चलबिचल सुरू झाली. वडील कांहीं हरकत घेतील अथवा संमति देणार नाहींत, अशी तिला धास्ती वाटत होती, असें नाहीं; परंतु आज त्यांनां न आवडणारी गोष्ट होणार व ती आपल्या हातानें होणार तें तिला कसेंसेंच वाटूं लागलें. आपण त्यांची विशेष लाडकी असून आपणहि वर्तनानें—

नवरा पसंत करण्याच्या तऱ्हेनें त्यांना नाराज करावें, आपणाला सुखाची प्राप्ति होईल कीं नाहीं याविषयीं त्यांच्या मनांत हुरहुर लागण्यासारखी आपण निवड करावी, हा विचार तिला ताप देऊं लागला. पांच मिनिटांत भय्यासाहेब बाहेर येतांना त्यांच्या तोंडावर हास्य पाहून तिला बराच धीर आला. एका सचित्र मासिकाचा ताजा अंक सकाळींच आला होता त्यांतली सुंदर चित्रें ती व हिराबाई टेबलाशीं बघत बसल्या होत्या, त्यांच्याजवळ जाऊन हिरीचें लक्ष चित्रांत गढलेलें पाहून भय्यासाहेब हळूच ताराबाईला म्हणाले "तुम्हाला लायब्ररींत बोलावलें आहे."

ताराबाई भीतभीत लायब्ररींत गेली, तों आनंदराव मनाची अत्यंत चलबिचल झाल्यासारखे होऊन लायब्ररींत येरझारा घालीत होते. बाबासाहेबांची अशी स्थिति झालेली ताराबाईनें क्वचित्‌च पाहिली होती. तिला पहातांच ते एकदम ह्मणाले "तारे, तूं हें काय मांडलें आहेस ? तुला वेडबीड तर नाहींना लागलं, असल्या माणसाला पतकरतेस ती ? नेहमीं तर तूं त्याचा तिरस्कार करीत आली आहेस, नव्हे का ?"

ताराबाई अतिशय ओशाळी झाली. आजपर्यंत आपण आपल्या जिभेला भय्यासाहेबांच्याविषयीं बोलतांना जरा आवरून धरली असती तर आज किती बरें चांगलें झालें असतें. आज जें बाबांना सांगण्याला महाप्रयास पडणार आहेत, ते सारे बरेचसे चुकले असते, व आतां त्यांच्या जिवाला जी हुरहुर लागली आहे तीहि खास लागली नसती, असें तिला वाटलें; पण आतां इलाज काय ? आतां होईल तितकी बाबांची नटि समजूत घातली पाहिजे, असा विचार करून तिनें लाजत लाजत आपलें त्यांच्यावर अलोट प्रेम बसलें आहे, व त्याच्यामुळेंच मीं त्यांना पतकरीत आहें असें गोंधळून जाऊन मोडक्या शब्दांनीं सांगितलें.

आनंदराव ह्मणाले " त्यापेक्षां थोडक्यांत असें ह्मणेनास, कीं, माझा निश्चयच झाला आहे असें? अलबत् तो धनाढ्य आहे अन् तुला दागिन्यांनीं अगदीं मढवून काढील. शांतीच्या वरताण दागदागिने, गाड्याघोडीं, बंगले, यांच्यांत तुझी होईल हें अगदीं खरें आहे; पण तेवढ्यांनींच फक्त तुला सुख लागेल का ?"

ताराबाई घोटाळून ह्मणाली " बाबा, माझं प्रेम त्यांच्यावर नाहीं अशा आपल्या समजुतीपेक्षां दुसरी कांहीं आपली हरकत आहे का ?"

आनदराव ह्मणाले "मुळींच नाहीं ! तो एक महागर्विष्ठ अन् माणुसघाणा प्राणी आहे खरा; पण तुला जर तो पसंत असला तर आमचें काय जातें ? "

ताराबाई काकुळतीनें ह्मणाली " मला कनई बाबा ते फार आवडतात. अगदीं माझं प्रेम आहे त्यांच्यावर. अन् त्यांच्या अंगीं खोटा गर्वहि नाहीं. ते तसे माणुसघाणे तर मुळींच नाहींत! तुह्मी अजून त्यांनां चांगलं ओळखलं नाहीं ह्मणूनच तुह्मी हें असं ह्मणतांहां. असं भलतं बोलून मला किती तरी वाईट वाटतं ! "

आनंदराव सौम्यपणानें ह्मणाले " तारे, मी तर माझी संमति त्यांनां मघांशींच देऊनहि टाकली आहे. ते गृहस्थच मुळीं असले दांड आहेत, कीं, त्यांनीं कांहीं आमच्यापाशीं मागायची मेहरबानी केली, तर त्यांनां नाहीं म्हणायची आमची छाती नाहीं. तुझा जर निश्चयच झाला असला तर माझें कांहींच ह्मणणें नाहीं; पण मी काय ह्मणतों तें थोडेंसें ऐकून ठेव. मला तुझा स्वभाव पुरा माहीत आहे तारे. तुझ्यापेक्षां खरोखरच बुद्धीनें अन् तरतरीतपणानें तुझा नवरा वरताण असल्याखेरीज तुझ्या मनांत नवऱ्याविषयीं कधींहि पूज्यबुद्धि उत्पन्न व्हायची नाहीं. अन् नवऱ्याविषयीं पूज्यबुद्धि असल्याखेरीज तुला कधीं सुख लागायचें नाहीं. एकाद्या मूर्ख माणसाच्या गाड्याघोड्यांनीं अथवा दागदागिन्यांच्या ओझ्यानें तूं चार दिवस फारतर दिपून जाशील. पण अखेरीला तूं अगदीं नाखुशी होऊन राहशील. दागदागिन्यांचें सुख चार दिवस. खरोखरी आपल्याप्रमाणें ज्याच्या आवडीनावडी आहेत असा सोबती जन्माचा लाभला तरच ही संसारयात्रा सुखकर होते. द्रव्याच्या राशीवर बसून अश्रु ढाळणाऱ्या संस्थानिकांच्या स्त्रिया का थोड्या आपण पाहातों ? यजमानांनीं नाचरंग करीत हलकट स्त्रियांशीं रममाण व्हावें, अन् राजवाड्यांत त्यांच्या स्त्रियांनीं दुःखीकष्टी होऊन त्यांच्या दर्शनाची वाट पहात रात्रंदिवस रहावें, अशा स्थितींत राहून उत्तम वस्त्रभूषणें अंगावर असून का सुख लागणें संभवतें ? म्हणून, खरोखरी एकादा गृहस्थ थोर मनाचा आहे अन् सुवृत्त आहे अशी खात्री असल्यावांचून, या श्रीमंतांशीं गांठ घालण्याचें मनांत आणणें ह्मणजे सोनेरी पिंजऱ्यांत कोंडून रहाण्याची हौस झाली आहे असें समजावें. पोरी, तुझ्यावर माझें मन भारी ओढतें, तर तुझी अशी दुःस्थिति तूं आपल्या हातानें करून घेणार तें पाहून माझें मन भारी उदास होतें आहे. नुसती भाजीभाकरी पोटभर मिळाली, अन् मना-

सारखा सज्जन नवरा असण्यांत जें अनुपम सुख आहे, त्याची तुला कशी कल्पना नाहीं ! मी तुला आजपर्यंत शहाणी समजत होतों, पण आज माझा तो भ्रम फुटूं पहात आहे. काय तूं हें करते आहेस ? ”

वडिलांची ही स्थिति पाहून तारेलाहि गहिंवर आला. कांही वेळ तिच्यानें बोलवेनासुद्धां. नंतर मोठा प्रयत्न करून तिनें वडिलांना आपलें मन कसें आहे व तें किती हळुहळू पावलांनीं तसें बनत गेलें, तितका बदल पूर्ण होण्यास किती महिने लागले, वगैरे गोष्टी पुनःपुनः निरनिराळ्या रीतीनें सांगितल्या. “निवळ द्रव्यराशीलाच जर मी भुलणारी असतें तर गतवर्षी सुवर्णपुरांत मालतीच्या घरीं त्यांनीं मला प्रथम मागणी घातली, त्याचवेळीं एकदम मी कबूल झालें असतें; पण त्यावेळीं मीं उलट त्यांना अत्यंत निर्भर्त्सना करून केवळ लाथाडून लावलें. एवढ्या एकाच गोष्टीवरून मी दाग-दागिन्यांसाठीं हें करीत नाहीं अशी तुमची खात्री होईल. परंतु त्यानंतर अलीकडे मला त्यांचा स्वभाव जास्त चांगला कळूं लागला, आणि आपणां सर्वांचा त्यांच्याविषयींचा ग्रह अगदीं चुकला आहे; व ते खरोखरी अत्यंत थोर मनाचे अन् सुवृत्त गृहस्थ असल्याची माझी खात्री झाली आहे. म्हणूनच मी पुनः त्यांनीं दुसऱ्यांदां मागणी घातली म्हणून आनंदानं कबूल झालें आहें.”

पहिली मागणी लाथाडल्याची गोष्ट ऐकून आनंदराव चकित झाले, व निदान दागिन्यांची लालसा तरी येथें मुख्य नाहीं, हें समजून त्यांचें बरेंच समाधान झालें. ते म्हणाले “असें जर आहे तर तारे, माझें कांहीं म्हणणें नाहीं. दुसऱ्यांदा मागणी करण्याइतकी जर तो तुझी किंमत ओळखतो आहे, तर मग तो तुझ्या अगदीं लायख आहे असें म्हणायला कांहीं हरकत नाहीं. याच्याहून कमी लायकीच्या माणसाला मी माझ्या तारीला कधीं दिली नसती!”

वडिलांचा हा झालेला चांगला अभिप्राय जास्त दृढ करण्याचा हेतूनें ताराबाईनें लगेच सुंदरच्या लग्नाच्या बाबतींत भय्यासाहेबांनीं किती झीज व मानखडणा सोशिली, तें सारें इत्थंभूत वर्णन केलें. ही सारी हकीगत ऐकतांच आनंदराव अगदीं थक्कच होऊन गेले. ते म्हणाले “ अरे बापरे ! आज आश्चर्यावर आश्चर्य माझ्या कानीं पडण्याचा दिवस आहे तर मग ! वा, काय अजब आहे. भय्यासाहेबांनीं तें सगळें जुळवून आणलेंन् ! त्याला लग्न करण्याला कबूल करवलेंन्, द्रव्य खर्च केलें, त्याचें कर्ज फेडलें अन् नवी नोकरी लावून दिली ! विलक्षणच आहे हें सारें !

वा वा, फारच उत्तम गोष्ट झाली ही. माझा किती तरी त्रास वांचला, अन् आतां संसारांत काटकसर करण्याचीहि कटकट राहिली नाहीं ! तुझ्या मामांनीं जर हें सगळें केलें असतें तर मला त्यांचें देण फेडायला हवेंच होतें, अन् मी फेडणारहि होतों. पण या प्रेमांध झालेल्या तरुण गरम रक्ताच्या बांडांनां द्रव्य म्हणजे कःपदार्थ दिसतो ! उद्यां मी भय्यासाहेबांचें देणें देऊन टाकण्याचा आव आणतों, अन् मग तेहि मोठ्या आवेशानें म्हणतलि, कीं, मीं कांहीं द्रव्याकरितां हें सगळं मुळींच केलें नाहीं, अन् प्रेमाचा मोबदला मिळाला म्हणजे रगड झाला, वगैरे म्हणजे सगळें मिटून जाईल ! "

तेवढ्यांत आनंदरावांनां स्मरण झालें, कीं, दोनतीन दिवसांपूर्वीं नीलकंठरावांचें पत्र या लायब्ररींतच हिला वाचून आपण दाखविलें असतां तिची चलबिचल आपल्या स्पष्ट नजरेला आली होती. ते म्हणाले "अरेच्चा! तरीच तारे तूं त्यादिवशीं इतकी गडबडलेली दिसलीस ! अस्सें अस्सें. खूपच बतावणी केलीस त्यावेळीं तूं. बरीच वस्ताद आहेस कींग ! बरें बरें असो. होतें आहे तें ठीकच आहे. जा, तुझें कोटकल्याण होईल हाच माझा तुला पूर्ण आशीर्वाद देतों. जा."

ताराबाईला पुनः गहिंवर आला. तिनें तत्क्षणीं आनंदरावांच्या पायांवर डोकें ठेवलें व ती बाहेर जाऊं लागली. तितक्यांत ते हंसून म्हणाले "हें पहा, मथुराहिरीकरितां जर कोणी असेच गृहस्थ बाहेर उभे असले, तर त्यांनां पाठवून दे. मला आज रगड वेळ आहे ! "

एकदां छातीवरचें मोठें दडपण निघालें असें ताराबाईला वाटलें. ती परस्पर आपल्या खोलींत जाऊन अर्धा तास स्वस्थ विचार करीत राहिली. नंतर मन स्थिरस्थावर झाल्यावर ती पुनः मंडळींत चहाच्या वेळीं येऊन मिळाली. तरी अजून तिच्या अंतःकरणाला खऱ्या आनंदाचा आस्वाद मिळूं लागला नव्हता. आतां धास्ती वाटायला कांहीं शिल्लक राहिलें नव्हतें खरें, पण शांतता तरी एकदम कशी यावी ?

संध्याकाळीं टेनिस वगैरे खेळून ते दोघे आनंदभुवनांत निघून गेल्यावर ताराबाईनें सीताबाईनां त्यांच्या खोलींत गांठून ती आनंददायक बातमी त्यांनां कळविली. आईवर तिचा विलक्षणच परिणाम झाला. प्रथम

ती गोष्ट कानीं पडतांच सीताबाई अगदीं थंड दगडासारख्या गप्प राह्यल्या. अत्यंत आश्चर्य वाटल्याचें चिन्ह त्यांची नुसती मुद्रा दाखवीत होती. त्यांचें तोंड उघडें होतें, पण एकहि शब्द बाहेर येईना. दोन—चार—पांच मिनिटें झालीं तरी आपण काय ऐकतों त्याचा त्यांनां खरा अर्थच समजेना. आपल्या लेकींच्या फायद्याचें कांहीं असलें, कीं, त्यांनां तें खरें वाटायचेंच, असें असूनहि आजची गोष्ट त्यांनां किती वेळ खरीच वाटेना ! पुनःपुनः लेकीनें तीच तीच गोष्ट सांगितली, तेव्हां त्यांच्या डोक्यांत प्रकाश पडूं लागला. त्या जागच्या जागीं चुळबुळ करूं लागल्या, पुनः उठल्या, पुनः बसल्या आणि अखेर बोलूं लागल्या "अग बाई ! देव माझं भलं करो ! किती तरी छान ! अरे बापरे ! भय्यासाहेब ! कुणाच्या ध्यानीं मनीं तरी आलं असेल का ! पण हें सारं खरंच का ? का मी आपली स्वप्नांतच आहें ? तारा ! मला एकदां एक चिमटा घे पाहूं ! कायग पोरी नशीब काढलंस ! असला देखणा नवरा पटकावणार अं तूं ! मोटारीन् गाड्यान् घोडे ! दागिने तर टोपलंभर घालील ! शांतीचं तुझ्यापुढें कांहींच नाहीं ! अहाहा, अगदीं राजाची राणीच झालीस ह्मणायची तूं ! वा वा ! गोड गोड ! अगदीं अमृतापेक्षांहि गोड, सोन्याहूनहि पिवळं हें झालं बरं ! अन् भय्यासाहेबहि किती पसंत गृहस्थ आहे मला म्हणून तुला सांगूं ! अगदीं लाख माणूस आहे तो ! मी आजवर उगीच वेड्यासारखी त्यांनां बोलत असें, पण आतां तें, तें सारं, विसरायला सांग बरं ! वाःवा वाहवा ! माझ्या अत्यंत लाडके तारे ! बेटा, किती तुझी चैन—किती तरी चंगळ उडेल ! पुण्यामुंबईत बंगले, अन् तो तुझा दिलबहार महाराज ! काय पण माझं नशीब ! तिघी मुलींचीं लग्नं झालीं ! अन् पाऊण लाखाचं उत्पन्न ! मला आतां हर्षवायु नको होऊं देऊं देवा !! "

ताराबाईला या उकळ्या ऐकून वाटलें, कीं, आपण केलेला अंदाज अगदीं बरोबर उतरला. दुसरें कोणीहि हा पहिला आनंदाचा झोत पहायला नाहीं, हें कितीतरी ठीक झालें, असें तिला वाटलें. जरा वेळानें ती परत आपल्या खोलींत आली, तों दोन मिनिटांत सीताबाईहि तिच्या मागोमाग आंत आल्या व ह्मणाल्या "तारे, माझ्या अत्यंत लाडके तारे ! मला दुसरं कांहीं आतां सुचत नाहीं. अगदीं तूं एक राणीच बनलीस. आतां दोन्ही लग्नांचा ऐसा थाट उडवून देऊं, कीं, पांचपंचवीस वर्सं तरी लोकांनां आठवण राहिली पाहिजे!

तें सारं खरं. पण आधीं, भय्यासाहेबांनां कोणचा पदार्थ फार आवडतो तो तरी विचारून ठेवला आहेस का ? नाहींना ? वेडी कुठली ! अग, तर उद्यांला नसता बरं तो आपल्या घरीं केला ? ”

आई उद्यां त्यांच्याशीं कशी वागेल याचा हा एक मासलाच मिळाला, असें वाटून ताराबाईला वाईट वाटलें. आज मनासारखें उत्तम स्थळ मिळत असूनहि, मनाची हाव पुरी झाली आहे आणि आतां मागणें असें कांहीं राहिलें नाहीं, अशी स्थिति येत नाहीं. अजूनहि “देवा, माझ्या आईला चांगलं बोलण्याची बुद्धि दे, ” हें मागणें शिलक आहेच !

पण दुसऱ्या दिवशीं तें मागणें देवानें तिला दिल्यासारखें दिसूं लागलें ! कारण भय्यासाहेबांच्यापुढें सीताबाई अत्यंत जपून वागूं लागल्याचें दृष्टोत्पत्तीला येऊं लागलें. कधीं त्यांनां एकादी जिन्नस जास्त घेतां का म्हणून आग्रह करावा, अथवा “आपलं म्हणणं अगदीं बरोबर आहे.” असल्या बोलण्यापलीकडे तोंड उघडायला त्यांनां भीति वाटत असलेली दिसूं लागली. त्याचप्रमाणें आनंदरावहि भय्यासाहेबांची जास्त जास्त परीक्षा करण्याची तसदी घेत आहेत, व त्या परीक्षेंत ते जास्त जास्त उतरत चालले आहेत, असेंहि तिला स्पष्ट दिसूं लागलें. जेवणें झाल्यावर आनंदरावांनीं ताराबाईला मुद्दाम एकीकडे गांठून हंसत हंसत म्हटलें “ तारे, आमचे तीन्ही जांवई आमच्या भारी पसंतीला उतरले आहेत बरें ! पहिला नंबर अर्थात्‌च नागेशरावांचा लागेल. त्यांत तर शंकाच नाहीं. पण तुझे भय्यासाहेब शांतीच्या भाऊ-साहेबांच्या इतकेच मला आवडूं लागले आहेत बरें ! दर घटकेला माझा त्यांजविषयींचा आदर वाढतच चालला आहे ! ”

---

## प्रकरण साठावें.

### तात्पर्य काय ?

आनंदरावांनीं इतकी आपली पसंती उद्गारून दाखविल्यामुळें ताराबाईच्या मनांतली सर्व कांक्षा साफ निघून गेली, व लवकरच तिची नेहमींची आनंदाची वृत्ति पूर्ववत् दिसूं लागली. दोनप्रहरीं ती भय्यासाहेबांशीं दिवाणखान्यांत बोलत बसली होती, शांताबाई आईच्या खोलींत कशालाशीं गेली होती व भाऊसाहेब लायब्ररींत आनंदरावांकडे कामानिमित्त जाऊन बसले होते. एकाएकीं तिच्या मनांत कांहीं विचार येऊन ती भय्यासाहेबांनां

म्हणाली " आपली प्रथम सुरुवात कशी झाली तें सांगा ! एकदां सुरुवात झाल्यावर मग पुढें त्याला गति सहज मिळाली असेल तें मला समजतं ! पण प्रथम प्रेम सुरू कसं झालं ? "

भय्यासाहेब म्हणाले " कोणच्या घटकेला अथवा कोणच्या ठिकाणीं, अथवा कोणच्या भाषणानें अथवा कोणच्या कृत्यानें प्रेमाला प्रथम सुरुवात झाली तें सांगतां येणें अशक्य आहे. प्रथम पाया केव्हां, कुठें अन् कसा बसला तें मलाहि नाहीं माहीत ! इतकें मात्र खरें, कीं, माझ्या लक्षांत तें प्रेम प्रथम आलें, तेव्हां तें किती तरी मार्ग चालून गेलेलें होतें ! "

ताराबाई म्हणाली " माझ्या रूपानं म्हणावं, तर त्याची आपण पहिल्याच दिवशीं वाट लावून टाकली होतीत ! बरं माझी रीतभात मोहक झाली म्हणावी, तर तुमच्याशीं तर मी बहुतेक तुटकपणानं सदा वागत असें. कधीं तुमच्याशीं बोलायचं झालं तर तुम्हाला बरं वाटण्यापेक्षां तें कडू कसं लागेल हाच विचार करून मी बोलत असें. तर मग माझ्या या वात्रट-पणामुळं तर मी नाहींना प्रथम आवडायला लागलें ? "

भय्यासाहेब म्हणाले "तुमच्या तरतरीतपणाबद्दल प्रथम आवडलां खऱ्या ! "

ताराबाई म्हणाली " थोडक्यांत त्याला उर्मटपणा म्हटलं तरी नाहीं का चालणार ? कारण, खरोखरच मीं उर्मटपणाच धरला होता. मी सांगू का खरं कसं झालं असेल तें ? एकसारखी भोंवतालच्या माणसांकडून स्तुति ऐकून ऐकून तुमचे कान किटले होते. तुम्हाला अगदीं रात्रंदिवस वहावा, वाखाणणीचा कंटाळा येऊन गेला होता. बरोबर असणाऱ्या स्त्रिया आपणाला पसंत कशानं वाटेल, सुंदर कशा दिसूं, खूष कसं करूं, या विचारानं नेहमीं तुमच्याशीं वागत असत. त्या सगळ्याचा अगदीं वीट आला होता. माझं आपलं सगळं त्याच्या उलटच दिसलं म्हणून प्रथम माझ्याकडे तुमचं लक्ष लागलं. मीं आपली जिथें तिथें ठोसरे द्यायची. तुमचा स्वभाव जर खरा छानदार नसता, तर माझ्या वर्तनामुळं तुम्ही केव्हांच माझा तिरस्कार करायला लागलां असतां ! पण जरी तुम्ही उघड कधीं तसं मुद्दाम दाखवीत नव्हतां, तरी तसल्या सदा हांजीहांजी करणाऱ्या थुंकी झेलीत राहणाऱ्या स्त्रियांचा तुम्ही मनापासनं अगदीं तिरस्कार करीत होतां. पहा बरं ! मीं खरं होतं तें चटदिशीं सांगितलं कीं नाहीं ! अन् तुम्हाला एवढं सांगत बसण्याचा त्रासहि चुकवला कीं नाहीं ? अन् एकंदरींत पाह्यलं तर

तसं तुमचं मन विटून जावं हेंहि अगदीं साहजिकच आहे. रोजरोज गोड खाऊन वीट आला म्हणजे तिखट मिठाचं कांहीं तरी झणझणींत नाहीं का हवंसं वाटत ? तसलं थोडंसं झणझणीत माझ्यापासून मिळालं तें पसंत पडलं इतकंच ! बाकी, माझ्यामधें तसा कांहीं मोठा गुण नाहीं हें कोणीहि सांगेल. पण एकदां प्रेम जडलं ह्मणजे माणूस आंधळं होतं तें असं ! ! "

भय्यासाहेब म्हणाले " तें कां बरें ? आनंदभुवनांत शांताबाई आजारी झाली तेव्हां तिच्याकरितां तुम्हीं किती चालून येऊन श्रम घेतलेत. त्यांत कांहींच का चांगलेपणा नव्हता ? "

ताराबाई उद्गारली "शांताक्का ! अगबाई, आक्का इतक्या गोड आहेत, कीं, त्यांच्याकरतां कोण खटपट करणार नाहीं ? तुम्ही आतां तो माझा गुण ह्मणून म्हणा पाहिजे तर ! माझे गुण अवगुण आतां आपल्या ताब्यांत दिले आहेत. गुण हवे तितके फुलवून मोठे करा. मी मात्र, त्याच्या उलट, होईल तितकं करून तुम्हाला चिडवीत बसेन अन् भांडण उकरून काढीत जाईन ! काढीन कशाला ? ही आत्तां सुरुवातच करतें पहा ! एवढी मनांत जर तयारी झाली होती, तर स्वारी स्पष्ट बोलायला इतकी मागं मागं कां घेत होती ? इथें इतके आलां, जेवायलाहि राह्यलां होतां, तरी छाती कां नाहीं केलीत एकदम बोलायची ? माझ्याकडे बघतसुद्धां नव्हतां अगदीं, इतकं कीं, एकाद्याला वाटावं, कीं, माझ्याविषयीं मनांत मुळींच कांहीं नाहीं ! असं कां बरं केलंत ? "

भय्यासाहेब म्हणाले " कारण, तुम्हीहि हुप्प होऊन गप्प बसत होतां, अन् मुळींच कांहीं मला उत्तेजन द्याना ! "

ताराबाई म्हणाली " मी ? माझी कोण गडबड उडाली होती ! "

भय्यासाहेब म्हणाले " अन् माझी देखील तशीच ! "

ताराबाई म्हणाली " पण जेव्हां जेवायला आलां होतां तेव्हां तरी जास्त कांहीं बोलायचं होतंत ? "

भय्यासाहेब म्हणाले "मनांत चलबिचल जर कमी असती तर बोललोंच असतों ! "

ताराबाई हंसत म्हणाली " काय बरं दुर्दैव बघा, कीं, मी जो प्रश्न विचारतें त्याला समर्पक उत्तर तुमच्याजवळ तयारच आहे, अन् मलाहि

तें समर्पक वाटूं लागतं हेंहि तसंच दुर्दैव ! पण बाई, आपणाला जर एकटंच सोडलं असतं मीं, तर आणीक किती काळ आपण तसेच गप्प राहलां असतां कोण जाणे ! मीं जर उपकार मानायची सुरुवात नसती केली, तर आपण केव्हां बोलला असतां बरं ? उपकार मानण्याच्या माझ्या निश्चयाला छानदार फळ आलं. मला तर एकदां वाटतं, कीं, भलतंच्या भलतंच उत्तम फळ आलं. कारण, मीं तो विषयच काढायला नको होता. मीं मुळीं तो काढला तोच मामींनां दिलेल्या वचनाचा भंग करून काढला. वचनभंगासारख्या अपराधापासून जर असलं उत्तम फळ येऊं लागलं, तर अपराध करूं नये असं जें नीतीचं तत्त्व आहे, त्याची वाट कशी लावायची ! ”

भय्यासाहेब हंसून म्हणाले “ इतक्या अडचणींत कशाला पडतां ? कोणतेंहि नीतीचें तत्त्व इथें बिघडलेलें नाहीं. यांतलें तात्पर्य अगदीं अगदीं स्पष्ट आहे. माईसाहेबांनीं आपणां दोघांमध्यें लुडबुड करून बिब्बा घालण्याचा प्रयत्न केला, त्याच्यायोगानें तर माझे सर्व संशय दूर होऊन गेले ! आजचा हा सौख्याचा प्रकार आपल्या आभार मानण्याच्या निश्चयापासून उत्पन्न झाला, असें मुळींच नव्हे. तुमच्याकडून प्रस्तावना होईपर्यंत मी मुळीं थांबणारच नव्हतों. माईसाहेबांच्या बोलण्यावरून मला आशा उत्पन्न झाली होती, अन् तिची एकदां शहानिशा करण्याचा माझा निश्चयच होता. तेव्हां तात्पर्य हें, कीं, दुसऱ्याच्या कामांत उगाच ढवळाढवळ करूं नये. ”

ताराबाई ह्मणाली “ तेंहि कांहीं जुळत नाहीं. कारण, आपल्या कामांत त्यांनीं ढवळाढवळ केली ह्मणूनच आपला फायदा झालाना ? तें असो कांहींतरी ! आज एवढं मात्र खरं, कीं, माईसाहेबांनां नेहमीं लोकांच्या उपयोगीं पडण्याची भारी हौस असते, तर या कामांतहि खरा उपयोग आपणांला त्यांचाच झाला, इतकं तरी त्यांनां समाधान मानण्याला रगड जागा आहे. बरं तेंहि असो. आतां असं सांगा, आपण आनंदभुवनांत कोणच्या उद्देशानं आलां ? नुसतं घोड्यावरनं आमच्या घरीं येऊन गोंधळून बसावं एवढ्याचकरतां का आलांत ? का आणखी कांहीं दुसरा जास्त महत्त्वाचा हेतु होता ? ”

भय्यासाहेब ह्मणाले “ माझा खरोखर अगदीं आंतला हेतु हा होता, कीं, इथें येऊन तुमची गांठ घ्यावी, अन् कधीं तरी आपणाला तुम्ही मिळण्याची

आशा आहे कीं नाहीं तें ठरवावें. बाह्यतः लोकांनां सांगायला हेतु हा होता, कीं, इथें येऊन भाऊसाहेबांवर शांताबाईचें मन आहे कीं नाहीं तें ठरवावें, अन् तें तसें असलें तर मघांशीं सांगितलेली गोष्ट भाऊसाहेबांच्याजवळ कबूल करावी."

ताराबाई हंसत म्हणाली "बरं तेंहि असो. माईसाहेबांची किती निराशा होण्याची वेळ त्यांच्यावर आली आहे, तें त्यांनां स्वतः कळवण्याची छाती आहे का आपली ?"

भय्यासाहेबहि हंसतच ह्मणाले "छाती ? छातीपेक्षां वेळच असण्याची अडचण आहे कायती ! पण आतां तें केलेंच पाहिजे. शुभस्य शीघ्रम् ! एक नोटपेपर द्याल, तर हें आतां लिहून टाकतोंच !"

ताराबाई ह्मणाली "अन् मलाहि जर एक तसंच जरूरीचं पत्र आत्तांच ल्याहायचं नसतं, तर मीहि आपल्या शेजारीं बसलें असतें, अन् दुसऱ्या एका क्षनं जसं केलं होतं एकदां, तसं, आपलं अक्षर किती छान अन् ओळी तरी किती सरळ, अशी आपली वाखाणणी करीत राह्यलें असतें ! पण आपल्या मामींच्यासारखी माझीहि एक मामी आहे, तिची आतां चालढकल करण्याची अगदीं सोय नाहीं !"

शारदामामींच्या थोरल्या पत्राला ताराबाईनें मुळींच कांहीं उत्तर पाठविलें नव्हतें. कारण, भय्यासाहेबांशीं असलेल्या तिच्या स्वतःच्या परिचयाचा मामींनीं फार जास्ती अर्थ लावला होता, असें कबूल करण्याची तिची इच्छा तितकी नव्हती; पण आज आतां त्यांनां अत्यंत हर्ष देणारी बातमी आपणाजवळ लिहावयाला आहे, आतां ती कळवायला उशीर कां ? आज सबंध तीन दिवस आपण त्यांनां ती कळवायला चुकलों, त्यामुळें त्यांचे तितके आनंदाचे तास आपण व्यर्थ घालविले, असें वाटून तिला आतां वाईट वाटूं लागलें. तिनेंहि ताबडतोब पुढें दिलेलें पत्र लिहून टाकलें:—

" ती. सौ. शारदामामी, मु. मुंबई, यांस—

कृतानेक शिरसाष्टांग नमस्कार विनंति विशेष. आम्ही सर्व खुशाल आहोंत. तुमच्याकडून सविस्तर मजकुराचें लांबलचक पत्र आलें, त्याबद्दल तुमचे मीं केव्हांच यापूर्वीं आभार मानावयाला पाहिजे होते; पण खरें सांगूं का ? मला उत्तर ल्याहायला कसेंसेंच वाटत होतें. कारण, वास्तविक खरें होतें त्यापेक्षां तुम्हीं मनानें कितीतरी जास्ती जुळवलें होतेंत !

पण, मामी ! आतां रगड कल्पना करा, हवी तितकी आपल्या मनाला गति द्या, त्या गोड विषयावर तुमच्याच्यानें मनांत जितकी भरारी मारवेल तितकी खुशाल मारा ! तसें करतांना तुम्हीं, माझें त्यांच्याशीं लग्नसुद्धां लागून गेलें आहे, इतकाच जर दूर पल्ला नेलात, तरच काय ती तुमची चूक होईल ! तुम्ही पुनः जलदी एक मोठं लांबलचक पत्र त्याहा, अन् त्यांत त्यांची आणखी रगडशी स्तुति करा! मागच्या पत्रांत होती ती फारच अपुरी होती ! तुम्हीआम्ही वेड्यासारखीं धांवत काश्मीरापर्यंत गेलों नाहीं, याविषयीं मी तुमची कितीतरी ऋणी आहें म्हणतां ! तुमची ती आरबी तट्टांची कल्पना फारच गोड आहे. आपण रोज एकदां सगळ्या बागेच्या भोंवतीं फिरून येत जाऊं ! जगांत आज माझ्याइतकी कोणी सुखी नाहीं ! असें दुसऱ्या पुष्कळांनीं आजपर्यंत म्हटलें असेल, पण माझें म्हणणें जितकें खरें आहे तसें कोणाचेंच असणें शक्य नाहीं ! मी पहा शांताक्कापेक्षां सुद्धां जास्त सुखी आहें ! त्या नुसत्या हळुहळू गालांत हंसतात. मी तर मोठमोठ्यानें हंसतें आहें, अन् आनंदानें नाचावेंसेंसुद्धां मला वाटतें आहे ! भय्यासाहेबांनीं तुम्हां दोघांनां फार फार विचारलें आहे. आतां इतकेंच सांगा मामी, कीं, दिलबहारला यायला केव्हां तयारी करतां ?

आपली,
तारा. ”

भय्यासाहेबांनीं माईसाहेबांनां लिहिलेलें पत्र या पत्रांतल्या भाषेपेक्षां निराळ्या तऱ्हेचें होतें, आणि या दोहोंहूनहि अगदीं भिन्न अशा तऱ्हेचें पत्र आनंदरावांनीं नीलकंठरावांच्या आलेल्या पत्राचें उत्तर ह्मणून लिहिलें. तें पुढें दिलें आहे:—

“ सा. न. वि. वि. आणखी एकवार आमचें अभिनंदन करण्याची तसदी आपणाला घ्यावी लागणार आहे. आमची ताराबाई लवकरच भय्यासाहेबांची पत्नी होईल. तुमच्या श्रीमंत माईसाहेबांचें तुमची शिताफी असेल तितकी खर्च करून सांत्वन करा. पण मी जर तुमच्या जागीं असतों, तर मी मामींचा पक्ष सोडून भाच्यांच्या पक्षाला जाऊन मिळालों असतों. भाच्यांच्या हातांत देवस्थानचीं वगैरें इनामें द्यायला रगड आहेत !

आपला
आनंदराव नगरक

कमलिनीनें भावाच्या लग्नाची जुळवाजुळव झालेली समजल्यावर त्याला एक अभिनंदनपर पत्र लिहिलें, त्यांत उगीच नसतें प्रेम भरगच्च भरून ठेवलें होतें. तिनें याप्रसंगीं शांताबाईलाहि मुद्दाम निराळें पत्र लिहिलें; त्यांत आपणाला कितीतरी परमानंद झाला आहे, आपणासारखी माझी दुसरी कोणीच प्रिय मैत्रीण नव्हती, व आतां या नव्या संबंधानें तर आपल्या दोघींमधलें प्रेम अत्यंत वाढेल, वगैरे खूप बतावणी केली होती. या ढोंगानें आतां शांताबाई फसली नाहीं; परंतु तिला कमलिनीची भारी कींव आली. म्हणून जेवढें उत्तर देणें रास्त होतें, त्यापेक्षां पुष्कळ चांगलें पत्र शांताबाईनें तिला उत्तरादाखल पाठविलें.

भय्यासाहेबांच्या लग्नाची नवी बातमी ऐकतांच त्यांची बहीण सरलादेवी मात्र हिला मनापासून खरोखर फार आनंद झाला. तिनें आपल्या बंधूला चार सबंध ताव भरून पत्र लिहिलें, व त्यांत आपल्या भावी भावजयीची रगड स्तुति अगदीं मनापासून करून, तिच्यामुळें आपणा स्वतःला अत्यंत लाभ होईल अशी आपली खात्री असल्याचेंहि लिहिलें होतें. त्याचप्रमाणें तिनें ताराबाईलाहि निराळें पत्र लिहून आपलें समाधान व्यक्त करून दाखविलें होतें.

नीलकंठरावांनां आनंदरावांनीं लिहिलेल्या पत्राचें उत्तर त्यांच्या हातीं आलें नाहीं, किंवा मैत्रीण मालतीकडूनहि अभिनंदनपर पत्र ताराबाईला आलें नाहीं. याचें कारण असें, कीं, तीं दोघें नवराबायकोच स्वतः सुवर्णपुराहून निघून शिवदुर्गास आलीं, अशी बातमी समजली. इतक्या झटपट सुवर्णपुराहून त्यांनां पाय काढण्याचें कारण असें झालें, कीं, भय्यासाहेबांचें पत्र वाचून श्रीमंत माईसाहेबांच्या अंगाची इतकी लाहीलाही होऊन गेली, कीं, त्या उष्णतेची झळई आपण ताराबाईचे नातेवाईक व मैत्रीण असल्यामुळें आपणालाहि लागून आपण होरपळून जातों कीं काय, अशी भीति नीलकंठराव व मालती यांनां पडली. त्यांतूनहि मालतीला ताराबाईचें असें भाग्य उदय पावल्याचा आनंदच होत असल्यामुळें, माईसाहेब जी एकसारखी ताराबाईवर शिव्यांची लाखोली वाहूं लागल्या होत्या, ती मालतीच्या कानांनीं ऐकवेना. म्हणून हा आगीचा डोंब थोडासा थंड होईपर्यंत आपण जरा माहेरीं पळ काढावा यांत जास्त शहाणपणा आहे, असा तिचा विचार झाला, व नीलकंठरावांनांहि तो पोक्तपणें पसंत पडला. इतकेंच नव्हे, तर त्यांनांहि आपल्या श्वशुरांनां भेटण्याची अनिवार इच्छा त्याचवेळीं उत्पन्न झाली !

# तात्पर्य काय ?

आजच्यासारख्या आनंदाच्या समयाला मालतीसारखी लहानपणापासूनची मैत्रीण भेटली, व तिचा बरेच दिवस सहवासहि होणार, ह्मणून ताराबाईला दुधांत साखर पडल्याप्रमाणें झालें. परंतु मालतीबरोबर तिचा नवराहि आला, व तो वेळींअवेळीं मुद्दाम संधि उत्पन्न करून भय्यासाहेबांनां सलामी देऊं लागला, व अचरटपणानें त्यांची वाखाणणी करूं लागला, म्हणजे घरचें थोडें असल्यामुळें हें व्याह्यांनीं घोडें धाडून दिलें कीं काय, असें ताराबाईला होऊन जाई. त्याचप्रमाणें रावबहादुरहि वारंवार " या आमच्या प्रांतांतून अगदीं अस्सल मोलवान रत्न आपण घेऊन चाललांहां, आतां तुमची आमची नेहमीं गणेशखिंडींत गांठ पडेलच, " असें मोठ्यानें हंसत म्हणत. हा सर्व अचरटपणा भय्यासाहेब फार धिम्मेपणानें सहन करीत. जर कधीं एकादे वेळीं अति झालें, म्हणजे ते वेडींवाकडीं तोंडें करीत, तरी तीं त्या दोघांचीं तोंडें आपणापासून फिरल्यानंतर करण्याची खबरदारी घेत !

प्रत्यक्ष घरांतच सीताबाई आणि राहिल्यासाहिल्याला त्यांच्या प्रियभागिनी रमाबाई या दोघींचा मारा तसल्याच प्रकारचा चालू असण्याची भीति होती. पण सुदैवानें त्या दोघीहि बहिणी भय्यासाहेबांनां इतक्या वचकून असत, कीं, त्या भाऊसाहेबांशीं जशा अचावचा बोलत रहात, तशा भय्यासाहेबांशीं बोलायची फारशी छाती करीत नसत.तरी जेव्हां कधीं बोलण्याचा त्या हिय्या करीत, तेव्हां तें कांहींतरी अजागळपणाशिवाय फारसें निराळें नसे, हें सांगावयाला नकोच. असल्या मंडळींशीं भय्यासाहेबांचा फारसा सहवास न होतां तो आनंदराव, भाऊसाहेब, शांताक्का व मालती यांच्याशींच व्हावा, अशी ताराबाई होतां होईल तों तजवीज करी; व या सर्व खटपटी कराव्या लागत असल्यामुळें मागणी स्वीकारून लग्न लागण्यापर्यंतच्या अत्यंत सौख्यदायक काळाचें तिचें बरेंचसें स्वारस्य हिरावून जाई, यांत शंका नाहीं. परंतु एकदां आपण दिलबहारला गेलों, म्हणजे ही सर्व मंडळी—बरीबाईट कशी कां असेना, पण ही सर्व आपली मंडळी—आपणाला फारशीं भेटणार नाहींत, या विचारानें हल्लीं ताराबाई त्यांजवर राग करीत नसून, होईल तितकें करून सर्वांनां सुख होईल अशा योजना बसवीत असे, व एकंदरींत तिच्या योजनांचा उपयोगहि बराच होई.

---

# आजपासून पन्नास वर्षांनीं !

## प्रकरण एकसष्टावें.

### सर्वांविषयीं.

आज पांचसात वर्षें ज्या गोष्टीचा सीताबाईंनां अगदीं निदिध्यास लागून राहिला होता, तीं शांतातारावाईंचीं लग्नें ज्या दिवशीं लागून त्या दोघी आपापल्या घरीं गेल्या, त्या दिवसाचा सीताबाईंचा आनंद काय सांगावा ! त्यानंतर त्या किती अभिमानानें आनंदभुवनांत जात, व तेथें बिनीवाल्यांच्या घरच्या व विशेषेंकरून बिनीवालीणबाईच्या वैभवाच्या गोष्टी सांगत बसत, त्याची वाचकांनां सहजच कल्पना करतां येईल. अशा तऱ्हेनें परमेश्वरानें त्यांच्या मनांतली अत्यंत आवडती गोष्ट त्यांच्या कल्पनेच्याहि पलीकडे उत्तम बहारीनें घडवून आणल्यानंतर तरी त्यांनां पूर्ण समाधान प्राप्त होऊन त्यांच्या जीवाची नेहमींची धांदल नाहींशी झाली, व त्या शहाण्या होऊन अचरटपणा करीनातशा झाल्या, असें जर आम्हाला वास्तविक वर्णन करतां आलें असतें, तर कितीतरी बहार झाली असती ! बाकी, असली बहार त्यांचे पतिराज आनंदराव यांनां कितपत मानवली असती, याची शंकाच आहे ! दररोज हुकी येईल तेव्हां चेष्टा करण्याला अनायासानें मिळालेलें हुकमी माणूस अशा तऱ्हेनें नाहींसें होऊन, चेष्टा करून आनंद मानण्याला घरांत कोणीच नाहीं, असा प्रसंग त्यांनां फारच दुःसह झाला असता. परमेश्वराच्या कृपेमुळें तेवढी दुर्धर पाळी त्यांच्यावर न येतां, सीताबाई अजूनहि इतके दिवसांप्रमाणें अचरट, गडबड्या व सदा नवऱ्यावर नाखुश अशाच जन्मभर राहिल्या !

आनंदरावांनां तारी गेल्यापासून घरांत फार चुकल्याचुकल्यासारखें होई. कधीं कोणच्याहि कारणानें घर सोडून बाहेर न जाणारे आनंदराव वारंवार तारीकरितां घर सोडून जात, व बहुतकरून अगदीं बिलकूल अपेक्षा नाहीं अशा वेळीं अकस्मात् जाऊन दिलबहारमध्यें ताराबाईला चकित करीत, व तसें करण्यांत त्यांनां स्वतःला अतिशय आनंद वाटत असे.

भाऊसाहेब व शांताबाई यांनीं एक वर्षभरच आनंदभुवनांत मौजेनें काळ घालविला. सीताबाईरमाबाईंच्या इतक्या नजीकच्या टप्प्यांत कायमचें रहाणें भाऊसाहेबांच्याहि भिडस्त स्वभावाला आणि शांताबाईंच्याहि प्रेमळ अंतःकरणाला सोसेनासें झालें. ह्मणून भाऊसाहेबांनीं आपल्या दोघी बहि-

णींची फार दिवसांची इच्छा उत्तरहिंदुस्थानांतच एक मोठी इस्टेट खरेदी करून तृप्त केली. शांताबाईताराबाई यांच्यामध्यें फक्त शंभर मैलांचें अंतर राहिलें, तेवढें मोटारमधून दोघींनांहि दोन तासांत हवें तेव्हां तोडतां येई. त्यामुळें इतर सर्व सुखांबरोबर प्रेमळ बहिणीच्या सान्निध्याचाहि लाभ प्रत्येकीला मिळत असे.

हिराबाईहि आतां बहुतकरून कोणत्याना कोणत्यातरी थोरल्या बहिणी-जवळ राहत असे. तिचा स्वतःच स्वभाव वाईट नव्हता, परंतु तिची बुध-प्रकृति होती. जोंवर ती सुंदरच्या कक्षेंत असे तोंवर सुंदरच्या नादानें तिच्याहि-वर ताण करण्यास शिकली होती. हल्लीं ती संगति सुटून दोघीहि शहाण्या समजुतदार बहिणींच्या नजरेखालीं आल्यामुळें पूर्वींचा तिचा स्वैच्छपणा बराच कमी होत जाऊन ती खरोखरच नीट रीतीनें आपलें मन सुसंस्कृत करूं लागली होती. मधुनमधून सुंदर तिला पत्र पाठवून आपणाकडे येण्याचा आग्रह करी, पण आनंदराव आतां ती गोष्ट बिलकूल ऐकत नसत.

आतां शांतिसदनांत काय ती एकटी मथुरीच राही. प्रथम आपला अभ्यास व बाजा सोडून खालीं दिवाणखान्यांत येऊन बसावयाला ती नाखुष असे. पण सीताबाईंनां एकटीला करमेनासें होऊं लागलें, त्यामुळें ती खालीं आली नाहीं तर त्याच स्वतः वर तिच्या खोलींत जाऊन बडबडत बसत. त्यापेक्षां आपणच खालीं जाणें तिला पसंत पडूं लागलें. शिवाय आतां शांतातारा नसल्यामुळें पदोपदीं त्यांच्याशीं तिची तुलना झाल्यामुळें हिरमुसलें होण्याचाहि प्रसंग पूर्वींप्रमाणें फारसा येत नसे, व तिच्याशिवाय दुसरी सोबत नसल्यामुळें सीताबाईहि तिच्याशीं नीट राहून तिची एकप्रकारें मनधरणी करीत, म्हणून तिचा आतां पूर्वींपेक्षां अभ्यास फार कमी होऊन निवळ पुस्तकी घोकंपट्टीपेक्षां व्यवहारज्ञान प्रत्यक्ष मिळूं लागल्यामुळें, तिच्यांत बरेंच तारतम्य येऊं लागलें आहे कीं काय, अशी आनंदरावांनां पुष्कळदां शंका उत्पन्न होऊं लागली. तरी अजूनहि कोणचीहि साधी गोष्ट घडली, तरी तीपासून रगडसें तात्पर्य व पुष्कळसा पुस्तकी पाठ केलेला बोध कोणचा घेण्या-सारखा आहे, तो ती खडाखड तोंडपाठ ह्मणून दाखविण्यांत सहसा चुकत नसे !

नागेशराव व सुंदर यांच्यामध्यें या दोन्ही लग्नांपासून फरक इतकाच झाला, कीं, दोघीहि बहिणी श्रीमंत आहेत असा धीर आल्यामुळें सुंदर

पूर्वींपेक्षांहि जास्त बेताल खर्च करूं लागली. आतां आपल्या सगळ्या यच्चयावत् लबाड्या ताराबाईला समजतील अशी नागेशरावांनां खात्री होऊन चुकली; पण तशाला ते काय डरतात ? त्यांनां उलट अशी आशा उत्पन्न झाली, कीं, आतां भय्यासाहेबांजवळ आपला एक नवीन बळकट वशिला लागू झाला; त्यामुळें अजूनहि चणकापुरचे इनामदार बनण्याची त्यांनीं दीर्घ उमेद नवीनच बांधली. सुंदरनें ताराबाईला जें अभिनंदनपर पत्र लिहिलें, त्यावरून तिच्या मनाचा बराच अंदाज होण्यासारखा आहे, म्हणून तें येथें देणें जरूर आहे.

" अत्यंत प्रिय तारातार्इला कृतानेक शिरसाष्टांग नमस्कार वि० वि०—

आपलें नशीब. इतकें उदयाला आल्याचें ऐकून फार आनंद झाला. आम्हां दोघांमध्यें जितकें प्रेम आहे, त्याच्या निम्म्यानें जरी तुम्हां दोघांमध्यें राहील, तरी तूं अत्यंत सुखी आहेस असें मी म्हणेन. इतकी तूं श्रीमंतीण बनलीस, तेंहि एक प्रकारें उत्तमच आहे. जेव्हां कधीं कांहीं तुला विशेष उद्योग नसेल, तेव्हां आमची आठवण करीत जा. कारण, आमच्यापाशीं प्रेमाची जरी लयलूट आहे, तरी कधींकधीं द्रव्याचा बराच तुटवडा पडतो. तो जर तूं यथाशक्ति भरून काढण्यास हातभार लावशील, तर आम्हीहि इकडून प्रेमाचें पार्सल तुजकडे जरूर पाठवून देत जाऊं. पण इतक्यांतच तशी सुरुवात करणें जर भय्यासाहेबांनां आवडणार नाहीं असें तुला वाटलें, तर कांहीं दिवस वाट पहावी लागली तरी आमची हरकत नाहीं. परमेश्वर तुला सदैव सुखी ठेवो. कळावें."

अर्थात्च ताराबाईचीहि इच्छा त्यांनीं नेहमींच तशी वाट पहात राहावें अशी असल्यामुळें, तिनें लवकरच पत्र लिहून आपण त्या बाबतींत भय्यासाहेबांजवळ कधीं रदबदली करणार नाहीं, असें स्पष्ट लिहून तिचा तो नाद संपवून टाकला. आपल्या स्वतःच्या चैनीच्या पदार्थांत काटकसर करून ती कधींकधीं बहिणीला कांहीं रकम पोंचवी, व शांताबाईहि तसें करी, पण असल्या तुटपुंजा मदतीनें तेथें काय कात होणार ? जास्त द्रव्य मिळण्याची आशा राहिली नसल्यानें नागेशरावांचें तिजवरील प्रेम हळुहळू थंडावत गेलें. तिचें मात्र त्यांच्यावर जास्त काळ टिकलें. नागेशरावांची दिलबहारला ेण्याची इच्छा अनेक प्रकारांनीं व्यक्त होत असतांहि भय्यासाहेबांनीं त्यांनां

कधीं तेथें पाय घालूं दिला नाहीं, परंतु सुंदरला येऊं देण्याला त्यांनीं कधीं हरकत घेतली नाहीं. पुढें नागेशरावांनीं कुचनैगडांतहि गुण उधळल्यामुळें तेथें त्यांनां तेथच्या नबाबसाहेबांचा फुकट पाहुणचार खात संस्थानच्या खर्चानें बांधलेल्या एका हवेशीर इमारतींत कांहीं काळ घालविण्यास मिळणार होता. परंतु ज्यांच्या वशिल्यानें ते प्रथम तिकडे गेले होते, त्यांच्या मोहबतीखातर तेथल्या एका बड्या अधिकाऱ्यानें त्यांनां आगाऊ सूचना पोंचविल्यामुळें त्या प्रसंगांतून ते जीव घेऊन धडपणीं संस्थानच्या हद्दीबाहेर कसेतरी निसटून आले. त्यांनीं आल्यापासून भाऊसाहेबांच्या घरीं जो तळ दिला, तो इतका दीर्घ काळ, कीं, अखेर भाऊसाहेबांनांसुद्धां कंटाळा येऊन ते त्यांनां आतां प्रयाण करण्याची सूचना करण्याचें बोलूं लागले. आणि केवळ शांताबाईच्या अत्याग्रहास्तव त्यांनीं बेळगांवाकडे एका संस्थानांत त्यांनां पुनः खासगीमध्यें चिकटवून दिलें !

भय्यासाहेबांच्या लग्नानें कमलिनी त्यांच्यावर खूपच नाराज झाली; पण आतां त्याला इलाज काय, असा पोक्त विचार करून दिलबहारला जाण्याचें मुळींच बंद करून घेण्यापेक्षां तेथें कधींकधीं जाऊन तेथला पाहुणचार घेणें तिला जास्त प्रशस्त वाटलें. म्हणून तिनें मूग गिळून हळुहळू शांतावहिनीबरोबर दिलबहारांत जाण्याचा प्रघात सुरू करून तेथेंहि सरलादेवींच्या जास्त कच्छपीं लागून व ताराबाईचीहि यथास्थित हांजीहांजी करून पूर्वीं तिच्या अनेकदां केलेल्या कुचाळ्यांचें रगड प्रायश्चित्त घेऊन टाकलें.

सरलादेवीचें ताराबाईशीं अत्यंत प्रेम जुळून गेलें. आजपर्यंत कोणी नीट वाटेला लावणारी स्त्री तिला मिळाली नसल्यामुळेंच ती इतकी भिडस्त व लाजाळू आणि त्यामुळें जराशी हुशारींत कमी अशी राहिली होती; पण आतां ताराबाईच्या सहवासानें ती रगड सांवरली. आपण ज्यांच्याशीं अतिशय अदबीनें जपून भीतभीत वागत आलों, त्या भय्यासाहेबांशीं ताराबाई इतक्या सलगीनें व इतक्या बरोबरीच्या अधिकारानें कशी वागते, याचें तिला प्रथम फार आश्चर्य वाटूं लागलें, व हळुहळू तिनें त्यांची चेष्टाहि करण्यापर्यंत मजल आलेली तिच्या दृष्टीला पडली, तेव्हां तें वर्तन भय्या-साहेबांनां कसें खपतें याचा तिला प्रथम फार अचंबा वाटला. परंतु दिवसें-दिवस तिला जसजसा शहाणपणा येऊं लागला, तसतशी तिची समजूत

पटूं लागली, कीं, अगदीं पाठीला पाठ लावून आलेली जरी बहीण असली, तरी ती भावाशीं जितक्या मोकळयापणानें सलगी करूं शकेल, त्यापेक्षां किती तरी जास्त प्रतीची सलगी तो भाऊ आपल्या प्रत्यक्ष बायकोला आपणाशीं करूं देईल. त्याचप्रमाणें तिला हेंहि समजून आलें, कीं, भावाचें बहिणीवर किती जरी अलोट प्रेम असलें, तरी त्या प्रेमाच्यापेक्षां कितीतरी अधिक प्रेम त्याचें आपल्या बायकोवर असणें साहजिकच असतें. ही सरळ गोष्ट सरलादेवी लवकर शिकल्यानें त्या नणंदाभावजयांत कधींहि वितुष्ट आलें नाहीं, व भय्यासाहेबांनांहि कधीं त्रास झाला नाहीं. हीच गोष्ट जगांतील सर्व नणंदा जर शिकून घेतील, तर या जगांतील किती तरी धुसफुस कमी होऊन बहीण-भावंडांचें प्रेमहि वृद्धिंगत होईल.

आपल्या भाच्यानें आपला हुकूम मोडून ताराबाईशीं लग्न केल्याबद्दल माईसाहेब त्याजवर पराकाष्ठेच्या संतापून गेल्या, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. भय्यासाहेबांच्या पत्राला त्यांनीं जो जबाब पाठविला, त्यांत त्यांनीं आपला स्पष्टवक्तेपणा इतका खच्चून भरून टाकला होता, व त्यांत विशेषेंकरून ताराबाईवर इतकें यथेच्छ तोंडसुख घेतलें होतें, कीं, भय्यासाहेबांनीं त्याचक्षणीं त्यांचें नांवहि घेण्याचें टाकून दिलें. पुढें कांहीं दिवसांनीं ताराबाईच्या विशेष आग्रहाप्रीत्यर्थ त्यांनीं मामींशीं सलोखा करून घेण्याची इच्छा प्रदर्शित केली, व बराच वेळ नसते आढेवेढे घेऊन व ओढूनताणून चंद्रबळ आणून माईसाहेबांची खप्पा झालेली मर्जी जराशी ताळ्यावर आली. त्यांचा हेतु भाच्याशीं वास्तविक सलोखा करण्याचा असो, अथवा त्याची बायको दिलबहारांत कशी काय वागणूक ठेवते तें प्रत्यक्ष पाहण्याची त्यांना इच्छा झाली असो, अखेर ज्या दिलबहारला ताराबाईचा विटाळ होईल असें त्यांनीं निक्षून सांगितलें होतें, त्या दिलबहारला ताराबाईच्यापेक्षां आणखी तिच्या मावशीमामींचाहि अतिविटाळ झालेला असूनहि, आपल्या डोळयांवर कांतडें ओढून, श्रीमंत माईसाहेब एकदांच्या भाच्यांच्या निमंत्रणाला मान देऊन दिलबहारांत येऊन आठआठ दिवस राहूं लागल्या.

## सर्वांविषयीं.

भय्यासाहेबांचा वसंतराव केळकर व त्यांची पत्नी यांच्याशीं जास्त दृढ परिचय होत जाऊन एकमेकांचें प्रेमहि वाढत गेलें. परस्पराशीं आपला पुनः संबंध घडून येण्याला मुख्य कारण केळकरमंडळी झाली होती, ही गोष्ट भय्यासाहेब व ताराबाई नेहमीं लक्ष्यांत बाळगीत असत, व सध्यां आपण जें अनुपम सुख उपभोगीत आहोंत,त्याला बहुतांशीं तीं दोघें कारणीभूत झालेलीं होतीं, याबद्दल त्यांनां धन्यवाद देत असत.

